# शुद्ध मराठी कोश.

हा ग्रंथ

विष्णु रामचंद्र बापट

व

बाळकृष्ण विष्णु पंडित

यांनीं करून

पुणें येथें

'जगद्धितेच्छु' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

प्रसिद्ध कर्त्यांनीं सर्व हक्क स्वाधीन ठेविले आहेत.

सन १८९१.

किंमत १॥ रुपया. ट. ख. ८४.

कैलासवासी परशुरामपंत तात्या पंडित गोडबोले

यांनीं मराठी भाषेच्या उन्नतीकरितां जे अव्याहत श्रम केले त्यांचे स्मरणार्थ हा कोश ह्याच्या कर्त्यांनीं त्यांस समर्पित केला आहे.

# प्रस्तावना.

भाषेच्या संपन्नतेचें ज्ञान तिच्यांत अनेक विषयांवर असलेले ग्रंथ, तिचें निर्विवाद व्याकरण व तिचा कोश यांनीं होतें. त्यांत विशेषेंकरून अनेक विषयांचे प्रतिपादक ग्रंथ ही तिची मुख्य संपत्ति होय. निर्विवाद व्याकरण ही तिची कसोटी, व कोश हा तिचा—क्वचित् अस्ताव्यस्त व क्वचित् यथाविभाग—कोश अथवा खजीना. ह्या तीनही उपकरणांनीं युक्त अशी, या भरतखंडांतील अनेक भाषांत, एक संस्कृत भाषाच केवल होती व आहेही. प्रस्तुत काळीं 'आहेही' हें ह्मणणें ह्मणजे अतिवयस्क मनुष्याशीं किंवा अति लहान अर्भकाशीं सुंदर नवयुवतीचा समागम आहे असेंच ह्मणणें होय; कारण, जसे ते दोघेही तिच्या उपभोगाचे अपात्र, तसेच हल्लींचे भरतखंडवासी लोक संस्कृत भाषेच्या उपयोगाचे अपात्र. सारांश काय कीं, संस्कृत भाषा सर्वैश्वर्यसंपन्न असून तिचा मार्मिक भोक्ता राहिला नाहीं. असो. संस्कृत भाषेंत अनेक विषयांवर ग्रंथ आहेत, तिचें व्याकरण निर्विवाद आहे व तिचा कोशही व्यवस्थितपणें संपूर्ण भरला आहे.

सदरीं सांगितलेली स्थिति भरतखंडांतल्या इतर भाषांची तर काय परंतु आशिआखंडांतल्या कोणत्याही भाषेची नाहीं असें ह्मटल्यास चूक होईल असें आह्मास वाटत नाहीं. तशा स्थितींत असून सांप्रत चालू असलेल्या भाषा यूरोपखंडांत सांपडतील; परंतु त्याही चारपांचच.

यावरून हें लक्षांत येईलच कीं पुढील शब्दसंग्रह ज्या भाषेचा आहे ती ह्मणजे मराठी भाषा वर सांगितल्या लक्षणानें पहातां संपन्न नाहीं. ह्या आमच्या ह्मणण्याच्या खरेपणाच्या प्रतिपादनार्थ दूर जाणें नलगे: इच्यांत किती विषयांवर किती ग्रंथ आहेत, इचें व्याकरण किती पूर्ण आहे व इचा कोश कसा व केवढा आहे याचा विचार केला ह्मणजे पुरे आहे.

त्यांत पहिला विचार मराठींत असलेल्या ग्रंथांचा. ग्रंथांचे विभाग दोन तऱ्हांनीं करितां येतात. एक त्यांतील विषयांसंबंधाचा व दुसरा त्यांच्या गद्यपद्योभयविधत्वसंबंधाचा. यांशिवाय उभयसाधारण एक तिसराही विभाग आहे. तो कोणता ह्मणाल तर कालकृत—प्राचीन किंवा अर्वाचीन. प्राचीन मराठी ग्रंथांकडे पहातां त्यांत वेदांताशिवाय कोणत्याही दुसऱ्या विषयावर असलेला ग्रंथ लक्षांत येत नाहीं*. त्या विषयाचें प्रतिपादन तरी सर्वत्र पद्यमय आहे. हें प्राचीन विविधविषयप्रतिपादक ग्रंथांविषयीं झालें. आतां प्राचीन गद्य-

---

* सर्वथा 'नाहीं' असें ह्मणण्यास थोडे अपवाद आहेत, परंतु ते इतके थोडे आहेत कीं सदरीं दिलेल्या शेऱ्यास ते प्रतिकूल होणार नाहींत. ते अपवाद ह्मणजे—क्वचित् वैद्यक व शालिहोत्र यांतील हस्तलिखित अस्ताव्यस्त चुटके, वामन पंडितकृत भर्तृहरीच्या नीतिशतकाचें रूपांतर, व ऐतिहासिक मोडी लिपींत लिहिलेल्या (व ज्यांतील बहुतेकांचा जीर्णोद्धार **काव्येतिहाससंग्रह**द्वारा नुकताच झाला) अशा बखरी. ह्यांपैकीं बखरींशिवाय बाकी सारे पद्यमय आहेत.

पद्योभयविध ग्रंथांविषयीं पहातां केवळ गद्यात्मक व गद्यपद्यात्मक असे ग्रंथ मुळींच नाहींत. पद्यात्मक मात्र बरेच प्रसिद्ध आहेत व अजूनही प्रसिद्ध होत आहेत. हे बहुतेक राम, कृष्ण, पांडव इत्यादींच्या पराक्रमाचें वर्णन करणारीं काव्यें आहेत. पाश्चात्य अपूर्व ज्ञानसूर्याचे किरण पूर्वेकडे अळकूं लागल्यापासून मात्र मराठी व इतर देशभाषांत अनेकविषयमकरंदमय कांहीं ग्रंथकमलें विकसलीं, विकसत आहेत व उत्तरोत्तर अधिकाधिक विकसतील अशी आशा आहे असें महास्वदेशभाषाभिमानीही निर्विवाद कबूल करितील. अर्वाचीन ग्रंथांत नानाविध विषयांचे प्रतिपादक ग्रंथ गद्यघटित व काव्यग्रंथ पद्यघटित व गद्यपद्यघटित आहेत हें सांगणें नलगे.

अर्वाचीन ग्रंथांचे विविधविषयप्रतिपादक व काव्यनाटकें असे दोन ग्रंथ विभाग करितां येतात. त्यांत विविधविषयप्रतिपादक ग्रंथांत बहुतेक पाश्चात्य ग्रंथांचीं भाषांतरेंच आहेत; व त्यांत मानसिक उन्नति करणारे ह्मणजे तर्कमीमांसादिविषयप्रतिपादक ग्रंथ तर आमच्या बिलकूल पहाण्यांत नाहींत. ही शोचनीय उणीव कधीं भरून येईल तो येवो! सदरहूप्रमाणेंच काव्यनाटकादि ग्रंथांची स्थिति आहे. परंतु ती तितकी शोचनीय आहे असें नाहीं; कारण, त्यांपैकीं कांहीं त्यांच्या कर्त्यांनीं स्वतःच्या कल्पनेनें केलेलीं आहेत. व कित्येक तर विषयविशेषप्रतिपादकही आहेत. एतावता मराठी भाषेंतील ग्रंथसंग्रह फार थोडा आहे. तो योग्य रीतीनें मोठा होईल तो सुदिन!

आतां मराठी व्याकरणाविषयीं. कै० बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांच्या आद्य **बालव्याकरणा**पासून तों अगदीं नवीन झालेल्या **प्रौढबोधा**पर्यंत मराठी भाषेच्या व्याकरणाचीं पुस्तकें आमच्या पहाण्यांत आहेत. परंतु ह्यांतील कित्येक शुद्ध संस्कृत व्याकरणाचें अनुकरण करणारीं व कित्येक शुद्ध इंग्रजी व्याकरणाचें अनुकरण करणारीं आढळतात. व कित्येकांतला विषयप्रतिपादनाचा मनमोक्त प्रकार पाहून तर हसूंच येतें. मराठी भाषेची पीठिका व तिला किती दायांनीं आपल्या शब्दरूपी दुग्धानें पुष्ट केलें आहे, ह्याचें पूर्ण ज्ञान करून घेतल्याशिवाय त्यांनीं तिचें व्याकरण लिहिण्याचें साहस केलें, ह्मणूनच त्यांच्या हातून प्रमाद घडले ह्यांत संशय नाहीं. तथापि इष्ट वस्तूच्या अत्यंत अभावापेक्षां तिचा अल्पांश मिळाला तरी तो अभिनंदनीयच आहे, या न्यायानें पहातां सर्वच मराठी व्याकरणाचीं पुस्तकें ग्राह्य ह्मटल्यास चालेल. त्यांतूनही गुणाच्या मानानें पहातां कै० बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें **बालव्याकरण** व कै० गंगाधर शास्त्री टिळक यांचें लघुव्याकरण हीं थोडक्यांतल्या थोडक्यांत चांगलीं होतीं असें ह्मटल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं व तीं लुप्तप्राय झालीं व त्यांच्या पुनः आवृत्ति निघत नाहींत हें पाहून वाईट वाटतें. असो.

सदरीं लिहिल्याप्रमाणें मराठी भाषेची पीठिका व तिला कोणकोणत्या दायांनीं आपल्या शब्दरूपी दुधानें पोषिलें हें जाणून लिहिलेलें एकच व्याकरण आमच्या पहाण्यांत आहे. तें कै० कृष्ण शास्त्री गडबोले यांनीं केलेलें होय. आमच्या मतें एवढें मात्र व्याकरण

चांगलें आहे. कारण, ह्यांत मराठी भाषेंतील त्या त्या शब्दांची व्युत्पत्ति चांगली दिली असून तदनुसार नियम बांधले आहेत, व व्याकरणसंबंधी सर्व विषयही यांत आहेत.

दुर्बोधत्वाचा आरोप ह्या व्याकरणावर कोणी आणितात; परंतु ज्याप्रमाणें नावेंतून पैलतीरास जावयाचें आहे त्यास तिचे हिसके सोसावे लागतात त्याप्रमाणेंच व्याकरणाब्धिपारंगत होण्यास त्याच्या दुर्बोधत्वाचे हिसके सोसले पाहिजेत.

तिसरें उपकरण कोश. प्रस्तुत पुस्तक कोशाचें असल्याकारणानें त्यासंबंधें थोडें तपशीलवार लिहिणें इष्ट दिसतें. कोशाची पद्धति अगदीं प्रथम भाषांमध्यें श्रेष्ठत्व पावलेल्या संस्कृत भाषेंत सुरू झाली. हें कशावरून हा आक्षेप पुढें येणारच; त्यास हल्लीं चालू असलेल्या कोशपद्धतीच्या इतिहासाचें आविष्करण हेंच उत्तर होय. हें आविष्करण योग्य स्थळीं होईलच. संस्कृत भाषेंत ५६ कोश आहेत असें ह्मणण्याची रूढी पूर्वापार आहे. परंतु ह्या संख्येपेक्षां कोशांची संख्या जास्त असावी असें आमचें अनुमान आहे. ह्या कोशांची व्यवस्था हल्लींच्या कोशांतील व्यवस्थेप्रमाणें वर्णानुक्रमानें केलेली नाहीं. वेगळाल्या विषयांच्या संबंधानें शब्दांचें वर्गीकरण त्यांत केलें आहे व त्यांस स्वर्गवर्ग, मनुष्यवर्ग, वनौषधिवर्ग, वैश्यवर्ग इत्यादि नांवें दिलेलीं आहेत. ह्यांत तत्तद्वर्गीय शब्दांचा संग्रह असतो. क्वचित् आद्यंत वर्णावरूनही शब्दांचें परिगणन असतें. असल्या कोशांच्या रचनेचा काल भारतवर्षीय राजांच्या व विद्यांच्या ऱ्हासाबरोबरच झाला. त्याचें पुनरुज्जीवन बऱ्याच वर्षांत झालें नाहीं. पुढें बराच काळ लोटल्यानंतर मराठी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज ह्यांनीं स्वराज्य स्थापिल्यावर तो काळ पुनः डोकावूं लागला. तेव्हांपासून पेशव्यांच्या राज्याच्या अखेरीपर्यंत कांहीं विद्वद्रत्नें भरतभूमीच्या पोटीं निपजलीं. त्यांनीं संस्कृत व प्राकृत ग्रंथरचना बरीच केली. त्यांत अशा तऱ्हेचा एकच ग्रंथ आलेला पहाण्यांत येत आहे; तो पंडित रघुनाथरायकृत **राजव्यवहारकोश** होय. हा कोश हल्लीं छापला असल्यामुळें पुष्कळांस माहित असेलच.

पेशव्यांचे राज्याचा वारसा दुसऱ्या बाजीरावानें सोडून दिल्यापासून दक्षणेंत इंग्रजांचा अम्मल झाला. राजकीय अमलाबरोबर इंग्रजी विद्याकलांनींही आपला अंमल सुरू केला. जसजसा हा अंमल जारी झाला तसतसें पाश्चात्य विद्याकळादिकांच्या इतिहासाचें ज्ञान वाढत गेलें. त्या इतिहासावरून असें स्पष्ट दिसतें कीं हल्लीं भूगोलाच्या बऱ्याच अंशावर बोलली व लिहिली जाणारी व त्यामुळेंच भूगोलांतल्या सर्व भाषांपेक्षां श्रेष्ठत्व पावलेली अशी जी इंग्रजी भाषा त्या भाषेंतला पहिला कोश डा० जानसन नांवाच्या महापंडितानें तयार केला; व डा. जानसनचा इंग्रजी भाषेचा कोश पाहूनच युरोपांतील इतर राष्ट्रांनींही आपआपल्या भाषांचे कोश तयार करविले. ह्यावरून संस्कृत भाषेंतच प्रथम कोश झाले होते हें आमचें सदरचें ह्मणणें सिद्ध होतें.

डा० जानसनच्या कोशाप्रमाणें संस्कृत भाषेचे कोश वर्णानुक्रमबद्ध—व ह्मणूनच पहाण्यास अति सुलभ—नव्हते, हें खरें; परंतु संस्कृत शब्दसंग्रह शिकण्याची पद्धति इंग्रजी तऱ्हेची न-

व्हती. अथपासून इतिपर्यंत समग्र कोशाचें अध्ययन पूर्वीच्या विद्यार्थ्यांस होत असे, व त्यामुळें पाहिजे तो शब्द अर्थासुद्धां आठविण्यास प्रयास पडत नसत. इंग्रजी विद्येच्या प्रसाराबरोबर तद्विशिष्ट अध्ययनाची रीति पसरल्यापासून मात्र त्या कोशांचा उपयोग कमी होऊं लागून वर्णानुक्रमबद्ध कोश इकडेही होऊं लागले. ही गोष्ट अभिनंदनीयच झाली. त्यांतही विशेषेंकरून संस्कृतेतर भाषांच्या संबंधानें फारच अभिनंदनीय. कारण ह्यांत मूळचे कोश मुळींच नाहींत.

अशा रीतीनें हिंदुस्थानांतील बहुतेक चालू असलेल्या भाषांचे कोश झाले, व आमच्या मराठी भाषेचेही कांहीं कोश झाले. ह्या कोशांपैकीं पहिला मायाळू इंग्रज सरकारानें अनेक शास्त्र्यांकडून करविलेला "महाराष्ट्र भाषेचा कोश" होय. हा कोश शुद्ध मराठीच आहे, ह्मणजे मराठी शब्दांस मराठीच अर्थ दिले आहेत. ह्यांत कोठें कोठें शब्दांची व्युत्पत्ति व व्याकरण हीं दिलेलीं आहेत, परंतु शब्दांस प्रतिशब्द दिलेले थोडेच सांपडतील. बहुतकरून व्युत्पत्तींचे शास्त्रीय रीतीनें अर्थ लिहिले आहेत. उदाहरणार्थः—

"प्रकार, पुं० सं० सर्व पदार्थांचें भिन्नभिन्नत्वेंकरून ज्ञान होण्यास त्या त्या पदार्थांचे ठायीं भेदक जो धर्मविशेष असतो तो. तत्तत्पदार्थविशेष्यक ज्ञानाच्या ठायीं विशेषणत्वेंकरून भासतो तो; २, प्रकारभेदानें भिन्न भिन्न जे पदार्थ ते प्र०; उ० दोन चार प्रकारचीं वस्त्रें घेऊन ये, वरांत चार प्रकार असले ह्मणजे उपयोगीं पडतात.

भाविक, ३ लिं० देव, गुरु, औषध, इ० कांपासून बरें होतें इ० जें त्याचें माहात्म्य लोक शास्त्रांत सांगतात त्याजवर ज्याचा मनःपूर्वक विश्वास असतो तो.

शोध, पु० कोणक अर्थ कोठें आहे कसा आहे इ० रूप ज्ञान होण्याकरितां तत्संभावित स्थलाचें किं० त्या अर्थाचें त्या त्या नेत्रादि इंद्रियांनीं जें पर्यालोचन तो आणि तेणेंकरून तो अर्थ अमुक ठिकाणीं आहे कीं नाहीं किं० अमुक प्रकारचा आहे इ० रूप होतें जें ज्ञान तो; २ लिहिण्यांत चुकलेलीं अक्षरें तीं ज्या स्थलींचीं चुकलीं त्या स्थलीं काकपद, इ० खूण करून अन्यत्र लिहितात तो."

आधारभूत दुसरा कोश नसतां त्यांनीं केलेला हा कोश फारच चांगला आहे व त्याचा उपयोगही पुष्कळच होण्यासारखा आहे हें आम्ही प्रांजळपणें कबूल करितों. परंतु ह्या कोशानें दुसरी किंवा त्याहून पुढची एखादी आवृत्ति बघितली नाहीं असें अनुमान होतें; कारण त्याचीं पुस्तकें फारच क्वचित् पहाण्यांत येतात. एवढ्या खर्चानें व मेहनतीनें तयार झालेला ग्रंथ पुनः कां छापला गेला नाहीं हें आह्मांस समजत नाहीं. असो.

ह्याच्या मागून तयार झालेला कोश ह्मटला ह्मणजे मोल्स्वर्थ साहेबांचा होय. हाही त्याच्याच तोडीचा आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्यांत शब्दांचे अर्थ इंग्रजी भाषेंत दिलेले आहेत. त्यामुळें तो निव्वळ मराठी जाणणारांच्या उपयोगीं पडत नाहीं. ह्यांत कांहीं दोष आढळतात, परंतु परस्थानें परदेशीय भाषेचें अध्ययन करून केलेल्या ग्रंथरचनेचें तें गालबोट आहे असें ह्मटलें पाहिजे.

तिसरा मराठी कोश कै० रघुनाथ शास्त्री गोडबोले यांनीं केलेला. हा प्रथम कोशाचा

कांहीं शब्द वर्ज करून उतारा आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हें त्याच्या कोशाच्या प्रस्तावनेंतल्या पुढील भागावरून स्पष्ट होतें:—" कोणी असें ह्मणेल कीं, पूर्वीचा एवढा मोठा कोश हातांत वागविण्याजोगा लहान झाला कसा ? तर असें समजावें कीं पूर्वीच्या कोशांत ज्यांचा नेहमींच्या भाषणांत उपयोग नाहीं असे फार अवघड जे शास्त्रीय संस्कृत शब्द होते ते व ज्यांचा अर्थ सहज मनांत येतो असे लाक्षणिकार्थावांचून असलेले साधारण मराठी शब्द ते, हे सर्व गाळून टाकल्यामुळें हा कोश हातांत वागविण्याजोगा झाला आहे." ह्या कोशाशिवाय त्यांनीं ज्ञानेश्वरी वगैरे प्राचीन ग्रंथ वाचणारांच्या उपयोगाचा हंस* नांवाचा दुसरा एक कोश केला आहे. तो मात्र सदरीं निर्दिष्ट केलेल्या कोशापेक्षां विशेष महत्त्वाचा आहे. ह्या दोन्ही कोशांच्या प्रती मिळत नाहींत.

ह्या शिवाय आणखी मराठी भाषेचे ३ कोश आहेत. ते तिनीही कमजास्त प्रमाणानें मोलस्वर्थच्या कोशाचे अनुकरणरूप आहेत. ते इंग्रजी न जाणणारांच्या उपयोगाचे नाहींत.

पूर्वी झालेल्या मराठी कोशांच्या सदरील विवेचनावरून ह्या कोशाच्या आवश्यकतेचा एक अंश ह्मणजे त्यांच्या दुर्मिळताजन्य मराठी कोशाचा अभाव लक्षांत येईलच. ह्या शिवाय मोरोपंतादि कवींचीं काव्यें वाचणारांस ( विशेषेंकरून हा प्रसंग इंग्रजी किंवा संस्कृत न जाणणारांस असतो ) प्रस्तुत कोशासारखें दुसरें साधन नसल्यामुळें प्रसंगविशेषीं सदरहू काव्यांचें वाचन सोडून द्यावें लागतें असा अनुभव आहे. हें जाणून व स्वतः अनुभवून आह्मीं ती अडचण काढून टाकावी ह्मणून प्रस्तुत कोश लिहिण्यास प्रारंभ केला व ईश्वरकृपेनें योग्य साहाय्य मिळून आह्मी आज मराठी शब्दार्णवांतून पार आलों आहों. मागच्यांत अमुक होतें किंवा नव्हतें याचा विचार करीत न बसतां हा ज्या रीतीनें लोकोपयोगी होईल असें आह्मांस वाटलें त्या रीतीचें ह्यांत अवलंबन केलें आहे. हा लोकाश्रयास कितपत पात्र होईल ह्याचें अनुमान करितां न आल्यामुळें शब्दांच्या व्युत्पत्तीची चिकित्सा जितकी करावयास पाहिजे होती तितकी केली नाहीं. उदाहरणार्थ—'सिंह' ह्या शब्दाची व्युत्पत्ति—'हिंस्' या धातूपासून हा शब्द निघाला व त्यांतील अक्षरांचा विपर्यास अमुक तऱ्हेनें झाला असें लिहून द्यावयास पाहिजे होती. त्याप्रमाणेंच 'महशूर' हा मूळ फारशी 'मशहूर' शब्दांचा अपभ्रंश आहे असें सांगावयास पाहिजे होतें. तथापि अमुक भाषेंतून हा शब्द निश्चयेंकरून आला हें मात्र (सं) (फा) इत्यादि संज्ञांनीं दर्शविलें आहे. असें करण्याचें व पूर्ण व्युत्पत्ति न देण्याचें कारण हें कीं केवळ शब्दार्थजिज्ञासूंस व्युत्पत्तीची अपेक्षा नसते व संपूर्ण व्युत्पत्ति दिली असती तर ग्रंथ फार प्रचंड होऊन त्याच्या ठिकाणीं दुर्वहत्व व बहुमूल्यत्व हे बाह्य दोष आले असते. वर सांगितलेल्या संज्ञांनीं निदान तो मूळ अमुक भाषेंतला शब्द आहे हें तरी समजेल.

हा कोश पहातांना कित्येक शब्दांपुढें (सं), (फा), इत्यादि संज्ञा सांपडणार नाहींत; तर हे शब्द कोठचे अशी शंका येईल त्यास ते शब्द देशी आहेत असें समजावें.

---

* हा कोश शास्त्रीबोवांचे शिष्यवर्गांपैकीं कोणी पुनः छापून प्रसिद्ध करतील तर त्यांत त्यांची गुरुभक्ति दिसून येईल व लोकोपयोग होईल.

(सं) ह्मणजे काय? (फा) ह्मणजे काय? व वर सांगितलेले देशी शब्द ह्मणजे काय? हें सांगणें अवश्य आहे. बहुतेक पाश्चात्य व तदनुरोधानें कितीएक इकडील विद्वानही असें ह्मणतात कीं हिंदुस्थानच्या वायव्य सीमेकडून आर्य लोक इकडे आले व त्यांनीं आपल्याबरोबर संस्कृत भाषा इकडे आणिली. त्याप्रमाणेंच महाराष्ट्री, मागधी, इत्यादि भाषा त्या त्या देशाच्या होत. हें त्यांचें ह्मणणें आमच्या मतें निर्मूल आहे. कारण महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी, पैशाची ह्यांचा समावेश प्राकृतांत होतो, व ही प्राकृत भाषा प्रकृति–संस्कृत–हिच्यापासून झाली. ह्याशिवाय देशीनाममाला ह्मणून जो जैनपंडित हेमचंद्र यांनीं केलेला कोश आहे त्यांतील शब्द मात्र कोणत्याही संस्कृत शब्दापासून निघाल्यासारखे दिसत नाहींत. ह्यावरून असें अनुमान काढितां येतें कीं तेवढे मात्र शब्द शुद्ध देशी होत. बाकीचे सारे संस्कृत किंवा संस्कृताचे अपभ्रंश होत. अशा ह्मणजे स्वरूपानें विद्यमान किंवा अपभ्रंशरूप शब्दांस (सं) ही संज्ञा दिली आहे, व देशी शब्दांबद्दल कांहीं लिहिलें नाहीं.

आतां (फा) किंवा (आ) संज्ञांविषयीं. मुसलमानांचा इकडे अंमल झाल्यापासून राज्यांतील अठरा कारखाने मुसलमानांच्या अधिकारांत असत. त्यामुळें सर्वत्र फारशी शब्दांचा उपयोग होऊं लागला. व मूळ फारशी लोकांवर आरबांचा अंमल असल्याकारणानें फारशींत तिच्या बरोबरीनें, किंबहुना ज्यास्तही, आरबी शब्द तींत मिळाले. फारशी कोश पहातां त्यांत अमुक शब्द आरबी व अमुक शब्द फारशी असें पृथकरण केलेलें आढळतें. ह्या गोष्टीस अनुसरूनच आह्मीही फारशीशब्दांपासून आरबी शब्द वेगळे काढले आहेत.

ह्या कोशांत शब्दांस देतां आले तितके मराठीच प्रतिशब्द दिले आहेत. "देतां आले तितके असें" ह्मणण्याचें कारण असें कीं शास्त्रीय पारिभाषिक शब्द, पशुपक्षी व लतावृक्षांच्या नांवांस प्रतिशब्द क्वचितच आढळतात म्हणून अशा ठिकाणीं पशुविशेष, वृक्षविशेष असें निरुपायास्तव ह्मटलें आहे. अशा ठिकाणीं त्या त्या पदार्थांचीं चित्रेंच काढून दाखवावयास पाहिजे होतीं, परंतु तसें करण्यास पैसे फार लागल्यामुळें ह्या कोशाच्या ग्राहकांवर अधिक बोजा पडता.

प्रारंभीं मूळ शब्द मोठ्या टैपांत देऊन त्यापुढें तो कोणत्या भाषेंतून आला आहे हें व त्याचें व्याकरण सांगून शेवटीं त्याचा अर्थ दिला आहे. एकाच शब्दाचे दोन, तीन, किंवा ज्यास्त अर्थ असल्यास २, ३ इत्यादि अंक घालून अर्थ दिले आहेत. त्याप्रमाणेंच त्या त्या अर्थांच्या अनुरोधानें त्या शब्दाचें व्याकरण बदलत असल्यास तें त्या त्या अर्थांच्या आंकड्यापुढें दिलें आहे.

पूर्वनिर्दिष्ट कोशांचा वर्णक्रम असा आहे कीं, अमुक शब्द अमुकच स्थळीं सांपडेल असें निश्चयानें सांगतां येणार नाहीं. तसा घोंटाळा आमच्या कोशांत बिलकुल नाहीं, हें आमच्या कोशांतील एखादें अक्षर समग्र वांचून पाहिल्यास सहज ध्यानांत येणार आहे. त्या व्यवस्थेबद्दल युक्तिवाद अप्रस्तुत होय.

हस्तपत्रकांत लिहिल्याप्रमाणें सरकारी कचेऱ्या व अदालतींतून चालू असलेल्या शब्दांची स्वतंत्र यादी जोडणार होतों परंतु पुष्कळ नोकरलोकांच्या अशा सूचना आल्या कीं आपली याद स्वतंत्रच प्रसिद्ध केल्यास फार चांगलें होईल: ह्मणून पहिला बेत रहित करून त्या यादींतील बरेच शब्द ह्याच कोशांत जागचे जागीं घातले व ती याद तिचें स्वतंत्र पुस्तक करण्यासाठीं तशीच ठेविली आहे. तींत न्यूनाधिक करून लवकरच प्रसिद्ध करूं.

चांगल्या शब्दांबरोबर वाईट शब्दही यांत आले आहेत, परंतु त्यासंबंधानें आमचा नाइलाज आहे. आह्माला कित्येकांनीं त्यासंबंधानें दोष लाविले त्यांस जें आह्मीं सांगितलें तेंच आमच्या कोशाचा उपयोग करणारांपैकीं ज्यांस वाईट शब्दांचा कंटाळा वाटेल त्यांकरितां लिहून ठेविलें पाहिजे. न्यायाधीश, इतिहासकार, वैद्यक ग्रंथकार, यथादृष्ट पदार्थांचा चितारी ह्यांची जी गत तीच कोशकाराची. न्यायाधीशापुढें खटला आला, मग तो चांगल्या मनुष्याचा असो अथवा वाईट मनुष्याचा असो अथवा दिवाणीचा किंवा खूनबलात्काराचा असो, कीं, त्याला पक्षपात न करितां न्याय केला पाहिजे. त्याप्रमाणेंच ज्या देशांतला रहिवासी इतिहासकार असेल त्या देशच्या लोकांच्या उत्कर्षाविषयीं किंवा अपकर्षाविषयीं तो यथाभूत वर्तमान लिहितो. उत्कर्षाविषयीं जोरानें लिहितो व अपकर्षाविषयीं मुळींच लिहीत नाहीं असें होत नाहीं. वैद्यक ग्रंथकाराची तर गोष्ट कांहीं विशेषच आहे. तो रक्त, मांस, अस्थि, श्लेष्मा, ह्यांचें तर काय पण याहूनही घाणेरडे पदार्थांचें विवरण यथास्थितपणें करितो. तीच गोष्ट चिताऱ्याची. एखाद्या वीर पुरुषाचें चित्र चितारी काढूं लागला तर तो वीर पुरुष कितीही सुंदर असला व त्याच्या चेहऱ्यावर एखादा व्राचा डाग असला तर तो चितारी 'अरेरे! ह्या सुंदर चेहऱ्यावर हा व्रण मी कसा काढूं!' असा विचार बिलकुल न करितां बेधडक त्या व्रणासुद्धां हुबेहूब चित्र उठवून देतो व त्या चित्राच्या मार्मिक पहाणारास अतिशय सुखवून टाकतो. त्यांच्या मालिकेंतीलच कोशकार. त्यांना शब्दांच्या बरेवाईटपणाबद्दल विचार करितां कामा नये. तो विचार त्या शब्दांचा उपयोग करणारे निबंधकार, कवि, इत्यादिकांनीं करावा. त्यांचे तारतम्याची जबाबदारी त्या त्या शब्दांचा प्रयोग करणारांकडे आहे.

ह्यांत मराठी भाषेच्या सांप्रतच्या स्थितींत चालू असलेले बहुतेक शब्द आहेत. ज्ञानेश्वरी वगैरे अति प्राचीन ग्रंथांत असलेले, व स्लेट, पेन्सिल, पोष्ट, टाईम, वगैरे इंग्रजींतून येणारे अशा शब्दांचा ह्यांत समावेश केला नाहीं. ह्याचें कारण हें कीं, ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथांतल्या शब्दांचा स्वतंत्र कोश आहेच; व इंग्रजी शब्द इंग्रजीभाषानभिज्ञही वापरतात, परंतु फारशी भाषेंतून मराठी भाषेंत आलेल्या शब्दांप्रमाणें त्यांची अद्यापि मराठींतले ह्मणून गणना होऊं लागली नाहीं.

प्रस्तुत कोश पंडितांस मान्य झाला ह्मणजे आह्मी आपणांस कृतार्थ समजूं व ईशेच्छेनें जमल्यास ह्यांत गाळलेले शब्द, शब्दांची संपूर्ण व्युत्पत्ति व स्थलविशेषीं चित्रें देऊन ह्याचाच विस्तार करण्याची उमेद आह्मास येईल.

---

## ह्या कोशांतील संक्षिप्त चिन्हांबद्दल सूचना.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ० | ,, | अकर्मक क्रियापद. | फा० | ,, | फारशी. |
| आ० | ,, | आरबी. | वि० | ,, | विशेषण. |
| उ० | ,, | उभयान्वयी अव्यय. | श० | ,, | शब्दयोगी अव्यय. |
| उ० वि० | ,, | उभयविध क्रियापद. | स्त्री० | ,, | स्त्रीलिंग. |
| क्रि० | ,, | क्रियाविशेषण. | स० | ,, | सकर्मक क्रियापद. |
| के० | ,, | केवळप्रयोगी अव्यय. | सर्व० | ,, | सर्वनाम. |
| न० | ,, | नपुंसकलिंग. | सा० | ,, | सामान्यलिंगी. |
| पु० | ,, | पुल्लिंग. | सं० | ,, | संस्कृत. |

# शुद्ध मराठी कोश.

## अ.

**अ**—हा प्रथम वर्ण व प्रथम स्वर आहे. ज्या शब्दाचे मागें हा असेल त्याचा अर्थ मूळशब्दाच्या उलट होतो; जसें ज्ञान व अज्ञान.

**अइसा**–स्त्री० विष्णूची स्त्री लक्ष्मी.

**अईन**–(फा) वि० निर्भेळ, निव्वळ. २ निचवंग, वृक्षविशेष.

**अउटकी**–स्त्री० साडेतीन संख्येचे पाढे.

**अऊत**–(सं) न० नांगर, अवजार, हळ.

**अक्कल**–(आ) स्त्री० बुद्धि, मति, शहाणपण, वकूब.

**अक्कलकारा–ढा**–(आ) पु० औषधविशेष.

**अक्कलवान**–(आ) वि० बुद्धिमान, धूर्त, ज्ञानी, हुशार.

**अक्ष**–(सं) पु० फासा. २ आंस. ३ कणा. ४ ध्रुव.

**अक्षक्रीडा**–(सं) स्त्री० फाशाची बाजी-खेळ. २ पु० जुव्वा.

**अक्षत**–(सं) वि० बिन छिद्राचा. २ पु० तांदुळ. ३ स्त्री० आमंत्रण.

**अक्षयी**–(सं) क्रि० अक्षी, नेहमीं, सदा, सर्वदा.

**अक्षर**–(सं) न० वर्ण, हरफ. २ वि० अव्यय. ३ स्त्री० विद्या. ४ लिपि.

**अक्षरमाला**–(सं) स्त्री० वर्ण व्यवस्था, मूलवण.

**अक्षरशः**–(सं) क्रि० एकूण एक, इत्थंभूत.

**अक्षरशत्रु**–(सं) पु० अविद्वान्, निरक्षर.

**अक्षांश**–(सं) पु० ध्रुवाचा भाग.

**अक्षि**–(सं) पु० डोळा, नेत्र, नयन.

**अक्षौहिणी**–(सं) स्त्री० सैन्यसंख्या वि०.

**अकड**–स्त्री० थाटमाट, डौल, अक्कड, ऐट.

**अकडी**–स्त्री० फुलें, फळें वगैरे तोडण्याची काठी.

**अकंटक**–(सं) वि० कांट्याशिवायचा, चांगला, साफ. २ शत्रूशिवाय.

**अकर्तृक**–(सं) वि० स्वयंभू, मूळचें, कुदरती.

**अकर्मक**–(सं) वि० व्याकरणांत ज्यास कर्म नाहीं तें क्रियापद.

**अकरका**–पु० अकरकींतला प्रत्येक पाढा.

**अकरकी**–स्त्री० अकरे अकरे एकवीसाशींपासून विशें विशें चारशेंपर्यंतचे पाढे.

**अकरमाशा**–वि० धर्मविरुद्ध कर्मापासून झालेला.

**अकरावा**–पु० हिंदु लोकांत मेलेल्या मनुष्याच्या अकरावे दिवशीं केलेला धर्म व तो दिवस.

**अकराळ विकराळ**–वि० भयंकर, भीतिप्रद, विलक्षण.

**अकरोड**–(सं) पु० वृक्षविशेष व त्याचें फळ.

**अकल्पित**–(सं) क्रि० अकस्मात, अवचित. २ वि० कल्पना ज्याची केली नाहीं तें.

**अकल्याण**–(सं) न० नाश, तोटा, नुकसान, खराबी.

**अकलेचा खंदक**–(आ) पु० दीडशहाणा, चतुरशाबाजी, मूर्ख.

**अकस्मात्**–(सं) क्रि० अकल्पित, अवचित, एकाएकी.

**अकस**–(आ) पु० द्वेष, दावा, चुरस.

**अकसाबोकशी**–क्रि० ढळढळां, मोठ्यानें, जोरानें.

**अकाबाई**–स्त्री० दुर्दैव, कमनशीब.
**अकाल–ळ**–(सं) पु० अवेळ, उशीर, दिरंग.
**अकृत्रिम**–(सं) वि० निष्कपट, खरा.
**अखंड**–(सं) वि०, अविच्छिन्न, पूर्ण, सबंध, सगळा, अखा.
**अखंडसौभाग्य**–(सं) न० सदासौभाग्य, चिरसौभाग्य.
**अखंडित**–(सं) वि० सतत, नेहमींचा, चालू असलेला.
**अखत्यार**–(आ) पु० अधिकार, मुखत्यारी, हक्क, हुकमत.
**अखबरनवीस–नीस**–(आ) पु० वर्तमानपत्र–मासिक पुस्तककर्ता, बातमीदार.
**अखबार**–(आ) न० वर्तमान, समाचार, बातमी, खबर, हवाल.
**अखा**–वि० सर्व, पूर्ण, अखंड, सगळा, सबंध.
**अखाडा**–पु० अड्डा, जागा.
**अखाद्य**–(सं) वि० खाण्यास अयोग्य.
**अखिल**–(सं) वि० सर्व, सबंध, साद्यंत, सगळें.
**अखुडणें**–अ० लहान होणें, कमती होणें, खुरटणें.
**अखूड**–वि० ऱ्हस्व, लहान, अपरा, थोडा.
**अखेर–री**–(फा) स्त्री० समाप्ति, अंत, कळस, शेवट.
**अखें**–न० कंठाळीचें अर्धे अंग, अर्धी गोणी.
**अग्नि**–(सं) पु० अनल, वन्हि, आग, विस्तव, अंगार.
**अग्निदिव्य**–(सं) न० सत्याकरितां अग्निसंबंध करणें तें.
**अग्निप्रवेश**–(सं) पु० आगींत जाणें, शिरणें, जाळून घेणें.
**अग्निपुट**–(सं) न० झाळणें, आंच–आग देणें.
**अग्निमांद्य**–(सं) न० अजीर्ण, अन्नद्वेष, भुकेचें मंदावणें, एक रोग.
**अग्निशाला**–(सं) स्त्री० होमशाळा.
**अग्निशिखा**–(सं) स्त्री० ज्वाला, जाळ, ज्योत.
**अग्निहोत्री**–(सं) वि० जो अग्नि राखून ठेवितो तो, होम करणारा.
**अग्र**–(सं) न० टोंक, शेंवट, बाजू, कोपरा.
**अग्रगण्य**–(सं) वि० मुख्य, नायक, अध्यक्ष, श्रेष्ठ, शिष्ट.
**अग्रभाग**–(सं) पु० प्रथमचा वांटा, पुढचा भाग.
**अग्रवादी**–(सं) वादी, पूर्ववादी, फिर्यादी.
**अग्रहार**–न० कुटुंब पोषण्याकरितां मिळालेलें इनाम.
**अग्राह्य**–(सं) वि० न घेण्याजोगतें, अगोचर.
**अग्रेसर**–(सं) वि० मुख्य, अग्रगण्य, श्रेष्ठ.
**अग**–(सं) पु० पर्वत. २ वृक्ष. ३ बोलण्यांत ह्याचा उपयोग बायकांना हांक मारण्याकडे होतो.
**अगई**–(सं) के० भय किंवा आश्चर्याचा उद्गारः याचा उपयोग विशेषेंकरून स्त्रिया करितात.
**अगटी**–(सं) स्त्री० शेकोटी, चर, पर्सा, शेगडी.
**अगडतगड**–वि० अमर्याद, ओबडधोबड, खरखरीत.
**अगडबंब**–वि० विशाळ, अवाढव्य, मोठा, अवजड.
**अगणित**–(सं) वि० अमित, असंख्य, अतिशय, पुष्कळ.
**अगत्य**–(सं) न० अभिमान, गरज, जरूर, हौस. २ क्रि० अवश्य.
**अगदीं**–क्रि० निःशेष, पूर्ण, अखिल.
**अगम्य**–(सं) वि० न जाण्याजोगता, पोंचण्यास अशक्य. २ जाणतां न येई असा.
**अगमनीय**–(सं) वि० जाण्यास अयोग्य.
**अगर**–(सं) न० वृक्षविशेष. २ उ० अथवा,

**अगल**—(सं) स्त्री० गाडी हाकणाराची गाडीवर बसण्याची जागा.

**अगस्ता**—(सं) पु० हादगा, वृक्षविशेष.

**अगस्ति**—(सं) पु० मुनिविशेष. २ दक्षिणध्रुव.

**अगळ**—(सं) पु० अर्गला, आडसर, अट, खिटी.

**अगा**—(सं) हें संबोधन पुरुषांना योजतात, क्वचित् स्त्रियांना.

**अगाध**—(सं) वि० अतर्क्य, अगम्य, खोल, अपार.

**अगापिछा**—(सं) पु० छातीकडचा भाग व पाठीकडचा भाग. २ मागचा पुढचा विचार.

**अगार**—(सं) न० वास्तव्य, जागा, घर, ठिकाणा.

**अगाशी**—(सं) स्त्री० गच्ची, चुन्याचें धाबें.

**अगोचर**—(सं) वि० अग्राह्य, बोध न होण्याजोगा, अघटित.

**अगोदर**—(सं) क्रि० पूर्वी, लौकर, पहिल्यांदा, पहिल्यांना.

**अघ**—(सं) न० पातक, पाप, दोष, अपराध.

**अघटित**—(सं) क्रि० असंभाव्य, अगोचर.

**अघटितघटना**—(सं) स्त्री० न घडण्याजोगी गोष्ट, असंभाव्य गोष्ट.

**अघळपघळ**—(सं) वि० लांबलचक, अवाढव्य, भव्य, जंगी.

**अघाडा**—(सं) पु० एका झाडाचें नांव. २ झाडाचा शाखादि विस्तार.

**अघाडी**—(सं) स्त्री० पुढचा भाग, पुढें.

**अघाडी पिछाडी**—(सं) स्त्री० मागचें पुढचें सामान, दवासन, दावें व पायबंद.

**अघोर**—(सं) वि० अघोरी, भयंकर, अमंगळ, अपवित्र.

**अचरट**—वि० चावट, व्रात्य, अडाणी.

**अचळ**—(सं) वि० न चलन पावणारा, अढळ, स्थिर.

**अचाट**—वि० विलक्षण, शक्तीबाहेरचें, फार.

**अचानक**—क्रि० एकदम, अकस्मात्, अवचित, अकल्पित.

**अचिंत्य**—(सं) वि० अतर्क्य, गूढ.

**अचूक**—वि० चुकल्याखेरीज, नेमून, बिनचूक, अछाद.

**अचेतन**—(सं) वि० निचेष्टित, निर्जीव.

**अज**—(सं) पु० ईश्वर. २ ब्रह्मदेव. ३ बोकड, बकरा, मेंढा. ४ वि० जन्मविरहित.

**अजगर**—(सं) पु० सर्पविशेष. २ वि० सुस्त.

**अज्ञ**—(सं) वि० अडाणी, मूर्ख.

**अज्ञात**—(सं) वि० गुप्तचित्र, न जाणलेलें.

**अज्ञान**—(सं) न० मूर्खत्व, मौर्ख्य, गैरसमजूत.

**अजब**—(आ) वि० विलक्षण, अचाट.

**अजम**—(आ) वि० ए० प्र० पदवी.

**अजमास**—(फा) अदमास, सुमार, अटकळ.

**अजर**—(सं) वि० ज्यास जरा नाहीं तो.

**अजरामर**—(सं) वि० ज्यास मरण नाहीं तो, सततचें.

**अजागळ**—वि० वेडा, अप्रबुद्ध.

**अजाणता**—(सं) वि० अज्ञानी, अडाणी.

**अजापुत्र**—(सं) पु० कोंकरूं.

**अजिंक**—(सं) वि० दुस्तर, अनिवार्य, जबरदस्त, जिंकतां येत नाहीं असा.

**अजित**—(सं) वि० अजिंक. २ पु० परमेश्वर.

**अजीर्ण**—(सं) न० अग्निमांद्य, भूक नमणें.

**अजून**—क्रि० आतांपर्यंत.

**अट्टल**—वि० वस्ताद, पक्का, माहितगार, पुरा लुच्चा.

**अट्टहास**—(सं) पु० खिकाळी, जोराचें हंसूं.

**अट्टाहास**—पु० अटापीट.

**अट**—(सं) स्त्री० शर्त. २ हेका, हट्ट.

**अटक**—स्त्री० अडथळा, अटकाव, तुरुंग, बंदीशाळा. २ नदीविशेष.

**अटकळ**—स्त्री० तर्क, सुमार, अजमास.

**अटकाव**—पु० अटक, अडथळा.

**अटखोर**–वि० हट्टी, हटवादी, आग्रही, अडून बसणारा.
**अटवी**–(सं) न० जंगल, रान, अटव्य.
**अटापीट**–पु० परिश्रम, मेहनत, कष्ट.
**अठरा**–(सं) संख्याविशेष.
**अठरापगडजात**–(सं) स्त्री० सगळीजात, सर्व जाती, सर्व मनुष्यें.
**अठराविश्वे**–(सं) वि० अगदीं, कमाल, पूर्ण.
**अठवडा**–(सं) पु० हप्ता, आठ दिवस.
**अड्डा**–पु० जागा, मुक्काम, टप्पा, आखाडा.
**अड**–(सं) स्त्री० ( अट पाहा ).
**अडकण**–(सं) स्त्री० अडसर, अडथळा.
**अडकणें**–(सं) अ० गुंतणें, घोटाळणें.
**अडका**–पु० कोणचेंही नाणें.
**अडकावणें**–(सं) स० गुंतवणें, घोटाळवणें.
**अडकित्ता**–पु० सरोता, आडकित्या.
**अडखळणें**–अ० अडणें, थांबणें.
**अडगळ**–स्त्री० सामानसुमान, संसार. निरुपयोगी पदार्थांचा समुदाय.
**अडचण**–स्त्री० पंचाईत, घोटाळा, गर्दी, न्यूनता, संकोच.
**अडणूक**–स्त्री० अडचण, अडथळा, हरकत.
**अडणें**–अ० अडकणें, थांबणें, हरकत होणें-असणें.
**अडत्या**–पु० दलाल, गुमास्ता, मुनीम.
**अडत–ती**–स्त्री० दलाली, मध्यस्ती. २ दलाली, दस्तुरी, मध्यस्तीबद्दल द्रव्य.
**अडतीस**–वि० संख्याविशेष.
**अडथळा**–पु० अडचण, त्रास, अडणूक, हरकत.
**अडवणें–विणें**–स० थांबविणें, प्रतिबंध करणें.
**अडवा**–वि० रुंद. २ तिरपा. ३ सामोरा.
**अडावि**–वि० वांकडी. स्त्री० दाराची फिरकी. २ भारी, पेंढी.
**अडशेरी**–स्त्री० अधोली.
**अडणी**–स्त्री० तिवई.
**अडाणजात**–(सं) स्त्री० सर्व हलकी जाती, अज्ञानी लोक.
**अडावा–ढावा**–पु० एकंदर हिशेब.
**अडी**–स्त्री० अढी. २ फळें पिकविण्याची युक्ति.
**अडेल**–वि० हट्टी, अडणारा.
**अडोशीपडोशी**–वि० शेजारचे, आसपासचे.
**अढळ**–(सं) वि० अचळ, न ढळणारा, स्थिर.
**अणखी–आणखी**–(सं) वि० जास्ती, २ उ० आणि, खेरीज, शिवाय.
**अणवाणी**–वि० अनवाणी, जोड्याशिवाय. २ क्रि० उघड्या पायानें.
**अणी**–स्त्री० शेवट, बारीक टोंक, अग्र.
**अणीदार**–वि० टोंकदार शेवट असलेला.
**अणीबाणी**–स्त्री० प्रसंग, खातरीची वेळ, बिकट समय.
**अणु**–(सं) पु० परमाणु, बारीक कण.
**अणुरेणु**–(सं) पु० जे पदार्थ कवडशांत फिरतातसे दिसतात ते, परमाणु.
**अत्तर**–(आ) न० सुवासिक पदार्थांचा अर्क.
**अत्तां**–(सं) उ० आतांच, नुक्ता.
**अत्यंत**–(सं) क्रि० फारच, अतिशय, अति, मनस्वी, बहुत.
**अत्यावस्था**–(सं) स्त्री० मरणसमय, त्रिदोषसमय, दुर्दशा.
**अत्याग्रह**–(सं) पु० आग्रहाची पराकाष्ठा.
**अतर्क्य**–(सं) वि० तर्क करण्यास कठिण, अचिंत्य, गूढ.
**अतत्यायी**–(सं) वि० साहसी.
**अतांशी**–क्रि० अलीकडे, आतां, थोड्या दिवसांपासून, नुक्ता.
**अति**–(सं) क्रि० अतिशय, पुष्कळ, मार्यादळ, लई. [ अन्याय.
**अतिक्रमण**–(सं) न० मर्यादेचें उल्लंघन,

**अतिथि**-(सं) पु० आगंतुक, अभ्यागत, भिकारी, भोजनेच्छु.
**अतिप्रसंग**-(सं) पु० अधिक प्रसंग, निकराची वेळ.
**अतिरिक्त**-(सं) वि० अतिशय, फाजील, • जास्त.
**अतिशय**-(सं) फाजील, अति, अतोनात.
**अतिशयोक्ति**-(सं) स्त्री० मूळापेक्षां जास्त सांगणें, गप्प. २ अर्थालंकारविशेष.
**अतिसार**-(सं) पु० शौचाचा उपद्रव, रोगविशेष.
**अतीतअभ्यागत**-(सं) पु० अतिथी, भिकारी, जोगी.
**अतुल**-(सं) वि० ज्याची तुलना केली जाणार नाहीं असा.
**अतृप्त**-(सं) वि० ज्याची तृप्ति झाली नाहीं तो, अधाशी.
**अतोनात**-(सं) वि० अति, अतिशय, जास्त.
**अथवा**-(सं) उ० किंवा.
**अथेति**-(सं) स्त्री० आरंभापासून शेवटपर्यंतचें कृत्य.
**अद्भुत**-(सं) न० चमत्कारिक, विलक्षण, अपूर्व, आश्चर्यकारक.
**अद्रि**-(सं) पु० पर्वत, डोंगर, गिरि.
**अद्वातद्वा**-(सं) वि० अभद्र, दुसऱ्यास लागेल असें भाषण, ताळतंत्र सोडून.
**अद्वितीय**-(सं) वि० अतुल, एकचएक, ज्यासारिखें दुसरें नाहीं असें, अनन्य.
**अद्वैत**-(सं) वि० ज्याला द्वैत नाहीं तें, एकंकार. २ श्रीजगद्गुरु शंकराचार्य यांनीं स्थापिलेलें मत, जीव ब्रह्मैक्यवाद.
**अद्वैतभाव**-(सं) पु० दुसरेपणाचा भाव नाहीं तो भाव, निष्कापट्य.
**अद्यापि**-(सं) क्रि० अजून, आतांपावेतों, हा वेळपावेतों.
**अड्डल**-(आ) स्त्री० ठेंच, ठोकर.
**अदत्त**-(सं) वि० न दिलेलें. २ कृपण, कंजूष, चिकू.
**अदपाव**-पु० अर्धा पावशेर.
**अदब**-(आ) स्त्री० मान, मरातब. २ तसदी.
**अदमण**-पु० अर्धा मण.
**अदमुरें-मोरें**-न० ज्यांत थोडा आंबटपणा आला आहे असें विरजण, गोड दहीं.
**अदलाबदल**-(फा) स्त्री० फेरफार, मोबदला.
**अदालत**-(आ) स्त्री० कोडत, कचेरी, न्यायसभा.
**अदावत**-(आ) स्त्री० चुरस, द्वेष, अकस.
**अदृश्य**-(सं) वि० अंतर्हित, झांकलेला, नदिसेसा.
**अदृष्ट**-(सं) वि० गुप्त. २ न० प्रालब्ध, नशीब.
**अध्ययन**-(सं) न० अभ्यास, व्यासंग, शिक्षण.
**अध्यक्ष**-(सं) वि० मुख्य, अधिकारी.
**अध्यात्म**-(सं) न० वेदांत, आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान.
**अध्यापक**-(सं) पु० गुरु, शिक्षक.
**अध्याय**-(सं) पु० भाग, विभाग.
**अध्याहार**-(सं) पु० पदन्यूनता.
**अधम**-(सं) वि० दुष्ट, कृतघ्न, हलकट.
**अधर्म**-(सं) पु० धर्मविरुद्ध कर्म, पाप, अघ.
**अधर**-(सं) वि० खालचा, हलकें. २ पु० खालचा ओंठ.
**अधार्मिक**-(सं) वि० अधर्मी, अधम.
**अधाशी**-वि० अतृप्त, खादाड.
**अधांतरीं**-(सं) क्रि० हवेमध्यें, बिनआधारी, अंतराळीं.
**अधिक**-(सं) वि० जास्ती, फाजील, मोठा, फार, जास्त.
**अधिकआगळा**-(सं) वि० थोडा, जास्ती.
**अधिकउणा**-(सं) वि० कमजास्ती, अधिकोत्तर.

**अधिकमास**–(सं) पु० धोंड्याचा महिना.
**अधिकाधिक**–(सं) वि० जास्ती जास्ती, फारफार.
**अधिकार**–(सं) पु० हक्क, हुकमत, सत्ता, पदवी, योग्यता.
**अधिकारी**–(सं) वि० अंमलदार, मुकत्यार, सत्ताधीश.
**अधिकोत्तर**–(सं) वि० कमजास्ती.
**अधिप**–(सं) पु० मुखत्यार, धनी, भूप, राजा, स्वामी.
**अधिष्ठान** (सं) न० बैठक, बसण्याची जागा. अड्डा, अखाडा.
**अधीर**–(सं)वि०उतावळा, उताविळ, चंचळ.
**अधीश**–(सं) वि० ( **अधिप पहा.** )
**अधू**–(सं) वि० अशक्त, असमर्थ, व्यंग.
**अधेला**–(सं) पु० सर्पविशेष. २ अर्धा पैसा.
**अधेली**–(सं) स्त्री० अर्धा रुपाया.
**अधोगत**–(सं) वि० खाली, उतरता.
**अधोभाग**–(सं) पु० खालचा भाग.
**अधोमुख**–(सं) वि० फजीत झालेला, शरमलेला, तोंड खाली घालून बसलेला.
**अधःपात**–(सं) पु० नरक, खाली पडणें.
**अधःपंथ**–(सं) पु० मोठ्या जागेवरून खाली येणें, घसरणें, निसटणें, नरकाची वाट.
**अन्न**–(सं) न० खाद्य, पोटगी, खाना.
**अन्नछत्र**–(सं) न० छत्र, सदावर्त, धर्मार्थ –खाणावळ.
**अन्नान्नगत**–(सं) स्त्री० दुर्दशा, वाईट स्थिति, अन्नास महाग, बुभुक्षित
**अन्नोदक**–(सं) न० अन्नपाणी, खाणें पिणें.
**अन्य**–(सं) वि० दुसरा, परका.
**अन्यत्र**–(सं) क्रि० दुसऱ्या ठिकाणी, वांया.
**अन्यथा**–(सं) क्रि० व्यर्थ, निरुपयोगी, खोटें.
**अन्याय**–(सं) पु० अयोग्य न्याय, गैरइनसाफ, अपराध.
**अन्यायी**–(सं) वि० अपराधी, गुन्हेगार, गैरकाम करणारा.
**अन्योक्ति**–(सं) स्त्री० गूढभाषण, द्व्यर्थी भाषण. २ अर्थालंकार विशेष.
**अन्योन्य**–(सं) क्रि० परस्पर, एकमेक.
**अन्वय**–(सं) पु० जुळणी. २ पदें व्याकरणरीत्या एकापुढें एक ठेवणें. ३ संबंध. ४ वंश, कुळ.
**अनक्षर**–(सं) वि० शंख, ढ, दगड, ज्यास अक्षरें माहीत नाहींत असा.
**अनध्याय**–(सं) पु० खाडा, नागा, सुट्टी, ज्या दिवशीं शिकणें बंद असतें तो दिवस.
**अनधिकारी**–(सं) वि० रिकामा, अधिकाराशिवाय, अयोग्य.
**अनंत**–(सं) वि०ज्याचा अंत नाहीं तो. २पु० परमेश्वर. ३ प्रतिमाविशेष(रेशमी इत्यादि).
**अनन्वित**–(सं) वि० भलतेंच, विलक्षण.
**अननस**–पु० फळविशेष.
**अनपत्य**–(सं) वि० निर्वंश, मुलाविरहित.
**अनभ्यास**–(सं) पु० गैरराबता, बिनसंवयी.
**अनभिज्ञ**–(सं) वि० अजाण, अज्ञानी.
**अनमान**–(सं) पु० अदमास, अंदाज, अनमानधपका. २ अपमान. ३ शंका.
**अनर्थ**–(सं) पु० दुःख, प्रसंग, आकाबाई, वाईट.
**अनरसा**–(सं) पु० पक्वान्नविशेष.
**अनल**–(सं) पु० आग, विस्तव, अग्नि.
**अनलस**–(सं) वि० उद्योगी, मेहनती.
**अनवस्थित**–(सं) वि० चंचल, चपल.
**अनवाणा**–(सं) वि० उघडा, जोड्याशिवाय.
**अनाचार**–(सं) पु० दुराचार, पाप, अधर्म.
**अनाठायीं**–(सं) क्रि० व्यर्थ, अयोग्य ठिकाणीं.
**अनाडी**–वि० अडाणी, मूर्ख.
**अनादर**–(सं) पु० अपमान.

**अनादि**–(सं) वि० स्वयंभू, मूळचा.

**अनादिपरंपरा**–(सं) स्त्री० मूळचीरीती, क्रम.

**अनादिसिद्ध**–(सं) वि० मूळचा, अनादि, स्वयंभू, स्वतःसिद्ध.

**अनामत**–(सं) स्त्री० ठेव, मोघम रक्कम.

**अनामिका**–(सं) स्त्री० करंगळीच्या शेजारचें बोट.

**अनायास**–(सं) पु० बिनमेहनत, आयास नाहींत तें.

**अनार**–(फा) न० डाळिंब.

**अनावड**–स्त्री० त्रास, अरहस्य.

**अनावृष्टि**–(सं) स्त्री० पाण्याचा दुकाळ.

**अनास्था**–(सं) स्त्री० हेळसांड.

**अनाहूत**–(सं) वि० अगांतुक, न बोलविलेला.

**अनित्य**–(सं) वि० कधींमधींचें.

**अनियत**–(सं) वि० अनिश्चित, अव्यवस्थित.

**अनिवार्य**–(सं) वि० निवारण न होण्याजोगें.

**अनिवार**–(सं) वि० फारच, मोठा, विशाळ.

**अनिष्ट**–(सं) वि० प्रतिकूल, वाईट.

**अनिंद्य**–(सं) वि० श्लाघ्य, स्तुत्य.

**अनीति**–(सं) स्त्री० अधर्म, दुर्नीति, पाप.

**अनु**–(सं) उपसर्ग: मागून.

**अनुक्रम**–(सं) पु० क्रम, रीत, रिवाज, ओळ.

**अनुक्रमणिका**–(सं) स्त्री० विषयमालिका.

**अनुकंपा**–(सं) स्त्री० कृपा, दया, प्रसन्नता.

**अनुकरण**–(सं) न० कित्ता, दुसऱ्याची रीत उचलणें.

**अनुकूल**–(सं) वि० इष्ट, प्रिय.

**अनुग्रह**–(सं) पु० दया, कृपा, उपकार, उपदेश, दीक्षा.

**अनुचर-चारी**–(सं) पु० चाकर, नोकर, गडी.

**अनुचित**–(सं)वि० अनन्वित, वाईट, अयोग्य.

**अनुज्ञा**–(सं) स्त्री० आज्ञा, हुकूम.

**अनुताप**–(सं) पु० पश्चात्ताप, पस्तावा.

**अनुत्साह**–(सं) पु० मळूली, आनंदाचा अभाव.

**अनुदिन**–(सं) क्रि० रोज, नेहमीं, सततचा.

**अनुनासिक**–(सं) वि० नस्य, नाकाचा, ज्याचा उच्चार नाकांतून होतो तो.

**अनुपम**–(सं) वि० ज्याला उपमा नाहीं तें,

**अनुपयोग**–(सं) पु० दुरुपयोग, २ वि० उपयोगाखेरीज.

**अनुपान**–(सं) न० उपयोगाची माहिती. २ ज्या पदार्थाबरोबर औषध घ्यावयाचें तो किंवा औषध घेतल्यावर खाण्याचा पदार्थ.

**अनुपाय**–(सं) पु० निरुपाय.

**अनुभव**–(सं) पु० माहिती, वाकब. २ परीक्षा.

**अनुभविक**–(सं) वि० वाकबगार, माहितगार, परीक्षा घेतलेलें.

**अनुमत**–(सं) न० मत, संमति, अनुमोदन.

**अनुमान**–(सं) न० तर्क, अंदाज, अजमास, अटकळ.

**अनुमोदन**–(सं) न० ( **अनुमत पहा.** )

**अनुयायी**–(सं) वि० अनुचर, अनुकरण करणारा, शिष्य.

**अनुरक्त**–(सं) वि० आसक्त, स्नेही.

**अनुराग**–(सं) पु० प्रीति, स्नेह.

**अनुरूप**–(सं) वि० मेळ, जम, योग्य.

**अनुलक्षून**–( सं ) क्रि० समजण्यासारखें, उद्देशून.

**अनुवाद**–(सं) पु० एखाद्याचें ह्मणणें पुनः ह्मणणें.

**अनुवृत्ति**–(सं) स्त्री० अनुवर्तन.

**अनुशासन**–(सं) न० कायदा, नियम.

**अनुष्टुप**–(सं) स्त्री० छंदविशेष. २ वि० लहानसें, थोडकें.

**अभोग्य**–(सं) वि० निरुपयोगी, अपूर्ण, अयोग्य, उपभोगास अयोग्य.
**अभोज्य**–(सं) वि० खाण्यास अयोग्य, वर्ज्य, अपथ्य.
**अम्मल**–(आ) पु० कायदा, अधिकार. २ कैफ, तार.
**अम्मलदार**–(आ) वि० कामदार, अधिकारी.
**अम्मळ**–क्रि० क्षणमात्र, थोडा वेळ.
**अमका**–(सं) वि० अनियमित, फलाणा.
**अमंगल**–(सं) वि० मलिन, गलिच्छ, घाणेरडा.
**अमदानी**–(फा) स्त्री० कारकीर्द. २ चांगली स्थिति, व्यापार, उदय.
**अमर्याद**–(सं) वि० बेसुमार, मर्यादेविरहित.
**अमर**–(सं) पु० ईश्वर. २ अमरकोश. ३ वि० मरण नसलेलें.
**अमसोल**–न० कोकम, रातंब्याची साल.
**अमा**–(सं) स्त्री० अमावास्या. २ पु० स्तन.
**अमात्य**–(सं) पु० प्रधान, मंत्री, दिवाण.
**अमान्य**–(सं) वि० नापसंत, नाकबूल.
**अमानत**–(फा) ( **अनामत** पहा. )
**अमानुष**–(सं) वि० अद्भुत, मनुष्याच्या शक्तीबाहेरचें.
**अमावास्या**–(सं) स्त्री० आंवस, अमास, चंद्रदर्शन न होणारी रात्र.
**अमित**–(सं) वि० अपार, असंख्य, अनंत.
**अमीन** (आ) पु० न्यायाधीश, न्याय करणारा मनुष्य.
**अमीर**–(आ) वि० श्रीमंत, उमराव, बडा लोक.
**अमुक तमुक**–(सं) वि० कोणीएक, अनियमित संज्ञा, असें तसें, हा तो.
**अमूप**–(सं) वि० अमित, पुष्कळ, फार.
**अमूल्य**–(सं) वि० अमोल, बिनमोल, अपूर्व.
**अमृत**–(सं) न० देवांचें पेय, सुधा.
**अमोघ**–(सं) वि० अचूक, प्रबल, समर्थ.
**अयन**–(सं) न० षण्मास, सहामाही. २ जाणें.
**अयनय**–(फा) पु० दर्पण, अयना, कांच.
**अयाचित वृत्ति**–(सं) स्त्री० पारमार्थिक वृत्तिविशेष.
**अयाळ**–(आ) स्त्री० घोडा इत्यादि जनावराच्या मानेवरील केश.
**अयुक्त**–(सं) वि० अयोग्य, व्यर्थ, निरुपयोगी.
**अयुत**–(सं) न० दशसहस्र, दहाहजार.
**अयोग्य**–(सं) वि० अप्रयोजक, अयुक्त.
**अर्क**–(सं) पु० सूर्य. २ रुईचें झाड. ३ तात्पर्य. ४ तेजाब, सार.
**अर्गल**–(सं) पु० अडसर, आडणा.
**अर्घ्य**–(सं) न० अर्घ्या. २ आचमन.
**अर्चन**–(सं) न० पूजन, पूजा, अर्चा.
**अर्चनीय**–(सं) वि० पूजनीय.
**अर्ज**–(आ) पु० आरज. २ फिर्याद. ३ विनंतिपत्र.
**अर्जदार**–(आ) पु० फिर्यादी, वादी, विनंति करणारा.
**अर्णव**–(सं) पु० समुद्र, सागर, दर्या.
**अर्थ**–(सं) पु० भाषांतर. २ अभिप्राय. ३ हशिल, तत्त्व. ४ द्रव्य.
**अर्थगौरव**–(सं) न० मोठा–खोल अर्थ.
**अर्थतः–अर्थात्**–(सं) क्रि० अलबत.
**अर्थशास्त्र**–(सं) न० व्यवहारशास्त्र.
**अर्थापत्ति**–(सं) स्त्री० तर्क, अनुमान.
**अर्ध**–(सं) वि० अर्धा, निमा, अर्धा भाग.
**अर्धचंद्र**–(सं) पु० अष्टमीचा चंद्र. २ गचांडी.
**अर्धपोटी**–(सं) क्रि० क्षुधित, पोटभर न खाल्लेला.
**अर्धमेला**–(सं) क्रि० अर्धाजीवंत, घायाळ.
**अर्धरात्र**–(सं) स्त्री० मध्यरात्र, मध्यानरात्र.
**अर्धेल–अर्धेल–अर्धेली**–(सं) स्त्री० अर्ध्या भागाची सरकत.

**अर्धलंड**–(सं) अर्धवट.
**अर्धवट**–क्रि० अर्धापुरा, अपुरा.
**अर्धवर्तुल**–(सं) न० अर्धगोल, गोलार्ध.
**अर्धशिशी**–(सं) स्त्री० रोगविशेष.
**अर्धामुर्धा**–वि० थोडा, अपुरा, अपक्क.
**अर्धुक**–(सं) न० ( अर्ध पहा. )
**अर्धवचन**–(सं) न० हुकमांत–तत्पर रहाणें.
**अर्धोअर्ध**–(सं) क्रि० बराबर निमा, अर्धा.
**अर्धोत्रा**–पु० दरमहा दरशेंकडा अर्धलीप्रमाणें ( व्याज. )
**अर्पण**–(सं) न० दान, बक्षीस.
**अर्बुद**–(सं) वि० दशकोटीची संख्या.
**अर्भक**–(सं) न० बालक, मूल. २ अज्ञान.
**अर्व**–(सं) न० संख्याविशेष.
**अर्वाच्य**–(सं) वि० असंबद्ध, उच्छृंखळ.
**अर्वाचीन**–(सं) वि० आलीकडील, नवीन.
**अर्ह**–(सं) वि० योग्य, उचित. २ स्त्री० लहर.
**अरकस**–(फा) पु० करवत व त्यानें काम करणारा मनुष्य.
**अरगजा**–(फा) पु० सुवासिकपदार्थविशेष.
**अरण्य**–(सं) न० वन, विपिन, जंगल, रान.
**अरण्यपंडित**–(सं) मूर्खशिरोमणि.
**अरण्यरोदन**–(सं) न० व्यर्थ रडणें, अयोग्य ओरड.
**अरणी**–(सं) स्त्री० होमांतील कोलती.
**अरमार**–(फा) न० लढाईचीं जहाजें.
**अरर**–के० आश्चर्याचें किंवा विस्मरणाचें चिन्ह–उच्चार.
**अरविंद**–(सं) न० कमल–ळ, अंबुज.
**अरसिक**–(सं) वि० मूर्ख, बेदर्दी. २ क्रि० बेचव.
**अरि**–(सं) पु० शत्रु, दुस्मान, दावेदार.
**अरिष्ट**–(सं) न० संकट, कठिण प्रसंग–समय.
**अरुचि**–(सं) स्त्री० अरसिकता, बेचव.
**अरुण**–(सं) पु० लाल रंग. २ सूर्याचा गाडीवान.
**अरुणोदय**–(सं) पु० प्रातःकाल, पहाट, तांबडें.
**अरुंद**–वि० आखूड, आकुंचित.
**अरे**–(सं) के० संबोधनार्थी शब्द.
**अरेतुरे**–स्त्री० तूं–मी करणें.
**अरेराव**–(सं) पु० बाजीराव.
**अरेरे**–के० दया दाखविणारा शब्द.
**अल्प**–(सं) वि० थोडें, मित, किंचित, कमी.
**अल्लाद**–(आ) क्रि० हळूच, गुपचिप, समूळ.
**अलग**–वि० निराळा, स्वतंत्र, अलाहिदा, अचळ.
**अलगुजें**–(आ) न० पावा, वाद्यविशेष.
**अलंकार**–(सं) पु० दागिना. २ व्याकरणसंज्ञाविशेष.
**अलंकारणें**–(सं) उ० वि० सुशोभित करणें, नटवणें.
**अलंग**–(सं) स्त्री० शिपाई लोक रहाण्याची जागा, निराश्रित ठिकाण.
**अलंघ्य**–(सं) वि० दुर्गम.
**अलंदुनिया**–(आ) स्त्री० पृथ्वी, जग.
**अलबत**–(फा) क्रि० अर्थात, मुद्दाम, अगत्यपूर्वक.
**अलबेला**–वि० साधा, शाबळवाटी.
**अलभ्य**–(सं) वि० दुर्लभ, मिळण्यास कठिण.
**अलक्ष**–(सं) न० दुर्लक्ष, लक्ष-ध्यान नसणें.
**अलावा**–(फा) पु० मुसलमान लोकांच्या मोहरमामधील विस्तव. २ क्रि० यामुळें, बदला.
**अलाहिदा**–(फा) वि० अलग, निराळा, स्वतंत्र, पृथक्.
**अलिता**–आळता–(सं) पु० लाखेचा तांबडा रंग.

**अलिप्त**–(सं) वि० स्वतंत्र, पृथक्, अलग.
**अलोट**–(सं) वि० अनिवार्य, पुष्कळ.
**अलौकिक**–(सं) वि० अपूर्व, चमत्कारिक.
**अव्यक्त**–(सं) वि० अस्पष्ट, अस्वच्छ, गुप्त.
**अव्यंग**–(सं) वि० बिनखोड, उणें नसलेलें.
**अव्यवस्था**–(सं) स्त्री० दुर्व्यवस्था, बिघाड, गोंधळ.
**अव्यय**–(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष. २ वि० अमर, अविनाशी.
**अव्वल**–(आ) क्रि० प्रथमतः, आरंभीं. २ वि० पहिलें.
**अव्हेर**–(सं)पु० अनादर, तिरस्कार, अवज्ञा.
**अव्हेरणें**–(सं) उ० वि० तिरस्कार करणें.
**अवक्षर**–(सं) पु० उपोद्घात, ब्र.
**अवकळा**–(सं) स्त्री० दुर्दशा, कंबक्ती, दुश्चिन्ह.
**अवकात**–(आ) स्त्री० शक्ति, ताकद, सामर्थ्य, बळ. २ समय.
**अवकाश**–(सं) पु० उशीर. २ समय. ३ आकाश. ४ जागा.
**अवकृपा**–(सं) स्त्री० इतराजी, कमी लोभ.
**अवगणणें**–(सं) स० उपेक्षा करणें.
**अवगणना**–(सं) स्त्री० उपेक्षा, अनादर.
**अवगत**–(सं) वि० माहीत, ठाऊक. २ पाठ.
**अवगुण**–(सं) पु० दुर्गुण, खोड, अयब.
**अवघड**–(सं) वि० कठिण, सख्त.
**अवघा**–वि० संपूर्ण, सर्व, सगळें.
**अवच्छिन्न**–(सं) वि० विच्छिन्न, निरनिराळें.
**अवजड**–(सं) वि० विशाळ, मोठा, वजनदार.
**अवजार**–(आ) न० शीड. २ हत्यार.
**अवज्ञा**–(सं) स्त्री० अवगणना, अव्हेर.
**अवतरण**–(सं) न० उपोद्घात, प्रस्तावना.
**अवतरणिका**–प्रस्ताव, सूचना.
**अवतार**–(सं) पु० देह. २ मूर्ति. ३ वि० दहा. ४ न० सोंग.
**अवदसा**–(सं) स्त्री० अकाबाई, दुर्दैव.
**अवध्य.** (सं) वि० मारण्यास अयोग्य.
**अवधान**–(सं) न० लक्ष, ध्यान, चित्त.
**अवधि**–(सं) स्त्री० वेळ. २ सीमा. ३ अंतर.
**अवधूत**–(सं) पु० बैरागी, तापसी, गोसांवी.
**अवन**–(सं) न० संरक्षण, संभाळ.
**अवनी**–(सं) स्त्री० पृथ्वी, दुनया.
**अवमान**–(सं) पु० अपमान, अव्हेर.
**अवयव**–(सं) पु० शरीरभाग. २ हिस्सा.
**अवर्षण**–(सं) न० पर्जन्य नसणें, अनावृष्टि.
**अवरसचवरस**–क्रि० चतुरस्त्र, एका लांबी रुंदीचें.
**अवरोध**–(सं) पु० अवष्टंभ, दबा, जाड्य. २ अडथळा. ३ अन्तःपुर.
**अवरोह**–(सं) पु० ( गाण्यांत ) उच्च स्वरापासून आरंभ करून नीच स्वरापर्यंत स्वरांचें आवर्तन.
**अवरोहण**–(सं) न० उतरणें, आगमन, वाहन.
**अवलंब**–(सं) पु० आश्रय, आधार.
**अवलंबणें**–(सं) स० आश्रय करणें.
**अवलक्षण**–(सं) न० अपलक्षण, दुश्चिन्ह.
**अवलाद**–(आ) स्त्री० संतति, संतान. २ वि० व्रात्य.
**अवलिप्त**–(सं) वि० लिप्त, लिंपलेलें, माखलेलें.
**अवलिया**–(आ) पु० साधू, ज्ञानी, विदेही. २ लहरी, छांदिष्ट.
**अवलेप**–(सं) पु० लेप, माखणें.
**अवलेह**–(सं) पु० लेह, घट्ट पाक. २ चाटण.
**अवलोकन**–(सं) न० पहाणें.
**अवलोकणें**–(सं) उ० वि० बघणें, दिसणें.
**अवश्य**–(सं) क्रि० जरूरीचें, गरजेचें, अगत्य.
**अवशिष्ट**–(सं) वि० बाकी, शिल्लक राहिलेलें, शेष.

**अवशेष**–(सं) पु० शेष, बाकी.
**अवष्टंभ**–(सं) पु० अवरोध.
**अवस्था**–(सं) स्त्री० स्थिति, दशा, प्रसंग.
**अवसर**–(सं) पु० अवकाश, जागा. २ वेग, वार, झटका.
**अवसान**(सं) न० धैर्य. २ (गाण्यांत) सम. ३ शेवट. ४ विराम.
**अवहेळणा**–(सं) स्त्री० अवगणना, अव्हेर.
**अवई–आवई**–स्त्री० कंडी, गप्प, भुमका.
**अवाक्षर**–(स) न० चकारशब्द. २ दुर्भाषण.
**अवाच्य**–(सं) वि० अवर्णनीय.
**अवांतर**–(सं) वि० इतर, बाकी राहिलेले.
**अवार**–(सं) न० अंगण, मर्यादित जागा. २ अनावर, अनिवार्य.
**अवाळूं**–न० गळूं, उठाणूं, चर्मवृद्धीचा फुगा.
**अविच्छिन्न**–(सं) वि० सबंध. २ खर्चा-खेरीज.
**अविचार**–(सं) पु० दुर्विचार, अविवेक.
**अविंध**–(सं) वि० छिद्राखेरीज. २ पु० शि-खानष्ट, मुसलमान, यवन.
**अविनाशी**–(सं) वि० अमर, अजर, अ-व्यय.
**अविवक्षित**–(सं) वि० अनियमित, अम-र्यादित.
**अविवाहित**–(सं) वि० लग्न न झालेला, ब्र-ह्मचारी, कुमारी.
**अविवेक**–(सं) पु० अविचार, दुर्विचार.
**अविश्वास**–(सं) पु० बेभरंवसा, अशाश्वती.
**अवीट–आविट**–वि० चवदार, न बिघडणा-रा, ज्याला वीट येत नाहीं तो मनुष्य.
**अवेळ**–स्त्री० उशीर, अवकाळ, अकाळ.
**अश्रद्धा**–(सं) स्त्री० अनिष्ठा, अविश्वास.
**अश्रफी**–(फा) स्त्री० मोहोर.
**अश्राफ**–(फा) वि० उत्तम, चांगला, गरीब, सचोटीचा.
**अश्राव्य**–(सं) वि० न ऐकण्याजोगें.
**अश्रु**–(सं) पु० असूं, टीप, डोळ्यांतील पाणी.
**अश्लाघ्य**–(सं) वि० अस्तुत्य, अप्रशंसनीय.
**अश्व**–(सं) पु० घोडा, वाजी, वारू.
**अश्वत्थ**–(सं) पु० पिंपळ.
**अश्वत्थामा**–(सं) पु० द्रोणपुत्र, द्रौणि.
**अश्वमेध**–(सं) पु० घोड्याचा यज्ञ.
**अश्वशाला**–(सं) स्त्री० घोडशाळा, पागा, तबेला.
**अश्विन**–(सं) पु० हिंदूंचा सातवा महिना.
**अश्विनी**–(सं) स्त्री० नक्षत्रमालेंतील पहिलें नक्षत्र. २ घोडी.
**अशक्त**–(सं) वि० दुर्बल, शक्तिहीन.
**अशक्य**–(सं) वि० दुर्घट.
**अशाश्वत**–(सं) वि० अनित्य, नाशवंत.
**अशास्त्र**–(सं) वि० शास्त्रविरुद्ध, निराधार.
**अशिक्षित**–(सं) अविद्वान, न शिकलेला.
**अशुद्ध**–(सं) वि० अशोधित. २ अस्वच्छ. ३ न० चूक.
**अशुभ**–(सं) वि० अमंगळ. २ न० दुश्चिन्ह.
**अशेष**–(सं) वि० सर्व, संपूर्ण.
**अशौच**–(सं) वि० अशुद्ध. २ न० सूतक.
**अष्टकोण**–(सं) पु० आठ कोनांचें, अष्टदल-पैलू.
**अष्टौप्रहर**–(सं) क्रि० रात्रंदिवस, अहोरात्र.
**अस्खलित**–(सं) वि० स्पष्ट, अडल्याखेरीज.
**अस्त**–(सं) न० अंतर्धान, मावळणें, नाश.
**अस्तनी**–(फा) स्त्री० बाही, अंगरखा इत्या-दींचा हात.
**अस्तर**–(सं) न० आंतल्या बाजूचें वेष्टण.
**अस्ताचल**–(सं) पु० पश्चिमेकडील पर्वत.
**अस्ताव्यस्त**–(सं) वि० बेशिस्त, अव्य-वस्थित.
**अस्तित्व**–(सं) न० जीवित, जगणें, असणें. २ स्थिति.

**अस्त्र**–(सं) न० हत्यार, मंतरलेलें युद्धाचें साधन.

**अस्थि**–(सं) स्त्री० हाड, हड्डक.

**अस्थिपंजर**–(सं) पु० हाडांचा सांगाडा.

**अस्थिर**–(सं) वि० चंचल, चपल, क्षणिक.

**अस्पर्श**–(सं) वि० अशुद्ध, अशौच.

**अस्फुट**–(सं) वि० अस्पष्ट, समजण्यास कठिण.

**अस्मादिक**–(सं) सर्व० अहं, आम्ही.

**अस्मानी**–(फा) वि० निळा, आकाशी रंगाचा.

**अस्वस्थ**–(सं) वि० असमाधानी, आजारी, हैराण.

**अस्वास्थ्य**–(सं) न० आजार, दुखणें.

**अस्सल**–( आ ) वि० अव्वल, इरसाल, उत्तम.

**असडी**–(सं) स्त्री० अळी. २ वि० सडीखेरीजचें.

**असणें**–( सं) अ० रहाणें, होणें.

**असत्य**–( सं ) वि० खोटें, अनृत, लबाड.

**असती**–(सं) वि० जारिणी, बदचालीची.

**असबाब**–(आ) पु० लवाजमा, सामान.

**असभ्य**–(सं) वि० छचोर, हलकट.

**असंबद्ध**–(सं) वि० विसंगत, भलतेंच.

**असमंजस**–(सं) वि० अरसिक, बेवकूब.

**असला**–वि० असा, अशा प्रकारचा.

**असह्य**–(सं) वि० दुःसह, सहन करण्यास कठिण.

**असा**–वि० असला.

**असाधारण**–(सं) वि० असामान्य, विलक्षण.

**असामी**–(आ) पु० मनुष्य. २ स्त्री० चाकरी.

**असावध**–(सं) वि० गैरसावध, बेसावध.

**असि**–(सं) पु० खड्ग, तरवार.

**असुर**–(सं) पु० दैत्य, राक्षस, दानव.

**असुरी उपाय**–(सं) पु० राक्षसी इलाज.

**असुरी विद्या**–(सं) स्त्री० तंत्रविद्या, जादुटोणा, माया.

**असूड**–पु० चाबूक, कोरडा.

**असूया**–(सं) स्त्री० मत्सर, द्वेष.

**असोला**–वि० न सोललेला, नारळविशेष.

**असोशी**–(सं) स्त्री० अतृप्ति, हाव, अधाशीपणा.

**अहंकार**–(सं) पु० मीपणा, गर्व, अहंता.

**अहंता**–(सं) स्त्री० मीपणा, गर्व.

**अहर्निश**–(सं) क्रि० रात्रंदिवस, अष्टौप्रहर.

**अहा**–के० आनंद-गडबड इत्यादिदर्शक शब्द.

**अहार**–(सं) पु० आंटोका. २ निखारे.

**अहाहा**–के० ( अहा पहा. )

**अहि**–(सं) पु० सर्प, नाग.

**अहित**–(सं) न० नुकसान, तोटा, खोट.

**अहिंसा**–(सं) स्त्री० प्राण्यांस न मारणें.

**अहेर**–पु० विशिष्ट वेळेचें बक्षीस-नजर.

**अहो**–संबोधनार्थी शब्द.

**अहोरात्र**–(सं) न० अहर्निश, रात्रंदिवस.

**अळण**–(सं) न० पिठलें, बेसन, झुणका.

**अळणी**–(सं) वि० कमी खारट, नीरस, सपक, मिठाशिवाय.

**अळणें**–उ० वि० सुकणें, वाळणें, वाळवणें.

**अळापिळा**–पु० आळस, आलस्य.

**अळी**–(सं) स्त्री० कीड. २ गल्ली, बोळ.

**अळू**–न० झाडविशेष. २ स्त्री० भाजीविशेष.

**अळें**–(सं) न० कोंडाळें, बांध, बंधारा.

**अळेंबळें**–क्रि० संकटानें, कसेंतरी, प्रयासानें, सायास.

## आ.

**आई**–(सं) स्त्री० मातुश्री, माता, ब, मा, अंबा.

**आईबाप**–(सं) पु० मातापिता, माततात,

**आऊ**–(सं) स्त्री० अव्वा, माता, आई. २ आवडी या विशेषनामाचें संक्षिप्त रूप.

**आक्रंदन**–(सं) न० आक्रोश, रडणें, मोठ्यानें आरडणें.

**आक्रम–आक्रमण**–(सं) न० वलांडणें, पार जाणें.

**आक्रमणें**–(सं) स०आकलन करणें, व्यापणें, पार जाणें.

**आक्रसणें**–(सं) आटणें, आंखडणें,

**आक्रांत**–(सं) वि० जिकलेला, हस्तगत झालेला.

**आक्रोश**–(सं) पु० कल्होळ, गोंधळ, आक्रांत.

**आक्षेप**–(सं) पु० संशय, आरोप, टपका.

**आकंठ–आकंठमर्याद**–(सं) क्रि० गळ्यापर्यंत, नको होईपर्यंत.

**आकर्ण**–(सं) क्रि० कानापर्यंत, कानापावेतों.

**आकर्णन**–(सं) न० ऐकणें, श्रवण.

**आकर्षक**–(सं) वि० ओढणारें, खेंचणारें.

**आकर्षण**–(सं) न० ओढून घेणें, खेंचणें. २ ओढ.

**आकर**–(सं) पु० सांठा, खाण, खनि.

**आकलन**–(सं) न० ताब्यांत ठेवणें, दाब.

**आकस्मिक**–(सं) वि० अवचित घडलेलें, अकस्मातचें.

**आकांक्षा**–(सं) स्त्री०इच्छा, अपेक्षा. २ हेतु, संशय.

**आकांत**–(सं) पु० कल्होळ, गोंधळ.

**आकार**–(सं) पु० आकृति. २ आंकडा, हिशेब.

**आकारणी**–(सं) स्त्री० वर्गणी, दर, कर, प्रतबंदी.

**आकारबंद**–(सं) पु० लिहिलेली रक्कम–हिशेब.

**आकाश**–(सं) न०अवकाश. २ आस्मान.

**आकाशगंगा**–(सं) स्त्री० आकाशनदी, आकाशांतले प्रवाहासारखे तारे.

**आकाशमंडल**–(सं) न० गगन, आस्मान, खगोल.

**आकाशवाणी**–(सं) स्त्री० आकाशांत झालेला शब्द.

**आकीर्ण**–(सं) वि० गर्दीचा, दाटीचा, जमावाचा.

**आकुंचित**–(सं) वि० लहान, आखूड, थोडा.

**आकुल**–(सं) वि० दबलेला, चिरडलेला, व्याकुल, व्याप्त.

**आकृति**–(सं) स्त्री० आकार, रूप, मूर्ति.

**आख्या**–(सं) स्त्री० प्रसिद्धि, कीर्ति, नांव.

**आख्यान**–(सं) न० गोष्ट, हकीकत, खबर, कहाणी, चरित्र.

**आख**–(सं) पु० अक्ष, कणा.

**आखा**–वि० सर्व, सगळा, संपूर्ण.

**आखुडणें**–(सं) अ० आकर्षणें, लहान होणें.

**आखूड**–(सं) वि० लहान, थोडा, अरुंद.

**आग्नेय–यी**–(सं) स्त्री० पूर्व आणि दक्षिण ह्यांमधील दिशा.

**आग्रह**–(सं) पु० हट्ट, नाद. २ भीड.

**आग्रही**–(सं) वि० हट्टी, नादी, छांदिष्ट.

**आग**–(सं) स्त्री० कफावत. २ अग्नि, विस्तव. ३ न० पाप, अपराध.

**आगटी**–(सं) स्त्री० ( **अगटी** पहा. )

**आगतस्वागत**–(सं) न० आदरसत्कार, आतिथ्य.

**आग पाखडणें**–रागावणें.

**आगपाणी**–(सं) न० शंखद्रव. २ तेजाब.

**आगबोट**–स्त्री० वाफेनें चालणारी नाव.
**आगमन**–(सं) न० येणें, पाय लागणें, धूळ झाडणें.
**आगमाग**–क्रि० अलीकडे पलीकडे, जवळ.
**आगर**–( **अगर** पहा.)
**आगलाव्या**–वि० आग लावणारा. २ कळचेत्या, नारद, चहाड, चेटकी.
**आगळा**–वि० अधिक.
**आगळीक**–स्त्री० चूक, फाजील वर्तणूक, गुन्हा.
**आगाऊ**–वि० पहिल्यानें, अगोदर, आधीं.
**आगेंमागें**–क्रि० सुमारास.
**आगोठ**–स्त्रि० चौमास, चातुर्मास्य, पावसाळ्याच्या सुमाराचा काळ.
**आघात**–(सं) पु० ठोका, धक्का.
**आच्छादणें**–(सं) स० झांकणें, छपवणें, पांघरूण घालणें.
**आचमन**–(सं) न० नियमित पाणी पिण्याचें माप. २ अर्घ्य.
**आचरण**–(सं) न० वागणूक, रीत, राहा.
**आचरणें**–(सं) अ० वर्तणें, वागणें.
**आचार्य**–(सं) पु० अध्वर्यु, श्रेष्ठ, मुख्य, धर्मगुरु, विद्यागुरु.
**आचार**–(सं) पु० वर्तनप्रकार, आचरण. २ लोणचें.
**आचारभ्रष्ट**–(सं) वि० दुराचारी, भ्रष्ट.
**आचारविचार**–(सं) पु० रीतीभातीचा विचार, मागें पुढें पहाणें.
**आचारी**–पु० स्वैंपाकी, भोजन तयार करणारा मनुष्य.
**आज्ञा**–(सं) स्त्री० रजा. २ हुकूम.
**आज्ञा घेणें**–(सं) स० निरोप घेणें, भेट घेणें.
**आज्ञाधारक**–(सं) वि० हुकुमांत राहाणारा.
**आज्ञापणें**–(सं) उ० वि० हुकूम करणें, काम सांगणें.
**आज्ञापत्र**–(सं) न० हुकुमाचें पत्र, लिहिलेला हुकूम.
**आज्ञाभंग**–(सं) पु० हुकूम अमान्य करणें.
**आज**–(सं) क्रि० चालू दिवशीं, वर्तमान दिवशीं.
**आजउद्यां–आज नाहीं उद्यां**–क्रि० थोडक्या काळांत, लवकरच, कधीं तरी.
**आजकाल**–(सं) क्रि० सांप्रतकालीं, आतांशीं, अलीकडे,
**आजतागायत**–(सं) क्रि० आजपर्यंत, चालू दिवसापर्यंत.
**आजन्म**–(सं) क्रि० जन्मांत, हयातींत, जन्मल्यापासून.
**आजला**–(सं) क्रि० चालू दिवसापर्यंत, आतांपावेतों.
**आजवर**–(सं) क्रि० सांप्रतकाळापर्यंत.
**आजा**–(सं) पु० आईचा किंवा बापाचा बाप.
**आजार**–(फा) पु० रोग, असमाधान, व्याधि.
**आजी**–(सं) स्त्री० आजाची बायको.
**आजोळ**–(सं) न० आईच्या बापाचें घर.
**आटणी**–स्त्री० मूस, धातु आटण्याचें साधन. २ धातु आटण्याची क्रिया.
**आटणें**–अ० आकर्षणें, सुकणें. २ स० धातु मुशींत घालून त्याचा रस इत्यादि करणें.
**आटता काळ**–पु० प्रतिकूल काल, साडेसाती.
**आटपणें**–उ० वि० जमा करणें, व्यवस्था करणें, संपवणें.
**आटपता**–वि० आटपसर, बेताचा, हलका.
**आटपाआटप**–स्त्री० वारासार, शेवट, संपविण्याचें काम.
**आटपाट**–स्त्री० धराधरी, शिवाशिवी.
**आटा**–पु० वेढा. २ पीठ. ३ विरलें–छत्रीचा सांगाडा.

**आटापीट**-पु० आयास, परिश्रम.
**आटीव**-वि० आटविलेलें, घट्ट, दाट.
**आटोका**-पु० पोंच, आंवाका.
**आटोकाट**-वि० मोठा, फारच, अट्टल.
**आठ**-(सं) स्त्री० संख्याविशेष.
**आठकी**-(सं) स्त्री० आठ असामींची टोळी. २ आठ डाव.
**आठल**-(सं) स्त्री० आठोळी, फणसांतली बी.
**आठवडा**-(सं) पु० हप्ता, आठ दिवस.
**आठवण**-स्त्री० स्मरण, याद, लक्ष.
**आठवणें**-उ० वि० लक्षांत रहाणें, स्मरणें, याद होणें.
**आठी**-स्त्री० सुरकुती, चिरमी. २ आढी. ३ आठही.
**आड**-पु० कुवा, विहीर. २ स्त्री० अट. ३ श० मागें.
**आडकाठी**-स्त्री० अडथळा, खो, व्यत्यय.
**आडकुशी**-स्त्री० बाजूवर, कुशीवर.
**आडगल्ली**-स्त्री० आडबोळ, लहान रस्ता.
**आडगळ**-स्त्री० निरुपयोगी सामान, पसारा.
**आडगांव**-पु० लहान गांव, गांवढें.
**आडजिना**-पु० गुप्तजिना, दादर.
**आडणा**-पु० अडसर, दाराची फिरकी.
**आडणी**-स्त्री० शंख ठेवण्याची बैठक, तिवई.
**आडनांव**-न० उपनांव, अडक.
**आडपडदा**-पु० पडदा, झांकण्याचें साधन. २ रीत, रहा.
**आडपेंठ**-स्त्री० लहान पेंठ, आडबाजार.
**आडफांटा**-पु० अडचण, हरकत.
**आडबंदर**-न० लहान बंदर.
**आडबाजार**-पु० लहान बाजार, आडपेंठ.
**आडबाजू**-स्त्री० एकांत स्थल.
**आडमिळकत**-स्त्री० रुस्वत, चिरीमिरी, लांच, बक्षीस.
**आडमुठा**-वि० दांड, अडाणी, मूर्ख.
**आडवा**-वि० वांकडा, तिरपा. २ सामोरा, सन्मुख.
**आडवाट**-स्त्री० पायवाट, आडवळण.
**आडाणी**-(सं) वि० अज्ञानी, अजाण, मूर्ख.
**आडें**-न० आढें. २ कणा, दांडा. ३ पाठीचा वरचा भाग.
**आडोसा**-पु० आडबाजू, आडघर.
**आढ्य**-(सं) वि० धनिक, श्रीमंत, पैसेवाला.
**आढ्यता**-(सं) स्त्री० गर्व, अहंपणा.
**आण**-स्त्री० शपथ, प्रतिज्ञा, अट, भाक.
**आणणें**-(सं) उ० वि० घेऊन येणें, बरोबर नेणें.
**आणभाक**-स्त्री० करारमदार.
**आणा**-पु० उखाणा. २ चार पैसे. ३ म्हण. ४ जमीन मोजण्याचें माप. ५ षोडशांश.
**आणि**-(सं) उ० आणखी, व, खेरीज.
**आत्मघात**-(सं) पु० स्वतःस मारून घेणें, आत्महत्या.
**आत्मनिंदा**-(सं) स्त्री० स्वतःची निंदा.
**आत्मबोध**-(सं) पु० आत्मविद्या, स्वतःविषयीं ज्ञान, आत्मज्ञान.
**आत्मवत्**-(सं) क्रि० स्वतःसारखें.
**आत्मश्लाघा**-**आत्मस्तुति**-(सं) स्त्री० प्रौढी, स्वतःची स्तुति.
**आत्मसंयमन**-(सं) न० आत्मनियमन, आपलें मन आपले ताब्यांत ठेवणें.
**आत्महित**-(सं) न० स्वतःचें हित, आपलपोटेपणा, आपमतलब.
**आत्मा**-(सं) पु० प्राण, अंतःकरण.
**आत**-(सं) स्त्री० आत्या, बापाची बहीण.
**आतां**-(सं) क्रि० ह्यावेळीं, सांप्रतकाळीं.
**आतिथ्य**-(सं) न० पाहुणचार, आदरसत्कार.

**आतुर**–(सं) वि० उतावळा, कासावीस, आजारी.
**आतेभाऊ**–(सं) पु० आतेचा मुलगा.
**आद्य**–(सं) वि० पहिला, मूळचा, प्रारंभींचा.
**आदत**–(आ) स्त्री० वाईट संवय–चाल.
**आदब**–(फा) पु० विनय.
**आदबी**–(फा) स्त्री० मान, मान्यता.
**आदर्श**–(सं) पु० आरसा, कांच, दर्पण.
**आदर**–(सं) पु० सत्कार, मान, मरातब.
**आदळणें**–(सं) उ० वि० आपटणें, पडणें, हापटणें.
**आदा**–(आ) पु० लाभ, मिळकत. २ भाव, अभिनय.
**आदान**–(सं) न० घेणें.
**आदाय**–(सं) पु० मिळकत, जमा, उत्पन्न.
**आदावत**–(आ) स्त्री० आकस, चुरस, द्वेष, शत्रुत्व.
**आदि**–(सं) पु० आरंभ. २ कारण.
**आदिअंत**–(सं) पु० आरंभशेवट, शेंडाबुडखा, अव्वलअखेर.
**आदिकरून**–(सं) क्रि० इत्यादि, वगैरे.
**आदिकारण**–(सं) न० मूळ–प्रथमचें कारण, निदान.
**आदित्य**–(सं) पु० सूर्य, रवि, भानु, अर्क.
**आदित्यवार**–(सं) पु० रविवार, आदितवार.
**आदिपुरुष**–(सं) पु० परमेश्वर, मूळपुरुष.
**आदिमर्दी**–(सं) क्रि० पहिला, प्रथमचा, मध्येंच.
**आदिमाया**–(सं) स्त्री० आदिशक्ति, शक्ति, पार्वती, कुदरत.
**आदेश**–(सं) पु० हुकूम, आज्ञा.
**आदौ**–(सं) क्रि० प्रथम, आधीं, प्रारंभीं.
**आधण**–न० कढत पाणी.
**आधार**–(सं) पु० आश्रा, टेका. २ कारण. ३ प्रमाणवचन.
**आधि**–(सं) स्त्री० मनोव्यथा. २ गाहाण. ३ लचांड.
**आधिपत्य**–(सं) न० मुख्यत्व, धनिपणा, मुखत्यारी.
**आधीं**–(सं) क्रि० ( **आदौ** पहा )
**आधेलें**–न० विषाशिवाय असलेल्या सर्पांपैकीं एक जातिविशेष.
**आन्हिक**–(सं) न० रोजचें कृत्य, नित्यकृत्य.
**आनंद**–(सं) पु० हर्ष, मौज, मजा.
**आनंदमय**–(सं) वि० आनंदानें भरलेलें, आनंदी.
**आनंदवृत्ति**–(सं) स्त्री० पु० आनंदी स्वभाव, सुस्वभाव.
**आनंदाश्रु**–(सं) पु० हर्षबिंदु, हसण्यापासून आलेलें अश्रु.
**आनंदित**–(सं) वि० आनंदी, सुखी.
**आनन**–(सं) न० तोंड, मुख, चेहरा.
**आनुमानिक**–(सं) वि० तर्काचें, अंदाजलेलें.
**आनुषंगिक**–(सं) वि० सहवासिक, संगतीचें, सहवासाचें.
**आप्त**–(सं) वि० आप्तविषय, नातेवाइक, नातलग, सगे, सोयरे, संबंधी.
**आप**–(सं) न० पाणी, उदक, जल, अंबु, २ पु० आप्त. ३ आपण, स्वतः.
**आपआपला**–(सं) वि० स्वतःचा.
**आपखुशीनें**–क्रि० आपण होऊन.
**आपंगणें**–उ० वि० अपंगणें, पोसणें, बाळगणें. २ निराश्रित–निराधार होणें–करणें.
**आपटणें**–उ० वि० हापटणें, आदळणें.
**आपण**–(सं) सर्व० स्वतः.
**आपण होऊन**–(सं) क्रि० आपखुशीनें, राजीखुशीनें.
**आपत्काळ**–(सं) पु० प्रतिकूळकाळ–वेळ, वाईट दिवस, विपत्ति.

**आपत्ति**–(सं) स्त्री०.( आपत्काळ पहा. )
**आपदा**–(सं) स्त्री०आपत्ति, गरीबी,दारिद्य.
**आपपर**–(सं) न० द्वैत.
**आपला**–(सं) वि० स्वतःचा, आपुला.
**आपेंआप**–(सं) क्रि० आपोआप, आपले आपणच, न करितां, प्रयत्नावांचून.
**आपोशन**–(सं) न० आचमनाचा एक प्रकार, आपोष्णी.
**आफत**–(आ) स्त्री० कठिण अवस्था, दुःख, कठिण प्रसंग.
**आफू**–(फा) स्त्री० अफीम, मादक पदार्थविशेष.
**आब**–(आ) पु० मान, अब्रू, कीर्ति, नांव. २ पाणी.
**आबकारा**–(फा) पु० पेला, पात्रविशेष.
**आबकारी**–(फा) स्त्री० मादक पदार्थावरची जकात, कर.
**आबदागीर**–(फा) स्त्री० छत्रविशेष.
**आबालवृद्ध**–(सं) सा. लहान थोर, सर्व मंडळी.
**आभरण**–(सं) न० भूषण, शोभा, दागिना.
**आभार**–(सं) पु० उपकार, अनुग्रह, ओशाळगत.
**आभारी**–(सं) वि० उपकारी, ओशाळा.
**आभास**–(सं) पु० भ्रम, डौल, भास, रूप.
**आभाल**–(सं) न० आकाश,नभ.
**आमचा**–(सं) वि० आपला.
**आमंत्रण**–(सं) न० बोलावणें, आंवतणें.
**आमराई**–(सं) स्त्री० आंबराई, आंब्याचीं झाडें.
**आह्मी**–(सं) सर्व० आम्ही स्वतः, आमची मंडळी.
**आमांश**–(सं) पु० आंव, हगवण.
**आमिष**–(सं) न० रुस्वत, मांसान्न, लांच.
**आमोद**–(सं) पु० सुवास, सुगंध, खुषबो.
**आय**–(सं) पु० आदाय, उपज, आकार, प्रत्यय, मिळकत, कमाई, आई.
**आयता**–(सं) क्रि० मेहनतीखेरीजचा, फुकट, मुफत. २ पक्वान्नविशेष.
**आयास**–(सं) पु० श्रम, त्रास, मेहनत, यातना, कष्ट.
**आयुध**–(सं) न० हत्यार, शस्त्र.
**आयुष्मान**–(सं) वि० चिरंजिवी, उदंड-आयुष्याचा.
**आयुष्य**–(सं) न० उमर, जिणें, जीवित, हयात.
**आर्जव**–(सं) न० स्तुति, हांजी हांजी, गुण गाणें.
**आर्जवी**–(सं) वि० हांजी हांजी करणारा, स्तुतिपाठक.
**आर्त**–(सं) वि० दुःखी, पीडित, आतुर.
**आर्द्र**–(सं) वि० ओलें, चिंब असलेलें, भिजलेलें.
**आर्य**–(सं) वि० श्रेष्ठ, शुद्ध, चांगला.
**आर्या**–(सं) स्त्री० श्रेष्ठ स्त्री. २ छंदविशेष.
**आर्ष**–(सं) वि० छांदिष्ट, अर्वाच्य, सम्राळशी, अनियमित. २ ऋषिप्रणीत.
**आर**–पु० ( **अजगर** पहा. ) आळशी, सुस्त. २ स्त्री० धार. ३ पु० चाकाच्या तुंब्यापासून धावेपर्यंत ठोकलेल्या लांकडांपैकीं प्रत्येक.
**आरक्त**–(सं) वि० तांबडा, लाल, सुरेख.
**आरड**–(सं)स्त्री० ओरड, कल्होळ, गोंधळ.
**आरडणें**–न० ओरडणें, कल्होळ करणें, कल्ला करणें.
**आरता**–क्रि०हिकडे, ह्या बाजूस.
**आरतापरता**–क्रि० इकडे तिकडे.
**आरती**–(सं) स्त्री० देवाला धूपदीप दाखविण्याची क्रिया, तें पात्र व ती कविता.

**आरपार**–क्रि० पार, पलीकडील बाजू सुद्धां, ह्या बाजूपासून त्या बाजूपर्यंत.

**आरब**–(आ) पु० आरबस्थानांतील रहिवाशी, आरबजातीचा. २ वि० कडक मनुष्य.

**आरबीतगादा**–(सं) पु० लकडा, निकड.

**आरंभ**–(सं) पु० प्रारंभ, सुरवात. श्रीगणेशायनमः

**आरंभशूर**–(सं) वि० आरंभ करण्यांत हुशार.

**आरवणें**–(सं) अ० ओरडणें, बांग देणें.

**आरशी**–स्त्री० चाळिशी, चष्मा, ( **आयना** पहा. )

**आराध्य**–(सं) वि० आराधन करण्यास योग्य, पूज्य.

**आराधणें**–(सं) स० पुजणें, मानणें, हुकुमांत राहून मर्जी संपादणें.

**आराधन**–(सं) न० पूजा, भक्ति, आराधना.

**आराम**–(सं) पु० विश्रांति, सुख, मौज. २ उपवन, बाग.

**आरास**–(फा) स्त्री० शोभा, सुभूषितपणा, व्यवस्था, दिव्याची मौज.

**आरी**–स्त्री० जोडे शिवण्याचें एक हत्यार.

**आरूढ**–(सं) वि० स्वार, चढलेला.

**आरोग्य**–(सं) न० निरोगीपणा सशक्तपणा.

**आरोप**–(सं) पु० आळ, अपवाद, बालंट.

**आरोपण**–(सं) न० रोपणें, पेरणें, पेरणी.

**आरोपित**–(सं) वि० पेरलेला, पकडलेला, आरोपी.

**आरोपी**–(सं) पु० दोषी, अपराधी.

**आरोहणं**–(सं) न० चढणें, बसणें, स्वार होणें.

**आरोळी**–(सं) स्त्री० मोठी हांक. २ पोळीविशेष.

**आलय**–(सं) न० घर, ठिकाण.

**आलस्य**–(सं) न० आळस, सुस्ती.

**आलागेला**–पु० पाहुणा, आगंतुक.

**आलाप**–(सं) पु० बोलणें, भाषण, गप्पा. २ तान.

**आलिकडे**–क्रि० थोड्या दिवसांपासून.

**आलिंगणें**–(सं) उ० वि० भेटणें, आवळणें, आलिंगन देणें.

**आलें**–न० आर्द्रक, कच्ची सुंठ.

**आव**–पु० डौल, डंभ, सोंग, आकार.

**आवक**–स्त्री० आगत. ( **आय** पहा. )

**आवडणें**–उ० वि० प्रीति करणें, प्यार होणें, इच्छा असणें.

**आवर्ण**–न० हरितालिका व्रताच्या अगोदरची रात्र.

**आवर्त**–(सं) न० परत येणें, फिरणें, पुनरागमन. २ भोंवरा.

**आवर्तन**–(सं) न० आवृत्ति, संपूर्ण पाठ.

**आविर्भाव**–(सं) पु० प्रसिद्धीभाव, स्पष्टीकरण.

**आवर**–न० आवार, पटांगण, अंगण. २ आटोप.

**आवरण**–(सं) न० कवच, वेष्टण, आभ्रा. २ आटोप, आवरणें.

**आवरणें**–(सं) उ० वि० व्यवस्था पहाणें–लावणें, नीट करणें, संभाळणें. २ आटोपणें.

**आवश्यक**–(सं) वि० जरूरीचें, गरजेचें, अवश्य लागणारें.

**आवा**–पु० कुंभाराची भट्टी. २ ओल्या भाताची मूठ. ३ स्त्री० स्त्री.

**आवांका**–पु० धीर, धैर्य.

**आवाज**–(फा) पु० नाद, ध्वनि, सूर.

**आवाहन**–(सं) न० बोलावणें, प्रार्थणें. २ आरंभ.

**आविष्ट**–(सं) वि० बाळगलेलें, असलेलें, मिळविलेलें. २ भूत इत्यादि लागलेला.

**आवृत्ति**-(सं) स्त्री० उजळणी, फिरून पढणें.
**आवेग**-(सं) पु० वेग, जोर, त्वरा.
**आवेश**-(सं) पु० राग, संताप, खून चढणें.
**आश्चर्य**-(सं) न० नवल, नवाई, विस्मय, चमत्कार.
**आश्रम**-(सं) पु० ऋषींची रहाण्याची जागा.
**आश्रय**-(सं) पु० आधार, टेका, थारा, आश्रा.
**आश्रित**-(सं) वि० अवलंबून रहाणारा, अधीन. २ नौकर.
**आश्वासणें**-(सं)स०धैर्य देणें, खातरी करणें.
**आश्वासन**-(सं) न० वचन, उत्तेजन, धैर्य.
**आशक**-(आ) वि० खुष, फिदा.
**आशंका**-(सं) स्त्री०शंका, संशय, अंदेशा.
**आशय**-(सं) पु० हेतु, मुद्दा, कारण, तत्त्व.
**आशा**-(सं) स्त्री० इच्छा, संभव, भरंवसा.
**आशीर्वाद**-(सं) पु० आशीर्वचन.
**आस्तिक**-(सं) वि० देव आहे असें मानणारा. २ सर्पांचा मुख्य.
**आस्था**-(सं) स्त्री० काळजी. २ इच्छा.
**आस्मान**-(फा) न० आकाश.
**आस्वल**-न० जनावर विशेष. रीस.
**आसक्त**-(सं) वि० गुंतलेला, तत्पर, मिळलेला. २ आशक.
**आसक्ति**-(सं) स्त्री० निष्ठा, प्रीति, स्नेह.
**आसन्न**-(सं) वि० जवळ, संनिध, नजीक.
**आसन**-(सं) न० बसण्याचें साधन, बस्कर-ण, बैठक.
**आसमंतात्**-(सं) क्रि० जवळपास, सभोंवतीं.
**आसड**-पु० अचूळ, गाई म्हशी इत्यादिकांचा एक स्तन.
**आसडणें**-स० हालवणें.
**आसपास**-(सं) क्रि० इकडे तिकडे, अलिकडे पलिकडे.
**आसरा**-(सं) पु० आधार, आश्रा, आश्रय.
**आसव**-(सं) न०अश्रु. २निचरून काढलेला पातळ पदार्थ. ३ मद्य.
**आसुरीनिद्रा**-(सं) स्त्री० कुंभकर्णाची झोंप.
**आल्हाद**-(सं) पु० हर्ष, आनंद.
**आल्हादणें**-(सं) अ० हर्ष पावणें, आनंदणें.
**आव्हान**-(सं) न० आवाहन, आमंत्रण.
**आहत**-(सं) वि० आपटलेला, जखमी.
**आहार**-(सं) पु० खाणें, भक्ष्य, खाद्य. २ शक्ति.
**आहुति**-(सं) स्त्री० बळी, होम करणें.
**आळ**-पु० आरोप, तोहोमत. २ ळळा. ३हट्ट.
**आळशी**-(सं) वि० सुस्त, आर्ष. २ वनस्पतीविशेष, जवस.
**आळस**-(सं) पु० सुस्तपणा, सुस्ती.
**आळा**-पु० बंधन. २ आवर.
**आळी**-स्त्री० गल्ली, वाट, बोळ, रस्ता.
**आं**-के० जिज्ञासा दाखविणारा शब्द.
**आंकडा**-(सं) पु० हिशोब. २ अंक.
**आंख**-(सं) पु० डोळा. २ नेत्राची सीमा.
**आंखणें**-(सं) स० रेखाटणें, रेघा ओढणें.
**आंखणी**-(सं) स्त्री० अंकनी, रेखाटणी, खूण करण्याचें साधन.
**आंगण**-(सं) न० अंगण, मैदान, परसू. २ खळ.
**आंगुळ**-(सं) न० ( **अंगुल** पहा. )
**आंघोळ**-स्त्री० स्नान, नाहाणें.
**आंच**-स्त्री० शेक, धग, उष्णता, अग्निसंस्कार.
**आंडें**-(सं) न० बीज, कवठ अंकुर.
**आंत**-(सं) श० मध्यें, आंतले बाजूस.
**आंतडें**-(सं) न० तांतीचें चर्म, अंत्रमाळ.
**आंतबट्टा**-(सं) पु० घटाव, खोट, तोटा.
**आंतल्या गांठीचा**-(सं) वि० मिस्कील, वस्ताद, मतलबी.

**आंतून**–(सं) क्रि० मधून, पासून.
**आंदण**–न० लग्नांतील वधू किंवा वरास दिलेलें बक्षीस.
**आंदुळणें**–(सं) स० झोंका देणें, हालवणें.
**आंदोलन**–(सं) न० हलणें, झोंका, हेलकावा.
**आंब**–(सं) स्त्री० हरभऱ्याच्या झाडावरील दवाचें पाणी.
**आंबसोल**–(सं) न० कच्या आंब्यांचें वाळविलेलें फोलपट–गीर.
**आंबा**–(सं) पु० आंब्याचा वृक्ष. २ आम्रफळ, कैरी.
**आंव**–(सं) स्त्री० ( **आमांश** पहा )
**आंवस–आवस**–(सं) स्त्री० अमावास्या. २ गाई–बैलांचें शिळें मांस.
**आंवळा**–(सं) पु० आमलक.
**आंवळणें**–(सं) उ० वि० आलिंगणें, बांधणें, एक करणें.
**आंस**–(सं) पु० कणा, अक्ष, ध्रुव.

---

# इ.

**इक्षु**–(सं) पु० ऊंस, गन्ना, काठा. २ स्त्री० शेरडी.
**इकडचा–ला**–वि० इकडचे बाजूचा, ह्या-बाजूचा.
**इकडून**–क्रि० येथून, ह्या जागेहून–कडून.
**इकडे**–क्रि० ह्या बाजूला–स.
**इकडेतिकडे**–क्रि० अलीकडे पलीकडे, आसपास.
**इकरार**–(आ) पु० करार, कबुली, वचन.
**इच्छा**–(सं) स्त्री० हेतु, मानस, विचार.
**इच्छांक**–(सं) पु० इच्छिलेला अंक. २ गणितसंज्ञाविशेष.
**इच्छाभोजन**–(सं) न० जेवणाराच्या इच्छेनुरूप भोजन–जेवण.
**इच्छामरण**–(सं) न० हवें तेव्हां मरणें.
**इच्छिणें**–(सं) अ० मानस करणें, बुद्धि होणें, चाहणें.
**इच्छित**–(सं) क्रि० पाहिजे तें, इच्छा गेलेलें, इष्ट.
**इच्छु**–(सं) वि० इच्छिणारा, हेतु धरणारा.
**इचा**–सर्व० हिचा.
**इज्जत**–(आ) स्त्री० आब्रू, मान, नांव.
**इज्जतखोर**–(आ) वि० हुजत करणारा, भांडणारा, भांडखोर.
**इजा**–(आ) स्त्री० पीडा, त्रास, उपद्रव.
**इजार**–(फा) स्त्री० विजार, जामा, पायापर्यंतचा चोळणा.
**इजारा**–(फा) पु० मक्ता ठेका, काम.
**इटकर**–स्त्री० विटकर, विटेचा टोला, रोडा.
**इटीदांडू**–पु० दांडू विटीचा खेळ.
**इडापिडा**–स्त्री० वाईट अवस्था, महात्रास.
**इत्यर्थ**–(सं) पु० हा मुद्दा, हा मतलब, असें.
**इत्यादि**–(सं) वि० वगैरे.
**इत्थंभूत**–(सं) वि० एकूनएक, अगदींसर्व, चटसारें, कच्चें, सविस्तर.
**इतका**–(सं) वि० एवढा.
**इतकासा**–(सं) वि० एवढासा, एवढा, थोडा.
**इतपत**–(सं) क्रि० ह्याप्रमाणें, असा, असला.
**इतबार**–(आ) पु० भरंवसा, विश्वास. २ आब्रू.
**इतमाम**–(आ) पु० सरंजाम, थाट, डौल. २ योग्यता.
**इतर**–(सं) वि० अन्य, दुसरा, कोणी तरी.
**इतराजी**–(आ) स्त्री० गैरमर्जी, नाखुषी.
**इतल्ला**–(आ) पु० संबंध, मतलब.
**इति**–(सं) वि० शेवट, संपवणारा शब्द.

**इतिहास**–(सं) पु० वृत्तांत, लेखी हकीकत, कथा, कहाणी.
**इतःपर**–(सं) क्रि० यापुढें.
**इनसाफ**–(आ) पु० न्याय, निवाडा.
**इनाम**–(आ) न० बक्षिस, चिरीमिरी. २ बक्षिस दिलेली जमीन.
**इनामदार**–(आ) पु० इमान असलेला गृहस्थ.
**इनामपत्र**–(आ) न० इनामाची सनद.
**इबलीस**–(आ) वि० भूतसंचारी, द्वाड.
**इभरत-इभ्रत**–(आ) स्त्री० धास्ती, धाक. २ आब. ३ साख.
**इमला**–(आ) पु० बंगला, महाल, वाडा, इमारत, घर.
**इमान**–(आ) न० वचन, सत्य, प्रतिज्ञा, प्रामाणिकपणा.
**इमानइतबार**–(आ) न० आब्रू. २ सत्यता.
**इमानी**–(आ) वि० प्रामाणिक, विश्वासू.
**इमानें इतबारें**–क्रि० खरोखर.
**इमारत**–(आ) स्त्री० वाडा, इमला.
**इरलें**–न० विरलें, झाडाच्या पानांची केलेली छत्री.
**इरसाल**–(आ) वि० अव्वल, अस्सल, उत्तम.
**इराकत**–(आ) स्त्री० लघवी, मुतणें, मूत्र.
**इरादा**–(आ) पु० हेतु, बेत, इच्छा, मर्जी.
**इलाखा**–(आ) पु० प्रांत, देश, हद्द.
**इलाची**–स्त्री० एलची, विलायची, वेलदोडा.
**इलाज**–(आ) पु० उपाय, युक्ति, योजना.
**इवलासा**–वि० थोडासा, इतकासा.
**इश्य**–के० वाईट गोष्टीचा किंवा पदार्थाचा स्त्रिया या शब्दानें धिक्कार करितात; वाईटरे बोवा ! नको ! नको !
**इशारत**–(आ) स्त्री० खूण, सूचना, इषारा.
**इष्क**–(फा) पु० प्रीति. २ विषय.
**इष्की**–(आ) वि० छान, छौल, अक्कडबाज, ऐटी, चैनी.
**इष्टि**–(सं) पु० इष्टीच्या प्रयोगाचा दिवस, इष्टीचा प्रयोग. २ मित्र. ३ हवें असलेलें.
**इष्टदेवता**–(सं) स्त्री० प्रियदेवता.
**इषक**–(आ) पु० नाद, छंद, विषय, प्रीति.
**इस्तकबील**–(आ) श० पासून.
**इस्त्री**–(सं) पु० इस्तरी, खळ लावून आणलेली सफाई. २ कपडे साफ करण्याचें हत्यार.
**इसम**–(आ) पु० असामी, मनुष्य, बाब.
**इसवी**–(आ) वि० येशूचा शक, सन.
**इसारा**–(आ) पु० विसार, खात्री, हमी, निशा.
**इहलोक**–(सं) पु० हा लोक, दुनिया, हें जग.
**इळा**–पु० विळा, कोयता, भाजीफळें वगैरे चिरण्याचें साधन.
**इळी**–स्त्री० विळी, सुरी, चाकू.
**ईक्षण**–(सं) न० अवलोकन. २ डोळा, दृष्टि.
**ईक्षित**–(सं) वि० पाहिलेला.
**ईट**–(सं) स्त्री० वीट.
**ईड**–(सं) न० लिंबाचें झाडविशेष. २ इड लिंबू.
**ईद**–(आ) स्त्री० मुसलमान लोकांचा सणाचा दिवस.
**ईर्ष्या-ईर्षा**–(सं) स्त्री० जिगीषा. २ उल्हास, उत्साह, हौस.
**ईश्वर**–(सं) पु० परमेश्वर, देव, भगवान्.
**ईश्वरसत्ता**–(सं) स्त्री० देवाची मर्जी, परमेश्वराची लीला.
**ईश्वरसूत्र**–(सं) पु० ईश्वराचा नियम, ईश्वरी संकेत.
**ईश्वरीपुरुष**–(सं) पु० देवाचा अंश, साधु.
**ईश**–(सं) पु० देव, श्रेष्ठ, थोर, धनी.
**ईशान्य**–(सं) स्त्री० उत्तर व पूर्व यांच्या मधील दिशा.
**इंगळ**–पु० निखारा.

**इंगळी**-(सं) स्त्री० विंचू, वृश्चिक. २ वि० तीव्र, कडक.
**इंगा**-पु० कठिण प्रसंग. २ चांभाराचें कातडें नरम करण्याचें हत्यार.
**इंगित**-(सं) न० पु० उद्देश, हेतु, मुद्दा, अभिप्राय.
**इंद्र**-(सं) पु० देवांचा राजा. २ मोठा, श्रेष्ठ.
**इंद्रचाप**-(सं) पु० इंद्रधनुष्य.
**इंद्रजाल**-(सं) न० नजरबंदी, जादू.
**इंद्रिय**-(सं) न० अवयव. २ शिस्न.
**इंदु**-(सं) चंद्र, चांद, चांदोबा, शशी.
**इंधन**-(सं) न० सर्पण, विस्तवाचें साधन.

---

## उ.

**उक्त**-(सं) वि० बोललेलें, सांगितलेलें. २ योग्य.
**उक्ता**-(सं) वि० उभडा, मक्तयानें.
**उक्ति**-(सं) स्त्री० भाषण, वाक्य, शब्द.
**उकटणें-उकलणें**-उ० वि० सोडविणें. नीट करणें, गुंता काढणें, गुंता निवर्णे.
**उकडणें**-(सं) उ० वि० शिजणें, शिजविणें, गर्मी वाटणें, उष्मा होणें.
**उकडवा-उकिडवा**-(सं) वि० चवड्यावर बसलेला.
**उकरणें**-(सं) उ० वि० खणणें, खोदणें, खड्डा करणें.
**उकळणें**-(सं) उ० वि० उकडणें, शिजविणें. २ वसूल करणें.
**उकळी**-(सं) स्त्री० कढ, आधण.
**उकाडा**-(सं) पु० उष्मा, गर्मी. २ रतीब.
**उकिरडा**-पु० केर, कचरा. २ केरकचरा टाकण्याची जागा.
**उकीर**-पु० कचरा, उकरलेली माती.
**उखळ**-(सं) न० होन, वाहीन, उखळी, दगडाचें कुटायाकरिता केलेलें साधन.
**उखळणें**-(सं) उ० वि० उकरणें, नांगरणें, मोडणें, पाडणें, काढणें, नाहींसा करणें.
**उखाड**-(सं) स्त्री० उचलून टाकणें.
**उखाणा**-(सं) पु० कूट, आहाणा, आणा.
**उग्र**-(सं) वि० भयंकर रागीट, मस्त.
**उग्रट**-(सं) वि० उग्रवासाचा.
**उग्रण-उग्राणी**-स्त्री० ( **उगवणी** पहा. )
**उगम**-(सं) पु० मूळ, नदीचा आरंभ, कारण.
**उगवणी**-(सं) स्त्री० उग्राणी, बाकी, येणें.
**उगवणें**-(सं) अ० वर येणें, उत्पन्न होणें, लागणें, येणें, रुजणें.
**उगवत**-(सं) स्त्री० पूर्व, पूर्वबाजू. २ वि० उगवणारा, वर येणारा.
**उगविणें**-(सं) स० उग्राणी करणें, ( सूड ) घेणें.
**उगा**-वि० स्वस्थ, शांत, गप्प, उगाच.
**उगाच**-क्रि० कारणाखेरीज.
**उगारणें**-स० उठविणें, उचलणें.
**उगाळणें**-(सं) उ० वि० घांसणें, वाटणें.
**उगें**-क्रि० कारणाखेरीज, उगा, उगाच.
**उघड**-(सं) वि० स्वच्छ, स्पष्ट, खोल, खुली हवा.
**उघडणें**-(सं) स० खोलणें, खुलें करणें.
**उघडा**-(सं) वि० उघडलेला, खुला, खोललेला, नागवा, स्वच्छ.
**उघडा माथा**-(सं) पु० उजळ माथा, निष्कलंकपणा.
**उच्च**-(सं) वि० ( **उंच** पहा. )
**उच्चाटन-ण**-(सं) न० उखाड.
**उच्चार**-(सं) पु० आवाज, बोलणें.

**उच्चारणें**-(सं) स०. म्हणणें.
**उच्छ्वास**-(सं) पु० श्वासोच्छ्वास, निश्वास.
**उच्छिष्ट**-(सं) वि० उष्टें, वापरलेलें.
**उच्छेद**-(सं) पु० नाश, अनर्थ. २ त्रास.
**उचका**-(सं) पु० काळजी, घाई, भय, वचक.
**उचकी**-(सं) स्त्री० हिक्का, रोगविशेष.
**उचल्या**-(सं) पु० भामट्या, चोर, खिसेकातरू.
**उचलणें**-(सं) स० वर करणें, हातांत घेणें, उठविणें.
**उचाट**-(सं) स्त्री० उतावळी, घाई.
**उचापत**-स्त्री० कर्ज, उधारी.
**उचित**-(सं) वि० योग्य, नीट.
**उजगारणें**-स० बजावणें, स्पष्टोक्तीनें सांगणें.
**उजवा**-(सं) वि० उजव्या बाजूचा, सव्य, सरळ, सवईचा, उजू.
**उजळ**-(सं) वि० स्वच्छ, लख्ख, चकचकित, निष्कलंक.
**उजळणी**-(सं) स्त्री० शिकलेलें फिरून वाचणें, आवृत्ति. २ अंकलिपि.
**उजळणें**-उ० वि० स्वच्छ करणें, चकाकी आणणें, स्वच्छ होणें.
**उजळा**-पु० स्वच्छ करण्याचें साधन.
**उजाड**-वि० ओसाड, वस्तीरहित.
**उजू**-(सं) वि० उजवा. २ बरोबर, सरळ, नीट, दोरीसूत.
**उजेड**-(सं) पु० प्रकाश, किरण, प्रभा.
**उजेडतां**-(सं) क्रि० उजाडतां, प्रकाशाबरोबर, सकाळीं.
**उटणें**-न० कांतिवर्धक द्रव्य, अंगास लावण्याची उटी.
**उटी**-स्त्री० सुगंधि पदार्थ, लेप.
**उठणें**-(सं) अ० उभें रहाणें, जागें होणें.
**उठबशी**-(सं) स्त्री. बैठक, उठून बसण्याची क्रिया. २ मेहनत.
**उठपळ**-क्रि० वारंवार.
**उठवण**-(सं) स्त्री० उठवणी, थकवा, अशक्तपणा.
**उठवळ**-(सं) वि० आळशी, सुस्त, मंद.
**उठविणें**-(सं) स० उभें करणें, चिडविणें.
**उठाठेव**-स्त्री० चौकशी, पंचाईत, रिकामी खटपट.
**उठाणूं**-न० गळूं, बेंड.
**उठाव**-(सं) पु० उठण्याची क्रिया.
**उड्डाण**-(सं) न० उडी, झेंप.
**उडणें**-(सं) अ० हवेंत पोहणें.२ बार होणें. ३ मैथुन करणें. ४ नाहींसा होणें, खर्च होणें.
**उडत बातमी**-(सं) स्त्री० गप्प, बात, भुमका.
**उडवाउडव**-(सं) स्त्री० लटपटपंची, कोलाकोली.
**उडविणें**-(सं) स० फेंकणें, पसरणें, उधळणें. २ बंदूक इत्यादींचा बार काढणें.
**उडाणटप्पू**-(सं) वि० निरुद्योगी, खुशालचंद, चंचल.
**उडी**-(सं) स्त्री० झेंप, उड्डाण. २ उमेद.
**उणा**-(सं) वि० कमी, कमती, हलका, अपरा.
**उणें**-(सं) वि० कमती. २ न० चूक, अपराध, न्यून.
**उणें उत्तर**-(सं) न० वाईट भाषण, हमरीतुमरी, अरेतुरे.
**उत्कर्ष**-(सं) पु० भरभराट-टी, चांगली स्थिति, चलती.
**उत्कृष्ट**-(सं) वि० उत्तम, फारच चांगलें, नामी, सुरेख.
**उत्तर**-(सं) न० प्रतिवचन, जबाब. २ उदीची दिशा. ३ पुढचा.
**उत्तरकर्म**-(सं) न० क्रिया, अंत्येष्टि.

**उत्तरकाल**–(सं) पु० भावीकाल, पुढील-काल, भविष्य काळ.

**उत्तरपंथ**–(सं) पु० शेवटचा पंथ–मार्ग.

**उत्तरपक्ष**–(सं) पु० वद्यपक्ष, कृष्णपक्ष. २ उत्तर, जबाब, प्रतिपक्ष.

**उत्तरपूजा**–(सं) स्त्री० पूजेचा शेवटचा भाग.

**उत्तरार्ध**–(सं) न० दोन भागांतून पुढचा अर्धा भाग.

**उत्तीर्ण**–(सं) वि० मागें टाकलेला, उतरलेला, पार–पसार झालेला.

**उत्तेजक**–(सं) वि० उत्तेजन देणारा, पुढारी.

**उत्तेजन**–(सं) न० प्रोत्साहन, जागृति, उमेद, मदत, फूस.

**उत्थान**–(सं) न० उठणें, उभें रहाणें.

**उत्थापक**–(सं) वि० उठवणारा, उभा करणारा.

**उत्थापन**–(सं) न० उठवणी. २ सत्कार, उभें रहाण्याचा मान, ताजीम.

**उत्पत्ति**–(सं) स्त्री० उगम. २ जन्म, मूळ ठिकाणा. ३ पीक.

**उत्पन्न**–(सं) न० आवक, उपज, प्राप्ति, मिळकत, पैदाश–प.

**उत्पात**–(सं) पु० अपशकुन, दुश्चिन्ह.

**उत्पाती**–(सं) वि० खोडकर, द्वाड, व्रात्य.

**उत्पादन**–(सं) न० ( उत्पत्ति पहा. )

**उत्प्रेक्षा**–(सं) स्त्री० कल्पना, भावना. २ अर्थालंकारविशेष.

**उत्सव–उत्साव**–(सं) पु० उत्साह, आनंदाचा दिवस, उरूस.

**उत्सुक**–(सं) वि० उतावळा, उत्कंठित.

**उत्कंठा**–(सं) [illegible] औत्सुक्य, [illegible]

**उतरण**–[illegible] ० उतार. [illegible] [illegible]

**उतरणें**–( [illegible] ) अ० खालीं [illegible], रिकामें करणें, कमी होणें.

**उतरणारा–उतरता**–(सं) वि० खालीं जाणारा, कमी होणारा.

**उतरता पाया**–पु० प्रतिकूल काल, उतरती कमान, दशा.

**उतरतीकमान**–न० प्रतिकूलता, र्‍हास, कमी मान.

**उतरती वेळ**–(सं) स्त्री० दुपारानंतर दिवसाचा तिसरा हिस्सा.

**उतराई**–(सं) वि० आभारी, उपकार फेडलेला.

**उतराण**–स्त्री० उत्तरेकडचा वारा.

**उताणा**–(सं) वि० चीत, तोंड वर करून, उलथा.

**उतार**–(सं) पु० कमती होण्याची दशा. २ नाव वगैरेचें हांशील, नोर. ३ नदी इत्यादि जलाशयांत पाणी कमी असण्याची जागा.

**उतार वय**–(सं) न० म्हातारपण, वृद्धदशा.

**उतारा**–(सं) पु० उपाय, उतरण्याचा पदार्थ. २ नक्कल, प्रत. ३ साद्यंत मजकुरांतील अंश.

**उतारू**–(सं) पु० वाटसरू, पांथस्थ, प्रवासी.

**उतार्‍या**–(सं) पु० नावाडी, नाखवा.

**उतावळा**–वि० अधीर, घाई करणारा.

**उतारपेठ**–(सं) स्त्री० बाजाराचें गांव.

**उथळ**–(सं) वि० थोडा खोलपणा असलेला, सखल.

**उथळी**–(सं) स्त्री० खुरची, तळखडा, बुंधा.

**उद्देश**–(सं) पु० हेतु, आशय, मानस, कारण.

**उद्धट**–(सं) वि० दांडगा, उद्दाम, जास्ती धीट, बेपरवा.

**उद्धरणें**–(सं) उ० वि० मुक्ति देणें, पावन करणें, मोक्षास नेणें, मुक्त होणें.

**उद्धार**–(सं) पु० मोक्ष, सुटका, मुक्ति.

**उद्भव**–(सं) पु० जन्म, आरंभ, प्रारंभ.

**उद्भवणें**–(सं) अ० होणें, आरंभ होणें.

**उद्भिज**–(सं) वि॰ जमिनींतून वर येणार [illegible] मोठी भर [illegible] २ [illegible]ळण्या-
वृक्षादि.

**उद्यम**–(सं) पु॰ उद्योग, धंदा, काम.

**उद्यां**–(सं) क्रि॰ उदईक, उद्यांच्या दिवशीं.

**उद्युक्त**–(सं) क्रि॰ गढलेला, गुंतलेला. २ तयार झालेला.

**उद्योग**–(सं) पु॰ उद्यम, कामधंदा.

**उद्योगी**–(सं) वि॰ काम करणारा. जो उद्योग करितो तो, मेहनती.

**उद्विग्न**–(सं) वि॰ उदास, उदासीन, विरागी.

**उद्वेग**–(सं) पु॰ काळजी, उद्विग्न होण्याची क्रिया, हल्ला, हरकत.

**उदईक**–(सं) क्रि॰ उद्यां, दुसऱ्या दिवशीं.

**उदक**–(सं) न॰ पाणी, जल.

**उदंड**–(सं) वि॰ अतिशय, पुष्कळ.

**उदधि**–(सं) पु॰ समुद्र, दर्या, सिंधु.

**उदमी**–(सं) पु॰ व्यापारी, दुकानदार.

**उदय**–(सं) पु॰ प्रकाश, उठणें, येणें. २ चांगली स्थिति.

**उदर**–(सं) न॰ पोट, कोठा. २ रोगविशेष.

**उदरनिर्वाह**–(सं) पु॰ निर्वाह, चरितार्थ, खाणें.

**उदार**–(सं) वि॰ थोर मनाचा, धर्म करणारा, दाता.

**उदास**–(सं) वि॰ दुःखी, मलूल, सुन्न, खिन्न.

**उदासीन**–(सं) वि॰ उद्विग्न, ओसाड.

**उदाहरण**–(सं) न॰ नमुना, दाखला, कित्ता.

**उदी**–(आ) वि॰ तपकिरी, किंचित् पिंगट. २ धुपाटणें, ऊद जाळण्याचें पात्र.

**उदीम**–(सं) पु॰ व्यापार, सौदा, देवघेव.

**उधड**–क्रि॰ उक्ता, मक्तयानें.

**उधळ्या**–(सं) वि॰ दिवाळखोर, फाजील खर्च करणारा.

**उधळणें**–(सं) उ॰ वि॰ पसरणें, फेंकणें. २ फाजील खर्च करणें. ३ जोरानें पळणें.

**उधार**–(सं) वि॰ पतीवर जिन्नस आणणें, ग्नात्यावर आणणें, कर्ज.

**उन्नत**–(सं) वि॰ श्रेष्ठ, उंच, मोठा.

**उन्मत्त**–(सं) वि॰ माजलेला, मस्त, दांडगा.

**उन्मीलन**–(सं) न॰ प्रारंभ, उघडण्याची-आरंभण्याची क्रिया. २ फुलणें, विकसन.

**उन्मुख**–(सं) वि॰ वर तोंड केलेला, उद्युक्त.

**उन्हाळा**–(सं) पु॰ वसंत व ग्रीष्म ऋतूचा काळ. २ उष्मा.

**उन्हाळी**–स्त्री॰ रोगविशेष. २ औषधिविशेष.

**उन्हाळें**–(सं) न॰ गरम पाण्याचें टाकें-तळें.

**उनाड**–वि॰ चटोर, निरुद्योगी, चावट, उद्धट.

**उपक्रम**–(सं) पु॰ आरंभ, प्रारंभ, सुरवात.

**उपकरण**–(सं) न॰ साहित्य.

**उपकरणीं**–(सं) न॰ पूजेचीं भांडीं.

**उपकार**–(सं) पु॰ आभार, कृपा, दया.

**उपकारी**–(सं) वि॰ कृपाळू, दयावान. २ आभारी.

**उपग्रह**–(सं) पु॰ प्रतिग्रह, लहान ग्रह.

**उपगुरु**–(सं) पु॰ मालचाव्या, प्रतिगुरु.

**उपचार**–(सं) पु॰ उपाय, पथ्य, तजवीज.

**उपज**–(सं) स्त्री॰ प्राप्ति, मिळकत.

**उपजणें**–(सं) अ॰ जन्मणें, उद्भवणें, निपजणें.

**उपजत**–(सं) क्रि॰ जन्मतः, जन्मापासून, जातीचा.

**उपजीवन**–(सं) न॰ उदरनिर्वाह, उपजीविका.

**उपट्या**–(सं) पु॰ उचल्या, घेऊन जाणारा.

**उपटणें**–(सं) उ॰ वि॰ काढणें. २ नाहींसें करणें, पळविणें, चोरणें. ३ फिरून उद्भवणें.

**उपडा**–वि॰ पालथा, उताणा, अधोमुख.

**उपद्व्याप**–(सं) पु॰ उरस्फोड, रिकामा त्रास.

**उपद्रव**–(सं) पु० त्रास, पीडा, रोग, बाधा.
**उपदंश**–(सं) पु० गर्मीचा विकार.
**उपदिष्ट**–(सं) वि० सांगितलेलें, उपदेशलेलें, समजलेलें.
**उपदेश**–(सं) पु० दीक्षा, शिक्षण.
**उपदेशक**–(सं) पु० शिक्षक, गुरु.
**उपध्वनि**–(सं) पु० प्रतिशब्द, प्रतिध्वनि.
**उपनयन**–(सं) न० मुंज, मौंजी. २ चष्मा.
**उपनाम**–(सं) न० आडनांव, अडक.
**उपनेत्र**–(सं) न० आरशी, चाळिशी, चष्मा.
**उपपत्ति**–(सं) स्त्री० कल्पना, उत्पत्ति, मूळ, संबंध, उपपादन.
**उपपादणें**–(सं) स० सांगणें, प्रतिपादणें.
**उपपादन**–(सं) न० स्थापन, प्रतिपादन.
**उपभोक्ता**–(सं) वि० भोक्ता, भोगी, चैनी.
**उपभोग**–(सं) पु० उपयोग, अनुभव, व्यय.
**उपभोगणें**–(सं) स० योग्य व्यय करणें, कामास लावणें, उपयोग करणें.
**उपमर्द**–(सं) पु० अपमान, अनादर, धिक्कार.
**उपमा**–(सं) स्त्री० बरोबरी, साम्य. २ अर्थालंकारविशेष.
**उपमाता**–(सं) स्त्री० दाई, आया.
**उपमान**–(सं) न० उदाहरण, दाखला, दृष्टांत, ज्याशीं साम्य दाखवायाचें तो पदार्थ.
**उपमेय**–(सं) न० ज्याचें साम्य दाखवायाचें तो पदार्थ.
**उपयुक्त**–(सं) वि० उपयोगी, कामाचें, जरूरीचें.
**उपयोग**–(सं) पु० व्यय, कार्य, काम, जरूरी.
**उपर**–(सं) श० नंतर, उपरी, उपरांत, वर.
**उपरणा-णें**–पु० अर्धे धोतर, फर्द.
**उपरति**–(सं) स्त्री० वैराग्य.
**उपराग**–(सं) पु० ग्रहण.
**उपरी**–(सं) पु० पाहुणा, नवखा, वरवरती.
**उपरोध**–(सं) पु० संकोच, धक्का, शंका.
**उपलब्ध**–(सं) वि० मिळालेला, सांपडलेला.
**उपलब्धि**–(सं) स्त्री० प्राप्ति, फायदा, नफा.
**उपलाणा-णू**–(सं) वि० खोगिराखेरीज, बिनजिनाचा.
**उपवन**–(सं) न० उद्यान, बगीचा, बाग.
**उपवर**–(सं) वि० लग्नास योग्य, विवाहा जोगा.
**उपवस्त्र**–(सं) न० ( **अंगवस्त्र** पहा. )
**उपवास**–(सं) पु० उपास, लंघन.
**उपशब्द**–(सं) पु० प्रतिशब्द, पर्यायशब्द.
**उपशम**–(सं) पु० आराम, शांति, कमीपणा.
**उपस्थान**–(सं) न० स्तुतिविशेष, नमस्कार.
**उपस्थिति**–(सं) स्त्री० स्मृति, आठवण.
**उपस्थित**–(सं) वि० जवळ आलेला, पोंचलेला, उपटलेला.
**उपसणें**–(सं) अ० बाहेर काढणें, रिकामें करणें.
**उपसर्ग**–(सं) पु० उपद्रव, संबंध. २ शब्दाचे अगोदर लागणारा प्रत्यय.
**उपसा**–पु० उपसण्याचा व्यापार, बाहेर काढणें.
**उपसंहार**–(सं) पु० गुंडाळा, सारांश, समाप्ति.
**उपहार**–(सं) पु० फराळ, थोडें खाणें.
**उपहास**–(सं) पु० थट्टा, निंदा.
**उपळणें**–(सं) अ० वर येणें, उलथणें, झरणें.
**उपाध्या**–(सं) पु० उपाध्याय. २ भामट्या.
**उपाध्याय**–(सं) पु० धर्मगुरु, उपाध्या.
**उपाधि**–(सं) स्त्री० त्रास, उपसर्ग. २ विशेषण, पदवी.
**उपाय**–(सं) पु० तजवीज, युक्ति, औषध.
**उपार्जित**–(सं) वि० मिळविलेलें, संपादिलेलें.
**उपाव**–(सं) पु० उपाय, तजवीज, इलाज.
**उपाशी**–(सं) वि० उपवाशी, क्षुधित, भूक लागलेला.
**उपास**–(सं) पु० उपवास, उपोषण, लंघन.

**उपासक**–(सं) वि० उपासना करणारा, सेवक, भक्त.
**उपासना**–(सं) स्त्री० आराधन, पूजन.
**उपासमार**–(सं) स्त्री० खावयास न मिळाल्याची स्थिति.
**उपेक्षणें**–(सं) स० उपमर्द-दुर्लक्ष करणें.
**उपेक्षा**–(सं) स्त्री० दुर्लक्ष, अवमान, अपमान.
**उपेक्षित**–(सं) वि० काळजी न घेतलेला, निराश्रित.
**उपोद्घात**–(सं) पु० आरंभ, प्रस्तावना. २ ओळख, मुलाखत.
**उपोषण**–(सं) न० लंघन, उपास, उपवास.
**उपोषित**–(सं) वि० उपाशी.
**उफराटा**–वि० उलट, मागें, उलटा.
**उब्जे**–पु० चुरमुरे किंवा लाह्या तयार होण्यापूर्वीची धान्याची स्थिति.
**उबगणें**–अ० उबणें, कंटाळणें.
**उबट**–वि० कोंबट, थोडें ऊन, किंचित् उष्ण.
**उबणें**–अ० घाम सुटणें, गर्मी होणें.
**उबवणें**–स० बनविणें, करणें. २ ऊब देणें, ऊन करणें.
**उबारा**–पु० उष्णता. २ द्रव्य, ऐवज.
**उभट**–वि० उंचेला, उंचट.
**उभय**–(सं) सर्व० दोन्हीं, दोघे, जोडी.
**उभयचर**–(सं) वि० जलस्थलवासी.
**उभयतां**–(सं) वि० दोघेजण.
**उभयान्वयी**–(सं) वि० दोहोंस जोडणारें. २ अव्ययविशेष.
**उभळणें**–(सं) पाखडणें, सडणें, निवडणें.
**उभा**–(सं) वि० बांधलेला, रचलेला, उभा केलेला.
**उभा बाजार**–(सं) पु० सगळा बाजार, एवढा बाजार.
**उभारणें**–(सं) उ० वि० उभा करणें-होणें, बांधणें, जमा करणें, पाया घालणें.
**उभीदुपार**–(सं) स्त्री० भरदुपार.
**उमगणें**–(सं) उ० वि० शोधणें, पत्ता लावणें-लागणें, समजणें, सांपडणें.
**उमज**–पु० समज, ज्ञान.
**उमटणें**–अ० दिसणें, दृष्टी येणें, उठणें.
**उमदळणें**–(सं) अ० वांति होणें, मळमळणें.
**उमदा**–(आ) वि० तरुण, चांगला, छानदार.
**उमर**–(आ) स्त्री० वर्षे, वय, आयुष्य.
**उमराव**–(आ) पु० अमीर, थोर गृहस्थ, मानकरी.
**उमलणें**–(सं) अ० प्रफुल्लित होणें, फुलणें.
**उमळ**–स्त्री० मळमळ, वांति होण्याची पहिली दशा.
**उमाप**–वि० असंख्य, पुष्कळ, अतिशय.
**उमेद**–(फा) स्त्री० उत्तेजन, धैर्य. २ आशा.
**उमेदवार**–(फा) योग्य, पणांत आलेला, प्रौढ.
**उर्वी**–(सं) स्त्री० पृथ्वी, भूमि, जग.
**उरकणें**–उ० वि० आटपणें, संभाळणें, पार पाडणें.
**उरग**–(सं) पु० सर्प, साप.
**उरजा**–(सं) स्त्री० व्यवस्था, तजवीज.
**उरणें**–(सं) अ० रहाणें, शिलक होणें, जास्ती होणें.
**उरफाटा**–वि० उलटा, प्रतिकूळ.
**उरमट–उर्मट**–वि० उद्धट, जास्ती धीट.
**उरविणें**–स० ठेविणें, शिलक राखणें.
**उरस्फोड**–स्त्री० अतिप्रयत्न, माथाकूट, डोकेफोड.
**उरुबरु**–(फा) क्रि० समक्ष, समोर, रूबरू.
**उरूस**–(आ) पु० उत्साह, उत्सव. २ लग्नसंबंधी भोजन समारंभ.
**उल्कापात**–(सं) पु० नक्षत्रपात, तारे पडणें.
**उल्लेख**–(सं) पु० उच्चार. २ विचार, मतलब.
**उल्लू**–(सं) वि० उतावळा, घाई करणारा.

**उल्हास**–(सं) पु० हर्ष, आनंद, उत्साह.

**उल्लंघणें**–(सं) स० वलांडणें, पार जाणें.

**उलगडणें**–उ० वि० सोडविणें, संपणें, संपविणें.

**उलगडा**–पु० मुक्तता. २ निकाल, फैसला.

**उलट**–वि० प्रतिकूल, मागें, उफराटें, उलटा.

**उलटणें**–उ० वि० पालथें किंवा उताणें होणें–करणें, उफराटें होणें–करणें. २ पळतां पळतां पाठलाग कराणारावर हल्ला करणें.

**उलटा**–वि० ( **उलट** पहा. )

**उलटी**–स्त्री० ओकारी, वांति. २ पलथ, उलटणें.

**उलथणें**–उ० वि० उलटणें.

**उलथा**–वि० उलटा, ऊर्ध्वमुख, उताणा.

**उलथापालथ**–स्त्री० वरखालीं, घडामोड.

**उलूक**–(सं) न० घुबड, दिवाभीत.

**उश्शाप**–(सं) उश्राप, श्रापशमन.

**उश्शी**–स्त्री० वर येणें.

**उशीरां**–क्रि० अवेळीं, दिरंगीनें.

**उशी**–(सं) स्त्री० डोक्याखालीं ठेवण्याची गिरदी, उसें, सिराना.

**उशीर**–(सं) पु० अवकाश, अवेळ, देर, दिरींग.

**उष्ण**–(सं) वि० ऊन, गरम, उन्हून.

**उष्ट्रखाना**–पु० उंटाचा कोंडवाडा, उंट रहाण्याची जागा.

**उष्टा**–(सं) वि० चाखलेला, उष्टावलेला.

**उष्टावण**–(सं) न० अन्नप्राशन.

**उष्टावणें**–(सं) न० थोडें खाणें बाकी टाकणें.

**उषःकाल**–(सं) पु० सकाळ, तांबडें फुटण्याची वेळ, प्रातःकाल.

**उस्तरणें**–(सं) उ० वि० उसकटणें, उस्तवारी करणें, उतरणें.

**उस्वास**–(सं) पु० पाण्याची कोठी.

**उसकटणें**–उ० वि० मोडणें, पाडणें, उतरणें, विचकणें.

**उसण**–स्त्री० वात सरणें, [illegible]चरें, कटिवात.

**उसनें**–वि० उधार.

**उसपणें**–(सं) स० कमी करणें, रिकां करणें.

**उसवणें**–उ० वि० शिवण काढणें–निघणें उधडणें.

**उसळणें**–(सं) अ० वर येणें, उफळणें.

**उसासा**–(सं) पु० दुःखाचा उद्गार, उश्वास.

**उसें**–(सं) न० मथळें, उशी.

**उळकंबणें**–उ० वि० टांगणें, टांगून घेणें लटकणें.

**उळकंबा**–पु० झोंका, हेलकावा.

**ऊ**–(सं) स्त्री० यूका, केसांत उत्पन्न होणारा जीव.

**ऊठबस**–स्त्री० मेहनत.

**ऊद**–(सं) पु० कांड्या चोर. २ धूपविशेष.

**ऊन**–**ऊन्ह**–(सं) न० सूर्याचें किरण. २ वि० उष्ण, उन्हून.

**ऊब**–स्त्री० गर्माई, उष्णता, गर्मी.

**ऊजा**–स्त्री० ( **उरजा** पहा. )

**ऊर्जित**–( सं ) वि० भरभराटीचा, अनुकूल.

**ऊर्ध्व**–(सं) वि० वरचा, उंच ठिकाणचा.

**ऊर्फ**–(आ) क्रि० अथवा, किंवा, बदला.

**ऊर**–(सं) पु० छाती, हृदय, स्तन.

**ऊष्मा**–(सं) पु० ताप, गर्मी, उकाडा.

**ऊहापोह**–(सं) पु० वादविवाद, वाटावाट.

**उं**–के० सांगितलेली गोष्ट फिरून सांगण्याची इच्छा असलयास ह्याचा उपयोग करितात.

**उंच**–(सं) लांब, श्रेष्ठ, वाढलेला, उच्च.

**उंचवटा**–(सं) पु० टेंकाड, टेप, ढीग.

**उंचा**–(सं) वि० उत्तम, चांगला, फुरालांब.

**उंचाड**–(सं) वि० उंच, मोठा, उच्च.

**उंचोटा**–(सं) पु० ( **उंचवटा** पहा. )

उंट–(सं) पु० उष्ट्र, सांड.
उंडा–पु० पक्वान्नविशेष.
उंडी–स्त्री० वृक्षविशेष. २ डिखळ.
उंदीर–(सं) पु० मूषक, आखु, चुव्वा.
उंबर–(सं) पु० औदुंबर. २ त्याचें फळ, गुल्लेर.
उंबरघाट–उंबरठा–उंबरा–(सं) पु० दारवठा. २ घर.
उंबराचें फूल–(सं) न० कधीं न दिसणारी वस्तु, अदृश्य पदार्थ.
उंहुं–के० छे, छे, नव्हे, नको.
उंः–के० छुट, छेः, यांत काय आहे.
ऊं–के० काय, कसें, पुनः बोल.
ऊंस–(सं) पु० ऊस, इक्षु, साठा, शेरडी.

## ऋ.

ऋजु–(सं) वि० उजू, समोर, सुधा, नीट.
ऋण–(सं) न० ब्रह्मस्व, कर्ज, देणें.
ऋणकरी–(सं) पु० त्रासदायक, ऋणको, धनको.
ऋणको–(सं) पु० कर्ज घेणारा.
ऋणानुबंध–(सं) पु० संबंध, घरोबा. २ करणी, लीला.
ऋणी–(सं) वि० ऋणकरी, कूळ.
ऋतु–(सं) पु० वसंतादि प्रत्येक दोन दोन महिन्यांचा काल. २ रज, विटाळ. ३ हंगाम, मोसम.
ऋव्पत–(फा) [illegible] लुच्चपणा, लांच.
ऋषि–(सं) पु० [illegible], [illegible], ब्राह्मण, उत्तम मनुष्य.

## ए.

एक–(सं) वि० एकडा, एकची संख्या.
एकएक–(सं) वि० एकेक, निरनिराळा.
एककाम्या–(सं) वि० एकच काम करणारा.
एकखट्टा–क्रि० एके ठिकाणीं, एकदम.
एकचित्त–(सं) न० लक्ष, सर्व लक्ष एके ठिकाणीं.
एकजातीय–(सं) वि० एकवर्गीय, एकजातीचा, सजातीय.
एकटा–(सं) वि० } एकला, दुसऱ्या खेरीज.
एकटा दुकटा– }
एकडा–(सं) पु० (एक पहा.)
एकत्र–(सं) क्रि० एकंदर, एकवट, एके ठिकाणीं.
एकतंत्र–(सं) वि० एक मार्ग, एक व्यवस्था.
एकतर्फी–(सं) वि० एकपक्षी, एक बाजूचें.
एकदम–(फा) क्रि० जलदी, एका दमास.
एकदां–(सं) क्रि० एका प्रसंगीं, एक वेळ.
एकदेशी–(सं) वि० पक्षपाती, एका देशांतलें, एक पक्षी.
एकंदर–(सं) क्रि० एकत्र, एके ठिकाणीं, सगळें, दरोबस्त.
एकंदरी–(सं) स्त्री० एकूण बेरीज, रक्कम.
एकंदरींत–क्रि० सारांश.
एकनिश्चय–(सं) पु० पक्का बेत, नियम, निश्चय, ऐकमत्य.
एकनिष्ठ–(सं) वि० एकावर निष्ठा ठेवून चालणारा.
एकपक्षी–(सं) वि० एकदेशी, एकतर्फी.
एकपत्नि–(सं) वि० एका बायकोचाच, बंदिस्त, ब्रह्मचारी, अव्यभिचारी.
एकपाठी–(सं) वि० एकदां आयकिल्याबरोबर पाठ म्हणणारा.
एकभाव–(सं) पु० विश्वास, एकचित्त.

**एकमार्गी**—(सं) वि० सरळ चालणारा, एकांड्या, साधा, भोळा.

**एकमाही**—(सं) वि० मासिक, एक महिन्याचा.

**एकमेक**—वि० परस्पर, आपसाआपसांत.

**एकमेकाशीं**—क्रि० परस्परांत, परस्पराशीं.

**एकला**—(सं) वि० ( **एकटा** पहा. )

**एकवचन**—(सं) न० एक बोलणें. २ व्याकरणसंज्ञाविशेष.

**एकवटणें**—उ० वि० एक होणें, गोळा करणें, जमा करणें.

**एकवर्णसमीकरण**—(सं) न० असें समीकरण कीं ज्यांत माहित नसलेली रक्कम एक आहे.

**एकवसा**—(सं) पु० एकांत, ओसाड जागा.

**एकवाक्यता**—(सं) स्त्री० मेळ, ऐकमत्य.

**एकवेळ**—(सं) क्रि० एकदां.

**एकसाहां**—क्रि० एकसारखा.

**एकाएकीं**—(सं) क्रि० अकस्मात्, एकदम.

**एकाक्ष**—(सं) वि० एकडोळ्या, काणा, कावळा, शुक्राचार्य.

**एकाकी**—(सं) वि० एकटा, एकला.

**एकाग्र**—(सं) वि० एकलय, एक चित्त झालेलें, एकतान.

**एकांगी**—(सं) वि० एकमार्गी, एकदेशी.

**एकांत्रा**—(सं) क्रि० एक दिवसा आड, एक दिवस टाकून.

**एकांत**—(सं) पु० एकवसा, ओसाड, निवांत जागा. २ गुज गोष्टी.

**एकी**—(सं) स्त्री० मैत्री, ऐक्य.

**एकीकडून**—क्रि० एक्याबाजूनें—चें.

**एकीकडे**—क्रि० एक्याबाजूस—ला.

**एकुण**—(सं) क्रि० एकून—एकूण, एकंदरींत, तरमग.

**एकुणएक**—क्रि० चटसारें, सगळें, सर्व.

**एकुणएकच**—(सं) क्रि० एकच, सारखेंच.

**एकुलता**—(सं) वि० एकटाच. २ लाडका.

**एकेरी**—स्त्री० तेरीमेरी. २ वि० घडी किं दुहेरी इत्यादि न केलेलें.

**एकोत्रा**—पु० दरमहिना दरशेंकडा एकाप्रमाणें व्याजाचा भाव.

**एकोत्रें**—न० एका रकमेला त्याच रकमें गुणिल्याचें उत्तर.

**एकोपा**—पु० जमाव, जूट, एकी, ऐक्य.

**एखादा**—**एकादा**—(सं) वि० कोणीएक, कोणी तरी.

**एडका**—(सं) पु० मेंढा.

**एतावता**—(सं) क्रि० एवढ्यानें, सारांश.

**एथें**—**येथें**—(सं) क्रि० ह्या ठिकाणीं, ह्या जागीं

**एर**—**येर**—(सं) वि० बाकी, निराळा, रिकामें

**एरंड**—(सं) पु० वृक्षविशेष.

**एरवां**—क्रि० गेले चौथे दिवशीं.

**एरवीं**—**एरव्हीं**—क्रि० इतर वेळेस, नाहींतर, अन्यथा.

**एलची**—(सं) स्त्री० विलायची, वेलदोडा.

**एव्हां**—**एव्हांशीं**—क्रि० आतां, सध्यां.

**एवढा**—(सं) वि० इतका, इतका मोठा, पुष्कळ.

**एवंच**—(सं) क्रि० ( **एकुण** पहा. )

**एवींतेवीं**—क्रि० नाहीं तरी, कोणत्याही प्रकारें.

**एळकोट**—पु० हिंदु लोकांत खंडोबा देवाचे पूजनाचे वेळेस तळी उचलतांना हा शब्द उच्चारितात.

## ऐ

**ऐक्य**—(सं) न० एकोपा, एकी.

**ऐकणें**—(सं) उ० वि० श्रवण करणें. २ काम करणें, हुकूम मानणें, समजून घेणें.

**ऐकींव**-(सं) वि० ऐकलेला, समजलेला.
**ऐच्छिक**-(सं) वि० इच्छिलेलें.
**ऐट**-स्त्री० अकड, डौल.
**ऐन**-(आ) वि० मध्य, योग्य, अईन, एकंदर.
**ऐपत**-स्त्री० योग्यता, संपत्ति, शक्ति.
**ऐब**-(आ) पु० दुर्गुण, दोष, खोड.
**ऐरण**-णी-स्त्री० जमीन. २ सोनार लोहार तांबट वगैरेंचें हत्यारविशेष.
**ऐरावत**-(स) पु० इंद्राचा हत्ती.
**ऐवज**-(आ) पु० संपत्ति, मालमत्ता, द्रव्य.
**ऐवजीं**-(आ) क्रि० ठिकाणीं, मोबदला, जागीं.
**ऐश्वर्य**-(सं) न० वैभव, प्रतिष्ठा, संपत्ति.
**ऐशी**-के० शाबास, वाहवा, भले, खाशी. २ वि० ह्या प्रकारची.
**ऐशीं**-(सं) वि० संख्याविशेष.
**ऐषआराम**-(आ) पु० स्वस्थता, सुख, समाधान, चैन, ख्यालीखुशाली.
**ऐसपैस**-क्रि० आसमंतात्, अलिकडे पलिकडे, भोंवतालून. २ वि० मोकळें.
**ऐहिक**-(सं) वि० ह्या जगसंबंधीं, इहलोकसंबंधीं.

---

## ओ.

**ओ**-हांक मारिल्यास हांक ऐकिली हें सांगण्याचा शब्द-उच्चार.
**ओक**-स्त्री० ओकारी, वांति, वमन.
**ओकणें**-अ० वांति होणें-करणें.
**ओकाबाक**-स्त्री० सोंगट्यांतील एक खेळ.
**ओखद**-(सं) न० ओषध, दवा, उपाय.
**ओघ**-(सं) पु० प्रवाह, ओघळ. २ कल.
**ओझरता**-क्रि० निसटता, दिसता न दिसता.
**ओझें**-न० भार, वजन. २ सामान, बोज्या, तोल, गट्ठा.
**ओझेंकरी**-पु० हमाल, हेलकरी, मजूर.
**ओटा**-पु० मातीविटांचा चबुतरा. २ ओंचा.
**ओटी**-स्त्री० कास. २ ओसरी, पडवी.
**ओठ**-(सं) पु० ओष्ठ, अधर, ओंठ.
**ओठंगणें**-अ० टेंकणें, आधार करणें.
**ओठाळी**-(सं) स्त्री० काढणी, गांवठी लगाम.
**ओढ-ओढा**-स्त्री० कल, झोंक, प्रवाह, हेतु. २ पैशाची टंचाई.
**ओढणें** उ० वि० खेचणें. २ विडी हुक्का इत्यादि पिणें, अम्मल करणें.
**ओढवणें**-अ० पिववणें. २ खेंचवणें. ३ येणें.
**ओढा**-पु० झरा, नाला, लहान नदी. २ कल.
**ओढाताण**-स्त्री० तारांबळ, पंचाईत, धांदल, ओढाओढ.
**ओढाळ**-वि० सवकलेलें, लालुचलेलें, उनाड.
**ओणवणें**-(सं) अ० वांकणें, ओणवें होणें.
**ओणवा**-(सं) वि० वांकलेला, आडवा.
**ओतणें**-(सं) उ० वि० घालणें, सांठविणें. २ तयार करणें.
**ओतारी**-(सं) पु० ओतणारा मनुष्य, साचे बनविणारा.
**ओतींव**-(सं) वि० ओतलेलें, साच्यांत बनलेलें.
**ओप**-(सं) पु० कल्फ. २ स्त्री० सफाई. ३ सकाळचें ऊन.
**ओपणें**-(सं) उ० वि० विकणें. २ उन्हांत वाळत घालणें. ३ अर्पण करणें.
**ओपिवणें**-स० उन्हांत वाळत घालणें.
**ओबड धोबड**-वि० आबड धोबड, वेडावांकडा, आडवातिडवा, सरासरी.
**ओमण**-न० पांझरण.
**ओरखडणें**-उ० वि० रेघा काढणें, बिचकारे घेणें, खरवडणें.
**ओरडणें**-अ० आरडणें, मोठ्यानें बोलणें, किंकाळी फोडणें.
**ओरपणें**-स० भुरकणें. २ डागणें.

**ओरी**–स्त्री० ओवरी, देवळांत यात्रेकरूं-करितां केलेली खोली.
**ओल**–स्त्री० सरदी. २ लोणा.
**ओलंडणें–लांडणें**–(सं) स० वलांडणें, पार जाणें.
**ओलसर**–वि० ओलें, ओलकट, भिजकट.
**ओला**–वि० भिजलेला, सरद, चिंब.
**ओला दुकाळ**–पु० पुष्कळ पावसानें पडलेला काळ.
**ओलांडा**–(सं) पु० वलांडा, चिंधी.
**ओलावणें**–स० भिजवणें, ओला करणें.
**ओलावा**–पु० लोणा, ओल, सर्दी. २ माया.
**ओली–ल**–स्त्री० अदलाबदल, जामीन.
**ओली भिक्षा**–स्त्री० माधुकरी, शिजलेल्या अन्नाची भिक्षा.
**ओवाळणी**–स्त्री० बक्षिसविशेष.
**ओवाळणें**–(सं) स० फिरविणें, आर्ती करणें.
**ओशाळगत**–स्त्री० ओशाळी, ओशाळीक, मिंधपण.
**ओशाळणें**–अ० शरमणें, लाजणें.
**ओशाळा**–वि० शरमलेला, लाजलेला, खट्टू.
**ओष्ठ**–(सं) पु० ओंठ, अधर.
**ओस**–वि० रिकामें, ओसाड.
**ओसरी**–स्त्री० ओटी, पडवी.
**ओसाड**–वि० ( **ओस** पहा ) २ निर्मनुष्य.
**ओहोट–टी**–(सं) स्त्री० सुकती. २ ऱ्हास.
**ओहोटणें**–(सं) अ० ओहटी लागणें, ऱ्हास होणें, अटणें.
**ओहोळ**–पु० कोरडा ओढा दरा, झरा.
**ओळ**–स्त्री० रांग, पंक्ति. २ सन्मार्ग.
**ओळख**–(सं) स्त्री० माहिती, परिचय, संबंध. २ जामीन.
**ओळखणें**–(सं) स० माहिती सांगणें, जाणणें.
**ओळखदेख**–(सं) स्त्री० ओळख, माहिती.
**ओळंबणें–ओळकंबणें**–(सं) उ० वि० टांगून घेणें, लटकणें, झोंका घेणें.
**ओळंबा**–(सं) पु० गवंड्याचें एक हत्यार.
**ओंळ्या**–पु० संवय, ओज.
**ओंगण**–न० गाडीच्या कण्यास लावण्याचें तेल.
**ओंगळ**–(सं) वि० घाणेरडा, मैला, अमंगळ.
**ओंचा**–पु० ओटा. २ पदर, शेंडा, ओटी.
**ओंजळ**–स्त्री० दोनपसे, अंजलि.
**ओंटी**–स्त्री० कांस, ओंचा.
**ओंड**–वि० खोल. २ तळापासून कांठापर्यंतची उंची.
**ओंडा**–पु० लांकडाचा तुकडा.
**ओंबी**–स्त्री० गव्हांचा हुळा.
**ओंवणें**–स० गोंवणें, अडकविणें, एके ठिकाणीं करणें, गुंफणें.
**ओंवळा**–(सं) वि० अशुद्ध, अपवित्र.
**ओंवा–ओवा**–पु० आजवान, औषधविशेष.
**ओंवी**–स्त्री० छंदविशेष.

## औ.

**औचट–अवचट**–वि० अचरट.
**औजड–अवजड**–वि० बोजड, अवघड, नेण्याआणण्यास कठिण, जड.
**औट**–वि० साडेतीन.
**औटकें**–न० साडेतीनचा पाढा.
**औटघटकेचें**–वि० थोड्या वेळाचें, साडेतीन घटकांचें.
**औत्सुक्य**–(सं) न० उत्सुकता, तत्परता, घाई, उतावळी.
**औदार्य**–(सं) न० दातृत्व, उदारत्व, उदारपणा.

**औदासीन्य**–(सं) न॰ औदास्य, उदासपणा.
**औदुंबर**–(सं) पु॰ उंबराचा वृक्ष.
**औपरोधिक**–(सं) वि॰ उपरोधाचें, वाईट लागेलसें, मर्माचें.
**औरत**–(आ) स्त्री॰ बायको, स्त्री, अंगना.
**औरस**–(सं) वि॰ अवलाद, अस्सल.
**औरसचौरस**–वि॰ ( **अवरसचवरस** पहा ) चतुरस्त्र.
**औषध**–(सं) न॰ ओखद, दवा, उपाय, इलाज.
**औषधी**–(सं) स्त्री॰ वनस्पती, जडीबुट्टी.
**औषधोपचार**–(सं) पु॰ उपाय, दवा, औषध.

---

## अं.

**अंक**–(सं) पु॰ आंकडा. २ खूण, चिन्ह. ३ मांडी.
**अंकगणित**–(सं) न॰ आंकड्यांचें गणित.
**अंकजाल**–(सं) न॰ आंकड्यांचें कोष्टक.
**अंकडा–आंकडा**–(सं) पु॰ अंक. २ कोयंडा. ३ नांगी.
**अंकमोडणी**–(सं) स्त्री॰ आंकडे शिकण्याची रीति.
**अंकलिपि**–(सं) स्त्री॰ आंकडे लिहिण्याची रीति, अंकमांडणी, अंकमोडणी.
**अंकित**–(सं) वि॰ आश्रित. २ खूण केलेला, सचिन्ह.
**अंकुर**–(सं) पु॰ फूट, मोड.
**अंकुश**–(सं) पु॰ शस्त्रविशेष.
**अंग**–(सं) न॰ शरीर, देह. २ अवयव, भाग. ३ गुदद्वार, योनि. ४ अनुमोदन, मदत. ५ ज्ञान.
**अंगकष्ट**–(सं) न॰ शारीर श्रम, कष्ट, मेहनत.
**अंगठा**–(सं) पु॰ अंगुष्ठ. २ नकार.
**अंगठी–अंगुटी**–(सं) स्त्री॰ मुद्रिका. २ करंगळी.
**अंगण**–(सं) न॰ परूस, मोकळी जागा.
**अंग धुणें**–(सं) न॰ स्नान, न्हाणें, आंघोळ.
**अंगना**–(सं) स्त्री॰ बायको, स्त्री.
**अंगपीडा**–(सं) स्त्री॰ व्याधि, रोग.
**अंगभर**–(सं) वि॰ अंगापुरतें, पुरेसें.
**अंगभूत**–(सं) वि॰ अंगाला खिळलेलें. २ अंतर्गत, समाविष्ट. ३ मदतगार.
**अंगमर्दन**–(सं) न॰ अंग चेपणें, दाबणें, रगडणें.
**अंगमेहनत**–स्त्री॰ शरीरकष्ट, श्रम.
**अंगरखा**–(सं) पु॰ लांब बंडी, कंचुक.
**अंगरस**–(सं) पु॰ पाणी घातल्याखेरीज काढलेला रस.
**अंगलट–अंगलोट**–(सं) न॰ अंगाचें वळण, ठेवण, बांधा.
**अंगवस्त्र**–(सं) न॰ धोतर, उपरणें. २ वेश्या.
**अंगवळणी**–(सं) वि॰ सहवासांतलें, रुळलेलें.
**अंगविक्षेप**–(सं) पु॰ हावभाव, चाळे.
**अंगवेग**–(सं) पु॰ जोर, शक्ति.
**अंगसंस्कार**–(सं) पु॰ स्नान, अभ्यंग.
**अंगसुख**–(सं) न॰ मैथुन, संभोग.
**अंगार**–(सं) पु॰ अग्नि, विस्तव, निखारा.
**अंगावरचें मूल**–(सं) न॰ तान्हुलें, लहानबाळ, मूल.
**अंगीकार**–(सं) पु॰ स्वीकार, घेणें.
**अंगीकारणें**–(सं) स॰ स्वीकारणें, घेणें.
**अंगुल**–(सं) न॰ अंगुळ, बोट, आठ यवां इतकी जागा.
**अंगुलि**–(सं) स्त्री॰ बोट.
**अंगुलीयक**–(सं) न॰ आंगठी.

**अंगुष्ठ**–(सं) पु० आंगठा.
**अंगुस्तान**–(सं) न० अंगुलित्राण.
**अंगूर**–(फा) न० द्राक्ष, बेदाणा.
**अंघोळ**–स्त्री० स्नान, अंग धुणें.
**अंचवण**–(सं) न० आचमन, तोंड धुणें, मुखमार्जन.
**अंचळ**–(सं) पु० गुराचें थान, मड, अचूळ.
**अंजन**–(सं) न० काजळ, डोळ्यांत घालण्याचें औषध.
**अंजीर**–(सं) पु० फळविशेष.
**अंजुली**–(सं) स्त्री० अंजळी, ओंजळ.
**अंड**–(सं) पु० वृषण, भेलगा. २ बीज.
**अंडज**–(सं) वि० अंडापासून झालेलें. २ पु० पक्षी. ३ मासे.
**अंडील**–(सं) वि० अंड न बडवलेला.
**अंडें**–(सं) न० बीज, पक्ष्याचा गर्भाशय.
**अंत्य**–(सं) वि० शेवटचा, मागचा, अंतरचा, २ संख्याविशेष.
**अंत्यकर्म**–(सं) न० शेवटचें कर्म, अंत्येष्टि, मनुष्य मेल्यावर त्याच्या प्रीत्यर्थ केलेलें कर्म.
**अंत्यज**–(सं) वि० महार, मांग, हलक्या जातींतले लोक, चांडाल.
**अंत्यांक**–(सं) पु० शेवटचा आंकडा. २ तिसरी रास.
**अंत्येष्टि**–(सं) स्त्री० प्रेतकर्म, अंत्यकर्म.
**अंतर्गत**–(सं) वि० गुप्त, गुह्य, अंतस्थ, गूढ, अंगभूत.
**अंतर्गृह**–(सं) न० माजघर, मध्यघर.
**अंतर्ज्ञान**–(सं) न० आत्मज्ञान.
**अंतर्धान**–(सं) न० नाहींसा होणें, अदृश्य होणें.
**अंतर्भेद**–(सं) पु० मनांतील हेतु, मुद्दा.
**अंतर**–(सं) न० अंतःकरण, मन, हेतु. २ फरक, फेर. ३ लांबी, छट्टा.
**अंतरणें**–(सं) उ० क्रि० विसरणें, गमावणें.
**अंतरपाट**–(सं) पु० हिंदु लोकांत लग्नाचे वेळेस वधूवरांचे मध्यें जें वस्त्र धरितात तें.
**अंतरसाक्ष**–(सं) वि० मनकवडा, अंतर्ज्ञानी.
**अंतरयामचा**–(सं) वि० प्रिय, प्रीतीचा, जीवाचा, मनांतील.
**अंतरात्मा**–(सं) पु० आत्मा, प्राण, मन.
**अंतरिक्ष**–(सं) न० आकाश, गगन, आभाळ.
**अंतस्थ**–(सं) वि० गुप्त, मनांतील, अंतर्गत, गुह्य, गूढ.
**अंतिक**–(सं) पु० नोकर, चाकर, दास, गडी.
**अंतुरी**–(सं) स्त्री० बायको, स्त्री.
**अंतःकरण**–(सं) न० मन, मानस, बुद्धि, दिल.
**अंतःपुर**–(सं) न० स्त्रियांकरितां केलेलें घर, जनानखाना.
**अंथरणें**–(सं) उ० क्रि० पसरणें, घालणें, टाकणें.
**अंथरी**–(सं) स्त्री० हात्री, चटई, सतरंजी.
**अंथरूण**–(सं) न० बिछाना, बिस्तारा, निजण्याचीं वस्त्रें.
**अंदाज**–(फा) पु० अदमास, अटकळ.
**अंदाधुंदी**–(फा) स्त्री० बेबंदी, अंधेर, गोंधळ.
**अंदेशा**–(फा) पु० संशय, वहीम, शंका.
**अंध**–(सं) वि० आंधळा.
**अंधक**–(सं) वि० अंधुक, अस्वच्छ, अस्पष्ट.
**अंधकार**–(सं) पु० अंधार, काळोख, तम.
**अंधपरंपरा**–(सं) स्त्री० पु० परंपरेचा आंधळेपणा.
**अंधळा**–(सं) पु० आंधळा, ( **अंध** पहा. ) २ अज्ञानी.
**अंधार**–(सं) पु० अंधकार, काळोख.
**अंधारकोठडी**–(सं) स्त्री० काळोखाची जागा.
**अंधारी**–(सं) स्त्री० झांपड, झांपडी. २ काळोख. ३ आंधळेपणा.

**अंबट** वि० आम्ल, खट्टा, खटास.
**अंबटओला**–वि० ओलसर, थोडा ओला.
**अंबटचिंबट**–वि० आम्लपदार्थ, मधुर नमलेले पदार्थ.
**अंबटढाण**–वि० अतिअंबट, फार खट्टा.
**अंबर**–(सं) न० वस्त्र. २ आकाश. ३अत्तरविशेष. ४ हत्यारविशेष. ५ सुवासिक वनस्पतिविशेष.
**अंबराई**–स्त्री० आंब्यांची झाडी.
**अंबा**–(सं) पु० आम्रवृक्ष, त्याचें फळ.
**अंबाडा**–पु० धान्यविशेष. २ एक जातीची गांठ.
**अंबाडी**–स्त्री० धान्यविशेष.
**अंबार**–(फा) न० धान्य ठेवण्याची जागा.
**अंबारी**–( आ ) स्त्री० हत्तीच्या पाठीवर बसण्याकरितां केलेली सोय.
**अंबिल**–स्त्री० आंबिल, नाचण्याच्या वगैरे पिठाची कढी.
**अंबु**–(सं) न० पाणी, उदक, जल.
**अंबुद**–(सं) पु० ढग, मेघ, बादल.
**अंबोण**–न० गुरांकरितां धान्य वगैरेचें केलेलें खाणें.
**अंवतणें**–(सं) न० आमंत्रण, बोलावणें.
**अंवळा**–(सं) पु० अभाव. २ आमलक.
**अंश**–(सं) पु० भाग, हिस्सा, तुकडा, खंड.

---

## क.

**क**–हें अक्षर प्रथम व्यंजन आहे. हें कित्येक संस्कृत शब्दांपुढें जोडलें असतां त्याचा अर्थ करणारा असा होतो: जसें–नाश, नाशक.
**क्रम**–(सं) पु० शिरस्ता, रीत, चाल.
**क्रमण**–(सं) न० जाणें, गमन.
**क्रमणें**–(सं) न० घालविणें, संपविणें, खुंटविणें.
**क्रय**–(सं) पु० सौदा ठरविणें, विकत घेणें.
**क्रव्याद**–(सं) वि० हिंसक. २ पु० राक्षस.
**क्रांति**–(सं) स्त्री० पालट, फेरफार.
**क्रांतिवृत्त**–(सं) न० भूमध्य वर्तुल, मध्यगोल.
**क्रिमि**–(सं) पु० कृमि, किडा, जंतु, जंत.
**क्रिया**–(सं) स्त्री० कृति. २ मरणानंतरची धर्मसंबंधीं कृति, उत्तर कार्य. ३ धर्म. ४ क्रियापद.
**क्रियापद**–(सं) न० व्याकरणांतील संज्ञाविशेष, कृति स्थिति इत्यादि दाखविणारा शब्द.
**क्रियाविशेषण**–(सं)न०व्याकरणांतील संज्ञाविशेष, क्रियापदाचा किंवा विशेषणाचा गुण दाखविणारा शब्द.
**क्रीडणें**–अ० क्रीडा करणें, खेळणें, करमणूक करणें.
**क्रीडा**–(सं) स्त्री० करमणूक, गम्मत, खेळ.
**क्रूर**–(सं) वि० भयंकर, दुष्ट, निर्दय.
**क्रोड**–(सं) वि० कोट, शंभर लक्ष.
**क्रोध**–(सं) पु० राग, संताप.
**क्रोधी**–(सं) वि० संतापी, रागीट.
**क्लिष्ट**–(सं) वि० कठिण, वाईट, अडथळ्याचा अडचणीचा.
**क्लीब**–(सं) पु० नपुंसक, गांडू, तृतीयाप्रकृति.
**क्लेश**–(सं) पु० श्रम, पीडा, कष्ट.
**क्वचित्**–(सं) क्रि० कोठें कोठें, कधीं कधीं.
**कक्षा**–(सं) स्त्री० खाक. २ ग्रहाची फिरण्याची जागा.
**कच्चा**–वि० हिरवा, अपक्व, अपूर्ण. २ लहान मूल, बच्चा. ३ साद्यंत. ४ जोर, तडाका.
**कच्ची जप्ती**–स्त्री० निकालाच्या अगोदरची जप्ती, अपूर्ती.
**कच्छ**–(सं) पु० कांसोटा, कांस. २ कांसव.

**कच**-(सं) पु० केस. २ चीर.
**कचकच**-स्त्री० रेव.
**कचकचीत**-वि० कचकच होण्या जोगतें, अपक्व. २ सडकून, पुरा.
**कचकणें**- उ० वि० वचकणें, भिणें, घाबरणें. २ मोडणें, जाया होणें.
**कचका**-पु० हिसका, धक्का, झपाटा.
**कचरा**-पु० घाण, केर.
**कचकावणें**-स० घट्ट भक्कम करणें, बांधणें.
**कचकावून-ऊन**-(सं) क्रि० कचकून, खूप, जोरानें, नेटानें, बळकट.
**कचाटी**-स्त्री० प्रसंग. २ हात पकडणें.
**कचेरी**-स्त्री० सभा, दरबार, दप्तर, कोडत.
**कचोळें**-न० गंध अक्षता ठेवण्याचें पात्र.
**कचोरी**-स्त्री० पक्वान्नविशेष.
**कज्जल**-(सं) न० काजळ, अंजन.
**कज्जा**-(आ) पु० कलह, खटला, तंटा, मुकदमा, फियाद, कल्यागत.
**कज्जेखोर**-(आ) वि० भांडखोर, कज्जेदलाल.
**कट**-(सं) पु० ठराव, जमाव, जोड, एकोपा. २ मंडळी. ३ गंडस्थळ.
**कटक**-(सं) न० सैन्य, फौज.
**कटकट**-स्त्री० हरकत, गडबड, शिवीगाळ, मारामारी, त्रास.
**कटाक्ष**-(सं) पु० रोख, झोंक, कल. २ डोळा. ३ लक्ष.
**कटार-कट्यार**-स्त्री० धास्ती, काळजी. २ शस्त्रविशेष.
**कटाव**-पु० छंदविशेष, एक प्रकारची कविता.
**कटि**-(सं) स्त्री० कमर, शरीराचा मध्य.
**कटिबंध**-(सं) पु० कंबरपट्टा, अक्षवलय, भूमेखला. २ कविताविशेष, कटाव.
**कटु**-(सं) वि० कडू, कडवट, त्रास येणारें.
**कटुकी**-(सं) स्त्री० औषधविशेष, कुटकी.
**कट्टा**-पु० ओटा. २ वि० पक्का, जोराचा.
**कठडा**-(सं) पु० ( **ओटा** पहा, ) कंगोरा.
**कठिण**-(सं) वि० त्रासदायक, अवघड, बिकट, बळकट.
**कठोर**-(सं) वि० निर्दय, तीक्ष्ण, उद्दाम, कठिण.
**कडक**-वि० तीक्ष्ण कडकडीत, उग्र, तीव्र, जलाल.
**कडकडणें**-अ० मेघगर्जना होणें. २ खूप ऊन होणें. ३ मोडणें. ४ आवाज होणें.
**कडकडाट**-(सं) पु० आवाज. २ गर्जना.
**कडकडून**-क्रि० उत्साहानें, प्रेमानें.
**कडकणी**-स्त्री० पक्वान्नविशेष.
**कडकावून**-क्रि० उत्कंठेनें, सपाट्यानें, जोरानें.
**कडकी**-स्त्री० आग, दाह.
**कडण**-न० कढण, कढ, झावळी.
**कडदण**-न० द्विदल धान्य, शेंग.
**कडबा**-पु० कडब, जोंधळ्याचीं ताटें.
**कडबू**-पु० कानवला, पक्वान्नविशेष.
**कडवा**-वि० कडू, कटु. २ रागीट, एककल्ली.
**कडवें**-न० चोक, कवितेचा चरण. २ वि० कडू.
**कडदोरा-करगोटा-करदोटा-करदोडा**-पु० कटिसूत्र.
**कडसणी**-स्त्री० नाडा, मणदोरा, दोरखंड. २ कडोसरी.
**कडा**-पु० दरा, कंगोरा, डोंगराचा भाग.
**कडाका**-पु० तडाखा, खाष्टपणा.
**कडाडणें**-अ० कडकडणें, आवाज होणें, मोडणें. २ रागावणें.
**कडासन**-(सं) न० कृष्णाजिन, व्याघ्रचर्म.
**कडी**-(सं) स्त्री० सांखळी, तोड, जुवा.
**कडू**-(सं) वि० ( **कटु** पहा, ) जहर.
**कडे**-श० बाजूस, येथें, कडेस.
**कडें**-न० वाद्यविशेष, डफ. २ कटका, वलय, कंकण. ३ वेल इत्यादीचें वेटोळें. ४ वेटोळें, वळसा.

**कडेकोट**–वि० पूर्ण.
**कडेलोट**–पु० शेवटचा उपाय, कमाल. २ शिक्षाविशेष.
**कढ**–पु० कड, उकळी, आधण.
**कढई**–स्त्री० तळणी, काई (ही) ल.
**कढण**–(सं) न० ( **कडण** पहा. )
**कढणें**–अ० शिजणें, आधण येणें.
**कढत**–वि० ऊन, कडकडीत, गरम.
**कढविणें**–स० ऊन करणें, आधण आणविणें.
**कढी**–स्त्री० कढलेली, एक प्रकारचें सार.
**कण**–(सं) पु० तुकडा, भाग, हिस्सा. २ वनस्पतिविशेष. ३ धान्य.
**कणखर**–वि० बळकट, मजबूत.
**कणगर**–न० फळविशेष.
**कणगा**–पु० सांठा, गल्ला, कणिंग.
**कणणें**–**कण्हणें**–अ० दुःखाचे उद्गार काढणें, कुंथणें.
**कणा**–पु० दांडा. २ गाडीचा दांडा. ३ पाठीचें मुख्य हाड.
**कणी**–(सं) स्त्री० तुकडा. ( **कण** पहा. )
**कणीक**–स्त्री० गव्हाचें पीठ, आटा.
**कणीस**–(सं) न० तुरा, भुट्टा. २ मंजरी.
**कणेर**–**कण्हेर**–पु० झाडविशेष.
**कत्तल**–(आ) स्त्री० काटाकाटी, कापाकापी, खून.
**कतबा**–(आ) पु० लेख, प्रतिज्ञा, कर्जखत.
**कथ**–(सं) स्त्री० ( **कथन** पहा. )
**कथणें**–(सं) स० सांगणें, वर्णन करणें.
**कथन**–(सं) न० वर्णन, गोष्ट, वार्ता, हकीकत.
**कथनीय**–(सं) वि० सांगण्यास योग्य.
**कथली**–(सं) स्त्री० कथलाचें पात्रविशेष.
**कथलीव्याध**–स्त्री० अतिवात्य मनुष्य.
**कथलें**–न० कथलाचें पात्र.
**कथा**–(सं) स्त्री० गोष्ट. २ कीर्तन.
**कथील**–न० खनिज द्रव्यविशेष.
**कथेकरी**–पु० हरिदास, हरदास.
**कदबा**–पु० करार, करारनामा.
**कदम**–(आ) न० थोडें अंतर. २ पाऊल.
**कदर**–(आ) स्त्री० गुणपरीक्षा. २ फिकीर, धाक.
**कदा**–(सं) क्रि० केव्हां, कोणत्या वेळेस.
**कदाचित्**–(सं) क्रि० कधींबिधीं, क्वचित्, थोडेंसें.
**कदाकाळीं**–क्रि० क्वचित्, कोणत्या वेळेस.
**कादम**–(आ) वि० चिरकाल चालत आलेली चाकरी, जुनी रीत, वतनधर्म.
**कद्धीं**–क्रि० कधींही, बिलकूल, केव्हांही.
**कधीं**–क्रि० केव्हां, कोणत्या वेळेस.
**कधींकधीं** } –क्रि० मधून मधून एखादे **कधींकाळीं** } वेळेस.
**कधींचा**–क्रि० कोणत्या वेळेचा, केव्हांचा.
**कधींतरी**–क्रि० केव्हां तरी, कोणच्या तरी वेळेला.
**कन्या**–(सं) स्त्री० मुलगी, कुमारी.
**कनक**–(सं) न० सुवर्ण, सोनें. २ धोत्रा.
**कनवाळु**–(सं) पु० कृपाळु, दयाशील, मायावान.
**कनात**–**थ**–(आ) स्त्री० तंबूच्या भिंतीचें कापड, पडदा.
**कनिष्ठ**–(सं) वि० शेवटला, लहान, शेवटल्या प्रतीचा, धाकटा.
**कनिष्ठिका**–(सं) स्त्री० करंगळी, करांगुली, अंगुळी.
**कप**–पु० कापूस, गूल, सुरमाडाचा पांढरा तुरा.
**कपट**–(सं) न० कृत्रिम, लबाडी, लुच्चाई.
**कपटा**–पु० तुकडा, भाग, हिस्सा.
**कपटी**–(सं) वि० फसव्या, लबाड, ढोंगी.
**कपडालत्ता**–पु० वस्त्रप्रावरण, पांघरूण.

**कपा**—पु० खण, खिसा, पिशवी.
**कपाट**—(सं) न० पुस्तकें वगैरे ठेवण्याची एक प्रकारची पेटी.
**कपाळ**—(सं) न० मस्तक, भाळ. २ अदृष्ट, नशीब, दैव.
**कपाळकरंटा**—(सं) वि० कमनशीबी, दुर्दैवी, हतभाग्य.
**कपाळरेषा**—(सं) स्त्री० दैवयोग, नेमानेम.
**कपाळशूळ—सूळ**—(सं) न० डोकें दुखणें, माथशूळ.
**कपि**—(सं) पु० वानर. २ म्हातारा, वृद्ध.
**कपी**—स्त्री० कप्पी, मणि. २ लहान खिसा.
**कपोत**—(सं) पु० कबूतर, पारवा.
**कफ**—(सं) पु० श्लेष्मा. २ कोणताही कफासारखा चीक वगैरे पदार्थ.
**कफक्षय**—पु० एक प्रकारचा रोग.
**कफणी**—स्त्री० बैरागी लोकांचा घालण्याचा आंगरखा, कौपीन.
**कफन**—(आ) स्त्री. कफण, प्रेतवस्त्र, खेंड.
**कबज**—(आ) न० जाड्य, अपचन. २ कबजा, स्वाधीनपणा, पावती, वहिवाट.
**कबजा**—(आ) पु० मालकी, स्वामित्व. २ अस्तन्यांशिवाय बंडी.
**कबर**—(आ) स्त्री० प्रेत पुरल्या जागची इमारत, थडगें.
**कबरी**—(सं) स्त्री० वेणी.
**कबूतर**—(फा) न० पारवा, कपोत.
**कबूल**—(आ) वि० मान्य, पतकरलेलें.
**कम**—(फा) वि० कमती, कमी, वजा.
**कमटा**—पु० कमठा, धनु, धनुष्य.
**कमती**—वि० कमी, थोडें, अपुरें.
**कमर—कंबर**—(फा) स्त्री० कटि.
**कमरकसा**—पु० कंबरेस बांधण्याची पिशवी.
**कमरपट्टा**—पु० कटिबंध, कांची, मेखला.
**कमल—ळ**—(सं) न० अंबुज, अब्ज.
**कमविणें**—न० मिळविणें, जमा करणें, प्राप्त करून घेणें. २ कातडें इत्यादि पदार्थांना संस्कार करणें.
**कमाई**—स्त्री० मिळकत, उपज, प्राप्ति, उत्पन्न.
**कमान—ण**—(फा) स्त्री० मेहरप. २ धनुष्य.
**कमाल**—(आ) न० परिपूर्णता, अतिशय, पूर्णता. २ शेवट, पराकाष्ठा.
**कमाविसदार**—(फा) पु० वसूल जमा करणारा, मामलेदार.
**कमी**—वि० थोडें, लहान, कमती.
**कर्क**—(सं) पु० ज्योतिषांत एका राशीस ही संज्ञा आहे, चवथी रास. २ खेंकडा.
**कर्कसंक्रांत**—(सं) स्त्री० जींत सूर्य कर्कराशीस येतो ती संक्रांत, दक्षिणायनाची संक्रांत.
**कर्ज**—(आ) न० देणें, ऋणत्व, ऋण.
**कर्जखत**—(फा) न० खत, कर्जरोखा.
**कर्जी**—(फा) न० व्याजी, व्याजावर.
**कर्ण**—(सं) पु० कान. २ गणित संज्ञाविशेष. ३ ऐतिहासिक पुरुषविशेष. ४ उदार मनुष्य. ५ कृपण—चिकू मनुष्य.
**कर्णजप**—(सं) वि० चहाडी, निंदा, चुगली.
**कर्णधार**—(सं) पु० नावाडी.
**कर्णिका**—(सं) स्त्री० पुष्पाचा मध्यभाग.
**कर्णोपकर्णी**—(सं) अ० ऐकतां ऐकतां, ह्या कानांतून त्या कानांत त्या कानांतून ह्या कानांत, उडत उडत.
**कर्तव्य**—(सं) न० उचित कर्म, अवश्य कर्म. २ वि० करण्यास योग्य.
**कर्तरिप्रयोग**—(सं) पु० व्याकरणसंज्ञाविशेष.
**कर्ता**—(सं) पु० करणारा, मोठा, मुख्य. २ व्याकरणसंज्ञाविशेष. ३ वि० पराक्रमी, गृहस्थिति चालवणारा.
**कर्तुत्व—कर्तृत्व**—(सं) न० कर्तेपणा, शक्ति, युक्ति, हिकमत.

कर्दम–(सं) पु० चिखल, किचड, गारा.
कर्दळी–(सं) स्त्री० केळ, रानकेळ, कदळ.
कर्पूर–(सं) पु० कापूर.
कर्म–(सं) न० काम, कृत्य. २ नशीब. ३ व्याकरणसंज्ञाविशेष.
कर्मगति–(सं) स्त्री० नशीब, प्रारब्ध.
कर्मचांडाळ–(सं) पु० दुष्टकर्मी, नास्तिक, अधार्मिक, कुकृति.
कर्मठ–पु० धर्माप्रमाणें चालणारा, धर्मिष्ट, धर्मकर्म करणारा.
कर्मधर्मसंयोग–पु० प्रारब्धयोग.
कर्मणिप्रयोग–(सं) पु० व्याकरणांतील संज्ञा.
कर्मभूमि–(सं) स्त्री० इहलोक.
कर्मणूक–स्त्री० करमणूक, वेळ जाण्याचें साधन.
कर्मांतर–(सं) न० क्रिया, मेल्याचे संस्कार.
कर्मेंद्रिय–(सं) न० अवयव, कर्म करण्याचें साधन.
कर्कश–(सं) वि० न ऐकण्या जोगा, नकोसा होणारा, कर्णकटु.
कर्कशा–(सं) स्त्री० कर्कश बोलणारी, घोगऱ्या घशाची बायको.
कर–(सं) पु० हात. २धारा, करभार. ३किरण.
करकर–स्त्री० किरकिर, किटकिट, कटकट.
करकरीत–वि० नवा, आवाज देणारा, कोरा.
करकोंचा–पु० वण. २ पक्षिविशेष.
करटी–स्त्री० करवंटी, कवच. २ डोक्याची कवटी.
करड–स्त्री० भरड, भरडलेले–असडी तांदुळ. २ न० गळूं.
करडा–वि० पांढुरका, कैरा. २ कडक, कडकडीत.
करडूं–न० शेळीचा बच्चा, पाठ.
करंडा–(सं) पु० डबा.
करंडी–(सं) स्त्री० टोपली.
करण–न० साधन, साहित्य. २ पु० तलाठी.
करणा–पु० वाद्यविशेष.
करणावळ–न० करण्याची मेहनत, मजूरी.
करणी–स्त्री० कृति, वागणूक. २ गवंड्यांचें एक हत्यार, थापी.
करणें–न० कामास लागणें.
करंदा–पु० एक प्रकारचा वेल, त्याचें फळ.
करपणें–अ० जळणें, जास्ती भाजलें जाणें.
करपल्लवी–स्त्री० हाताच्या खुणांची भाषा.
करपविणें–स० जाळणें, जास्ती भाजणें.
करभार–(सं) पु० कर, खंडणी.
करवत–ती–स्त्री० लांकडें कापण्याचें हत्यार, अरकस.
करवतणें–स० करवतानें चिरणें.
करवंद–करंद–न० फलविशेष.
करवंदी–स्त्री० वनस्पतिविशेष.
करवली–स्त्री० वधूवरांच्या बहिणींपैकीं प्रत्येकीस ही संज्ञा आहे, मानकरीण.
करवा–पु० सोललेल्या उसाचा लहान तुकडा, गंडेरी–डेरी.
करवीं–श० कडून, हातून, तर्फे.
करामत–(आ) स्त्री० युक्ति, हिकमत, चातुर्य, कर्तबगारी.
करार–(आ०) पु० ठराव.
करारनामा–पु० ठरावपत्र, शर्तींचा कागद.
करारमदार–(फा) स्त्री० आणभाक, बेलभंडार.
करितां–श० साठीं, प्रीत्यर्थ, कारणें, मुळें.
करी–(सं) पु० हत्ती, गज.
करुणा–(सं) स्त्री० दया, माया, कींव.
करोड–(सं) वि० कोट, कोटि.
कल्प–(सं) पु० निश्चय. २ ब्रह्मदेवाचा सगळा दिवस.
कल्पक–(सं) पु० विचारी, शहाणा, धोरणी, कल्पना लढविणारा, युक्तिवान.

**कल्पतरु**-(सं) पु० पाहिजे तें देणारें झाड, कल्पवृक्ष.
**कल्पना**-(सं) स्त्री० युक्ति, विचार, तर्क, मत.
**कल्पनाशक्ति**-(सं) स्त्री० विचारशक्ति, बुद्धि.
**कल्पणें**-(सं) स० विचार करणें, कबूल करणें, कल्पना करणें.
**कल्मष**-(सं) न० पाप, दोष, कलुष.
**कल्याण**-(सं) न० नफा, मंगल, शुभ, बरें, चांगलें.
**कल्ला-कल्होळ**-पु० कोलाहल, गडबड, बडबड, मोठा आवाज.
**कल्हई-कलई**-(आ) स्त्री० कथलाचा मुलामा.
**कल्हईगार**-(आ)पु०तांबट,मुलामा करणारा.
**कल्पांत**-(सं) पु० दुःखाचे डोंगर, भडका.
**कल**-(सं) पु० झोंक, वळण. २ वि० अव्यक्त मधुर ( स्वर ).
**कलकल**-(सं) पु० कल्ला, गडबड, ओरड.
**कलकलणें**-उ० वि० मोठमोठ्यानें बोलणें, कोल्हाळ होणें, ( मस्तक ) फिरणें.
**कलंक**-(सं) पु० कळंक, बट्टा. २ चंद्रावरचा डाग. ३ कळक.
**कलणें**-अ० झुकणें, वळणें.
**कलता**-वि० झुकलेला, वळलेला.
**कलता-था**-पु० उलथनं, काविलथा.
**कलत्र**-(सं) न० कुटुंब, बायको.
**कलम**-(फा) न० बाब, रकम. २ लेखणी. ३ चित्रांस रंग देण्याचें हत्यार. ४ एका झाडावर लावलेलें दुसरें झाड, झाडापासून दुसरें झाड होण्यासाठीं तोडून लावलेली फांदी.
**कलमदान**-(फा) न० लेखण्या वगैरे लिहिण्याचें सामान ठेवण्याची पेटी.
**कलश**-(सं) पु० कुंभ, घागर, घडा.
**कलह**-(सं) पु० कज्जा, तंटा, लढाई, कलागत, भांडण.
**कला**-(सं) स्त्री० युक्ति, कृति, चातुर्य. २ तेज. ३ चंद्राचा षोडशांश, कळा. ४ एका अंशाचा साठावा हिस्सा, साठ विकला.
**कलागत**-स्त्री० तंटा, भांडण, कज्जा.
**कलाल**-(आ) पु० मद्य विकणारा.
**कलावंतीण**-स्त्री० नायकीण, वेश्या, कंचनी.
**कलि**-(सं) पु० (कलह पहा.) ५ चवथें युग.
**कलुष**-(सं) न० पाप, दोष.
**कलुषित**-(सं) वि० गढूळ, अस्वच्छ.
**कलेवर**-(सं) न० शरीर, देह.
**कवच**-(सं) न० आंगरखा, चिलखत. २ कवटी, करवंटी.
**कवची**-(सं) स्त्री० कवटी, करवंटी.
**कवडसा**-पु० उजेड, चकाकी, प्रतिबिंब.
**कवडा**-पु० पक्षीविशेष. २ मोठी कवडी.
**कवडी**-स्त्री० शंखाचे जातीचे समुद्रांतील प्राण्याचें हाड.
**कवणें**-(सं) न० कविता करणें, बनविणें. २ सर्व० कोणी.
**कवन**-(सं) न० पद्य, कवीत, कविता.
**कवल-ळ**-(सं) पु० घांस, तुकडा. २ भेट, आलिंगन.
**कवळा**-पु० वेंव. २ वि० हिरवा, कच्चा.
**कवळी**-स्त्री० वेंव. २ विड्यांच्या पानांची कांहीं संख्या, बहुशा ४५०।५००.
**कवळें**-वि० कच्चें, हिरवें.
**कवळणें**-न० भेटणें, आलिंगन देणें, आंवळणें.
**कवळसणें**-स० उत्तरपूजा करणें, उठविणें.
**कवाईत**-(आ) स्त्री० युद्धाची कला.
**कवाड**-न० दार, द्वार, दरवाजा, फाटक.
**कवि**-(सं) पु० कवन करणारा, काव्य करणारा, शाहीर.
**कविता**-(सं) स्त्री० काव्य, कवन.

**कविताशक्ति**—स्त्री० प्रतिभा, कवित्वस्फूर्ति.
**कशा**—(सं) स्त्री० चाबूक.
**कशाचा**—सर्व० कोणत्या वस्तूचा, कसल्या प्रकारचा, कसला.
**कशाला**—प्र० कोणत्या कारणास्तव—साठीं.
**कष्ट**—(सं) पु० श्रम, मेहनत, दुःख, संकट.
**कष्टणें**—अ० श्रम होणें, त्रासणें, कष्टी होणें.
**कष्टसाध्य**—वि० असाध्य, भयंकर, दुःखानें मिळण्याजोगा.
**कष्टी**—(सं) वि० दुःखी, संकटांत पडलेला, मेहनती.
**कषाय**—(सं) पु० काढा, कढलेला पदार्थ, सार, तत्त्व.
**कस्तूरी**—(सं) स्त्री० एका प्रकारचे हरणाचे नाभींतला मल.
**कस्तूरीमृग**—(सं) पु० ज्यापासून कस्तूरी मिळते तो हरिण.
**कस्पट**—न० गवत किंवा लांकूड याचा अणुरेणूएवढा भाग.
**कस**—पु० सोन्यारुप्याचा रंग, गुण, तत्त्व, सत्त्व, अर्क.
**कसचा**—वि० कसला, कशाचा.
**कसब**—(आ) न० कुशलता, युक्ति, हातोटी. २ गुण. ३ वेश्यावृत्ति, देहविक्रय.
**कसबा**—(आ) पु० महालाचें मुख्य गांव, तालुका.
**कसबी**—(आ) पु० हुशार, गुणी, कुशल.
**कसबीण**—स्त्री० वेश्या, रांड.
**कसर**—(आ) स्त्री० कपडे कागद खाणारा लहान प्राणी. २ कमीपणा. ३ फायदा.
**कसला**—वि० कसचा, कशाचा, कोणत्या प्रकारचा. २ कसलेला, बळकट.
**कसरत**—(आ) स्त्री० कवाईत, मेहनत, रपेट. श्रम, व्यायाम.
**कसा**—सर्व० कोणत्या प्रकारचा, कसला, कशा रीतीनें. २ एक प्रकारची पिशवी.
**कसाब**—(आ) पु० मांस विक्रय करणारा, कसाई. २ घातकी, कपटी.
**कसाई**—**कसई**—पु० मांस विकणारा.
**कसोटी**—स्त्री० परीक्षा. २ कस लावण्याचा दगड.
**कह्यांत**—क्रि० सांगींत, ताब्यांत, आज्ञेंत.
**कहर**—(आ) पु० अनर्थ, बिकट प्रसंग. २ तडाका, कडाका.
**कहाणी**—स्त्री० वृत्तांत, गोष्ट, हिकायत, कथा, वार्ता.
**कहार**—पु० जातिविशेष, भोई.
**कळ**—(सं) स्त्री० दुःखाची रग, ठणका. २ भांडण. ३ युक्ति, कळा, कुत्रें.
**कळकणें**—न० कळकून जाणें, बिघडणें, नासणें, खराब होणें, कळंकणें.
**कळकळ**—स्त्री० काळजी, आस्था.
**कळकळणें**—अ० मळमळणें, उलटी होतेसें वाटणें.
**कळकळित**—वि० लवकर मोडण्याजोगें, चिकट नव्हे असें.
**कळणा**—पु० धान्याचा चूर.
**कळणें**—उ० वि० समजणें, समजून येणें, ध्यानांत येणें, जाणणें.
**कळप**—(सं) पु० जमाव, समुदाय, टोळी.
**कळमळ**—स्त्री० मळमळ.
**कळमळणें**—अ० मळमळणें, उलटी होतेसें वाटणें.
**कळ लावणें**—स० भांडण लावणें, चिडविणें, नाकांत काड्या घालणें.
**कळलाव्या**—वि० बिघाड करणारा, भांडण लावणारा, नारद.
**कळवंतीण**—(सं) स्त्री. नायकीण, नाचणारी रांड.

**कळवळणें**–अ० दुःखाचें कुंथणें, काकुळतीस येणें.

**कळविणें**–स० समजाविणें, जाणविणें, सांगणें, बातमी देणें.

**कळशी**–स्त्री० लहान घागर, बिंदगी.

**कळस**–(सं) पु० शिखर. २ कमाल, अखेर, पराकाष्ठा.

**कळा**–(सं) स्त्री० न उमललेली कळी. २ ( **कला** पहा. )

**कळी**–स्त्री० न उमलेलें फूल, लहान कळा. २भाजलेली चुनखडी. ३ वि० भांडण–कलह लावणारा, कळचेट्या.

**कळीचा नारद**–पु० भांडण लावणारा, चहाड, कज्जेदलाल.

**काईम–कायम**–(आ) वि० नेहमींचें, सततचें, ठाम, मुकरर.

**काईल**–(आ) स्त्री० मोठी कढई,कढणी.

**काउटी**–स्त्री० महत्व.

**काउरें**–न० वेड.

**काक**–(सं) पु० कावळा, काऊ.

**काकडा**–पु० मोठी वात, लहान दिवटी.

**काकदृष्टि**–स्त्री० चलाख नजर. २ वि० क्षुद्र दृष्टीचा, छिद्रदर्शी.

**काकपद**–(सं) न० हस्तलेखांत गळलेलीं अक्षरें दोन ओळींच्यामध्यें किंवा समासांत लिहिलीं आहेत असें दाखविणारें चिन्ह.

**काकवी**–स्त्री० उसांचा कढविलेला घट्टसर रस.

**काकळूत**–स्त्री० विनंति, नम्र भाषण.

**काका**–पु० बापाचा भाऊ, चुलता. २कावळा.

**काकी–काकू**–स्त्री० बापाची भावजय,चुलती.

**कागद**–(फा) पु० कागज, पत्र, चिट्टी. २ दस्तऐवज.

**कागदी**–(फा) वि० कागदाचा. २ हलका.

**कागाळी**–स्त्री० तकरार,चहाडी, आगळीक.

**काज**–(सं) न० काम. प्रयोजन, कार्य.

**काजरा**–पु० वनस्पतीविशेष.

**काजवा**–पु० कीटविशेष, खद्योत.

**काजवे**–पु० अंधारी, लकलकणें,भिरीरी येणें.

**काजी**–(आ०) पु० न्यायाधीश.

**काजू**–पु० वृक्षविशेष, त्याचें फळ.

**काट**–पु० जंग, गंज.

**काटकसर**–स्त्री० बेतबात,कार्पण्य,किरटेपणा.

**काटकी**–स्त्री० काडी, लहान काठी.

**काटकोन**–पु० पंचेचाळीस अंशांचा कोन.

**काटकोना**–पु० गुण्या, पंचेताळीस अंश पहाण्याचें हत्यार.

**काटव**–न० ढोंग, कपट.

**काटाकाट**–स्त्री० खर्च करण्याची भीति, कमी खर्च करणें, छाटाछाट.

**काटूक**–न० काटकी, काडी.

**काठी**–स्त्री० यष्टि, लट्टी, लकडी. २ जमीन मोजण्याचें मापविशेष. ३ हाडपेर, बांधा.

**काड**–न० धान्य काढून घेतल्यावर राहिलेलें धान्याचें ताट.

**काडी**–स्त्री० कपड्यांत विणलेली किंवा कागदावर काढलेली रेघ, धार. २ बारीक काटकी.

**काढणी**–स्त्री० सुताची किंवा रेशमाची बळकट रशी–दोरी. २ खेळविशेष. ३ पीक.

**काढणें**–स० बाहेर घेणें. २ लेखन करणें. ३ योजणें. ४ उत्पन्न करणें, मिळविणें.

**काढा**–(सं) पु० कषाय, सार.

**काढाऊ**–वि० बुद्ध्या काढलेला ( **शिंगा** इत्यादि. )

**काढू**–वि० दुसऱ्यापासून द्रव्य युक्तीनें हरण करणारा.

**काणकूण**–स्त्री० खबर,थोडी बातमी,कुणकूण.

**काणा**–पु० एकडोळ्या, कुचका, शुक्राचार्य, कावळा. २ कैरा, तिरवा.

**काणी**–स्त्री० क्लेश. २ कड, कोपरा.

**काणोसें**–वि० वांकडें.

**कात**–(सं) पु० कथ्था, खदिरसार. २ सापानें टाकलेली त्वचा.

**कातकरी**–(सं) पु० धनुष्याच्या उपयोगानें उपजीविका चालविणारा, भिल्ल, कोळी.

**कातडी–कांतडें**–स्त्री० चामडी, त्वचा, चर्म, चामडें.

**कातणें–कांतणें**–(सं) न० सूत बनविणें. २ घोडे वगैरे जुंपणें. ३ लांकूड किसणें.

**कातर–कातरी**–(सं) स्त्री० कापी, कातरणारी, कैंची.

**कातरणें**–स० कापणें, कातरीनें चिरणें.

**कातविणें**–स० रागास आणणें.

**कातळ**–पु० दगडाचा पत्रा, पत्र्याचा दगड.

**कातारी**–पु० कातकाम करणारा.

**कातावणें**–अ० चिडणें, रागास येणें, रागावणें, संतापणें.

**काथा–काथ्या**–पु० नारळाची शेंडी, सुंभ.

**काथाकूट**–(सं) स्त्री० व्यर्थ खटपट, रिकामें भाषण.

**कादंबरी**–(सं) स्त्री० कल्पित गोष्ट, रचलेली हकीकत.

**कान**–(सं) पु० कर्ण, श्रवण करण्याचा अवयव.

**कानठाळी**–स्त्री० ऐकूं येईनासें होणें, कान बंद होणें.

**कानडें**–वि० कर्नाटकी. २ वेडें वाकडें. ३ अर्धबोबडें. ४ दुर्बोध.

**कानन**–(सं) न० ( **कांतार** पहा. )

**कानस**–स्त्री० घासण्याचें हत्यार, घासणी.

**कानवसा**–पु० कानोसा, लक्ष लावून ऐकणें.

**कानशील**–स्त्री० आख, डोळ्याच्या व कानाच्या मधील भाग,

**काना**–पु० बंदुकीचें व तोफेचें बत्ती देण्याचें छिद्र, व्यंजनाच्या स्वराच्यापुढें उभी रेघ देतात ती.

**कानाडोळा**–पु० दुर्लक्ष.

**कानाचा हलका**–कोणीं कसेंही सांगितलेलें खरें मानणारा.

**कानू**–(आ) पु० कायदा, नियम, शास्त्र.

**काप**–(सं) तुकडा. २ मोप. ३ कानांतील दागिना.

**कापट्य**–(सं) न० कपट, लबाडी, फसवणूक.

**कापड**–न० वस्त्र, कपडा.

**कापणी**–स्त्री० कापी. २ धान्य कापण्याचें काम–दिवस.

**कापणें**–(सं) स० चिरणें, फाडणें, तोडणें.

**कापशी**–(सं) स्त्री० कापसाचें झाड, सरक्यांचें झाड. २ वि० कापसाचें.

**कापूर**–(सं) पु० कर्पूर, औषधविशेष.

**काफर**–(आ) पु० परधर्मी. २ वि० आंतल्या गांठीचा.

**काफी**–स्त्री० रागिणी विशेष. २ बुंददाणा व त्याचा काढा. ३ चांगला, पुरे, बस्स.

**काबीज**–(आ) वि० वहिवाटलेलें, हस्तगत.

**काम्य**–(सं) वि० इच्छा धरून केलेलें. २ इच्छा करण्याजोगें.

**काम**–(सं) न० कृत्य, उद्योग, कार्य. २ मदन. ३ इच्छा.

**कामकरी**–(सं) पु० मजूर, हेलकरी, हमाल, बिगारी, मोलकरी.

**कामधेनु**–(सं) स्त्री० इच्छित देणारी गाय, सुरभि.

**कामना**–(सं) स्त्री० काम, इच्छा, वासना.

**कामसाधू**–वि० आपमतलबी, ताका पुरता मामा, कार्यसाधू.

**कामाठी**–पु० मजूर. २ जातिविशेष.
**कामातुर**–(सं) वि० विषयांध, विषयलुब्ध.
**कामिनी**–(सं) स्त्री० नार, बायको, औरत.
**कामी**–(स) वि० **कामातुर**. २ उपयोगी.
**कामुक**–(सं) वि० इच्छा करणारा.
**काय**–(सं) सर्व० संशयाचे शब्द फिरून ऐकण्याची इच्छा दाखविणारा शब्द, कोणचें. २ पु० शरीर.
**कायदा**–(आ) पु० कानू, दस्तूर, नियम, शास्त्र.
**कायदेशीर**–वि० सशास्त्र, कायद्याप्रमाणें. २ करारी, नियमाप्रमाणें चालणारा.
**कायफळ**–(सं) न० फळविशेष.
**काय म्हणून**–प्र० कां, कशाकरितां.
**कायिक**–(सं) वि० कायेचें, शरीरसंबंधी.
**कार्कश्य**–(सं) न० कर्कशपणा, वोंगेरपणा.
**कार्तिकस्वामी**–(सं) पु० षडानन, महासेन.
**कार्पण्य**–(सं) न० कंजुषाई, कृपणता.
**कार्पास**–(सं) पु० कापूस, कपास.
**कार्य**–(सं) न० काम, कृत्य. २ लग्न-मौंजी-समारंभ. ३ परिणाम.
**कार**–(फा) न० काम, धंदा. २ दगडविशेष.
**कारक**–(सं) वि० करणारा. २ व्याकरण-संज्ञाविशेष.
**कारकीर्द**–(फा) स्त्री० वेळ, अंमल, राज्य.
**कारकून**–(फा) पु० लिहिणारा, हिशोबी. २ हुशार.
**कारखाननीस**–(फा) पु० हिशोब ठेवणारा, मुनीम.
**कारखाना**–(फा) पु० मोठमोठालीं कामें होण्याची जागा, यंत्रशाला.
**कारटा**–पु० वाईट पोर. २ मृताचें कर्म चालविणारा.
**कारण**–(सं) न० जरूरी, गरज, प्रयोजन.
**कारभार**–पु० व्यवस्था, प्रधानगिरी.
**कारभारी**–पु० व्यवस्थापक, दिवाण.
**कारस्थान**–न० मसलत, बेत, कपटयुक्ति,
**काल्पनिक**–(सं) वि० कल्पनेचें, रचलेलें. कल्पित.
**काल**–(सं) पु० वक्त, प्रसंग. २ केळीचा गाभा. ३ मृत्यु. ४ क्रि० गेल्या दिवशीं.
**कालक्षेप**–(सं) पु० निर्वाह, काल संपविणें, वेळ मारणें, वेळ घालवणें.
**कालकूट**–(सं) न० विष, जहर, विख.
**कालत्रय**–(सं) न० मागचा चालता पुढचा काल, भूत भविष्य वर्तमान काळ.
**कालत्रयीं**–क्रि० कधींही.
**कालवण**–न० पातळ तोंडी लावणें.
**कालवणें**–(सं) न० मिळवणें, सारखें करणें.
**कालवा**–(सं) पु० पाट, नदीचें फोडून आणलेलें पाणी.
**कलिंगड**–**ण**–न० टरबूज, फळविशेष.
**काव्य**–(सं) न० पद्य, कविता. २ शुक्राचार्य.
**काव**–स्त्री० मातीविशेष, गेरू, औषधिविशेष.
**कावकाव**–स्त्री० कावळ्याचा शब्द–ओरडणें
**कावड**–स्त्री० दोहीं बाजूंस दोन पदार्थ टांगण्यांची काठी, कबाड, माकण. २ गंगा.
**कावराबावरा**–वि० घाबरा, घाबरलेला, भ्यालेला.
**कावळा**–पु० काऊ, काक.
**कावा**–पु० कांगावें, कपट, ढोंग. २ कारस्थान.
**काशीकर**–(सं) पु० काशी केलेला, काशींत राहिलेला, काशीचा रहाणारा. २ वि० लफंगा, लुच्चा.
**काष्ठ**–(सं) न० लांकूड, सर्पण, फाटी.
**कास**–पु० खोकला. २ स्त्री० ओटी. ३ कच्छ, कासोटा.
**कासरा**–पु० बैलाचे गळ्यास बांधण्याची दोरी.
**कासार**–(सं) पु० तलाव, तळें, सरोवरें. २ बांगड्यांचा किंवा भांड्यांचा व्यापारी.

**कासावीस**—वि० घाबरा, व्याकूळ.
**कासोटा**—पु० काष्टा, कच्छ, कांस.
**काहिली**—स्त्री० आग, तळमळ, गरमी.
**काहूर**—न० अरिष्ट, आरोप. २ अंधारी. ३ जमाव.
**काळ**—(सं) पु० प्रसंग, वेळ, दशा. २ दुष्काळ. ३ वाण, उणीव. ४ यम. ५ मृत्यु.
**काळजी**—स्त्री० फिकिर, चिंता, आस्था.
**काळझोंप**—स्त्री० मरणप्रायनिद्रा, घोर निद्रा.
**काळतोंड्या**—वि० दुर्दैवी, अपशकुनी.
**काळपुळी**—स्त्री० रोगविशेष, चाळपुळी.
**काळबें**—न० गांधीलमाशांचें पोळें, मोहोळ.
**काळवटणें**—अ० काळा होणें, मळकट होणें.
**काळवीट**—पु० हरण ( नर. )
**काळा**—वि० काळ्या रंगाचा, श्याम, आस्मानी, सांवळा.
**काळासांवळा**—वि० काळसर, श्याम, आस्मानी.
**काळिमा**—स्त्री० काळेपणा, काळसर, काळोख. २ कलंक, डाग, अपकीर्ति.
**काळीज**—न० कलीजा, अंतःकरण, छातीच्या डाव्या बाजूचा अंतर्गत भाग.
**काळेंपाणी**—न० हद्दपार करण्याची शिक्षा.
**काळेंबेरें**—स्त्री० वाईटबेरें. २ लबाडी, ढोंग, कपट.
**काळोख**—पु० अंधार, अंधकार, तम.
**काळोखी**—स्त्री० अंधारी. २ बट्टा, दोष.
**कां**—उ० कशाकरितां, काय ह्मणून.
**कांक्षा**—(सं) स्त्री० शंका, संशय.
**कांक्षेखोर**—(सं) वि० संशयी, भ्रमिष्ट, शंकेखोर.
**कांकडणें**—अ० थंडीनें कांपणें, थरथरणें, लटलट कांपणें, हिंव भरणें.
**कांकडी**—स्त्री० फळविशेष, खिरा. २ थंडीचा कडाखा.
**कांकण**—(सं) न० कंकण, बांगडी.
**कांकीं**—उ० कारण कीं.
**कांकू**—(सं) न० देर, दिरंग, उशीर, आळस, शंका, वानवा.
**कांख**—(सं) स्त्री० कक्षा, भुरकुंड.
**कांच्या**—पु० कमर बांधण्याचा अरुंद कपडा.
**कांच**—(सं) स्त्री० आरसा, भिंग, दर्पण.
**कांचन**—(सं) न० सुवर्ण, सोनें. २ फुलझाडविशेष. ३ धोतरा.
**कांजिणी**—स्त्री० रोगविशेष.
**कांजी**—(सं) स्त्री० पेज.
**कांटा**—(सं) पु० कंटक. २ कुलपांतली अट.
**कांटेरा**—पु० कांट्याचा.
**कांठ**—पु० कंगोरा, किनारा, कोर.
**कांठणें**—अ० कंठणें, सोसणें.
**कांडण**—(सं) न० कांडण्याची किंमत, सडणें, कांडणें. २ मारणें.
**कांडणें**—स० कुटणें, मुसळानें कुटणें, कांडणें.
**कांडी**—(सं) स्त्री० तुकडा, पेरें.
**कांडचोर**—पु० ऊद.
**कांडें**—(सं) न० पेरें, तुकडा.
**कांत**—(सं) पु० नवरा, पति, भ्रतार, दादला.
**कां तर**—उ० तर मग कां, कारण कीं, कां कीं.
**कांता**—(सं) स्त्री० बायको, कुटुंब, सौभाग्यवती.
**कांतार**—(सं) न० जंगल, वन, अरण्य, अटवी.
**कांति**—(सं) स्त्री० तेज, प्रभा. २ वर्ण, रंग.
**कांदा**—(सं) पु० कंदर्प. २ गठा, मूळ, गड्डा.
**कांपणें**—(सं) उ० वि० लटपट हलणें, थरथरणें, कंप सुटणें.
**कांब**—स्त्री० चापट तुकडा. २ कामटी.
**कांबरुण**—न० पांघरुण, अभ्रा.
**कांबळा-कांबळें**—(सं) पु० घोंगडी, धाबळी, घोंगडें, चवाळें.
**कांसव**—न० कच्छ, कूर्म.
**कांसें**—(सं) न० धातुविशेष.
**कांहीं**—सा० कित्येक.

**कांहींकांहीं**–वि० थोडथोडें, लहान, सुमाराचें, थोडेंबहुत.
**कांहींचें बाही**–वि० भलतेंचें सलतेंच, निरुपयोगी.
**किटण**–(सं) न० कीट, सांचलेला मळ.
**किडका**–वि० किडीनें खाल्लेला, किडलेला.
**किडकिडीत**–वि० लुकडा, बारीक, रोडका.
**किडणें**–अ० किडे पडणें.
**किडा**–(सं) पु० जिवडा, जीव, कीड.
**किडुक मिडुक**–न० लहान लहान दागिने किंवा त्यांचा भाग.
**कित्ता**–(आ) पु० नमुना, वळण. २ सदर.
**किती–कितका**–वि० केवढा, किती आकाराचा.
**कितपत**–(सं) क्रि० कोठपर्यंत.
**किनखाप–ब**–(फा) पु० जरतारी, भरजरी.
**किनरी**–(सं) स्त्री० तर्फाखेरीज सारंगी, कोकाटा, कोका.
**किनारा**–(फा) पु० काठ, कड, कंगोरा, बाजू, तीर.
**किफाइत–यत**–(फा) स्त्री० फायदा, नफा, लाभ.
**किमपि**–(सं) क्रि० थोडाही, थोडेंसें, कांहीं तरी.
**किमया**–(आ) पु० सोनें रुपें बनविण्याची युक्ति, जडीबुट्टी.
**किमर्थ**–(सं) क्रि० कां, कशा करतां, काय म्हणून.
**किर्र**–वि० गर्द, दाट, खूप.
**किरकोळ**–क्रि० बारीक सारीक, फुटकळ.
**किरडूं**–न० सर्पासारखे जीव, किडा.
**किरण**–(सं) तेज, प्रकाश.
**किरमिजी**–वि० एक प्रकारचा रंग.
**किराईत**–(सं) न० औषधविशेष, चिराईत, काडे चिराईत.
**किराणा**–पु० किरकोळ, वाणसोदा.
**किरीट**–(सं) पु० मुगुट, भूषणविशेष.
**किल्मिष**–न० पाप. २ किंतु, अंदेशा, संशय.
**किल्ला**–(आ) पु० गढी, कोट बांधलेली जागा–इमारत, कोट.
**किल्ली**–(फा) स्त्री० चावी, कुंजी. २ युक्ति.
**किशोर**–(सं) पु० अज्ञान मुलगा ( कायद्यांत न आलेला ), बालक. पोर.
**किसणी**–स्त्री० किसणारी, कान्तसविशेष.
**किसणें**–स० किसणीवर घासणें, कीस करणें.
**किळस**–(सं) स्त्री० खंत, घाण, शिसारी.
**किळसणें**–(सं) वि० किळस करणें–वाटणें–येणें.
**किंकणेल**–न० किंकणीचें तेल, औषधविशेष.
**किंकाळणें**–अ० ओरडणें, खिंकाळणें.
**किंकरें**–न० हत्यारविशेष, पटाशी.
**किंचित्**–(सं) वि० थोडें थोडकेंसें, जरासें.
**किंतान**–(आ) न० तागाचें वस्त्र, सणाचें कापड.
**किंतु**–(सं) पु० संशय, शंका, कांक्षा. २ उ० परंतु.
**किंबहुना**–उ० बल्के, किंवा, इतकेंच नाहीं, फार काय.
**किंमत**–(आ) स्त्री० योग्यता. २ मोल, हाशील, मोबदला.
**किंवा**–उ० अथवा, कीं.
**कीट**–(सं) न० किटण, जंग, गंज, मैल. २ किडा.
**कीटक**–(सं) पु० कीट, किडा, लहान जीव.
**कीड**–(सं) स्त्री० अळी, जीवविशेष.
**कीर्त्ति**–(सं) स्त्री० प्रसिद्धि, आबरू, लौकिक, नांव.
**कीर्तन**–न० गायनयुक्त पुराण, कथा.
**कीर**–(सं) पु० राघु, पोपट, शुक.
**कीव–कींव**–स्त्री० दया, माया.

**कीस**–पु० बारिक कण, भुगा, भूस, चूर्ण.
**कीं**–उ० किंवा, असें कीं.
कु–(सं) वाईट, जसें--कुमार्ग ( वाईट मार्ग. )
**कुइरी**–स्त्री० करी. २ वनस्पतिविशेष.
कुई–स्त्री० कोल्ह्याचें ओरडणें. २ ओरड.
**कुक्षि**–(सं) स्त्री० खाक, कोठा, पोट, उदर.
**कुक्कुट**–(सं) पु० कोंबडा, मुर्ग.
कुकडें–न० एक तऱ्हेची सुताची गुंडी.
**कुकर्म**–(सं) न० वाईट काम, अनीतीचें कृत्य, गुन्हा, दोष, बदकर्म.
**कुकर–कुक्कुर**–(सं) पु० कुत्रा, श्वान.
**कुकुटकुंभा–डकुंभा**–पु० भारद्वाज, पक्षिविशेष.
**कुग्राम**–(सं) न० वाईट गांव, निरुपयोगी खेडें.
कुच–(सं) पु० स्तन, थान. २ वि० थोडें.
**कुचकामाचा**–वि० थोड्या कामाचा, निरुपयोगी.
**कुचकुचणें**–अ० कुजबुजणें.
**कुचर**–वि० कामचोर, आळशी, हेळसांड करणारा.
**कुचराई**–स्त्री० लबाडी, दुर्लक्ष.
**कुचाळी करणें**–स० कुचेष्टा करणें, नाकांत काड्या घालणें.
कुचेष्टा–(सं) स्त्री० कुचाळी, थट्टा, मस्करी.
**कुजा**–(फा) पु० खुजा, मृत्तिकापात्रविशेष.
**कुजट**–वि० कुजलेला, नासलेला, कुजका.
**कुजणें**–अ० नासणें, बिघडणें, अयोग्य होणें.
**कुजबुजणें**–अ० कुचकुचणें.
**कुजविणें**–स० नासविणें, बिघाडणें.
**कुटका**–पु० तुकडा, लहान भाग.
**कुटकुटणें**–अ० पोटांत गुरगुरणें–दुखणें, गुडगुडणें.
**कुटणें**–(सं) स० सडणें, कांडणें, बारीक करणें.
**कुटाळ**–(सं) वि० निंदक, कुचाळ, कुचोद्य.
**कुटिल**–(सं) वि० वांकडा, कुटाळ.
**कुटुंब**–(सं) न० मुलेंमाणसें, संसार, खटला. २ बायको.
**कुठला–कुठचा**–वि० कोठील, कोठचा.
**कुठपर्यंत–पावेतों–वर**–क्रि० कोठपर्यंत.
**कुठार**–(सं) पु० परशु, कुऱ्हाड, फरशी.
**कुठून–कोठून–कुठोन**–क्रि० कोणीकडून.
कुठें–(सं) क्रि० कोठें कोणीकडे.
**कुडकुडणें**–अ० थंडी वाजणें.
**कुडणें**–उ० वि० कुंपण घालणें, मर्यादा करणें. २ दुःख करणें.
**कुडतन**–न० छत्तिसाच्या व कधीं बेचाळीसाच्या संख्येस हा शब्द योजितात, परिमाणविशेष.
**कुडता**–पु० बंडी, पेटी, कबज्या, पेरण.
**कुडव**–(सं) पु० दोन पायल्या.
**कुडा**–(सं) पु० झाडविशेष. २ वि० वाईट, कुडणारा.
**कुडूक**–पु० ( कुंडल पहा. )
**कुडें**–न० अफवा, बातमी. २ तुकडा.
**कुणबी**–पु० कुळंबी, शेतकरी, खेडू.
**कुत्रा–कुतरा**–पु० श्वान, कुक्कुर.
**कुत्र्याचें मूत**–वि० व्रात्य.
**कुत्सित**–(सं) वि० वाईट, दुष्ट, क्षुद्र.
**कुत्तरओढ**–स्त्री० दोन्हींकडून असलेली ओढ, विपत्ति, यातायात.
**कुतंगळ–ळू**–वि० अशक्त, पंगू.
**कुतर्क**–(सं) पु० वाईट तर्क.
**कुदणें**–अ० उड्या मारणें, बागडणें.
**कुदळ–ळी**–( सं ) स्त्री० हत्यारविशेष, कुदाली, खणती.
**कुदळणें**–स० जमीन दुखावणें, खणणें.
**कुपण**–न० कुडण, मर्यादा, हद्द, वई.
**कुपथ्य**–(सं) न० अपथ्य पदार्थाचें सेवन.
**कुपा–प्पा**–(सं) पु० शिशी, कुपी.

**कुपात्र**–(सं) न० वाईट मनुष्य, अयोग्य मनुष्य, असत्पात्र.
**कुपी**–स्त्री० शिशी.
**कुपुत्र**–(सं) पु० वाईट मुलगा.
**कुबड**–(सं) न० पांक.
**कुबडा**–वि० खुजा, पोंक्या, कुब्ज.
**कुबडी**–स्त्री० बैरागन. २ वि० कुब्जा.
**कुबलणें**–स० मारणें, चोपणें.
**कुबेर**–(सं) पु० देवांचा खजिनदार. २ वि० श्रीमंत. ३ दरिद्री.
**कुभांड**–न० तर्कट, खोटा आरोप, दोष. २ खर्बुजांतली एक जात.
**कुमक**–(फा)स्त्री०मदत,महाय्य,सहायकारी.
**कुमार**–(सं) पु० पांचवर्षांचे आंतील मुलगा २ कार्तिकेय, कार्तिकस्वामी.
**कुमारिका**–(सं) स्त्री० कुमारी, अविवाहित मुलगी, कुंवार.
**कुमारी**–(सं) स्त्री० कुमारिका, कुंवार.
**कुर्रा**–पु० ऐट, गर्व, रिकामा डौल.
**कुऱ्हाड**–(सं) स्त्री० हत्यारविशेष, कुठार, परशु.
**कुरकूर**–स्त्री० रड, पिरपिर, रडगाणें.
**कुरकुली**–स्त्री०टोपली,लहान वाटोळी पाटी.
**कुरंग**–(सं) पु० हरण.
**कुरण**–न०जंगल,रान,चारा असलेली जमीन.
**कुरतुडणें**–स० वांकडें तिकडें खाणें.
**कुरंद**–**कुरुंद**–पु० पाषाणविशेष.
**कुरमुरा**–पु० भाजलेला पोहा.
**कुरवाळणें**–स० तोंडावरून हात फिरविणें, गोंजारणें.
**कुरळ**–वि० वांकडे, नागमोडी.
**कुराण**–(आ) न० मुसलमानी धर्मशास्त्र.
**कुरापत**–(आ) स्त्री० कुचाळी, कुचेष्टा.
**कुरूप**–(सं) वि० बेरूप, विद्रूप, बेढब.
**कुल**–(सं) न० कुटुंब, पिढी, वंश.
**कुलगुरु**–(सं) पु० उपाध्याय, पिढीचा गुरु.
**कुलंगडें**–न० अडचण, घोटाळा.
**कुलटा**–(सं) स्त्री० छिनाल बायको, असंभावित स्त्री.
**कुलदीपक**–(सं) पु० नामांकित, कुटुंबापैकीं हुशार.
**कुलदैवत**–(सं) न० कुलदेवता, पीढिजादा देव.
**कुलधर्म**–(सं) पु० वाडवडिलांचा धर्म.
**कुलवधू**–(सं) स्त्री० चांगली–कुलीन स्त्री.
**कुलक्षय**–(सं) पु० निर्वंश, निसंतान.
**कुला**–पु० कुल्ला, फेंडा, ज्याच्यावर आपण बसतों तो शरीराचा भाग, नितंब.
**कुलाबा**–(फा) पु० जागाविशेष, भूशिर, जमिनीचें समुद्रांत गेलेलें टोंक.
**कुलाल**–(सं) पु० कुंभार.
**कुलीन**–(सं) वि० चांगल्या घराण्यांत जन्मलेला, संभावित, खानदान.
**कुलंगा**–वि०लहान, लहान जातीचा, टारगा.
**कुलुली**–(सं) स्त्री० मौज, खुषी, आनंद, खाज, किडा.
**कुलुप**–**लूप** (आ) न० ताळें, टाळें.
**कुवत**–(फा) स्त्री० शक्ति, ताकत, हिंमत, बळ, जोर.
**कुवा**–पु० आड, बाव, विहीर.
**कुवाडें**–न० कोडें, घोटाळ्याचा प्रश्न.
**कुश**–(सं) पु० दर्भ, पवित्र गवत.
**कुशल**–(सं) वि०खुशालीचा, सुखाचा, क्षेम, खुशाल, सुखी.
**कुष्ट**–(सं) न० कोड, रक्तपिती, महारोग.
**कुस्ती**–(फा) स्त्री० मल्लयुद्ध, झोंबी.
**कुसका**–वि० कुजका, कुजलेला.
**कुसकर**–पु० भुगा, बारीक बारीक तुकडे.
**कुसकरणें**–(सं) अ० भुगा करणें.
**कुसरुड**–पु० सुरवंट, घुला, कुसरडा.

**कुसळ**–न० बारीक काडी, कुस, केस, धस. २ शष्प.

**कुसुम**–(सं) न० फूल, सुमन, पुष्प.

**कुसंगति**–(सं) स्त्री० कुसंग, वाईट सोबत.

**कुसुंबा**–(सं) पु० लाल रंग, वाळलेलीं कडई-ची फुलें.

**कुसूं**–न० दार फिरण्याकरितां बिजागऱ्यां-सारखी केलेली युक्ति. २ मर्यादा.

**कुळकर्णी**–(सं) पु० गांवचा सरकारी कार-कून, करण, तलाठी.

**कुळकुळीत**–वि० पक्का काळा.

**कुळचा**–पु० चुळका.

**कुळव**–पु० एक प्रकारचें शेतकीचें आऊत.

**कुळंबी**–पु० कुळवाडी, कुणबी.

**कुळी**–स्त्री० जातकुळी, पिढी.

**कुळीथ**–(सं) पु० हुलगा, कळथा.

**कुंकुम**–(सं) न० केशर, जाफ्रान. २ कुंकू.

**कुंचडें**–न० लहान मुलांची टोपी, टोपडें.

**कुंचणें**–स० झाडणें, साफ करणें.

**कुंचला–कुंचली**–पु० स्त्री० रंग देण्याचें हत्यार.

**कुंचा**–(सं) पु० जातें झाडण्याची केरसुणी.

**कुंची**–(सं) स्त्री० विरल्या सारखी टोपी.

**कुंज**–(सं) पु० मंडप, लतागृह, गुंफा.

**कुंजर**–(सं) पु० हत्ती, गज.

**कुंजिका**–(सं) स्त्री० कुंजी, चावी, किल्ली.

**कुंठणें**–(सं) अ० थांबणें, बंद होणें.

**कुंडगा**–पु० कुणगा, तांदळाचें सांठवण. २ द्रव्य, पुंजी, माया.

**कुंड**–(सं) न० पाणी सांठविण्यासाठीं केले-ली जागा. २ हवन करण्याची जागा.

**कुंडल**–(सं) न० वर्तुल. २ कुडूक, कानांत घालण्याचा दागिना.

**कुंडली**–(सं) स्त्री० चौकडी, कुली. २ रा-शिचक्र. ३ भविष्य.

**कुंथणें**–अ० कण्हणें, दम घेणें.

**कुंद**–(सं) पु० लताविशेष. २ वि० बधिर, शून्य, धुंद.

**कुंदा**–पु० गवतविशेष. २ पेंचविशेष.

**कुंदी**–स्त्री० खूप मार.

**कुंभ**–(सं) पु० अकरावी रास. २ घट.

**कुंभकर्णी झोंप**–स्त्री० अति गाढ व पुष्कळ वेळ निद्रा.

**कुंभार**–(सं) पु० कुंभकार, कुलाल.

**कुंवर**–(सं) पु० कुमार, लहान मुलगा.

**कुंवळणें**–(सं) वि० कोंळणें, हातानें रस काढून घेणें.

**कुंवार**–(सं) स्त्री० कुमारी, अविवाहित मु-लगी.

**कुंवार कांदा**–(सं) पु० कोरफड.

**कूच**–न० जाण्याची तयारी, तळ सोडणें.

**कूट**–(सं) न० कपट. २ कागदा करतां के-लेला भूस. ३ उखाणा. ४ एक प्रकार-चा मसाला.

**कूड**–पु० कारव्या कामट्या इत्यादिकांची भिंत.

**कूप**–(सं) पु० खड्डा, विहीर, कुवा, बाव.

**कूर्म**–(सं) पु० कच्छ, कांसव.

**कूस**–(सं) स्त्री० कुक्षि, उदर, गर्भाशय. २ कसर, नफा. ३ न० मर्यादेची भिंत. ४ सडी, कुसळ.

**कूळ**–(सं) न० कुल, गोत्र. २ कर्जदार. ३ पक्षकार.

**कृत**–(सं) वि० केलेलें. २ न० पहिलें युग.

**कृतकृत्य**–(सं) वि० ज्याचें कार्य उरलें नाहीं असा, कृतार्थ.

**कृतज्ञ**–(सं) वि० उपकार जाणणारा.

**कृतघ्न**–(सं) वि०उपकार विसरणारा, हरा-मखोर.

**कृतनिश्चय**–(सं) पु० पक्का निश्चय.

**कृतसंकल्प**–(सं) पु० शाश्वतीचा नियम.
**कृत्तिका**–(सं) स्त्री० नक्षत्रविशेष.
**कृत्य**–(सं) न० काम, कर्म.
**कृत्या**–(सं) स्त्री० पराक्रमी स्त्री, भांडणारी, तंटे करणारी, कैकेयी, कजाग.
**कृत्रिम**–(सं) न० कपट, लुच्चेगिरी, लबाडी. २ वि० नकली, कृतीनें.
**कृतांत**–(सं) पु० यम, काळ, काळपुरुष. २ वि० भयंकर, कर्दनकाळ.
**कृति**–(सं) स्त्री० करणी. २ चाल,वागणूक.
**कृपण**–(सं) वि० कंजूष, कवडीचुंबक.
**कृपा**–(सं) स्त्री० मेहेरबानी,माया,लोभ,दया.
**कृमि**–(सं) पु० किडा, जीव, जंतू, जंत.
**कृश**–(सं) वि० किडकिडीत, सुदामजी, रोडका, काडीमल्ल.
**कृष्ण**–(सं) पु० देवविशेष. २ वि० काळा.
**कृषि**–(सं) स्त्री० कृषिकर्म, शेतकी, शेतीभाती, शेतवाडी.
**क्लृप्ति**–(सं) स्त्री० युक्ति, कल्पना, योजना.
**केंकटणें**–**केंकणें**–**केकावणें**–अ० ओरडणें, गागणें, केंकें करणें.
**केका**–(सं)स्त्री० मोरांचें ओरडणें. २ मोरोपंत कवींचें एक काव्य.
**केतक**–(सं) न० केतकी, केवडा. २ पु० केसांत घालण्याचा एक दागिना.
**केतु**–(सं) पु० ग्रहविशेष. २ ध्वज.
**केधवां**–क्रि० कधीं, केव्हां.
**केनशी**–स्त्री० बुरा, बुरशी.
**केर**–पु०कचरा, व्यर्थ पदार्थांचा चुरा, व्यर्थ सामान.
**केरवां**–पु० एक प्रकारचा नाच, कारवा.
**केरसुणी**–स्त्री० झाडू, खराटा, हावळणी.
**केलि**–(सं) स्त्री० खेळ, क्रीडा.
**केव्हां**–क्रि० केधवां, कधीं, कोणत्या वेळेस.
**केवटा**–पु० नदीकांठची जमीन.
**केवडा**–(सं) पु० ( केतक पहा. )
**केवढा**–वि० किती मोठा.
**केवलप्रयोगी अव्यय**–(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष.
**केवळ**–(सं) क्रि० निव्वळ, नुसता, फक्त.
**केविलवाणा**–वि० गरिबासारखा, गरीब.
**केवीं**–क्रि० कसा, कशा रीतीनें.
**केश**–(सं) पु० केस, रोम, लोंकर, बाल.
**केशर**–(सं) न० कुंकुम, जाफ्रान.
**केशरी**–(सं) वि० केशराच्या रंगाचा.
**केशरीभात**–पु० साखरभात.
**केशव**–(सं) पु० विष्णु, कृष्ण देवाचें नांव.
**केस**–(सं) पु० केश, बाल, कच.
**केसतुड**–न० एक प्रकारचा फोड, गळू.
**केसर**–**केंसर**–न० सिंहाची आयाळ. २ पु० पुष्पतंतु.
**केसरी**–(सं) पु० सिंह, हरी.
**केळ**–न० केळीचें झाड, केळीचें फळ.
**केळवंड**–स्त्री० केळ्यांचा घड, फडा.
**केळवण**–स्त्री० रीत, रहा, चाल. २ लग्नाचे व मुंजीचे अगोदरची मेजवानी, गडगनेर.
**केळें**–(सं) न० केळीचें फळ.
**केंडणें**–उ० वि० अडथळा आणणें, आडवणें, आड येणें.
**केंद्र**–(सं) न० मध्य बिंदु.
**केंबळ**–(सं) न० जुनें गवत.
**कै**–**कैं**–क्रि० केव्हां, कोठें.
**कैक**–वि० पुष्कळ, बहुत.
**कैकई**–**कैकेयी**–(सं) स्त्री० दशरथाची एक बायको. २ वि० दुष्ट, कजाग.
**कैचा**–**कैंचा**–वि० कुठचा, कोठला, कसा.
**कैची**–**कैंची**–स्त्री० कातर, कातरी. २ धिरा देण्यासाठीं एकमेकास बांधलेले वांसे.
**कैद**–(आ) स्त्री० शिक्षा, तुरुंग, शासन, कारागृह.

**कैफ**–(आ) पु० अम्मल, तार, निशा.

**कैफियत**–(आ) स्त्री० जबानी. २ हकीकत, गोष्ट, मुद्दा, मूळ.

**कैरी**–स्त्री० कच्चा आंबा, आंत बाठ नसलेला आंबा. २ वि० काणी, तिरळी.

**कैलास**–(सं) पु० महादेवाची रहाण्याची जागा.

**कैलासवासी**–(सं) वि० मेलेल्या मनुष्यास हा शब्द लावतात.

**कैली**–(आ) वि० प्रमाणविशेष.

**कैवल्य**–(सं) न० ईश्वराशीं ऐक्य होऊन जाणें, एक प्रकारची मुक्ति.

**कैवार**–पु० कड, ओढा. २ वर्तुल काढण्याचें हत्यार.

**कैसा**–वि० कसा, कोणत्या प्रकारचा.

**कोकंब**–न० वृक्षविशेष. २ त्याचें फळ.

**कोकलणें**–उ० वि० ओरडणें, नांवानें रडणें, तक्रार करणें.

**कोकशास्त्र**–न० कामशास्त्र, स्त्रीपुरुषांचे संयोगाची विद्या.

**कोका**–पु० वाद्यविशेष, किनरी. २ नुकतेंच बाहेर पडलेलें केळफूल.

**कोकिल**–(सं) पु० पिक, कोकिला, कोकीळ.

**कोकी**–स्त्री० चोंच. २ बांधलेल्या पागोट्याचा चोंचीसारखा भाग.

**कोजळी**–स्त्री० दिव्याची वात जळून राहिलेला मैल, कोळी.

**कोट**–पु० तट, मजबूत भिंत, किल्ला. २ पत्त्याच्या डावांतील हार. ३ संख्याविशेष, कोटि.

**कोटंबा**–पु० कोठिंबा, पोहरा, डोल, पाणी काढण्याकरितां केलेलें लाकडी पात्र.

**कोटि**–(सं) स्त्री० कोटी, पेंच, कल्पना. २ कोट, शंभर लक्ष. ३ अग्र.

**कोटें**–न० पक्ष्याचें घरटें, कोठा.

**कोठचा**–वि० कोठला, कोणीकडचा–ला, कोठील.

**कोठडी**–स्त्री० खोली, [illegible] जागा.

**कोठनीस**–(फा) पु० कोठावळ्या, कोठीवरचा कारकून, कोठीचा मुखत्यार, वाकनीस.

**कोठपर्यंत**–क्रि० कोठपावेतों, कोठवर.

**कोठा**–पु० कूस, छाती, जठरांश. २ वखार, सांठविण्याची जागा.

**कोठी**–(सं) स्त्री० कोठार, धान्य वगैरे ठेवण्याची जागा, सांठवण, वखार, ठाणें.

**कोठें**–क्रि० कोणत्या ठिकाणीं.

**कोड**–(सं) न० कुष्ट, महारोग. २ कौतुक.

**कोडगा**–पु० निलाजरा, निर्लज्ज, बेशरम.

**कोडबोळें**–न० कडबोळें, कोडोळें.

**कोण**–(सं) पु० कोपरा, कोन. २ सर्व० कोणता, कोणचा, कुठला.

**कोणी**–सर्व० कोणीएक, एक, कोणी तरी.

**कोतवाल**–(फा) पु० फौजदारासारिखा अधिकारी, कोतवालीचा अंमलदार.

**कोता**–(फा) वि० कमती, कमी, आंखुड.

**कोथळा**–पु० कोथळी, मोठें पोतें.

**कोथळी**–स्त्री० मोठें पोतें.

**कोथिंबीर**–स्त्री० धनिया, धन्याचें झाड.

**कोदंड**–(सं) न० धनुष्य, धनु, कमठा.

**कोन**–पु० कोपरा, कोण. २ न० गोराडू.

**कोनडा**–पु० गोखला, देवळी.

**कोनफळ**–न० फळविशेष.

**कोप**–(सं) पु० राग, संताप. २ स्त्री० झोंपडें.

**कोपर–कोंपर**–पु० जेथून हात मोजण्याची सुरवात करितात तो हाताचा भाग.

**कोपरा**–पु० कोन.

**कोबी**–स्त्री० कोइ, करमगड्डा.

**कोम**–स्त्री० स्त्रीच्या नांवाच्या नंतर व नवऱ्याच्या नांवाच्या अगोदर लावण्याचा शब्द, भ्रतार.

**कोमजणें–मेजणें**–अ० फिका होणें, करपणें, नासणें, सुकणें, मलूल होणें.
**कोमट**–( कोंबट पहा. )
**कोमल-ळ**–(सं) वि० नाजूक, नरम, कोंवळें.
**कोय**–स्त्री० आंब्यांतली बी, बाठ, बाठा.
**कोयंडा**–पु० आंकडा, कडी लावण्याची आड.
**कोयता–ती**–पु० स्त्री० झाडें तोडण्याचें हत्यार, विळा.
**कोर**–स्त्री० कंगोरा, कांठ, रेषा. २चतकोर.
**कोरड्यास**–न० तोंडीं लावणें, कालवण.
**कोरड**–स्त्री० जिभेला ओलेपणा नसल्याची स्थिति.
**कोरडा**–पु० चाबूक. २ वि० नुस्ता, रिकामा. ३ ओला नसलेला, सुका, सुखा, शुष्क. ३ जेवणाशिवाय.
**कोरणें**–स० कोरून काढणें, घडणें, तयार करणें, बनविणें.
**कोरा**–वि० उपयोग न झालेला, न वापरलेला.
**कोरान्न**–न० कोरें अन्न, कोरें धान्य, कोरडी भिक्षा.
**कोल्हा**–पु० जंबूक, शृगाल.
**कोल्हाटी**–वि० कसरतीचे खेळावर उपजीविका करणारे लोक. २ उडीविशेष.
**कोलणें**–स० उडविणें, फेंकणें. २ दुसऱ्यावर ढकलणें.
**कोलती**–स्त्री० कोलीत, जळतें लांकूड.
**कोलदांडा**–पु० एक प्रकारची शिक्षा.
**कोलाहल**–(सं) पु० गलबा, कल्ला, ओरड.
**कोश**–(सं) पु० शब्दसंग्रह. २ खजीना. ३ कमलाचा मध्यभाग, वाटी. ४ कोस, योजनाचा चतुर्थांश. ५ म्यान. ६ कोसाटा, रेशमी इत्यादि किड्याचें घर.
**कोशिंबीर**–स्त्री० एक प्रकारचें रायतें.
**कोशीस**–(फा) स्त्री० प्रयत्न, शोध, यत्न.
**कोष्टक**–(सं) न० घरें. २ परिमाण, प्रमाण.
**कोष्टकोळिंजन**–न० वनस्पतीविशेष.
**कोष्टी**–पु० कापड विणणारा, विणकर.
**कोष्ठ**–(सं) पु० कोठा, पोट. २ औषधवि०.
**कोस**–(सं) पु० कोश, योजनाचा चतुर्थांश. २ कापड ताणलें असतां किंवा त्याची घडी घातली असतां त्याचा जो भाग जास्त आहेसा दिसतो तो.
**कोसळणें**–अ० ढासळणें, पडणें, मोडणें.
**कोहळा**–पु० भुरा, फळविशेष, कूष्मांड.
**कोळणें**–अ० कुवळणें, कालविणें, सार काढून घेणें.
**कोळपणें**–स० कुदळणें, कोळप्यानें केलेलें काम. २ आपेआप विझणें. थंडीनें किंवा गर्मीनें सुकणें.
**कोळंबी**–स्त्री० कुंडी, प्याला.
**कोळवें**–न० आत्पावाचें माप, आत्पाव.
**कोळसा**–पु० विझलेला निखारा, कोयला.
**कोळसुंदा**–पु० उद, कांडेचोर, जनावरविशेष.
**कोळिष्टक**–न० कोळ्याचें जाळें.
**कोळिसा**–पु० जनावरविशेष.
**कोळी**–पु० मासे धरून त्यांवर उपजीविका करणारे लोक. २ एक प्रकारचा किडा, लूता.
**कोंकण**–(सं) न० देशविशेष.
**कोंकरूं**–न० मेंढीचें पिल्लूं.
**कोंझा**–वि० खोल डोळ्याचा.
**कोंडणें**–उ० वि० बंद करणें–होणें, रस्ता नाहींसा होणें–करणें.
**कोंडवाडा**–पु० गुरें कोंडण्याची जागा.
**कोंडा**–पु० भाताचे तांदुळाची अगर कोणतेही धान्यावरची त्वचा, तुप.
**कोंडी**–स्त्री० बंद केलेली जागा. २ कुंडी.
**कोंदण**–न० रत्न बसविण्याकरतां केलेलें स्थान.

**कोंदणें**–उ० वि० जोरानें भरणें, कोंबणें, जबरीनें ढकलणें, खचणें.

**कोंबट**–(सं) वि० थोडें ऊन, विसण न मावण्याजोगतें, अर्धवट निवालेलें.

**कोंबडा**–पु० कुक्कुट, मुरग.

**कोंवळा**–(सं) वि० कोमळ, नाजूक, कच्चा.

**कौटिल्य**–(सं)न० कुटिलपणा, लबाडी, वांकडेपणा. २ पु० चाणाक्य.

**कौतुक**–(सं) न० आश्चर्य, नवल, नवाइ, मौज.

**कौपीन**–(सं) स्त्री० लंगोटी, कुपीन, कफनी.

**कौमुदी**–(सं) स्त्री० चंद्रप्रकाश. २ संस्कृत भाषेचें एक व्याकरण.

**कौल**–(आ) न० घरें झांकण्याकरितां मातीच्या पदार्थाची रचना. २ लेखी करार. ३ प्रश्न, साक्षा.

**कौला**–पु० फळविशेष, नारिंगासारखें फळ.

**कौलू**–स्त्री० पांथरी, बरेल, तापतिल्ली.

**कौशल्य**–(सं) न० कुशलता, हुशारी.

**कौस्तुभ**–(सं)पु० कृष्णाच्या छातीवरचें रत्न.

**कंकण**–(सं) न० कांकण, बांगडी. २ कडें, मंतरलेला दोरा.

**कंकोळ**–(सं) पु० कबानचिनी, औषधिवि०

**कंगणी**–स्त्री० कोर. २ स्त्रियांचा एक दागिना.

**कंगवा**–पु० कंगई, फणी.

**कंगाल**–वि० भिकारी, दरिद्री, गरीब.

**कंगोरा**–पु० कांठ, कोर, कंगणी.

**कंचनी**–स्त्री० नायकीण, कळवंतीण.

**कंचुकी**–(सं) स्त्री० चोळी. २ पु० चोपदार.

**कंजूष**–वि० कृपण, धनलोभी, कद्रु.

**कंटक**–(सं) पु० कांटा. २ त्रास, आडफाटा ३ वि० सहनशीळ, सोसक.

**कंटाळणें**–अ० त्रासणें, आळसणें.

**कंटाळा**–पु० त्रास, आळस, नाखुषी.

**कंठ**–(सं) पु० गळा. २ आवाज, स्वर.

**कंठणें**–उ०वि० कठिण–अगम्य–मार्ग जाणें, प्रसंग सोसणें.

**कंठमाधुर्य**–(सं) न०गोडगळा, स्वराची गोडी.

**कंठस्थान**–(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष, अ–आ–क वर्ग आणि ह यांचें स्थान.

**कंठस्नान**–(सं) न० गळ्याखालचें स्नान. २ गळा तोडणें.

**कंठा**–(सं) पु० गळ्यांत घालण्याचा एक दागिना.

**कंठाळ**–स्त्री० मोठी पडशी, गोणी.

**कंठी**–(सं) स्त्री० ( कंठा पहा. )

**कंड**–(सं) स्त्री० कंडू, खाज, आग, खरुज.

**कंडू**–(सं) स्त्री० ( कंड पहा. )

**कंडन**–ण–(सं) न० कांडणें, कुटणें.

**कंथा**–(सं) स्त्री० गोधडी.

**कंद**–(सं) पु० कांदा.

**कंदन**–(सं) न० युद्ध, कत्तल.

**कंदर्प**–(सं) पु० काम, मदन. २ कांदा.

**कंदरा**–(सं) स्त्री० गुहा, गुंफा, लेणें.

**कंदी**–वि० उदी, तपकिरी.

**कंदील**–पु० दिवा, फाणस.

**कंदुक**–(सं) पु० चेंडू.

**कंप**–(सं) पु० कांप, हाल, हेलकावे.

**कंपवायु**–(सं) कांपरें, ज्यापासून कंप भरतो तो वायु.

**कंबर**–स्त्री० कटि, कमर, शरीरमध्य.

**कंबल**–स्त्री० घाबळी, कांबळी, घोंगडी.

**कंवची**–(सं) स्त्री० कवटी, करवंटी.

**कंवटाळणें**–अ० भेटणें. आलिंगन देणें.

**कंवठ**–(सं) न० कपित्थ. २ अंडें.

**कंवडल**–न० कडू वृंदावन.

**कंस**–(सं) पु० वर्तुळाचा भाग. २ कृष्णाच्या मामाचें नांव. ३ ही ( ) खूण.

## ख.

**ख्याति**–(सं) स्त्री० कीर्ति, नांव, लौकिक.
**ख्याल**–(फा) पु० पद्यविशेष. २ लक्ष, ध्यान.
**ख्याली**–(फा) वि० खुशाली, आनंदी, गमती. २ ख्याल गाणारा.
**ख**–(सं) न० आकाश पोकळी, अवकाश.
**खग्रास**–(सं) वि० पूर्णग्रस्त. २ नायनाट, अगदीं लोप.
**खग**–(सं) पु० पक्षी, पांखरूं.
**खगोल**–(सं)पु० तार्‍यांचें वर्तुळ. २ खगोलविद्या, ज्योतिष.
**खच्ची**–स्त्री० तोडणी, तोड, तोडणें, दुखवणें.
**खच्चीत**–(सं) क्रि० खरोखरी, अगदीं खरें, निश्चयेंकरून.
**खचणें**–अ० कमती होणें, नाहींसा होणें. २ स० कोंदणें, भरणें.
**खचित**–क्रि० खरोखर, निश्चयानें.
**खजाना–खजीना**–(फा) पु० भांडारखाना.
**खजाळ**–वि० द्वाड, व्रात्य, कुचोद्य.
**खजाळी**–स्त्री० चेष्टा, कुचाळी, थट्टा, भांडण.
**खजील**–वि० ओशाळा, शरमलेला, वरमलेला.
**खजुरी**–(सं) स्त्री० खर्जूरी, वृक्षविशेष.
**खजूर**–(सं) पु० खजूरीचीं फळें.
**खट्टू**–वि० निराश, खजील, ओशाळा.
**खटचाळ**–वि० द्वाड, व्रात्य, दुष्ट, भांडकुदळ.
**खट**–न० दुःख, जखम, शरीरास पडलेली भेग, क्षत. २ वि० द्वाड.
**खटखट**–स्त्री० पिरपीर, अडचण, त्रास, खटराक, रडगाणें.
**खटपट**–स्त्री० त्रास, उद्योग, यत्न, खटाटोप.
**खटला**–पु० मुकद्दमा, काम. २ कुटुंब.
**खटारा**–पु० बैलगाडी.
**खटास**–स्त्री० खटाई, आंबटपणा.
**खटूं**–न० जोडवें निघूं नये याकरितां बोटांत घालण्याचा दागिना वेढें.
**खड्ग**–(सं) न० तलवार.
**खड्डा**–पु० खाडा, खळगा, खोलगा, खबदाड.
**खड**–न० गवत, घास, चारा.
**खडक**–पु० पथ्थर, दगड, पाषाण. २ वि० पूर्ण वाळलेला.
**खडकणें**–अ० रचणें, लावणें. व्यवस्थेनें ठेवणें. २ वाळणें, सुकणें.
**खडकावणें**–स० रागें भरणें, खरड काढणें.
**खडखडणें**–अ० शब्द होणें, वाजणें.
**खडखडीत**–वि० वाळलेला, शुष्क, कठिण.
**खडतर**–वि० कठिण, त्रासदायक, अवघड.
**खडसणी**–स्त्री० तासणी, कापणी.
**खडसणें**–तोडणें, खच्ची करणें.
**खडा**–पु० लहान दगड. २ हलकें रत्न. ३ वि० उभा.
**खडावा**–स्त्री० पादुका.
**खडीसाखर**–स्त्री० मिश्री, खड्यांची साखर.
**खडू**–पु० चुनाविशेष, शाडू, पांढरी माती.
**खडेघाट**–पु० साधा घाट, भपका. २ वि० सफेत, लख्ख.
**खण**–पु० खाना, हिस्सा, पेटी वगैरेचा भाग. २ साडे तीन हात जागा. ३ एकोणीस तसू लांबीचा चोळी शिवण्याचा कपडा.
**खणणें**–(सं) स० उकरणें, वर काढणें, खोदणें.
**खणाळें**–न० दहा खणांचा कापडाचा तुकडा, खंडाळें.
**खत**–(आ) न० पत्र, रोखा, दस्तऐवज. २ क्षत.
**खतावणी**–स्त्री० नोंदण्याचें बुक. २ सुताराचें हत्यारविशेष.
**खद्योत**–(सं) स्त्री० काजवा.
**खदखदां**–क्रि० मोठ्यानें.
**खनि**–(सं) स्त्री० खाणी, खाण, भांडार.
**खप्पड**–वि० जुनें, म्हातारें, पुराणें.
**खप्पी**–वि० वस्ताद, लुच्चा, हुषार, कामसाधू.

**खप**–पु० विक्रय, विक्री. २ उपयोग.
**खपणें**–अ० विकलें जाणें. २ श्रम करणें.
**खपरेल**–न० कवलारू घर.
**खपला**–पु० गहूंविशेष.
**खपली**–स्त्री० धपली,पापडी, पापोद्रा,त्वचा.
**खफा**–प्पा–(फा) वि० नाखुष, विरस, दुर्लक्षाचें.
**खबर**–(आ) स्त्री० हकीकत, बातमी, माहिती, वर्तमान.
**खबूतर**–(फा) न० कबूतर, पारवा.
**खमंग**–वि० स्वादिष्ट, चवदार, रुचकर. २ खप्पी.
**खर्च**–(फा) पु० व्यय, खरची.
**खर्चणें**–(फा) उ० वि० खर्च होणें–करणें, उधळणें, संपविणें.
**खर्चिक**–वि०खर्चणारा,पुष्कळ खर्च करणारा.
**खर्व**–(सं) वि० संख्याविशेष.
**खर्वस**–पु० आटविलेला गाई म्हशी इत्यादींचा चीक.
**खर**–(सं) पु० गद्धा, गधडा, गाढव. २ अपक्ववीर्य. ३वि० तीक्ष्ण, प्रखर. ४ कोळशांची धूळ. ५ लवकरच वांटे जाणारी धातु.
**खरकटणें**–स० जाडेंभरडें वांटणें. २ निष्काळजीपणानें लिहिणें.
**खरकटें**–न० निर्लेप नव्हे असें अन्न. २ उष्टें. ३ अर्धेंबोबडें व पुरें न झालेलें काम.
**खरखरीत**–वि० खडबडीत, कांटेदार, मऊ नसलेलें.
**खरंगटणें**–स० जाडेंभरडें वांटणें.
**खरडणें**–स० वेडेंवांकडें लिहिणें, रेघाटणें. २ तासणें.
**खरडा**–पु०लिहिलेला कागद. २ मसूदा.
**खरणें**–अ० वीर्यपात होणें, धातु जाणें.
**खरपुडी**–स्त्री० ( **खपली** पहा. ) २ लागलेल्या भाताचा पापुद्रा.
**खरपूस**–वि०खमंग, हवातसा, योग्य, पक्का.
**खरबूज**–(फा) न० फळविशेष, चिबुड.
**खरमरीत**–वि० तीक्ष्ण, जलाल, तिखटसा, चरचरीत.
**खरवड**–स्त्री० दूध तापविण्याच्या भांड्यास धरलेली खरपुडी. २ वाईट मनुष्य.
**खरवड काढणें**–अ० पच्ची करणें.
**खरा**–वि० सत्य, बरावर, चांगला.
**खराटा**–पु० हिरांची केरसुणी, झाडू.
**खराब**–(आ) वि० वाईट, व्यर्थ, दुष्ट.
**खरारा**–पु० घोडा खाजविण्याचें हत्यार.
**खरिदी**–**खरेदी**–(फा) स्त्री० सौदा, विकत घेणें.
**खरीप**–फ–(आ) पु० शरदृतूंतील पीक.
**खरूज**–(सं) स्त्री० खुजली, खाज, कंडू.
**खल्लक**–वि० रंक, निर्द्रव्य, बोडेफकीर, कफल्लक.
**खल्लड**–वि० हलका, दुर्बळ, दुबळा,अशक्त.
**खल**–(सं) पु० हम्मन, खलावयाचें दगडाचें किंवा धातूचें पात्र. २ वि० दुष्ट, नीच.
**खलणें**–(सं) स० खलांत घालून बारिक करणें, वांटणें.
**खलबत्ता**–पु०हम्मनदस्ता,खल आणि बत्ता.
**खलास**–(आ) वि० संपूर्ण, पूर्ण, समाप्त.
**खलिता**–(आ) स्त्री० पिशवी, अर्ज्या अथवा पत्रें घातलेला रेशमी लिफाफा.
**खलिपा**–(आ) पु० वस्ताद, जाणता, ज्ञानी.
**खवखव**–स्त्री० खाज, आग, मस्ती, इच्छा.
**खवडा**–पु० डोक्यांतला फोड.
**खवडा उडविणें**–अ०पच्ची करणें, खरड काढणें.
**खवडाळणें**–अ० भांडण काढणें.
**खवणी**–स्त्री० खवण्याचें हत्यार–साधन.
**खवणें**–स० खवणीनें गीर काढणें.
**खवला**–पु० डाग, पट्टा. २ कवची.

**खवळणें**–स० अ०आधण येणें. २ रागावणें.
**खवा**–पु० मावा, दुधांतील पातळपणा नाहींसा केल्यावर जो पदार्थ होतो तो.
**खवाटा**–पु० खांदा, मुंढा, खंधा, स्कंध.
**खवीस**–(आ) वि० दुष्ट प्राणी, खष्ट, द्वाड. २ भूत, खैस.
**खस्ता**–स्त्री० काळजी, कष्ट, श्रम.
**खसखस**–स्त्री० आफूचें बीं.
**खसाखसा**–क्रि० वस्सकरशी, खसकन.
**खळ**–(सं) पु० नीच मनुष्य, दुष्ट. २ बद. ३ चिकटाविण्याकरितां किंवा पांजणाकरितां चिंचोके किंवा पीठ यांचा केलेला पदार्थ.
**खळखळ**–स्त्री० घासाघीस. २ वाहत्या पाण्याच्या आवाजाचें अनुकरण.
**खळगा**–पु० खड्डा, खाडा, खोलगा, डबरा.
**खळमळ**–पु० स्त्री० मैल, कचरा, घाण.
**खळें**–(सं) न० स्त्री० धान्याच्या मळणीकरितां केलेली जागा.
**खाऊ**–पु० गोड पदार्थ, खाण्याची वस्तू.
**खाक–खांक**–(सं) स्त्री० काख, कक्षा. २ राख, भस्म.
**खाकरणें**–न० खंकारणें.
**खाकरा**–पु० तोंडांतून आलेला शेंबूड-कफ.
**खाखा**–स्त्री० आग, अतिशय भूक.
**खाच–खांच**–( **खळगा** पहा. )
**खाज**–(सं) स्त्री० खरूज, खाजविण्याची इच्छा. २ आग, किडा, गुदगुद.
**खाजविणें**–(सं) स० नखानें चोळणें. २ त्रास देणें, नाक खाजवणें.
**खाजाळू**–वि० खुमखुमदार, खाजदार.
**खाजाळूं**–न० अळूंविशेष.
**खाजें**–न० खाऊ, भक्षण्याचे पदार्थ, मिठाई.
**खाट**–(सं) स्त्री० बाज, खटिया, माचा, बाजलें, खाटलें.
**खाटिक–खाटकी**–(सं) पु० कसाब, कसई.
**खाडा**–पु० खड्डा, खळगा. २ नागा, गोता, गैरहजिरी.
**खाडी**–स्त्री० ज्या खड्ड्यांत समुद्राचें पाणी भरतें तो भाग.
**खाडू**–वि० वामनमूर्ति, बिनमिशांचा, खुजा.
**खाण**–(सं) स्त्री० खनि, खड्डा, खळगा. २ उत्पत्तिस्थान.
**खाणावळ**–स्त्री० मिसी, भोजनगृह.
**खाणें**–स० गिळणें, जेवणें, भक्षणें. २ न० अन्न.
**खातर**–(आ) स्त्री० फिकिर, पर्वा. २ मान.
**खातरजमा**–(फा) स्त्री० खातरी, विश्वास. २ गुमान, हिशोब.
**खातें**–न० नोंद. २ नोंदण्याची वही. ३ शाखा, भाग. ४ श० पैकीं.
**खाद्य**–(सं) न० खाणें, खाना, खाण्याचा पदार्थ. २ वि० खाण्यायोग्य.
**खाद**–स्त्री० खाणें. २ न० खत.
**खादाड**–वि० अघाशी, भस्मरोगी, अति खाणारा.
**खादी**–स्त्री० जाड कापड, स्वदेशी कापड.
**खादीचा**–वि० खाद्दाप्यालेला.
**खानगी**–वि० खाजगत, स्वतःचें.
**खानदान**–(फा) वि०मोठ्या कुळांतला, चांगले घराण्यांतला, लौकिकाचा.
**खाना**–(फा) पु० खण. २ जागा. ३ खाद्य.
**खानेसुमारी**–(फा) स्त्री० मनुष्यगणती.
**खाप**–स्त्री० फाक, तुकडा, भाग.
**खापऱ्याचोर**–वि० हलक्या चोऱ्या करणारा, क्षुल्लक चोर, उचल्या, भामट्या.
**खापर**–(सं) न० खापरी, मडक्याचा तुकडा. २ अभिश्राप, अपेश.
**खापरतोंड्या**–वि० दुर्दैवी, कमनशिबी.
**खापरपणजा**–पु० आज्याचा आजा, पणज्याचा बाप.

**खाबू**–वि० खादाड, खाणारा, अधाशी.
**खामखां**–(फा) क्रि० व्यर्थ, उगीच, विनाकारण.
**खामी**–(फा) स्त्री० कमतरता, कमताई.
**खायखाय**–स्त्री० खाखा, गुर्मी, मस्ती, गर्व.
**खार**–(सं) पु० क्षार. २ स्त्री० खडी, चिपकोली. ३ नुकसान. ४ बादलाची हवा.
**खारणें**–अ० क्षार होणें—येणें. खारट होणें.
**खारवा**–पु० तारवावरचा मनुष्य. २ लाल खादी.
**खारीक**–स्त्री० खर्जूरिका, वाळलेला खजूर.
**खालवणें–खालावणें**–अ० दारिद्य येणें, गरीब दशेंत येणें.
**खालवर**–क्रि० वर खालीं, उलट सुलट.
**खालसा**–(आ) वि० खाली केलेला, रिकामा.
**खाली–लीं**–वि० खालसा, रिकामा, खालतीं, व्यर्थ. २ श० अधोभागीं.
**खालील**–वि० खालोखाल, खालचा.
**खावंद**–(फा) पु० धनी, सरकार, मुखत्यार.
**खाशी**–(आ) के० शाबास, वाहवा, भले.
**खाष्ट**–वि० खट्ट, द्वाड, दुष्ट, विघ्नसंतोषी.
**खास**–(आ) क्रि० खात्रीनें, खरोखर, खरें, सत्य. २ खुद्द, स्वतः.
**खासगत**–(आ) वि० खाजगत, स्वतःचा, मालकीचा.
**खासगीवाला**–पु० खाजगी काम पहाणारा.
**खासडा**–पु० जोडा, जूता, खेटर, पायपोस.
**खासदार**–पु० खाजगीचा शिपाई, घोडा खाजविणारा.
**खासा**–(आ) वि० मुख्य, चांगला, वाजवी.
**खांचर**–न० भाताचें शेत, भातजमीन.
**खांड**–(सं) न० खंड, साखर. २ भेग, तुकडा.
**खांडणें**–(सं) स० कांडणें, बारीक करणें, सडणें, तुकडे करणें.
**खांडवी**–स्त्री० खांडपोळी, पक्कान्नविशेष.
**खांडूक**–न० गळूं, उठाणूं, बेंड.
**खांद**–(सं) पु० फांदी. २ बाहुटा, मुंढा, खांदा.
**खांदा**–(सं) पु० खांद, स्कंध.
**खांदी**–(सं) स्त्री० शाखा, फांदी.
**खांब**–(सं) पु० स्तंभ, उभा लांकडाचा आधार, खंबा.
**खांसी**–स्त्री० खोकला, कफ.
**खिचडा–डी**–पु० स्त्री० मिसळ, मिश्रण. २ एके ठिकाणीं असलेले डाळतांदूळ.
**खिजणें**–अ० चिडणें, रागावणें, वाईट वाटणें.
**खिजमत**–(फा) स्त्री० तैनात, खातरबरदास्त, खिदमत, नोकरी, खिसमत.
**खिडकी**–स्त्री० बारी, जाळी, लहान दरवाजा, झरोका, गवाक्ष.
**खिन्न**–(सं) वि० दुःखी, नाखुष, मलूल.
**खिरापत**–(फा) स्त्री० प्रसाद, नैवेद्य.
**खिलाडी–डू**–पु० खेळणारा, खेळ जाणता.
**खिलारी–खिल्लारी**–पु० खिल्लार ठेवणारा, धनगर, गौळी, गुरें विकणारा, लमाण. २ बैलांची एक जात.
**खिसगणती**–स्त्री० काळजी, फिकीर, खातरजमा, तमा.
**खिसा**–(फा) पु० कसा, कप्पा.
**खिसेकाप्या**–पु० खिसे कापणारा, खिसेकातऱ्या–रू, भामट्या.
**खिळखिळा**–वि० हलणारा, पोकळ, आधाररहित, डगमगणारा.
**खिळणें**–अ० चिकटणें, पक्का होणें, बळकट बसणें. २ स० खिळ्यानें पक्का करणें, खिळा मारणें.
**खिळा**–(सं) पु० लोखंडाची खुंटी, कुणी, अट, मोठी चूक, खीळ.
**खीर**–(सं) स्त्री० पक्कान्नविशेष.
**खिंड**–स्त्री० डोंगरांतील तुटका भाग, दरी.

**खिंडार**–न० मोठा भोसका, खिंड.
**खुजट**(सं)–वि० खाडू, लहानसा, खुजा, ठेंगणा.
**खुजा**–(सं) वि० ठेंगणा, वामनमूर्ति.
**खुटणें**–(सं) अ० बदलणें, बंद होणें, खुंटणें, अडणें. २ स० तोडणें.
**खुटुरुटु**–क्रि० सावकाश, आस्ते आस्ते, हळू हळू.
**खुडखुडी**–स्त्री० थंडी, गारवा, कांपरें, कुडकुडी.
**खुडणें**–स० तोडणें.
**खुडूक**–वि० निराश्रित, वाळलेला, वाळका.
**खुणा**–स्त्री० खूण, पत्ता, चिन्ह.
**खुणावणें**–स० चिन्ह करणें, चिन्हांनीं समजावणें.
**खुद्द**–(फा) वि० स्वतः, खास, आपण, जातीनें.
**खुदावंत**–(आ) पु० महाराज, प्रभू.
**खुनस**–पु० आकस, द्वेष, आग्रह, आंतल्या आंत असणारा संताप.
**खुनशी**–वि० कुढा, कुढणारा. २ द्वेषी.
**खुनी**–(फा) वि० खून करणारा.
**खुपणें**–अ० टोंचणें, लागणें, बोंचणें, भासणें, सलणें.
**खुपऱ्या**–स्त्री० डोळ्यांचा रोगविशेष.
**खुपसणें**–स० ढकलणें, जोरानें घालणें, दडपणें.
**खुबसूरत**–(फा) वि० सुरेख, सुरूप, छानदार.
**खुबा**–पु० कुल्यांचा सांधा.
**खुबी**–(फा) स्त्री० चलाखी, हातोटी, युक्ति.
**खुमारी**–(आ) स्त्री० लज्जत, खुमास, स्वाद.
**खुर्दा**–(फा) पु० पैसा, लहान नाणें, तुकडे.
**खुरची**–(आ) स्त्री० चौकी, खुरशी, बैठक. २ आसनविशेष.
**खुरटणें**–अ० कमती होणें, खुजटणें, वाढ कमी होणें.
**खुरडणें**–अ० फरपटणें, खुरडत-खुरडत जाणें, सरपटणें.
**खुरपणें**–स० गवत काढणें.
**खुरपें**–न० खुरपावयाचें हत्यार.
**खुरवान–ण**–(आ) क्रि० बहाल, बक्षिस.
**खुरमुंडी**–स्त्री० बैठकविशेष, गुडघ्यांत डोकें घालणें.
**खुराक**–(फा) पु० रतीब, चाट, खाणें.
**खुलणें**–अ० फुलणें, उमलणें, सतेज होणें–दिसणें.
**खुश–खुष**–(फा) वि० राजी, प्रसन्न, आनंदित.
**खुशामत**–(फा) स्त्री० हांजी हांजी, स्तुति, आर्जव.
**खुष्क**–(फा) वि० वाळलेला कोरडा, शुष्क, खडखडीत.
**खुष्की–खुषकी**–(फा) वि० जमिनीचा मार्ग.
**खुषमस्कऱ्या**–(फा) पु० मर्जीतला हुजऱ्या, मस्कऱ्या, यजमानाची मर्जी खुष होईल असें बोलणारा.
**खुस्पट–खुसपट**–न० भांडणाचें कारण.
**खुळचोंट**–वि० वेडा, बेवकूब.
**खुळा**–वि० मूर्ख, दिवाणा.
**खुर**–(सं) पु० पाय, जनावराची तंगडी. २ पलंग इत्यादींचे पाय.
**खुंट**–पु० चवाटा. २ केळीचा रोपा. ३ हजामतींतून राहिलेले केस. ४ भाग, हिस्सा.
**खुंटा**–पु० खुंटी, जात्याचें लांकूड, दांडकें.
**खूळ**–न० वेड, नाद, छंद, फंद.
**खूणखाण**–स्त्री० ओळखदेख, पत्ता, संबंध, मागमूस.
**खून**–(फा) पु० ठार मारणें, हत्या, हिंसा.
**खूप**–(फा) वि० बहुत, पुष्कळ, फार. २ खुपण्याची स्थिति.
**खूब**–(फा) वि० पुष्कळ, फार.
**खेटर–खेंटर**–न० जोड्याचे तळ, जोडा, पायपोस.
**खेडें**–न० लहान गांव, खेडेपाडें, गांवढें गांव.

**खेती**–स्त्री० शेती, शेतकी, कृषिकर्म.
**खेद**–(सं) पु० दुःख, वाईट वाटणें.
**खेप**–स्त्री० वारी, बारी, वेळ, चक्कर.
**खेरीज**–(आ) निराळा, शिवाय.
**खेळ**–(सं) पु० वेळ घालविण्याचें साधन, क्रीडा. २ डाव, खेळण्याचे जिन्नस. ३ नाटक इत्यादींचा प्रयोग.
**खेळणी**–स्त्री० गमणें, टंगळमंगळ.
**खेळणें**–(सं) अ० वेळ घालविणें, गमणें, क्रीडा करणें. २ न० खेळण्याचा जिन्नस.
**खेंचणें**–स० ओढणें, खेंचून धरणें, हिसकावणें.
**खेंचर**–(फा) न० जनावरविशेष, गाढव व घोडें यांपासून झालेलें जनावर.
**खैर**–पु० झाडविशेष. २ (फा०) चांगलें, समाधान, संतोष. ३ के०.बरें, चिंता नाहीं.
**खैरभट**–दांडगा, अतिशय बळकट.
**खैरात**–(फा) स्त्री० धर्म, दान.
**खैरी**–स्त्री० मस्ती, लबाडी, गुर्मी.
**खोकड**–न० कोल्ह्याच्या जातीचें एक जनावर.
**खोकला**–पु० खांसी, कास.
**खोगीर**–(फा) न० घोड्याचें जीन, पलाण.
**खोगीरभरती**–स्त्री० व्यर्थ भरती, बाजारबुणगे.
**खोजा**–(फा) पु० मुसलमानविशेष. २ नपुंसक, गांडू.
**खोट**–स्त्री० नुकसान, आंतबट्टा.
**खोटें**–वि० असत्य, लबाड.
**खोड**–स्त्री० संवय, अभ्यास, दुर्गुण, आदत. २ पु० झाडाचा बुंधा. ३ चंदनादिकाचा तुकडा.
**खोडणें**–स० काढून टाकणें, हरताळ लावणें, खराब करणें.
**खोत**–पु० गांवचा मुखत्यार.
**खोती**–स्त्री० मक्ता, ठेका. २ गांवची मुखत्यारी.
**खोदणें**–उ० वि० उकरणें, कोरणें, खणणें.
**खोप**–**खोपट**–स्त्री० झोंपडी, छप्पर.
**खोपा**–पु० बुचडा, वेणीची गुंडाळी.
**खोबरें**–न० नारळांतील मगज–गाभा.
**खोरें**–न० माती काढण्याचें हत्यार, फावडें.
**खोल**–वि० खोलगट, ओंड.
**खोलणें**–स० खुला करणें, मोकळा करणें, उघडणें.
**खोली**–स्त्री० कोठडी, जागा. २ ओंडी.
**खोळंबणें**–अ० थांबणें, बंद होणें.
**खोंक**–**खोक**–स्त्री० डोक्याची जखम.
**खोंकणें**–अ० खंकारणें, खाकरणें, खोकण्याची क्रिया.
**खोंगा**–पु० पसा.
**खोंच**–स्त्री० ( **खोंक** पहा. ) २ खुबी.
**खोंचणें**–स० बोंचणें, जोरानें खुपसणें, टोंचणें.
**खोंट**–स्त्री० पायाचा पोटरी खालील भाग.
**खोंड**–पु० पोळ, पोठिया, आंडिल, वसु.
**खंक**–पु० उघळ्या, दरिद्री, गरीब, बोन्या.
**खंकारणें**–अ० खोकणें, घशांतला कफ काढणें.
**खंगणें**–अ० अशक्त होणें, नाताकद होणें, कमती होणें.
**खंगाळणें**–(फा) अ० विसळणें, पाण्यानें साफ धुणें, साफ करणें.
**खंजिरी**–(फा) स्त्री० वाद्यविशेष, एक प्रकारचा डफ.
**खंजीर**–(फा) पु० शस्त्रविशेष.
**खंड**–(सं) न० भाग, तुकडा, हिस्सा. २ साखर. ३ देशसमुच्चय.
**खंडन**–(सं) न० मोडून टाकणें मोडणें, थांबविणें. २ विरुद्ध टीका.
**खंडणी**–(सं) स्त्री० कर, वसूल, हाशील.
**खंडी**–स्त्री० वीस मणांचें एक माप. २ वीस, कोडी.
**खंत**–स्त्री० चीड, किळस. २ उत्कंठा.

**खंती**–स्त्री० धास्ती. २ पस्तावा.

**खंदक**–(फा) पु० किल्ल्याभोंवतीं पाणी राखण्याकरितां खटलेला चर.

**खंदा**–(फा) वि० पक्का, भयंकर, रानटी, तयार, खमक्या.

**खंबीर**–वि० मजबूत, बळकट, टिकाऊ, खमक्या.

**खंवट–खंवचट**–वि० वाईट, नासलेला, आंबूस झालेला.

---

## ग.

**ग्रंथ**–(सं) पु० जोड, पोथी, पुस्तक.

**ग्रंथि**–(सं) स्त्री० ग्रंथिका, गांठ.

**ग्रस्त**–(सं) वि० ग्रासलेला, व्यापलेला. २ खाल्लेला.

**ग्रह**–(सं) पु० तारा. २ खाष्ट मनुष्य. ३मत.

**ग्रहण**–(सं) न० गिराण, गिरा. २ स्वीकार, अंगीकार, घेणें.

**ग्रहणी**–(सं) स्त्री० संग्रहणी.

**ग्राम्य**–(सं) वि० गांवढळ, प्राकृत.

**ग्राम**–(सं) पु० गांव, खेडें. २ सप्तस्वरांची कांहीं एक रचना. ३ समूह.

**ग्रामण्य**–(सं) न० बहिष्कार, वाळीत, वाळ.

**ग्रास**–(सं) पु० घास, तोंड भरून कोणचाही पदार्थ, निवाला.

**ग्राह्य**–(सं) वि० घेण्याजोगें.

**ग्रीवा**–(सं) स्त्री० मान, गळा, कंठ.

**ग्रीष्म**–(सं) वसंत व वर्षा यांच्या मधील ऋतु, ज्येष्ठ व आषाढ ह्या महिन्यांतला काळ.

**ग्लानि**–(सं) स्त्री० मलूलपणा, शिथिलपणा, म्लानता.

**ग्वाही**–(फा) स्त्री० शाहिदि, साक्षी.

**ग**–पु० तिसरें व्यंजन. २ गर्व. ३ जाणारे.

**गई**–स्त्री० झालेली. २ गय, हयगय, क्षमा.

**गगन**–(सं) न० आकाश, आभाळ.

**गच्च**–वि० आंवळलेला, न सुटेसा, घट्ट, बळकट.

**गच्ची**–स्त्री० चुन्याची जमीन, आगाशी, सौध.

**गच्छंती**–(सं) स्त्री० त्रेधा, दुर्दशा, फजिती.

**गचकळी**–स्त्री० गटांगळी, डुबकी.

**गचका**–पु० धक्का, थप्पड, थाप.

**गचांडी**–स्त्री० अर्धचंद्र, धक्का, मान धरून ढकलणें.

**गचाळ**–वि० रेम्याडोक्या, द, अकलेचा खंदक, रड्या.

**गज**–(सं) पु० हत्ती, नाग. २ कापड इत्यादि मोजण्याचें माप, १४ तसू.

**गजकर्ण**–(सं) एक प्रकारचा त्वग्रोग.

**गजब**–(आ) पु० जुलूम, जबरदस्ती.

**गजर**–(सं) पु० वाद्यांचा आवाज, घोष.

**गजरा**–पु० पुष्पांची लहानशी माळ, पुष्पकंकण.

**गजवदन–गजानन**–(सं) पु० गणपति.

**गट्ट करणें**–स० तोंडांत टाकणें, बुडविणें, स्वाहा करणें, खाणें.

**गट्टी**–स्त्री० मैत्री, स्नेह, सख्य.

**गट्टू**–वि० मजबूत, लहान, बळकट.

**गट**–पु० रास, ढीग. २ विटा, पत्र (सुवर्ण इत्यादींचें.)

**गटकळी–गचकळी–गटंगळी–गटांगळी**–स्त्री० डुबकी, बुडणें.

**गठा**–पु० लाट. २ बोजा, गांठ, गांसडी.

**गठडी**–स्त्री० त्रेधा. २ गाठोडें. ३ पैसे.

**गड्डा**–पु० कांदा.

**गड्डी**–स्त्री० कांगदांचें एक परिमाण.

**गड**–पु० किल्ला, कोट, गढी.
**गडगडणें**–अ० मेघगर्जना होणें.
**गडगनेर**–पुं० ( **केळवण** पहा. )
**गडणी**–स्त्री० मैत्रीण, मित्र, सखी.
**गडदु**–वि० लड्डु, गट्ट.
**गडप–ब**–वि० स्वाहा केलेलें, दडपलेलें.
**गडबड**–स्त्री० घोंटाळा, कोलाहल, गोंगाट.
**गडवा**–पु० तांब्या, पात्रविशेष.
**गडी**–पु० नोकर, चाकर. २ मित्र. ३ स्त्री० गड्डी, पेंढी.
**गडू**–पु० पात्रविशेष.
**गढी**–(सं) स्त्री० मर्यादेची भिंत, लहान कोट.
**गढूळ**–वि० कलुषित, पंकिल, मात्रट.
**गण**–(सं) पु० गडी, सभासद. २ ज्योतिषसंज्ञाविशेष. ३ प्रारंभ. ४ व्याकरण संज्ञाविशेष. ५ समूह. ६ शिवानुचर. ७ तीन अक्षरें किंवा चार मात्रा.
**गणक**–(सं) पु० ज्योतिषी.
**गणगोत**–न० आप्त,सोयरे,नातेवाईक,संबंधी.
**गणणें**–(सं)स० मोजणें,गणती करणें, मापणें.
**गणना**–(सं) स्त्री० गणती, माप, मोजदात.
**गणनाथ**–(सं) पु० गणपति, गणेश.
**गणनायक**–(सं) पु० गणपति.
**गणपति**–(सं) पु० गणेश.
**गणिका**–(सं) स्त्री० वेश्या, विश्वयोषिता, रांड, कसबीण.
**गणित**–(सं) न० गणती करण्याची विद्या, हिशेब.
**गत्यंतर**–(सं) न० इलाज, रस्ता, मार्ग.
**गत**–(सं) स्त्री० दशा. २ प्रकार. ३ गेलेलें.
**गति**–(सं) स्त्री० गमन. २ धांव, वेग.
**गद्य**–(सं) न० पद्येतर कविता, गाथा, गड्डलिका.
**गद्यपद्यात्मक**–(सं) वि० कविता व गाथा असलेला.
**गदळ**–न० घाण, कचरा, केर, रद्दी. २वि० गचाळ.
**गदा**–(सं) स्त्री० शस्त्रविशेष. २ धाड.
**गनीम**–(आ) पु० शत्रु,गलीम,लुच्चा मनुष्य.
**गप्प**–स्त्री० आफवा, आवई, भुमका.
**गप्पाष्टक**–न० व्यर्थ गोष्टी, निरुपयोगी गप्पा, चकाट्या.
**गप्पीदास**–पु० खोटें सांगणारा, लबाड, लाख्यापंचोत्री, थाप्या.
**गफलत**–(आ) स्त्री० चूक, हलगर्जीपणा, मौर्ख्य.
**गबदूल**–वि० लठ्ठ, आडव्या अंगाचा.
**गबर**–न० नाणेंविशेष. २ वि० श्रीमंत, पैसेवाला, मातबर, गब्बु.
**गबरू**–पु० गुणी, शहाणा मनुष्य, हुशार गृहस्थ.
**गभस्ति**–(सं) पु० सूर्य, भास्कर, प्रभाकर. २ किरण, कर.
**गम**–(आ) स्त्री० स्तब्धता, सौम्यता. २दुःख.
**गम खाणें**–अ० गय करणें, सोसून घेणें.
**गमक**–(सं) स्त्री० गायनशास्त्रसंज्ञाविशेष.
**गमजा**–स्त्री० थट्टा, गडबड, खाजवाखाजव.
**गमणें**–अ० आळसावर टाकणें, वेळ व्यर्थ घालविणें, रेंगाळणें. २ वाटणें. ३ करमणें.
**गमत–गम्मत**–स्त्री० मौज, करमणूक, मजा.
**गमन**–(सं) न० जाणें, प्रयाण,प्रवास,चक्कर.
**गयाळ**–वि० गचाळ, अजागळ.
**गर्क**–(आ) वि० तल्लीन झालेला, गढलेला.
**गर्जना**–(सं) स्त्री० मेघाचें ओरडणें, गडगडणें, सिंहाचें ओरडणें, सिंहनाद.
**गर्द**–(फा) क्रि० दाट, भिडलेलें, एकाशीं एक लागलेलें, निबिड.
**गर्दभ**–(सं) पु० गाढा, लंबकर्ण, गाढव.
**गर्दी**–(फा) स्त्री० दाटी, भीड, जमाव. २ गडबड, धांदल.

**गर्भ**–(सं) पु० गाभा, पोट, पोटचें, मध्य. २ गर्भाशयांतलें मूल.

**गर्भार**–वि० गरोदर, हमल, गाभण, सबर.

**गर्भाशय**–(सं) पु० गर्भ राहण्याची जागा, कूस.

**गर्भिणी**–(सं) वि० ( **गर्भार** पहा. )

**गर्व**–(सं) पु० अभिमान,अहंकार,मान,ताठा.

**गर**–(सं) पु० गरळ, जहर, विष. २ गीर.

**गरज**–(आ) स्त्री० जरूर, जरूरी, आवश्यकता, फर्ज.

**गरत**–(सं) वि० संभावित स्त्री, कुलवधू.

**गरदन**–(फा) स्त्री० मान, गळा.

**गरम**–(फा) वि० उष्ण, उन्हून,कढत, ऊन.

**गरमी**–(फा) स्त्री० उष्णता.२उपदंशविकार.

**गरा**–पु० फणसांतील गीर. २ रवा.

**गरिबाई–गरीबी**–(आ) स्त्री० दरिद्रता, भिकारपणा, दारिद्य.

**गरीब**–(आ) पु० दरिद्री, निर्धन, कफल्लक, बोऱ्या. २ सालस.

**गरुड**–(सं) पु० पक्षिविशेष, वार.

**गरोदर**–(सं) वि० गर्भार.

**गल्लत**–(आ) वि० अव्यवस्थित, चुकीचें. २ स्त्री० घोंटाळा, एकांत एक मिसळणें.

**गल्ला**–(फा) पु० धान्याचा कोठा, सांठा, दाणा. २ दुकानदारींत पैसे ठेवण्याची पेटी.

**गल्ली**–(फा) स्त्री० आळी, लहान वाट,बोळ, पोळ, शेरी, कुची.

**गलथा**–पु० ओटा, सज्या, कंगोरा.

**गलबत**–न० तारूं, जहाज.

**गलबला**–(आ) पु० कल्ला, आवाज,गलबा.

**गलिच्छ**–(आ) वि० घाणेरडा, मैला.

**गलीम**–(आ) पु० शत्रु, गनीम.

**गलूल–गलोल**–(फा) स्त्री० गोफणविशेष, खडे मारण्याचें साधन.

**गलेफ**–(फा) पु० अभ्रा, वेष्टन.

**गलेलठ्ठ**–वि० रानदांडगा, मजबूत,जोरदार.

**गव्हला कचरा**–पु० सुवासिक वनस्पतिविशेष.

**गव्हाण–णी**–(सं) स्त्री० गुरांस चारा घालण्याची नियमित जागा.

**गवई–गवय्या**–पु० गायक, गाणारा,गायनशास्त्र जाणता.

**गवगवा**–पु० बोभाट.

**गवत**–न० तृण, चारा, घास.

**गवसणी–गवासणी**–(सं) स्त्री० अभ्रा, आच्छादन, वेष्टन.

**गवसणें**–(सं) अ० सांपडणें, आढळणें, दिसून येणें.

**गवळी**–(सं) पु० दुधाचा व्यापारी, गौळी, अहीर.

**गवा**–पु० रानरेडा, एक प्रकारचें जनावर.

**गवाळें**–न० सामानसुमान, बोचकें बोजा. २ मुकटा वगैरेचें बासन.

**गवाक्ष**–(सं) न० हवा येण्याचें भोंक, बारी, खिडकी, जाळी, झरोका.

**गस्त**–(फा)स्त्री० पहारा, फिरणारे शिपायी.

**गस्तंगीर**–(फा) पु० हिंडणारा व्यापारी, फेरीवाला.

**गहजप–ब**–(फा) पु० गजब, जुलूम, जबरदस्ती. २ अनर्थ.

**गहन**–(सं) वि० कठिण, अवघड, त्रासदायक, समजण्यास काठिण. २ निबिड, गर्द, दाट.

**गहाण**–सं० मोबदला, तारण.

**गहिना**–पु० डागिना, भूषण, आभरण.

**गहिंवर**–पु० आनंदाश्रु, आनंदाचें भरतें, कंठ दाटणें, आनंदाचा किंवा दुःखाचा उमाळा.

**गहूं**–(सं)पु०कणक, बऊं, गोधूम,धान्यविशेष.

**गळ**–पु० लोखंडी आंकडा. २ भीड.
**गळका**–(सं) वि० गळणारा, फुटका.
**गळणी**–(सं) स्त्री० चाळण, गाळण.
**गळणें**–(सं) अ० सांडणें, निवणें, पाझरणें. २ थकणें.
**गळबंद**–पु० गळेबंद, गळपट्टा.
**गळसरी**–(सं) स्त्री० भूषणविशेष.
**गळा**–(सं) पु० कंठ. २ आवाज.
**गळाठणें**–अ० हरवणें. २ दमणें, थकणें.
**गळूं**–(सं) न० खांडूक, उठाणूं, बेंड.
**गा**–(सं) के० अगा, अरे.
**गाई**–(सं) स्त्री० गाय, गौ, गाऊ, गायत्री.
**गाकर**–पु० गव्हाची एक प्रकारची भाकर.
**गागणें**–अ० ओरडणें, जोरानें बोलणें.
**गाजणें**–(सं) अ० वाजणें, प्रसिद्धीस येणें, नांवाजणें.
**गाजरपारखी**–पु० मूर्ख, बेवकूब.
**गाजी**–(आ) पु० पराक्रमी पुरुष, योद्धा, लढवय्या, गबरू.
**गाडगें**–न० मडकें, मातीचें भांडें.
**गाडणें**–न० पुरणें, पुरून टाकणें.
**गाडा**–पु० खटारा, ओझ्याची गाडी, मोठी गाडी, लहान मुलांची गाडी.
**गाडी**–स्त्री० बगी, टांगा, छकडा, वाहन.
**गाढ**–(सं) वि० स्वस्थ, बिनघोर.
**गाढव**–पु ( **गर्दभ** पहा. )
**गाणें**–(सं) स० गायन करणें. २ न० गायन, गान, गीत, संगीत. ३ गाण्याची चीज, गीत, पद्य.
**गात्र**–(सं) न० अवयव, अंग.
**गात**–न० पलंगाचीं लांकडें, पलंगाची चौकट.
**गाथा**–(सं) पु० गड्डालिका, गद्य. २ स्त्री० आर्याछंद.
**गादी**–स्त्री० पथारी, बिछाना. २ राज्यासन, सिंहासन.
**गाफल-गाफिल**–(आ) वि० गैरसावध, निष्काळजी, बेसावध.
**गाफिली**–(फा) स्त्री० गैरसावधपणा.
**गाबडी**–स्त्री० लांकडांचें भोंक बंद होण्याकरितां मारतात ती खुंटी.
**गाभ**–(सं) पु० गर्भ, हमल. २ मध्य.
**गाभण**–(सं) वि० गर्भार, गरोदर, सबर.
**गाभा**–(सं) पु० मध्य, नार.
**गाभुळलेला**–वि० पाड लागलेला, पिठुळलेला.
**गाभूळ-गाभोळ**–(सं) वि० गाभुळलेला, पाड लागलेला.
**गाय**–(सं) स्त्री० गाई, धेनु.
**गायदुम-गायधूम**–वि० निमुळतें, बारीक होत गेलेलें.
**गायन**–(सं) न० गाणें, स्वर काढणें, गान.
**गार**–वि० थंड, सर्द. २ स्त्री० कुदरती बर्फ. ३ एक प्रकारचा दगड. ४ गर्ता, खांच.
**गारत-द**–(आ) वि० सफा केलेलें, नाहींसें केलेलें. २ स्त्री० लूट.
**गारदी**–पु० पायदळ, शिपाई, प्यादा.
**गारा**–पु० चिखल.
**गाराणें-गाऱ्हाणें**–न० तकरार, फिर्याद.
**गारुड**–(सं) न० इंद्रजाल, जादू.
**गारुडी**–(सं) पु० नजरबंद, जादूगार, ऐंद्रजालिक.
**गाल**–पु० गल्ल, कपोल, गालफड. २ भाषण.
**गालफड**–न० गाल, थोबाड.
**गालिचा**–(आ) पु० लोंकरीचें मोठें आसन.
**गाली**–(फा) स्त्री० शिवी, अपशब्द, दुःशब्द.
**गावणें**–(सं) अ० सांपडणें, आढळणें, माहीत होणें.
**गाशा**–(आ) पु० घोड्याच्या खोगरावर घालण्याची गादी. २ गांठोडें.
**गाशा गुंडाळणें**–अ० पळून जाणें, फरारी होणें.

**गाहाळ**–वि० हरवलेलें, नाहींसें झालेलें, गळाठलेलें.
**गाहाळणें**–अ० हरवणें, नायनाट होणें.
**गाळ**–पु० चवळ. २ चिखल. ३ बाकी–खराब–गचाळ अवशेष.
**गाळण**–स्त्री० धांदल, हातपाय मोडणें, घाबरगुंडी. २ चाळण.
**गाळणें**–स० शोधणें, चाळणें. २ गाळून टाकणें, काढून टाकणें, वगळणें. ३ न० गाळण्याचें फडकें वगैरे साधन.
**गाळा**–पु० व्यास, मध्य, अंतर. २ घाण.
**गाळीव**–(सं) वि० गाळलेलें. २ पक्का.
**गांजणूक**–स्त्री० गांजणी, जाचणी, जाचणूक, जाच, हाल.
**गांजणें**–उ० वि० जाच–हाल करणें.
**गांजा**–पु० भांगेच्या झाडाचे बूट.
**गांजेकस**–वि० गांजा ओढणारा.
**गांठ**–(सं) स्त्री० ग्रंथि. २ भेट.
**गांठणें–गांठविणें**–(सं) उ० वि० भेट घेणें, भेटणें. २ गुंतविणें. ३मागून येऊन बरोबरी करणें, येऊन मिळणें.
**गांठलें**–न० कंठभूषणविशेष.
**गांड**–स्त्री० बृहती, ढुंगण, पार्श्वभाग, हगण्याचें ठिकाण, गुह्य, गुदद्वार.
**गांडीव**–(सं) न० अर्जुनाच्या धनुष्याचें नांव.
**गांडीवधन्वा**–(सं) अर्जुन.
**गांडू**–पु० नपुंसक, क्लीब, षंढ, बोचू, तृतीयाप्रकृति.
**गांध**–स्त्री० कांहीं चावल्यानें येणारी सूज.
**गांधिलमाशी**–स्त्री० जी चावली असतां अंगावर गांध येते ती माशी.
**गांधी**–(सं) पु० सुगंधी, सुवासिक द्रव्यांचा व्यापारी.
**गांव**–(सं) पु० ग्राम, खेडें, गांवढें.
**गांवठी**–(सं) वि० गांवांत झालेला, देशी.
**गांवढळ**–(सं) वि० अडाणी, अविद्वान्, गचाळ.
**गांवढें**–(सं) न० गांवढें गांव, (**गांव पहा.**)
**गिचमिड**–स्त्री० एकांत एक मिसळ,घोंटाळा.
**गिड्डा**–वि० ठेंगु, खुजा, वामन मूर्ति.
**गिधड–गिधाड**–(सं) न० गृध्र, गीध.
**गिऱ्हाईक**–(सं) न० ग्राहक, विकत घेणारा मनुष्य.
**गिरकी–गिर्की**–स्त्री० फिरकी, फेरी. २ चक्कर, घेरी.
**गिरणी–ण**–स्त्री० सुताचें–कापड इत्यादींचें यंत्र.
**गिरदी**–(फा) स्त्री० वाटोळी उशी.
**गिरविणें**–(फा) उ० वि० वळविणें, हात फिरविणें.
**गिराण**–(सं) न० ग्रहण, गिरा.
**गिरि**–(सं) पु० पर्वत, डोंगर, पहाड.
**गिल्ला**–(फा) पु० बोभाटा, बोंब.
**गिलावा**–(फा) पु० सारखें लिंपण.
**गिंडी**–स्त्री० अति लहान गळ्याचें भांडें.
**गीत**–(सं) न० गाणें, गायन, पद्य. २ वि० गायलेलें.
**गीता**–(सं) स्त्री० अध्यात्मविषयक ग्रंथ.
**गीति**–(सं) स्त्री० जिच्या प्रथम आणि तृतीय चरणांत बारा व द्वितीय आणि चतुर्थ चरणांत अठरा मात्रा असतात अशी आर्या.
**गीर्वाण**–(सं) स्त्री०संस्कृत भाषा. २पु०देव.
**गुगुळ–गुग्गुळ**–(सं) पु० औषधविशेष.
**गुच्चा**–पु० ठुस्सा, बुक्का, बुकुंदा, गुद्दा.
**गुच्छ**–(सं) पु० झुबका, स्तबक.
**गुचकी**–स्त्री० उचकी.
**गुजगोष्ट**–(सं) स्त्री० गुप्तगोष्ट,गौप्य,रहस्य.
**गुजर**–(सं) पु० गुजराथेंतील रहाणारा. २ गुजारा, गुजराण.

**गुजरणें**–(फा) उ० वि० घालविणें, काढणें, होणें, गुदरणें.
**गुजरात–थ**–(सं) पु० गुर्जर देश.
**गुजराण**–(फा) स्त्री० गुजारा, निर्वाह.
**गुजरी**–स्त्री० पेठ, जुने कपडे वगैरे विकण्याचा बाजार, हलका बाजार. २ लुगड्यांतील एक जात.
**गुजारा**–पु० निर्वाह, उदर भरणें.
**गुजी**–स्त्री० कालवड, गाय, वासरी.
**गुटका**–(सं) पु० लहान गोळा, गोळी.
**गुठळी–गुठोळी**–स्त्री० गोळी, गोटी, गुटी.
**गुड–गुढ**–(सं) पु० गूळ.
**गुडगुडी**–(सं) स्त्री० तबाकू–गुडाखू–ओढण्याचें साधन, गुरगुडी, हुक्का.
**गुडघा**–पु० जानु, पोटऱ्या व मांड्या याच्या मधील अवयव.
**गुडघी**–पु० ज्यानें गुडघे धरतात तो रोग.
**गुडदी**–स्त्री० बुटणें, बूच, झांकण.
**गुढी**–स्त्री० आनंदाचें निशाण, वर्षप्रतिपदेस जें निशाण उभें करितात तें.
**गुण**–(सं) पु० उपयोग, कसब, लक्षण, धर्म.
**गुणक**–(सं) पु० गुणकांक, ज्यानें गुणावयाचें तो अंक.
**गुणगूण**–स्त्री० कुणकूण, बातमी. २ माशी किंवा चिलट उडतांना जो शब्द होतो तो.
**गुणगुणा**–पु० घोणा, नाकशीर.
**गुणणें**–(सं) स० गुणाकार करणें.
**गुणा–गुण्या**–पु० काटकोन बघण्याचें साधन, काटकोन.
**गुत्ता**–पु० दारू विकण्याचें दुकान, कलालाचें दुकान, रेंद.
**गुता–गुंता**–पु० अडथळा, अडचण. २ न० सूतक. ३ गुरफटणें, गुंतागुंत.
**गुद्दा–द्धा**–पु० ( गुच्चा पहा. )
**गुद**–(सं) न० गुदद्वार, गांड.
**गुदगुली**–स्त्री० एक प्रकारचा त्वचेचा विकार, खातखुतली.
**गुदमरणें**–अ० घाबरणें, जीव–दम कोंडणें.
**गुदरणें**–उ० वि० ( **गुजरणें** पहा ) बेतणें, प्रसंग येणें. २ अटकेंत–पहाऱ्यांत ठेवणें–नेणें–नेऊन पोंचविणें.
**गुदस्त**–(फा) वि० गेलें, मागील.
**गुन्हा**–(फा) पु० अपराध, तकशीर, चुकी.
**गुप्त**–(सं) वि० अप्रसिद्ध, गुपित, गूढ.
**गुप्ती**–(सं) स्त्री० गुप्त तरवार, काठींत वागविण्याची तरवार.
**गुबारा**–पु० दबा, दव्व होणें.
**गुमान**–(फा) स्त्री० फिकीर, तमा, पर्वा.
**गुमास्ता**–(फा) पु० मुखत्यार, मुनीम.
**गुरकणें**–अ० ओरडणें, आवाज करणें.
**गुरगुडी**–पु० ( **गुडगुडी** ) पहा.
**गुराखी**–(सं) पु० गोवारी, जांगळी.
**गुरु**–(सं) पु० शिक्षक, धर्मगुरु, आचार्य. २ बृहस्पति. ३ एक प्रकारचा रोग. ४ वि० मोठें, दीर्घ, श्रेष्ठ. ५ ज्याच्या दोन मात्रा गणल्या जातात असें.
**गुल्लेर**–(फा) पु० उंबर, फळविशेष.
**गुलकंद**–(फा) पु० गुलाबाच्या फुलांच्या पाकळ्यांचा मुरब्बा.
**गुलछबु**–(फा) पु० निशिगंध.
**गुलाब**–(फा) पु० फुलझाडविशेष.
**गुलाम**–(आ) पु० दासीपुत्र, विकत घेतलेला चाकर.
**गुलाल**–पु० आबाशाई रंगानें रंगविलेलें एक प्रकारचें पीठ.
**गुळवेल**–स्त्री० वनस्पतीविशेष.
**गुहा**–(सं) स्त्री० दरी, कंदरी, डोंगरांतील पोकळ जागा.
**गुळी**–स्त्री० नीळ, निळंबी. २ वि० गुळाच्या रंगाची.

**गुंग**–वि० गर्क. २ भ्रांत, बेशुद्ध, कैफ आलेला.
**गुंघणें**–अ० बेशुद्ध होणें, भ्रांति होणें.
**गुंगारा**–पु० थाप देऊन पळून जाणें.
**गुंजारव**–(सं) पु० भुंग्यांचें ओरडणें, गुणगुण.
**गुंडणें**–स० गुंडाळणें.
**गुंडा**–पु० वाटोळा–दोन पाठथऱ्यांमधला दगड. २ मोठी गुंडी.
**गुंडाळणें**–सं० वेटोळें–गुंडी करणें. २ आटोपणें.
**गुंडाळें**–न० वेटोळी–ळें.
**गुंतणें**–अ० फसणें, अडकणें. २ घोंटाळणें.
**गुंफणें**–(सं) उ० वि० गोफ करणें, विणणें, माळ करणें.
**गुंफा**–स्त्री० गुफा, गुहा.
**गू**–पु० विष्ठा, हग, मल.
**गूज**–(सं) न० गूढ पदार्थ, गुप्त गोष्ट.
**गूढ**–(सं) वि० गुप्त. २ न समजण्याजोगें.
**गूल**–पु० दिव्याचा कोळी. २ आगकाडीला लावलेला रांधा. ३ स्त्री० बातमी, खबर.
**गूळ**–पु० गुड.
**गृध्र**–(सं) पु० गिधाड, गीध.
**गृह**–(सं) न० घर, ठिकाण, राहण्याची जागा, गेह.
**गृहस्थ**–(सं) पु० मनुष्य, पुरुष, संभावित मनुष्य.
**गृहीत**–(सं) वि० घेतलेलें. २ कबूल.
**गे**–के० अगे, अग.
**गेरू**–पु० काव, मृत्तिकाविशेष.
**गेह**–(सं) न० ( गृह पहा. )
**गेंगणें**–अ० नाकांत बोलणें.
**गेंगाणा**–पु० नाकांत बोलणारा.
**गेंडा**–पु० एक प्रकारचें जनावर.
**गेंद**–पु० तुरा, गुच्छ.
**गैबी**–(आ) वि० गुप्त, अप्रसिद्ध.
**गैर**–(आ) वि० व्यर्थ, विनाकारण, अपकारक. २ ह्याचा उपसर्गासारखा उपयोग होतो तेव्हां याचा अर्थ–नाहीं, विपरीत–असा होतो; जसें:—गैरहजर, गैरसमज.
**गैरी**–(फा) वि० वाईट चालीचें, उनाड.
**गैहरा**–वि० पक्क दशेच्या रंगाचा.
**गो**–(सं) स्त्री० गाय. २ के० अगो, अग्गो, अगे, गे.
**गोक्रण**–(सं) स्त्री० गोकर्णीचा वेल. २ बोंडलें.
**गोकर्ण**–(सं) स्त्री० एक प्रकारचा वेल. २ स्थानाचें नांव.
**गोगलगाय**–स्त्री० एक सरपटणारा प्राणी.
**गोचडी–चेडी–चिड**–(सं) स्त्री० जीवविशेष. २ वि० लगट करणारा, चिकट, चिकटभेंडी.
**गोजिरवाणा**–वि० नाजूक, सुरेख.
**गोजिरा**–वि० गोजिरवाणा.
**गोजी**–स्त्री० गुजी, कालवड.
**गोट**–पु० बायकांचा एक प्रकारचा दागिना. २ तळ. ३ किनाऱ्याला फाटूं नये म्हणून दाल–नाडी–कातडें–इत्यादि शिवतात तें.
**गोटा**–पु० धोंडा, वाटोळा दगड. २ डाळींत सांपडणारा सबंध दाणा. ३ न फोडल्या नारळाचें वाळलेलें खोबरें.
**गोठणें**–अ० थिजणें, जमणें, घट्ट होणें.
**गोठा**–पु० गुरें बांधण्याची जागा.
**गोड**–वि० गुळचट, मधुर, स्वादिष्ट. २ सुंदर, मनोहर.
**गोण**–पु० कोथळा, बोरा, पोतें.
**गोत्र**–(सं) न० कुळ, घराणें.
**गोत**–(सं) न० नातें, गणगोत, आप्त.
**गोता**–पु० हिसका, फसणूक.
**गोधडी**–स्त्री० कंथा, जुन्या वस्त्रांचें पांघरूण.
**गोधूम**–(सं) पु० गहूं, कणक.
**गोप**–(सं) पु० गवळी.

**गोफ**-पु० सोन्याची! गळ्यांत घालण्याची सांखळी. २ रेशमाची किंवा सुताची अनेक पदरांची विणलेली दोरी.

**गोम**-स्त्री० खोड, अपराध. २ मर्म. ३ शतपदी, शंभर पायांचा सरपटणारा प्राणी.

**गोमय**-(सं) न० गाईचें शेण.

**गोमाजी कापशा**-पु० फलाणा, अमका.

**गोरा**-वि० पांढरा, स्वच्छ, गौरवर्ण.

**गोल**-(सं) वि० वाटोळा, वर्तुलाकार. २पु० वर्तुलाकृति पदार्थविशेष.

**गोलची**-स्त्री० गोल करण्याचें हत्यार.

**गोवर**-पु० रोगविशेष.

**गोष्ट**-(सं) स्त्री० कथा, हकीकत, हिकायत.

**गोसांवी**-(सं) पु० फकीर, बैरागी. २ हरदास, कीर्तन करणारा, बोआ.

**गोहो**-पु० दादला, नवरा.

**गोंगाट**-पु० ओरडा, कल्ला, आवाज.

**गोंजारणें**-उ० वि० कुरवाळणें, लाड करणें.

**गोंडस**-(सं) वि० छान, दिसण्यांत चांगला, डौलदार.

**गोंद**-पु० डीक.

**गोंदणें-धणें**-पु० टोंचून टोंचून शरीरावर रंग चढविणें.

**गोंधळ**-पु० घोंटाळा, गडबड, धामधूम. २ कुलधर्मविशेष.

**गोंधळणें**-अ० घाबरणें.

**गोंधळी**-पु० गोंधळ घालणारा. २ वि० गोरज, गोधूलिक.

**गोंवणें**-स० ओंवणें, अडकावणें.

**गोंवरी**-स्त्री० शेणी, रानशेणी, गवरी.

**गौड**-(सं) न० भारूड, ढोंग. २ बंगाली.

**गौडी**-(सं) स्त्री० गुळापासून होणारें मद्य.

**गौण**-(सं) वि० निर्वाहाचा, दुसऱ्या प्रतीचा.

**गौर**-(सं) वि० गोरा, सफेत. २ देवीची मूर्ति.

**गौरव**-(सं) न० महत्व, मोठेपणा, गुरुत्व.

**गौरविणें**-(सं) स० आदर करणें.

**गौरीशंकर**-(सं) पु० दोन मुखांचा चपटा व लांबोडा रुद्राक्ष.

**गौंडी**-पु० गवडी.

**गंगा**-(सं) स्त्री० भागीरथी, जान्हवी.

**गंगाजमनी**-(सं) वि० दोन तऱ्हेचा, मिसळीचा.

**गंगाजळी**-(सं) स्त्री० गंगोदक ठेवण्याचें भांडें. २संचयाचें भांडें, गुप्त खासगत धन.

**गंगावन**-न० वनगाईचे केस.

**गंगाळ-घंगाळ**-(सं) न० पात्रविशेष.

**गंगेरीपान**-न० विड्याचे पानाची एक जात आहे.

**गंज**-(फा) पु० ढीग. २ गंज. ३ विपुळता, रगाडी.

**गंजणें**-अ० जंग बसणें, खराब होणें, मळ चढणें.

**गंजिफा**-(फा) स्त्री० देशी पत्ते.

**गंड**-(सं) न० हत्तीचें डोकें. २ प्रत्ययविशेष. ३ ज्योतिषोक्त एक योग.

**गंडमाळा**-(सं) स्त्री० मानेस होणारा रोगविशेष.

**गंडस्थळ**-(सं) न० हत्तीच्या मस्तकावरील जागा, गंड.

**गंडा**-पु० मंतरलेला दोरा. २ चार कवड्या, चारांची गणती.

**गंडेरी**-स्त्री० उसाचे सोललेले करवे. २ एक प्रकारचा साडीचा पदर.

**गंध**-(सं) पु० वास. २ न० पाण्यांत उगाळलेला चंदन.

**गंधक**-(सं) पु० खनिज पदार्थविशेष.

**गंधर्व**-(सं) पु० देवयोनिविशेष. २ गायक, गवई.

**गंधी**-(सं) पु० सुगंधी, सुवासिक पदार्थ विकणारा.

**गंभीर**-(सं) वि० खोल, शांत, धैर्यवान्.

**गंवडी**–(सं) पु० रचाई काम करणारा.
**गंवार–गंव्हार**–वि० मूर्ख, बेवकूब, गाढव.

---

## घ.

**घ**–चौथें व्यंजन.
**घ्न**–(सं) वि० मारणारा, हत्याकरणारा; ह्याचा उपयोग शब्दाच्या शेवटीं समासांत होतो: जसें–शत्रुघ्न, कृतघ्न.
**घ्राण**–(सं) न० नाक, घ्राणेंद्रिय.
**घट्ट**–वि० दाट, जाड, एकाशींएक, घन, तंग, घण.
**घट**–(सं) पु० कुंभ, मडकें. २ वि० मजबूत.
**घटका**–(सं) स्त्री० घटिका, घटि.
**घटणें**–(सं) अ० कमती होणें. २ पक्का होणें.
**घटस्फोट**–(सं) पु० काडी मोडून घेणें–देणें, नवराबायकोची फारकत.
**घड्याळ**–न० वेळ मोजण्याचें साधन.
**घड**–पु० जुडगा, फड, घोंस.
**घडण**–(सं) स्त्री० घटना, घडण्याचें काम.
**घडणावळ**–स्त्री० घडण्याबद्दल मजूरी.
**घडणें**–(सं) उ० वि० होणें, बनणें, करणें.
**घडवंची**–स्त्री० चौकी, शिडी.
**घडशी**–पु० जातिविशेष, वाजंत्री.
**घडा**–(सं) पु० मडकें, कुंभ, मातीची घागर.
**घण**–(सं) पु० मोठा हातोडा. २ वि० दाट, घट्ट, घन.
**घणस**–(सं) पु० सर्प जातिविशेष, घोणस.
**घन**–(सं) पु० ढग. २ वि० दाट, भरींव, घण.
**घनमूळ**–(सं) न० घनपद.
**घनवर्ग**–(सं) पु० घनाचा वर्ग.
**घनाक्षरी**–(सं) स्त्री० छंदविशेष.
**घबाड**–(सं) न० एकदम पुष्कळ मिळालेलें द्रव्य, लाट. २ मुहूर्तविशेष.
**घम**–(आ) दुःख, उदासीपणा.
**घमघमाट**–पु० स्वाद, सुवास.
**घमंडी–घमेंडी**–स्त्री० बढाई, गर्व, अहंता.
**घर्म**–(सं) पु० घाम, पसीना, द्रव. २ एखाद्या पदार्थावर जमलेली वाफ.
**घर्षण**–(सं) न० घासणें, घासाघाशी.
**घर**–(सं) न० गृह, वाडा, बिऱ्हाड, जागा.
**घरकोंडा**–वि० घरांत बसून राहणारा.
**घरगळणें**–अ० खालीं येणें, सरकणें.
**घरगुती**–(सं) वि० घरीं तयार केलेला, घरच्या उपयोगाचा.
**घरटें**–(सं) न० घरकुंडा, पक्ष्याचें घर.
**घरंदाज**–(फा) वि० खानदान, संभावित.
**घराणें**–(सं) न० कुळी, जातकुळी, पिढी.
**घरोबा**–(सं) पु० स्नेह, मित्रत्व.
**घस्मरित**–वि० सढळ, विपुल.
**घस**–(सं) स्त्री० नुकसान, त्रास.
**घसरणें**–(सं) अ० निमटणें, पडणें. २ चुकणें.
**घसा**–पु० गळा, आवाज, नरडें.
**घळघळीत**–वि० मोकळ्या मनाचा, निष्कपटी. २ सडकून, विपुल.
**घाई**–स्त्री० उतावीळपणा, गर्दी, जलदी, गडबड, त्वरा.
**घाऊक**–वि० ठोक, ठोकळ, सट्ट्यानें.
**घागर**–(सं) स्त्री० घट, घडा, कळशी.
**घागरी**–(सं) स्त्री० पायांतील दागिना. २ घुंगरू.
**घाट**–(सं) पु० आकार, रूप. २ नदींत उतरण्या वगैरेसाठीं केलेलें दगडी बांधकाम, तीर्थ. ३ डोंगरांतली उतरणीची वाट, घाटी.
**घाटणें**–(सं) उ० वि० वांटणें, बारीक करणें–होणें. २ वाटाघाट चालणें, ठरणें.
**घाटा**–पु० हरभऱ्याचा सालपटासुद्धां ओला दाणा. २ शिजवलेलें आंबोण.

**घाण**–स्त्री० दुर्गंधि, वाईट वास. २ मैल, कचरा.
**घाणा**–पु० तेल काढण्याचें यंत्र. २ कुटण्यास वगैरे घेण्याचें धान्याचें प्रमाण. ३ लग्नादिकार्यांतील मंगलविधिविशेष.
**घाणी**–स्त्री० चुना मळण्याची जागा.
**घाणेरडा**–वि० घाणेरा, खराब, मैलट.
**घाणणें**–अ० वाईट वास येणें, दुर्गंधि येणें.
**घात**–(सं) पु० चुकी, वाईट गोष्ट, नाहींसा करणें, नाश. २ पट, एका संख्येला त्याच संख्येनें गुणणें.
**घाबरणें**–अ० भय वाटणें, धास्ती घेणें, गोंधळणें, बावरणें.
**घाम**–(सं) पु० ( **घर्म** पहा. )
**घामट**–(सं) वि० अस्वच्छ, ओंगळ, घाणेरडा.
**घामोळें**–(सं) न० रोगविशेष. २ खुद्द जोड्याचें कातडें घामानें कुजूं नये म्हणून त्यांत घालतात तें कातडें, सुकतळ. ३ घोड्याच्या घामानें खोगीर खराब होऊं नये म्हणून त्या खालीं घालावयाचें वस्त्र.
**घाय**–पु० घाव, वार, जखम.
**घायाळ**–वि० जखमी.
**घाऱ्या–रा**–वि० घारडोळ्या, मांजरडोळ्या.
**घार**–(सं) स्त्री० समळी, पक्षिविशेष, गरुडपक्षी.
**घालणें**–उ० वि० ढकलणें, ओतणें.
**घालमेल**–वि० धांदल, गडबड, गर्दी.
**घालविणें**–उ० वि० घालवून देणें, बाहेर लावणें, हाकणें.
**घाला**–पु० घात, आकाशची कुऱ्हाड, छापा.
**घाव**–पु० वार, चाट, चाय, जखम.
**घावन**–पुं० पक्वान्नविशेष.
**घासणें**–(सं) उ० वि० साफ करणें, घर्षण करणें.
**घांट**–(सं) स्त्री० घंटा.
**घांस–घास**–(सं) पु० गवत. २ ग्रास, कवळ.
**घिरट**–स्त्री० चक्की, मोठें जातें.
**घिसाडी**–पु० लोखंडी काम करणारा.
**घी**–(सं) न० घृत, तूप.
**घुगरी**–स्त्री० चण्यांची उसळ. २ धान्याची मळणी झाल्यावर पाटलाला अगर सरकाराला केलेली धान्याची नजर.
**घुघु**–न० घुबडाचें ओरडणें, घूत्कार.
**घुटका**–(सं) पु० आंवढा, घोंट, चूळ.
**घुटमळणें**–अ० अडखळणें, घाबरणें, अडकणें.
**घुणघुणा**–पु० ( **गुणगुणा** पहा. )
**घुम्या**–वि० दुःखी, मितभाषी, मुखदुर्बळ.
**घुमट**–पु० कळस, मिनारा, मनोरा, शिखर.
**घुमणें**–(सं) अ० प्रतिशब्द होणें, नाद होणें. २ पुष्कळ वेळ टिकणें.
**घुरें**–न० रोगविशेष, अपस्मार.
**घुलें**–न० कुसरुड, सुरवंट.
**घुस्सा**–पु० राग, द्वेष.
**घुस–घूस**–स्त्री० उंदराच्या जातीचा एक प्राणी, जनावरविशेष.
**घुसणें**–अ० शिरणें, जाणें, रिघाव करणें.
**घुसळणें**–उ० वि० हालविणें, मंथनकरणें.
**घुंगट–गुट**–पु० तोंड झांकणारा पदर, बुरखा.
**घुंगरू–घुंगुर**–न० पैंजण.
**घुंगुरटें–डें**–न० डांस, चिलिट, मुरकूट.
**घृत**–(सं) न० तूप, घी, अन्नशुद्धि.
**घेणें**–(सं) उ० वि० खरेदी करणें, मिळविणें, घेऊन जाणें.
**घेर**–पु० परिघ. २ घोळ.
**घेरणें**–उ० वि० पकडणें, धरणें, पछाडणें.
**घेरा**–पु० संजाब, शेंडीचे मर्यादेचे केस.
**घेरी**–स्त्री० मूर्छा, भोंवळ, चक्कर.
**घेलचोद्या**–वि० वेडझवा, मूर्ख.
**घेवडा**–पु० एक प्रकारचा भाजीचा वेल.
**घेवारी**–पु० फुटकळ जिन्नस विकणारा, फेरीवाला, घाउक जिन्नस घेणारा.

**घो**–पु० दादला, नवरा, गोहो.
**घोक्या**–वि० घोकंपट्टी करणारा.
**घोकणें**–उ० वि० पाठ करणें.
**घोट–घोंट**–पु० घुळका.
**घोटक**–पु० घोडा.
**घोट्या**–पु० वांटा, वरवंटा, बारीक करणारा. २ वि० घोटणारा. ३ घोक्या.
**घोटणें**–उ० वि० बारीक करणें. २ मळणें. ३ घशाखालीं उतरणें.
**घोटा**–(सं) पु० वांटा. २ भांग, भंग, लुढिया. ३ अवयवविशेष.
**घोटाळणें**–अ० गडबडणें.
**घोटाळा**–पु० अडथळा, गोंधळ.
**घोडा**–(सं)पु०अश्व, तेजी, तुरंग, हय, वारू.
**घोण**–स्त्री० एक प्रकारचें जनावर, गोम.
**घोणा**–पु० ( घुणघुणा पहा. )
**घोर**–(सं) वि० निबिड, दाट. २ भयंकर. ३ स्त्री० चिंता, काळजी.
**घोरणें**–(सं) अ० झोंपेंत मोठ्यानें श्वासोच्छ्वास होणें.
**घोरपड**–(सं) पु० आरोप, बालंट, लचांड. २ प्राणिविशेष.
**घोलांटी–ट**–स्त्री० एक प्रकारची कसरत, कोल्हांटी उडी.
**घोष**–(सं) पु० एकसारखा आवाज, आवाज.
**घोळ**–स्त्री० वनस्पतिविशेष. २ पु० गोंधळ. ३ सांगा, ओंचा, वेर.
**घोळणें**–स० माखणें, लावणें. २ दमविणें.
**घोंगडी**–स्त्री० कांबळें.
**घोंगडें**–न० कांबळें, लोंकरीचें खरखरीत वस्त्र, घोंबडी, धाबळी. २ लचांड.
**घोंगी–घोंगी**–स्त्री० घुगी, मोठ्या मनुष्याची कुंची टोपी.
**घोंस**–(सं) पु० घड, फड.
**घंगाळ**–(सं) न० गंगाळ.
**घंटा**–(सं) स्त्री० घांट, घंटिका.

## ङ.

**ङ**–पांचवें व्यंजन. ह्याचे शब्द मराठी भाषेंत नाहींत.

## च.

**च**–सहावें व्यंजन.
**च्युत**–(सं) वि० पडलेला, हीनदशेस आलेला, पतित.
**च्युति**–(सं) स्त्री० पात, नाश, हीनत्व.
**च**–शु० श० विशिष्ट–तत्कालीं–खात्रीपूर्वक अशा अर्थी याचा उपयोग होतो: जसें—तोच, आलोंच पहा, येणारच.
**चई**–स्त्री० चाई, रोगविशेष.
**चक**–(सं) वि० लख्ख, साफ, स्वच्छ.
**चक्कर**–(सं) न० घेरी. २ भोंवरा. ३ चाक. ४ फेरी, फेरा, भ्रमण.
**चक्का**–पु० घट्ट दहीं.
**चक्र**–(सं) न० चाक, चक्कर, वर्तुळ.
**चक्रवर्ती**–(सं) वि० सार्वभौम, पादशहा.
**चक्रविहु–व्यूह–विहु**–पु० कवाइतविशेष, एक प्रकारची सैन्याची रचना.
**चक्री**–(सं) स्त्री० ब्राह्मणी पागोटें. २ खोड. ३ परंपरा.
**चक्की**–स्त्री० जातें, यंत्रविशेष. २ चाकी, चपटा भोंपळा.
**चकचकणें**–(सं) अ० प्रकाशणें, लकाकणें, झळकणें.
**चकणा**–वि० वांकडा, तिरवा, काणा.
**चकणाचूर**–पु० सत्यनाश, नायनाट. २ पीठ, भुगा, चूर्ण.

**चकणें**—अ० चूक होणें, फसणें, विसरणें, भूल पडणें. २ खेळांत गडी ठरणें.
**चकती**—स्त्री० ओळख. २ वाटोळा तुकडा. ३ डाग. ४ सनद.
**चकदळ**—न० खंवदा, वांटोळी जखम.
**चकपक**—वि० स्वच्छ. २स्त्री० छानछोक, टापटीप, स्वच्छता.
**चकमक**—स्त्री० गार व पोलाद. २ तंटा, बोलाचाल.
**चकला**—पु० भाग, परगणा.
**चकाचकी**—स्त्री० स्वच्छता, सफाई.
**चकाट्या**—स्त्री व्यर्थ गप्पा, वायफळ गोष्टी, गप्पाष्टक.
**चकार शब्द**—(सं) पु० ब्र, अवाक्षर, चकार.
**चकित**—(सं) वि० आश्चर्यभरित, विस्मित, थक्क.
**चकोर**—(सं) पु० पक्षिविशेष.
**चखोट**—वि० चांगलें, चोखट, उत्तम, गोड, रुचकर.
**चघळ**—वि० चावट. २ न० गळाटा, गुरांनीं खाऊन राहिलेलीं कडब्याचीं ताटें, चिपाडें.
**चघळणें**—अ० दांत लावल्या खेरीज खाणें, तोंडांत इकडे तिकडे फिरवणें.
**चघळपणा**—पु० चावटपणा.
**चचणें**—अ० मरणें, आटपणें.
**चट्ट**—क्रि० गट्ट, चट्टा, संपविणें, खलास.
**चट्टीपट्टी**—स्त्री० दिमाक, डामडौल.
**चट**—(सं) स्त्री० वाईट संबंध, चटक, दर्जे. २ क्रि० सर्वांशीं, मुकाट्यानें.
**चटई**—स्त्री० चटाई, हतरी, बोऱ्या.
**चटक**—स्त्री० चट, वाईट संवय. २ छान.
**चटका**—पु० वण, वळ. २ ध्यास, नाद, छंद. ३ मळमळ, चटपट. ४ भाजणें, डाग.
**चटणी-नी**—(सं) स्त्री० तोंडी लावण्याचा एक पदार्थ, रोचक पदार्थ.
**चटपट**—स्त्री० चटका, ध्यास. २ क्रि० लौकर, जलदी.
**चटोर**—वि० हलकट, रिकामटेकडा, च्छचोर, चावट.
**चडकाणी**—स्त्री० थप्पड, चापटी.
**चडफडणें**—अ० संतापणें, कातावणें.
**चढ**—स्त्री० चढण, चढीचा रस्ता. २ वरचष्मा. ३ तेजी, महागाई.
**चढण**—स्त्री० उंच जाणारा रस्ता.
**चढणें**—अ० वर जाणें. २ जास्त होणें.
**चढती**—स्त्री० बढती, सुदिन, उदय.
**चढाई**—स्त्री० बढाई, तोरा, वरचष्मा.
**चढाओढ**—स्त्री० पैज, शर्यत.
**चणा**—(सं) पु० हरबरा.
**चतकोर-चत्कर**—पु० (भाकरी पोळी वगैरेचा) चतुर्थांश.
**चतुर्थ**—(सं) वि० चौथा.
**चतुर्थांश**—(सं) पु० चौथा हिस्सा, पाद.
**चतुर्थी**—(सं) स्त्री० चौथ. २ चवथी विभक्ति.
**चतुर्भुज**—(सं) पु० विष्णु. २ वि० बद्ध, कैदी.
**चतुष्पाद**—(सं) पु० चार पायांचीं जनावरें, पशु.
**चतुर**—(सं) वि० धूर्त, हुशार, शहाणा, सुज्ञ.
**चतुरस्र**—(सं) वि० चोहींकडून सारखा, चवरस. २ चतुर, चवरस, गुंडा.
**चप-प्प**—क्रि० गप्प, गप, आं, गुपचीप, गुपचूप, चूप, न बोलतां.
**चपचपणें**—अ० माखणें, पुष्कळ होणें.
**चपचबित**—वि० फाजिल माखलेलें.
**चपटा**—वि० दबलेला, बसका, चापट, कमी जाड.
**चपराक**—स्त्री० चापट, थप्पड, चपाटी.
**चपरास**—स्त्री० पट्टा, बिल्ला, शिक्का.
**चपराशी**—पु० शिपाई, पट्टेवाला.
**चपल**—(सं) वि० चंचल, चलाख. २ अचपळ, व्रात्य.

**चपला**-(सं) स्त्री० वीज. २ कुलटा, छिनाल, शिनळ.
**चपाट**-न० फन्ना, पार.
**चपाटणें**-स० खाऊन टाकणें, फन्ना पाडणें.
**चपाती**-स्त्री० पोळी.
**चपापणें**-अ० भिणें, घाबरणें.
**चपेट**-(सं) स्त्री० ( **चपराक** पहा. )
**चबीना**-(सं) पु० डाळेंचुरमुरे इत्यादी.
**चबुत्रा-तरा**-पु० चौकोनी ओटा. २ ताबुताचें खालचें तकट.
**चमक**-स्त्री० चकाकी, तकतकी, प्रकाश. २ हूक, उसण.
**चमचमीत**-वि० यथास्थित, अघळपघळ, खमंग, मसालेदार.
**चमचा**-(सं) पु० एक प्रकारची पळी.
**चमडी**-(सं) स्त्री० चामडें, कातडें, चर्म.
**चमत्कार**-(सं) पु० आश्चर्य, विलक्षण गोष्ट.
**चमन**-(फा) स्त्री० चैन ( **चंगळ** पहा. )
**चमर**-(सं) पु० मृगविशेष, वनगाय.
**चमू**-(सं) पु० सेना, सैन्य. २ समुदाय.
**चमेल-ली**-(फा) स्त्री० जाई, लताविशेष.
**चय**-(सं) पु० संचय, समूह, जमा,मिळकत.
**चयन**-स्त्री० लाट, गर्दी.
**चर्चणें**-(सं) उ० वि० माखणें, लावणें.
**चर्चा**-(सं) स्त्री० विचार, वादविवाद, ऊहापोह. २ उटणें, लेप.
**चर्म**-(सं) न० कातडें, चामडें.
**चर्या**-(सं) स्त्री० मुद्रा, चेहरा. २ मार्ग.
**चऱ्हांट-ऱ्हाट**-न० दोरखंड. २ कंटाळवाणी गोष्ट.
**चर**-(सं) पु० चार, हेर. २ खंदक. ३ आहाळ, हाळ. ४ वि० चल, चंचल, जंगम.
**चरक**-(सं) पु० वैद्यकग्रंथविशेष. २ रस काढण्याचें यंत्र, भांडीं वगैरे चरकीं धरण्याचें यंत्र.
**चरचर**-क्रि० चिरण्याचे-कापण्याचे वेळीं जो शब्द होतो त्याचें अनुकरण करीत, चरचरां.
**चरचरां**-क्रि० चरचर.
**चरण**-(सं) पु० पाय, कदम. २ नक्षत्राचा चतुर्थांश. ३ न० आचरण.
**चरणें**-(सं) अ० गवत खाणें. २ बेफिकिर पोटांत भरणें. २ वाढत जाणें, ( नायटा इत्यादि. )
**चरपटपंजरी**-(सं) स्त्री० कर्मकथा, पाल्हाळ, चऱ्हाट.
**चरब**-वि० पक्का, पुरा.
**चरबी**-(फा) स्त्री० स्निग्ध, मांसांश, मांदें.
**चरविणें**-(सं)अ०चारणें, राखणें, खावविणें.
**चरवी**-स्त्री० पात्रविशेष.
**चरस**-पु० गांज्याचा चीक, अंमलविशेष.
**चरा**-पु० ओरखाडा, कच.
**चरांट-चऱ्हाट**-न० दोरखंड. २ कंटाळवाणी गोष्ट.
**चरित्र**-(सं) न० वर्तन. २ इतिहास, कथा, कथानक, चरित.
**चरित**-(सं) वि० आचरलेलें. २ न० चरित्र, कथा, आख्यान.
**चरु**-(सं) पु० भात,शिजविलेले तांदुळ,अन्न.
**चलणें**-(सं) अ० चालणें, मार्गक्रमण करणें.
**चलती**-(सं)स्त्री०चढती,भरभराटी, अभ्युदय.
**चलन**-(सं) न० चालणें, चालान, नाणें, हुंडी, किंमत.
**चलनी**-वि० चालू, चालतें.
**चलाख**-(सं) वि०चपळ, चाणाक्ष, तीव्र, धूर्त.
**चव्वल**-पु० **चवली**-स्त्री० दोन आणे, दुआणी.
**चव्वीस**-(सं) वि० चोवीस, संख्याविशेष.
**चव्वेचाळीस-ताळीस-चव्वेचाळ-ताळ-चवेताळ**-वि० चाळीस आणि चार.

**चव**–स्त्री० रुचि, गोडी, लज्जत, आवड, स्वाद. २ मोतीं तालण्याचें वजन.
**चवई**–स्त्री० रानकेळ.
**चवड**–स्त्री० रास, ढीग, चळत.
**चवडा**–पु० तळवा, पायाचा बोटाकडील अर्धा भाग.
**चवणा**–पु० मुंगा, नखरा, कुलुली.
**चवताळणें**–अ० रागावणें, संतापणें, क्रुद्ध होणें.
**चवरंग**–पु० चवथरा, चौकी, घडवंची.
**चवरी**–(सं) स्त्री० चामर, माशा वारण्याचा कुंचा.
**चवळी**–स्त्री० लहान अळसुंदा, धान्यविशेष.
**चवाठा**–(सं) पु० खुंट, चार रस्त्यांचा कोपरा, चौक, चतुष्क.
**चवाळें**–न० चार मनुष्यें. २ कांबळें.
**चष्मा**–(सं) पु० उपनेत्र, डोळ्याची आरशी.
**चहा–चाहा**–(फा) पु० वनस्पतीविशेष. २ कीर्ति.
**चहाटळ**–वि० चावट, पाणचट, चवळ.
**चहाड**–वि० चुगलखोर. २ भिजावयास घातला असतां न भिजणारा दाणा.
**चहाडी**–स्त्री० चुगली, लावालावी.
**चळ**–(सं) पु० भ्रांति, साठी, वेड, भ्रम.
**चळकांप**–(सं) पु० थरकांप, घाबरगुंडी.
**चळचळीत**–वि० पुष्कळ, विपुल, धार लागेपर्यंतचें.
**चळणें**–(सं) अ० वेड लागणें, भ्रम होणें, च्यवणें. २ हलणें, स्थलांतर होणें–करणें.
**चळवळ**–(सं) स्त्री० उद्योग, हालचाल, गडबड, धांदल.
**चक्षु**–(सं) पु० डोळा, आख, नेत्र.
**चाई**–स्त्री० चावी, रोगविशेष.
**चाक**–(सं) न० चक्र, वर्तुल.
**चाकर**–(फा) पु० नोकर, कामकरी, सेवक, दास, नौकर.
**चाकी**–(सं) स्त्री० चपटा भोपळा.
**चाकू**–पु० एक प्रकारची सुरी.
**चाखणें**–उ० वि० चव घेणें, खाणें, रुचि घेणें, रुचि पहाणें.
**चाखोळा**–पु० प्रीतिभोजन, एके ठिकाणीं जेवावयास बसणें.
**चाचड**–पु० जंतुविशेष.
**चाचणी**–स्त्री० परीक्षा. २ साखरेचा पाक.
**चाचपडणें**–अ० धडपडणें, अडखळणें, चाचपणें.
**चाचपणें**–अ० चाचपडणें, अंधारांत शोधणें. २ शोधणें.
**चाट**–स्त्री० जखम. २ खीच. ३ तोटा, बूड.
**चाटण**–न० चाटण्यासारखें औषध.
**चाटणें**–अ० जिभेनें किंवा बोटानें खाणें. २ जिभेनें स्पर्श करणें, जीभ फिरविणें. ३ अग्नि–वीज इत्यादींचा स्पर्श होणें.
**चाड**–स्त्री० लाज, चट, संवय. २ गोडी, आवड.
**चाडें–चाढें**–न० समईचा तेल घालण्याचा भाग, टाळें, टवळें.
**चाणाख्य–चाणाक्ष**–(सं) वि० चालाक, धूर्त, हुशार.
**चातक**–(सं) पु० पक्षिविशेष.
**चाती**–स्त्री० सूत काढण्याचें साधन.
**चातुर्य**–(सं) न० शहाणपण, चतुरता, हुशारी.
**चातुर्थिक**–(सं) न० चवार, चौथे दिवशीं येणारा ( हिव. )
**चादर**–स्त्री० पलंगपास, आच्छादन.
**चाप**–(सं) पु० बाण, धनुष्य. २ दाब. ३ उंदीर धरण्याचें यंत्र.
**चापट**–स्त्री० (चापटी पहा) २ वि० बसका, थबकडा, चपटा.
**चापटणें**–न० चपटा करणें.
**चापटी**–स्त्री० चापट, थापटी.

**चापणें**-उ० वि० दाबणें, दबावणें, धमकी देणें, धाक दाखविणें. २ बिनदिकत खाणें.
**चाबा**-(सं) पु० खाणें, खाजा, फराळ.
**चाबूक**-(फा) पु० कोरडा, आसूड, फटका, चौदावें रत्न.
**चाम्हार**-(सं) पु० जातिविशेष, चांभार.
**चाम ऊ-चाम**-(सं) स्त्री० घामटपणानें अंगावर झालेली ऊ.
**चामट**-वि० चिवट, चिकट.
**चामडें**-(सं) न० चर्म, कातडें.
**चामर**-(सं) पु० ( **चवरी** पहा. )
**चार्वाक**-(सं) पु० निरीश्वरवादी, नास्तिक.
**चार**-(सं) वि० संख्याविशेष. २ चार. ३ हेर, गुप्त दूत. ४ थेर, खेळ, खेळखंडोबा.
**चारखंड**-न० फणसांतील गऱ्याच्या भोंवतालचा भाग.
**चारण**-(सं) पु० जातिविशेष, भाट.
**चारणें**-(सं) उ० वि० खाऊं देणें-घालणें, खाविवणें, चाखणें, चरण्यास सोडणें.
**चारु**-(सं) वि० सुंदर, सुरेख, खुपसुरत.
**चारोळी**-(सं) स्त्री० एक प्रकारचें लहान फळ, चंदनाचे फळांतील बी.
**चाल**-(सं) स्त्री० वर्तणूक, रीत, वर्तन. २ चढाई, हल्ला. ३ गत, गति.
**चालणें**-(सं) अ० संचार करणें, चलणें, रीत राखणें, वर्तणें. २ नाणें वगैरे उपयोगांत येणें. ३ सहन होणें, खपणें, चिंता नसणें.
**चावका**-वि० चावणारा, चावरा.
**चावट**-वि० ( **चहाटळ** पहा. )
**चावडी**-स्त्री० गांवांतील सार्वजनिक गृह.
**चावणें**-(सं) उ० वि० खाणें, दांतांनीं दाबणें, दंश करणें.
**चावरा**-वि० चावका, चावणारा.
**चावळणें**-अ० भलभलतें बोलूं लागणें.
**चावा**-चावण्याची क्रिया, दंश.
**चावी**-स्त्री० कुंजी, किल्ली, पेंचाचे खिळे बसविण्या-काढण्याचें हत्यार.
**चाष**-(सं) पु० तास, कास, पक्षिविशेष.
**चाहाणें**-उ० वि० आवडणें, बरा वाटणें. २ मानणें, मान्यता राखणें.
**चाहूर**-पु० जमीन मोजण्याचें माप, १२० बिघे.
**चाहूल**-स्त्री० चाल, चालवण, चाऊल.
**चाळ**-पु० पैंजण, घुंगरू.
**चाळण**-(सं) स्त्री० चाळणी, गाळणी, गाळणें.
**चाळणी**-(सं) स्त्री० चाळण, गाळणी. २ फेरफार, फेरबदल, खालवर करणें.
**चाळणें**-(सं) ( **गाळणें** पहा. ) २ खालवर करणें.
**चाळवण**-स्त्री० मृतउवाच, कळ लावणें, चिडवणें, खिजवणें.
**चाळवणें**-स० खिजवणें, आज उद्यां सांगणें.
**चाळा**-(सं) पु० खोड, संवय. २ चाळणींत राहिलेला पीठ वगैरेचा अंश. ३ तोंडाची बिजागरी.
**चाळीस**-(सं) वि० संख्याविशेष.
**चाळूनपाळून**-क्रि० पाळीपाळीनें, आळीपाळीनें, आलटूनपालटून.
**चांग-चांगट**-वि० सुंदर, सुरेख, सुरूप.
**चांगला**-वि० बरा, योग्य, नीट, व्यवस्थित, भला.
**चांचा**-पु० समुद्रांतील लुटारू.
**चांद**-(सं) पु० ( **चंद्र** पहा. ) २ पदक.
**चांदई**-स्त्री० कडेची रुंद भिंत.
**चांदकी**-स्त्री० लहान भाकर-री.
**चांदणी**-स्त्री० नक्षत्र, तारा. २ मोठें पाल, आच्छादनार्थ दोऱ्यांनीं बांधावयाचें एक प्रकारचें जाजम.

**चांदणें**–(सं) न० चंद्राचा प्रकाश, कौमुदी, उजेड.

**चांदवा**–पु० टोपीचा वरचा भाग, मंडपीवर घालण्याचें कापड.

**चांदी**–(सं) स्त्री० अस्सल रुपें. २ चट्टे.

**चांदी करणें**–अ० किमया करणें, मारणें, ठोकणें. २ फन्ना करणें.

**चांदोबा**–(सं) पु० चंद्र, चांद.

**चांपा–चाफा**–(सं) पु० चाफा, चंपक, वृक्षविशेष.

**चांभार**–(सं) पु० जोडे शिवणारा, मोची, चर्मकार, चाम्हार.

**चिकचिक**–स्त्री० किचाड.

**चिकचिकणें**–(सं) अ० पाणचट होणें, पाणी सुटणें.

**चिकट**–वि० चीक असलेलें, लबलबित, चिकण, चिक्कण.

**चिकटणें**–अ० जुडणें, डकणें.

**चिकटविणें**–डकविणें, जोडणें.

**चिकटा**–(सं) पु० चिकटी, चिकटाई, चिकणाई.

**चिकवडी**–स्त्री० तांदुळाचा तोंडीं लावण्याचा पदार्थविशेष.

**चिकाटी**–स्त्री० हातानें मनगट धरण्याची क्रिया.

**चिकार**–वि० दाट, गर्द.

**चिकित्सा**–(सं) स्त्री० औषध. २ बारीक शोध, साखरेची साल.

**चिकी**–स्त्री० काकवी, पातळ गूळ.

**चिकू–चिक्कू**–वि० कंजूष, कृपण, लोभी, कवडीचुंबक. २ फळविशेष.

**चिकोटी**–स्त्री० मिठी, मगरमिठी. २ चिकटपणी.

**चिखल**–पु० गारा, रेंदा, गाळ.

**चिघळणें**–अ० पाझरणें, पातळ होणें.

**चिचुंदरी**–स्त्री० चिचोंद्री, चिचोंदरी, उंदीर, चिचुंदर.

**चिटकी**–स्त्री० चुटकी, मधलें बोट व आंगठा यांनीं झालेला आवाज.

**चिटणें**–स० अचळांतून दूध येईनासें होईपर्यंत तें पिणें–काढणें.

**चिटी**–(फा) स्त्री० चिठी, चिठ्ठी, कागद, पत्र.

**चिठ्ठा**–(फा) पु० पगार, जमाबंदीचा खरडा.

**चिडणें**–अ० रागावणें, संतापणें, खिजणें.

**चिडविणें**–स० खिजवणें, थट्टा करणें.

**चिडी**–स्त्री० चिमणी, चकली.

**चिणणें**–(फा) उ० वि० बांधणें, रचणें. २ दाबून मारणें. ३ चीण घालणें.

**चित्**–(सं) स्त्री० ध्यान, ज्ञान, बुद्धि, शक्ति. २ चैतन्य.

**चित्त**–(सं) न० लक्ष, मन, ध्यान, मेंदु.

**चित्ता**–पु० वाघाच्या जातीचें एक जनावर.

**चित्पावन–चित्तपावन**–पु० ब्राह्मणज्ञातिविशेष.

**चित्र**–(सं) न० चित्तर, नकाशा, देखावा, कागद–कपडा–भिंत इत्यादींवर काढलेली किंवा माती वगैरेची केलेली प्रतिमा. २ वि० विलक्षण, चमत्कारिक, विचित्र.

**चित्रा**–(सं) स्त्री० नक्षत्रविशेष.

**चित्रान्न**–(सं) न० खिचडी, मसालेभात.

**चित्रिणी**–(सं) स्त्री० स्त्रीजातिविशेष.

**चितारणें**–(सं) उ० वि० चित्रें काढणें, वेड्यावांकड्या रेघोट्या ओढणें.

**चिता**–(सं) स्त्री० सरण.

**चिताड**–वि० खरडलेलें,खराब केलेलें–झालेलें.

**चितारी**–पु० चित्रें काढणारा.

**चिथडा**–पु० तुकडा, थोडा भाग, चिटोरा, चिंधी.

**चिथविणें**–स० चिडविणें, संताप आणणें.

**चिन्ह**–(सं) न० ओळखण, खूण, अंक.
**चिनाई**–(सं) वि० चिनी, चीन देशांतील, चिनई.
**चिप्प**–क्रि० चूप, गप्प,
**चिपटें**–न० पावशेराचें माप, पावशेर.
**चिपड**–न० डोळ्यांतील वाळलेला पू–गू.
**चिपनळी**–स्त्री० पिचकारी.
**चिपळी**–स्त्री० वाद्यविशेष.
**चिपाट–ड**–न० कडब्याचें ताट.
**चिबूड–बड–भड**–न० फळविशेष.
**चिमकुला**–वि० चिमुकला, लहान, टारगा, एवढासा.
**चिमकुरा–कोडा–कोरा**–पु० विचकुरा—खुरा–खुडा–खोडा–खोरा, ओरखडा.
**चिमट**–स्त्री० चिमटी, चिमूट.
**चिमटणें**–उ० वि० एक होणें–करणें, मिळणें–मिळविणें, संकुचित होणें.
**चिमटा**–पु० सांडस. २ चिमट्यासारखी पकड. ३ नद्यांच्या संगमाची जागा. ४ चिमखडा. ५ पेंच, अडचण, संकट.
**चिर**–(सं) क्रि० चिरकाल, पुष्कळ वेळपर्यंत, नेहमींचें, सततचें.
**चिरकांडी–कंडी**–(सं) स्त्री० पिचकारी, धार, प्रवाह.
**चिरगूट**–(सं) न० वस्त्र, प्रावरण, पोपाख.
**चिराचरित**–(सं) वि० जुनें, पुराणें, फार दिवसांचें, जीर्ण.
**चिरंजीव**–(सं) पु० पुत्र, मुलगा. २ अति दीर्घजीवी. ३ वि० सततचा.
**चिरटी**–(सं) स्त्री० चिरोटी, चिरपळी, जमिनीचा चिंचोळा भाग.
**चिरटोळी**–स्त्री० चिंधी. २ लहान मुलास पिण्याचें शिकविण्याकरितां दुधानें वगैरे भिजविलेलें चिंधुक. ३ लहान धार. ४ अरुंद फाळका.
**चिरड**–स्त्री० चीड.
**चिरडणें**–उ० वि० रगडणें.
**चिरडी**–स्त्री० साडी, मुलीचें लुगडें.
**चिरणें**–उ० वि० कापणें, तुकडे करणें.
**चिरफळी**–स्त्री० ( **चिरटी** पहा. ) लहानसें लांकूड.
**चिरमुटणें**–अ० चुरमडणें, सुरकुत्या पडणें.
**चिरा**–पु० घडलेला धोंडा, दगड, जवानी, तारुण्य.
**चिराईत–यत–यता**–(सं) पु० किराईत, काडेचिराईत.
**चिराक–ग–ख**–(फा)पु० दिवा, बत्ती, कंदील.
**चिरायु**–(सं) वि० चिरंजीव.
**चिरी**–स्त्री० कुंकवाची रेघ. २ भेग.
**चिल्लर**–वि० लहानसहान, अल्लड, हलका, पोरखडा, खुर्दा.
**चिलखत**–न० लोखंडाचा पोपाख-क, लढाईचा पेहेराव.
**चिलट–लीट**–न० मुरकूट, डांस, मच्छर.
**चिलम–चिलिम**–स्त्री० हुक्का, चुट्टा.
**चिवचिव**–स्त्री० चिमण्यांचें ओरडणें.
**चिवडणें**–उ० वि० कुसकरणें, नासणें, अस्ताव्यस्त करणें.
**चिवडा**–पु० डाळचुरमुरेपोहे. २ विचका, फजिता.
**चिवा**–पु० मेस, एक प्रकारचा बांबू.
**चिळस**–स्त्री० किळस, चीड, शिसारी, वीट.
**चिंच**–स्त्री० इमली, चिंच, वृक्षविशेष व त्याची शेंग.
**चिंचोका**–(सं) पु० चिंचेचें बीज.
**चिंचोळा**–वि० अरुंद, आंखुड.
**चिंतणें**–(सं) उ० वि० काळजी करणें, ध्यास ठेवणें.
**चिंता**–(सं) स्त्री० काळजी, फिकिर, धास्ती.
**चिंधडी**–स्त्री० चिंधी, चिंधोटी, चिंधुकली.

**चिंधी**–स्त्री० कापडाचा तुकडा.
**चिंब**–वि० ओला, चबचबित.
**चिंबट**–वि० चिवट, आंबटासारखें.
**चिंबटणें**–उ० वि० चिमटणें, एक होणें.
**चिंवट**–वि० चावट, लवचीक, चामट.
**चीक**–पु० रस, दूध (वृक्षादिकांचें.)
**चीज**–(फा) स्त्री० वस्तू, पदार्थ. २ कविता, पद्य, गीत, गाणें. ३ सार्थक्य.
**चीट**–न० बकशीचें कापड, चित्रपट, कालिकतचें कापड.
**चीड**–स्त्री० चिळस, चिरड, त्रास.
**चीत**–वि० उताणा, जमिनीस पाठ लागलेला.
**चीप**–न० पातळ धोंडा-दगड. २ वि० गप, स्तब्ध.
**चुई**–स्त्री० चोय, चोई, चुइटी.
**चुकचुकणें**–अ० पालीचें ओरडणें.
**चुकणें**–अ० अपराध करणें, विसरणें, संचार जाणें. २ पार होणें. ३ न लागणें, हुकणें. ४ तुटातूट होणें, संगति तुटणें.
**चुकविणें**–स० चुकावणें, विसरवणें, फसविणें. २ संगति तोडणें. ३ तोंड लपविणें, भेट न होऊं देणें.
**चुका**–पु० वनस्पतिविशेष.
**चुकी**–स्त्री० चूक, अपराध, गुन्हा. २ चुकीबद्दल छडीचा प्रहार.
**चुगली**–स्त्री० चहाडी, लावालावी.
**चुचकारणें**–स० गोंजारणें, माया लावणें, चुचकावणें.
**चुट्टा**–पु० बिडी, विडी.
**चुटका**–पु० लहानशी गोष्ट, आख्यायिका.
**चुटकी**–स्त्री० ( **चिटकी** पहा. )
**चुडी**–(सं) स्त्री० कोलती, दिवटी. २बांगडी.
**चुणचुणणें**–अ० थोडी आग होणें.
**चुणचुणीत**–वि० चलाख, चपळ.
**चुणणें**–उ० वि० निवडणें. २निऱ्या करणें.
**चुणी**–स्त्री० निरी, मिरी, घडी.
**चुणूक**–स्त्री० नमुना, मासला.
**चुतबावळा**–पु० चूतिया, वेडझवा, मूर्ख.
**चुथडा**–पु० फजिता, पच्ची, हुर्यो, नक्कल.
**चुनडी**–स्त्री० रंगलेलें वस्त्रविशेष.
**चुना**–(सं) पु० चूर्ण.
**चुबकणें**–उ० वि० हळूहळू आपटणें, थोपटणें.
**चुरगळणें**–स० चुरणें, रगडणें.
**चुरचुरणें**–अ० ( **चुणचुणणें** पहा. )
**चुरडणें**–स० चुरणें, रगडणें.
**चुरणें**–उ० वि० चुरडणें, मोडणें, दाबणें, चुरमटणें, चुरगळणें.
**चुरमा**–पु० पक्वान्नविशेष.
**चुरमुरा**–पु० मुरमुरा.
**चुरस**–स्त्री० आकस, द्वेष.
**चुलत**–वि०काकाच्या संबंधी, चुलत्याकडून.
**चुलता**–पु० काका, बापाचा भाऊ.
**चुला**–(सं) पु० मोठी चूल, चुलखंड.
**चुळका**–(सं) पु० कुळचा, चूळ, तळहातांत मावेल इतकें ( पाणी. )
**चुळचुळ**–स्त्री० घाई, उतावळी, गर्दी, जलदी, चळवळ.
**चुळचुळमुंगा**–पु० घाई, उतावळी.
**चुंखणें**–स० चुखणें, ( **चोंखणें** पहा. )
**चुंफणें**–उ० वि० चोखणें, तोंड लावून पिणें.
**चुंबक**–(सं) पु० ओढणारा, ओढून घेणारी वस्तू. २ लोहचुंबक. ३ कद्रू.
**चुंबणें**–(सं) उ० वि० मुका घेणें. २ओढणें.
**चुंबन**–(सं) न० मुका.
**चुंबळ**–स्त्री० चुंफळ, बैठक, इंडोणी, निवणें. २ गुदद्वाराजवळचा अवयवविशेष.
**चूक**–स्त्री० चुकी. २ लहान खिळा.
**चूड**–स्त्री० ( **चुडी** पहा. )
**चूण**–स्त्री० आंबोण, टरफल. २मुरड, चीण.

**चूत**–(सं) स्त्री० पुच्ची, भग, स्त्रीचें जननें-- द्रिय, योनि.

**चूर्ण**–(सं) न० भुगा, पीठ, बुकणी. २ औ-षधविशेष. ३ चुना.

**चूर्णिका**–(सं) स्त्री० कविताविशेष.

**चूर**–(सं) पु० भुगा, चूर्ण. २ वि० निमग्न.

**चूं**–न० चकारशब्द, ब्र.

**चेचणें**–उ० वि० चेंचणें, ठेंचणें, ठोकणें, कुटणें. २ खूप मारणें, कणीक मऊ क-रणें, तंबी देणें.

**चेटक–टूक**–न०करणी, जादु.

**चेड–डू**–(सं) न० लहान मुलगी.

**चेतणें**–(सं) अ० चिडणें. २ पेटणें, भडका होणें.

**चेतना**–(सं) स्त्री० हालचाल, जीव, प्राण. २ चैतन्य. ३ शिश्नोत्थिति.

**चेतवणें**–(सं) स० पेटवणें, आग लावणें.

**चेताळणें**–उ० वि० चवताळणें, चेतविणें.

**चेपणें**–उ० वि० दाबणें, ठेंचणें, रगडणें.

**चेला**–पु० शिष्य,शागीर्द,शाग्रीत, विद्यार्थी.

**चेव**–पु० मस्ती, गुरमी, कुल्ली.

**चेवणें**–(सं) अ० चळणें, मस्तक फिरणें, मस्त होणें.

**चेष्टा**–(सं) स्त्री० व्यापार, कर्म. २ थट्टा, मस्करी.

**चेहेरा–हरा**–पु० तोंड, मुख.

**चेकाळणें**–अ० द्वाड होणें, व्रात्य होणें, चेवणें.

**चेंगट**–वि० आळशी, सुस्त, मट्ठ, चिरकारी.

**चेंडू**–पु० कंदुक,खेळण्याचा चिंध्यांचा गोळा.

**चेंदणें**–उ० वि० चेंचणें, नरम होणें,ठेंचणें, दडपणें.

**चेंदा**–पु० चेंगरणें.

**चैत्र**–(सं) पु० पहिला महिना.

**चैन**–स्त्री०.मौज, गम्मत, मजा, लाट, सुख.

**चोइटी**–स्त्री० चुई, चोयटी.

**चोख**–वि० खरा, चांगला, चोखट.

**चोखणें**–उ० वि० चुंफणें.

**चोचरा**–वि० तोतरा, बोलण्यांत लागणारा–अडखळणारा.

**चोचला**–पु० नखरा, मान, डौल, चोज.

**चोज**–पु० चोचला, कौतुक.

**चोट**–स्त्री० चाट, जखम, नुकसान.

**चोथ**–स्त्री० चुइ-टी, चोईटी-यटी.

**चोथा**–पु० त्याज्य द्रव्यांश, निःसत्व पदार्थ.

**चोदणें**–उ० वि० झंवणें, संभोग करणें, शिरकविणें, घुसडणें.

**चोप**–पु०चोपणी,चोपणें, चोपावयाचें साधन.

**चोपणें**–स० ठोकणें. २ मारणें, मार देणें. ३ न० जमीन ठोकण्याचें साधन.

**चोपडणें**–उ० वि० लावणें, माखणें.

**चोपडी**–स्त्री० वही, पुस्तक.

**चोपदार–चोबदार**–पु० देवाची–राजाची काठी धरणारा, वेत्रधारी.

**चोफाळ**–पु० पातळ पासोडी, चादर.

**चोफाळा**–पु० झोंपा, झोंपाळा, दोला.

**चोर**–(सं) वि० चोरीकरितां रात्रीं भिंती फोडणारा, भामट्या, लुटारू, चोरटा. २ गंजिफाच्या खेळांत ज्याच्यावरचा हुकूम पडला नाहीं असें पान. ३ दुसऱ्या खेळणारांस धरणारा–शिवणारा. ४ वि० गुप्त.

**चोरणें**–(सं) उ० वि० न कळत नेणें, अपहार करणें, उपटणें, लांबविणें, पळविणें.

**चोरी**–(सं) स्त्री० चोरण्याची क्रिया, अपहार, चौर्य.

**चोवीस**–(सं) वि०वीस आणि चार ही संख्या.

**चोळणा**–(सं) पु० विजार, पायजमा.

**चोळणें**–(सं) उ० वि० खाजविणें, फिरविणें, लावणें, माखणें.

**चोळी**-(सं) स्त्री० कंचुकी, कांचोळी, बायकांची बंडी.

**चोंच-चोच**-(सं) स्त्री० चंचू, पक्ष्याचें तोंड.

**चोंचा**-पु० डाग, भाजणें.

**चोंट**-पु० लवडा, चोमणें, बोडा, पुरुषाचें जननेंद्रिय.

**चोंटाळणें-टळणें**-स० हयगय करणें, दुर्लक्ष करणें.

**चोंथा**-पु० निःसत्व झालेला पदार्थ.

**चोंबडकी**-स्त्री० चहाडी, चुगली.

**चोंबडेपणा**-पु० चहाडी.

**चोंबडा**-वि० चोमडा, चहाड, चुगलखोर.

**चौ**-वि० संख्याविशेष, चार.

**चौक**-(सं) पु० चतुष्क, चौकोनी मैदान. २ बांधलेल्या जागेंतील चौरस खुलें दालन, चव्हाटा. ३ कदवें.

**चौकट**-स्त्री० चार कडा असलेली वस्तु.

**चौकडा**-पु० पुरुषांचा दागिनाविशेष.

**चौकशी**-स्त्री० तपास, तलास, शोध, पत्ता.

**चौका**-पु० चबुतरा, चबुथा, चौकोनी ओटा.

**चौकी**-स्त्री० बडवंची. २ पाहारा, नाकें.

**चौगुला**-पु० बारा बलुत्यांतील एक अधिकारिविशेष.

**चौघडा**-(सं) पु० नगारा, नौबद, डंका.

**चौचाल**-वि० द्वाड, वाईट चालीचा, स्वच्छ.

**चौणा**-पु० च्यव, मस्ती, कुलूली, वाईट संवय.

**चौत**-पु० पाव, पाव हिस्सा, चतकोर.

**चौथ**-(सं) स्त्री० चतुर्थी.

**चौथाई**-स्त्री० उत्पन्नाचा चतुर्थांश घेण्याचा हक्क. २ चवथा हिस्सा.

**चौदा**-(सं) वि० दहा आणि चार, संख्याविशेष.

**चौफुला**-पु० चार ( किंवा अधिक ) पुडांचें भांडें, डबा.

**चौफुली**-स्त्री० कट. २ दागिनाविशेष.

**चौरंग** (सं) पु० एक प्रकारची चौकी.

**चौल**-(सं) पु० हजामतीचा विधि.

**चौंगा**-पु० हाताच्या चार बोटांची रुंदी.

**चंग**-(फा) पु० वाद्यविशेष. २ पैज, प्रतिज्ञा.

**चंगळ**-स्त्री० मौज, विपुळता.

**चंगा**-वि० चांगलें, स्वच्छ.

**चंगीभंगी**-वि० उल्लूके भाई दरवेशी, लहरी, बेपर्वा.

**चंचल**-(सं) वि० चपल, चलाख. २ क्षणभंगुर, अशाश्वत.

**चंची**-स्त्री० पिशवी, बटवा, हसवी.

**चंचू**-(सं) स्त्री० चोंच, चंचुपुट.

**चंड**-(सं) वि० मोठा, अवाढव्य, प्रचंड. २ उष्ण.

**चंडाल-ळ**-(सं) पु० चांडाळ, मांग, दुष्ट मनुष्य.

**चंडाळ चौकडी**-स्त्री० द्वाड मंडळी, व्रात्यसमुदाय.

**चंडिका**-(सं) स्त्री० चंडी, दुर्गादेवी.

**चंडी**-(सं) स्त्री० रागिट स्त्री.

**चंडोल**-(सं) पु० पक्षिविशेष. २ एक प्रकारचा अंमल-निशा.

**चंद्र**-(सं) पु० चांद, चंद्रमा, चांदोबा.

**चंद्रज्योत**-(सं) स्त्री० अग्निकौतुकविशेष, हवई.

**चंद्रमौळी**-(सं) वि० मोडकें-पडकें घर.

**चंद्री**-स्त्री० टक, नजर, एकचित्त, एकलय.

**चंदन**-(सं) पु० वृक्षविशेष.

**चंदी**-स्त्री० रोजचा घोड्याचा दाणा. २ धान्यादिकांचा पुरवठा.

**चंपक**-(सं) पु० चांफा.

**चंपी**-स्त्री० अंग दाबणें-रगडणें.

**चंपू**-(सं) पु० गद्यपद्यात्मक ग्रंथविशेष.

**चंबू**-पु० लांबोळा व उभट तांब्या, गडवा.

## छ.

छ—हें सातवें व्यंजन आहे. सहा या अर्थी दुसऱ्या शब्दाच्या पूर्वी याची योजना होते.

छक्कड—स्त्री० नुकसान, तोटा. २ भांडण.

छक्कल—(सं) न० पु० तुकडा, भाग, हिस्सा, वाटोळा अर्धा भाग, शकल.

छक्का—पु० ज्यावर एकसारखे सहा टिपके किंवा सहा चित्रें आहेत असा पत्ता किंवा गंजीफ.

छक्केपंजे—पु० लबाडी. कावेबाजी.

छकडा—पु० टांगा, लहान गाडी.

छकडी—स्त्री० फाशांतलें सहा संख्येचें दान.

छकणें—उ० वि— ठकणें, फसविलें जाणें.

छचोर—वि० हलकट, बेपर्वा, चटोर.

छट्टा—वि० अंतर. २ थेंब. डाग.

छट—वि० लबाड, पक्का.

छटा—(सं) स्त्री० वर्ण, रंग, झांक, चर.

छडी—स्त्री० काठी, दंड, यष्टि. चमकी.

छत्—के० छेः, छीः.

छत्तीस—वि० तीस आणि सहा.

छत्र—(सं) न० अन्नसत्र. २ मोठी छत्री, पाऊस किंवा ऊन निवारण्याचें साधन. आधार, आश्रय.

छत्री—(सं) स्त्री० छत्र. २ एक प्रकारची इमारत.

छत—न० आच्छादन, वितान, चांदवा. २ रेलचेल, गर्दी.

छद्म—(सं) न० कपट, लबाडी.

छद्मी—(सं) वि० कपटी, लबाड.

छद्मीभाषण—न० कपटाचें-वर्मी भाषण.

छदाम—पु० सहा दाम, पैसा.

छप्पन्न—वि० पन्नास आणि सहा.

छप्पर—न० गवताचें आच्छादन.

छप्परपलंग—(फा) पु० वर आच्छादन असलेला पलंग.

छपणें—अ० लपणें, दडणें. २ पचणें, उघडकीस न येणें, दबणें.

छपवणी—छपावणी—छपवणूक—स्त्री० बहाणा, कल्हई. २लपविणें, चोरणें, दाबणें.

छबकडा—वि० सुंदर, सुरेख, शानदार.

छबी—(सं) स्त्री० तसबीर, नकाशा. २कांति.

छबीना—पु०मिरवणूक, समारंभ.

छर्रा—पु० बंदुकींत घालण्याची लहान गोळी.

छल्ला—पु० एक प्रकारची आंगठी, सल्ला.

छल—(सं) पु० छलना, छळणूक. २ कपट.

छळणें—(सं) अ० त्रास देणें,गांजणें,जाचणें.

छाकटा—वि० दारूबाज, छचोर, चटोर.

छाट—पु० शिपला. २ कापणी, काप, लाग.

छाटणें—सं० तोडणें, कापणें, कातरणें.

छाटा—पु० थेंब, शितोडा. २ गाळा, अंतर.

छाटी—(सं) स्त्री० संन्याशाचें वस्त्र.

छात्र—(सं) पु० शिष्य, चेला.

छाती—स्त्री० हिंमत, हिय्या. २ पोटाचे वरचा भाग, ऊर.

छान—स्त्री० शान, नखरा. २ वि० पसंत, फक्कड.

छानदार—(आ) वि० सुरेख, नामी, पसंत, फक्कड, उमदा, शानदार.

छानणें—स० गाळणें, निवडणें, चाळणें.

छाप—पु० शिक्का. २ दरारा. ३ वजन, वरचष्मा. ४ घोड्याच्या जिनाखालीं घालावयाचा कपडा.

छापखाना—पु० छापण्याचें काम होतें ती जागा.

छापणें—स० प्रतकरणें, वठविणें, लिंपणें. २ प्रसिद्ध करणें, ठरणें.

छापा—स्त्री० आकस्मिक हल्ला, गुप्त मारा. २ ठसा.

**छापी**–स्त्री० चिलमीला लावण्याचें वस्त्र. २ वि० छापील.

**छापील**–वि० छापाचा. २ ठराविक. ३ ठशांतून काढलेला.

**छाया**–(सं) स्त्री० सावली. २ आश्रय.

**छावणी**–स्त्री० सैन्याची टोळी–तळ.

**छावा**–(सं) पु० हत्तीचें लहान पोर.

**छांदूं**–स्त्री० जादूटोणा वगैरे.

**छांदस–छांदिष्ट**–(सं) वि० नादी, लहरी.

**छिडकाव**–पु० तुषार, शिडकाव.

**छिद्र**–(सं) न० भोंक, छेद, वेध.

**छिन्न**–(सं) वि० तोडलेलें.

**छिन्नभिन्न**–(सं) वि० न समजण्यासारखें, अस्ताव्यस्त.

**छिनाल**–वि० लबाड, सोदी, शिंदळ.

**छिनावणें**–स० हिसकावून–काढून घेणें.

**छिपटी**–स्त्री० लहान छडी, शिपटी.

**छिलटा**–पु० तुकडा. २ कातडें, चर्म.

**छिलणें**–स० तासणें, तुकडे करणें.

**छिः**–के० निषेधार्थक अव्यय.

**छीट**–(सं) न० चित्रपट, चीट.

**छीथू**–स्त्री० फटफजिती, बोऱ्या, बेअब्रू.

**छू**–अ० एखाद्यावर कुत्रें घालावयाचें असल्यास हा शब्द योजितात.

**छेका**–(सं) पु० ठोकर.

**छेकापन्हुति**–(सं) स्त्री० अर्थालंकारविशेष.

**छेछे**–के० नाहीं, नव्हे.

**छेद**–(सं) पु० भोंक, तुकडा. २ कापणें, छेदन.

**छेदणें**–(सं) स० कापणें, तोडणें. २ भोंक पाडणें.

**छेदन**–(सं) न० कापा, कापणें, तोडणें.

**छेलछबेला**–वि० चैनी, आनंदी, फक्कड.

**छोटा**–वि० लहान, बारिक.

**छंद**–(सं) पु० फंद, वेड, नाद. २ वृत्त.

## ज.

**ज्या**–(सं) स्त्री० धनुष्याची दोरी.

**ज्यादा**–(आ) वि० ज्यास्त, फार, पुष्कळ, अधिक, बहुत, फाजील.

**ज्यापक्षीं**–क्रि० ज्यापेक्षां, ज्याअर्थी.

**ज्येष्ठ**–(सं) वि० मोठा, श्रेष्ठ. २ पु० तिसरा महिना.

**ज्येष्ठा**–(सं) स्त्री० अकरावें नक्षत्र.

**ज्येष्ठमध**–(सं) पु० ज्येष्टीमध, वनस्पतिविशेष, मुलेठी.

**ज्योति–त**–(सं) स्त्री० ज्वाला, प्रकाश, जाळ.

**ज्योतिष–ज्योतिःशास्त्र**–(सं) न० ताऱ्यांवरून केलेलें गणित, भविष्य काढण्याची युक्ति.

**ज्योतिषी**–(सं) पु० जोशी, गणक, ज्योतिःशास्त्रवेत्ता.

**ज्वर**–(सं) पु० ताप, बुखार, रोगविशेष.

**ज्वरांश**–(सं) पु० बारीक ज्वर, थोडा ज्वर.

**ज्वरी**–(सं) वि० ज्वरानें आजारी.

**ज्वलन**–(सं) न० जळणें, पेटणें. २ अग्नि, विस्तव.

**ज्वान–जवान**–(फा) पु० तरुण मनुष्य, उमेदवार, मर्द.

**ज्वानी**–(फा) स्त्री० तारुण्य, यौवन.

**ज्वार–री**–( **जोंधळा** पहा. )

**ज्वाल–ला–ळ**–(सं) स्त्री० ज्योत, जाळ.

**ज्वालाग्राही**–(सं) वि० लवकर पेट घेणारा, जलद पेटणारा.

**ज्वालामुखी**–(सं) वि० ज्यांत अग्नि निघतो तो पर्वत.

**ज**–हें ८ वें व्यंजन आहे: जन्मलेला–झालेला याअर्थी हें कित्येक शब्दांपुढें येतें.

**जई**–क्रि० ज्या वेळेस, जेव्हां, जधवां.

**जकात**–(आ) स्त्री० कर, महसूल, दस्तुरी.

**जकिरा–जकेरा**–(आ) पु० गाबाळ, सटरफटर, अडगळ.
**जखड–जरखड**–वि० म्हातारा, जुना, पुराणा.
**जखडणें**–स० आंवळणें, गच्च बांधणें.
**जखम**–(फा) स्त्री० घाव, घाय, दुःख, शोक.
**जखीण**–स्त्री० डंखीण, हाडळ, डाकण.
**जग**–(सं) न० विश्व, पृथ्वी, दुनिया.
**जगड्व्याळ**–(सं) वि० मोठें, अवाढव्य.
**जगणें**–अ० वांचणें, जिवंत राहणें, असणें.
**जगत्**–(सं) न० विश्व, दुनिया, जगती.
**जघन**–(सं) न० ओटी, कमर, कटिप्रदेश.
**जटा**–(सं) स्त्री० मस्तकावरील अव्यवस्थित केस, गुंतागुंत झालेले केस.
**जटाधारी**–(सं) वि० जटिल, जटाधारण करणारा, व्रती.
**जटामांसी**–(सं) स्त्री० वनस्पतिविशेष.
**जटिल**–(सं) वि० जटाधारी.
**जटेली–टीली**–वि० औषध बनविण्याची एक क्रिया.
**जठर**–(सं) न० उदर, पोट.
**जड**–(सं) वि० वजनदार, स्थूल. २ अचेतन. ३ स्त्री० मुळी. ४ वि० कठिण, आटोक्याबाहेर.
**जडणें**–(सं) अ० जोडणें, घडणें, चिकटविणें. २ खचणें, बसविणें. ३ लागणें.
**जडाव**–(सं) पु० मोल्यवान वस्तु, जोडलेला.
**जडी**–(सं) स्त्री० मुळी, मूळ.
**जणु**–(सं) के० जसें कांहीं, जणो.
**जणो**–(सं) के० जसें कांहीं, जणु.
**जत्रा**–(सं) स्त्री० यात्रा, मेळा.
**जतन**–(सं) न० रक्षण, संगोपन.
**जती**–(सं) पु० यति. २ जैन धर्मातील संन्यासी.
**जथणें**–(सं) अ० गोळा करणें, जमविणें.
**जथा**–स्त्री० टोळी, मंडळी, समुदाय.
**जधीं**–क्रि० जई, जेव्हां, ज्या वेळेस.
**जन्म–जन्मणें**–(सं) स० जन्म होणें, उपजणें, उत्पत्ति, संभव.
**जन**–(सं) पु० लोक, जगत्.
**जनक**–(सं) पु० बाप, उत्पन्न कर्ता. २ सीतेचा बाप.
**जनन**–(सं) न० जन्म, उत्पत्ति, उद्भव.
**जननी**–(सं) स्त्री० आई, माता.
**जनानखाना**–(फा) पु० स्त्रिया राहण्याची जागा, अंतःपुर.
**जनार्दन**–(सं) पु० विष्णूचें एक नांव आहे.
**जनावर**–(फा) न० गुरूं, ढोर, प्राणी, पशु.
**जप्त**–(आ) वि० जप्ती केलेलें, सभाळलेलें.
**जप्ती**–(आ) स्त्री० टांच, जप्त करण्याची क्रिया.
**जप**–(सं) पु० ध्यास, ध्यान, एखाद्या मंत्राची नियमित वेळां आवृत्ति.
**जपणें**–(सं) स० जप करणें. २ जतन करणें, राखणें, संभाळणें.
**जबडा**–पु० जाभाड, तोंड, गालफड.
**जबर–रा**–(आ) वि० मोठा, दांडगा, जबरदस्त, जास्त.
**जबरी**–(आ) स्त्री० जबरदस्ती, जुलूम.
**जबान**–(फा) स्त्री० जीभ. २ भाषण, उच्चार.
**जबानी**–(फा) स्त्री० तोंडी हकीकत.
**जबाब**–(फा) पु० जाब, उत्तर. २ दुरुत्तर, उलटून बोलणें.
**जम**–(आ) पु० जमाव, एकी, जुळणी.
**जमणें**–अ० गोळा होणें, एकत्र होणें. २ जुळणें, एकमत होणें, पटणें.
**जमदग्नि** (सं) पु० परशुरामाच्या बापाचें नांव. २ वि० रागीट.
**जमा**–(आ) स्त्री० मिळकत, प्राप्ति, सांठा, द्रव्य, आय.
**जमाखर्च**–(फा) पु० हिशोब, टांचण. २ आयव्यय.
**जमात**–(आ) पु० समुदाय, जमाव.

**जमादार**-(फा) पु० टोळीवरचा मुख्य.
**जमाबंदी** (फा) स्त्री० वसूल, उपज, उत्पन्न.
**जमाव**-पु० समुदाय, जमात.
**जमीन**-(फा) स्त्री० पृथ्वी. २ शेत.
**जमीनजुमला**-(फा) पु० शेतभात, मालमत्ता, वतनवाडी.
**जय**-(सं) पु० विजय, सिद्धि, यश.
**जयपत्र**-(सं) न० अजिंक्यपत्र.
**जयी**-(सं) वि० विजयी, यशस्वी.
**जर्जर**-(सं) वि० बेदम, दमलेला, दमविलेला.
**जर**-(सं) पु० ताप, ज्वर. २ जरी, कदाचित्, जेव्हां. २ (फा) सुवर्ण, सोनें.
**जरठ**-(सं) वि० वयातीत, म्हातारा, वृद्ध.
**जरत्कारू**-(सं) वि० अशक्त, रोगी, लुकडा.
**जरतार**-(फा) पु० कलाबतू.
**जरदा**-(फा) पु० खाण्याची तंबाखू. २ वि० पिवळा.
**जरब**-(आ) स्त्री० भीति, धास्ती, दहशत. २ वि० पक्का.
**जरबणें**-अ० भीति बाळगणें, धास्ती घेणें.
**जरा**-(सं) स्त्री० वृद्धापकाळ. २ क्रि० थोडें. थोडा वेळ पावेतों.
**जरा-जरासा**-क्रि० थोडासा, किंचित्.
**जरी**-(सं) उ० अ० यद्यपि. २ वि० सोन्याचें.
**जरीमरी**-(सं) स्त्री० महामारी, बाधा.
**जरूर-री**-(आ) स्त्री० आवश्यकता, गरज.
**जल्पणें**-(सं) अ० गर्व करणें, वमेंडी बाळगणें, वल्गना करणें.
**जल्पना**-(सं) स्त्री० व्यर्थ बडबड, गप्पा.
**जल**-(सं) न० पाणी, उदक, अंबु.
**जलतरंग**-(सं) पु० वाद्यविशेष.
**जलद**-(फा) क्रि० लवकर, झटकन, जलदी.
**जलधि**-(सं) पु० समुद्र, पाण्याचा सांठा, दर्या. २ संख्यास्थानविशेष. [तापट.
**जलाल**-(आ) वि० तिखट, चलाख, रागीट,
**जळुका**-(सं) स्त्री० जळू, रक्त शोपून घेणारे किडे.
**जलेल-ली**-(आ) स्त्री० जुलूम, जबरदस्ती.
**जलोदर**-(सं) न० रोगविशेष.
**जव**-(सं) पु० यव, सातु. २ वेग, त्वरा.
**जवखार**-(सं) पु० एक प्रकारचा खार आहे.
**जवखारणें**-स० गच्च बांधणें, जखडणें.
**जवस**-(सं) पु० अळशी, धान्यविशेष.
**जवळ**-क्रि० समीप, सन्निध. २ ब्राह्मण जातिविशेष.
**जवा**-(सं) पु० सांधा, जुव्वा. २ एक प्रकारचा दागिना आहे.
**जवाद**-(आ) वि० जास्त, अधिक.
**जवादी मांजर**-न० जनावरविशेष.
**जवान**-(फा) वि० तरुण, बांड. २ पु० पुरुष, इसम.
**जवाब**-(फा) पु० जबाब, उत्तर.
**जवारी**-स्त्री० सतारीची घोडी. २ ज्वारी, जोंधळे.
**जवाहिरी**-(आ) पु० जवाहीर विकणारा, जवाहिऱ्या.
**जवाहीर**-(आ) न० मौल्यवान रत्नें, माणकें वगैरे.
**जवी**-(सं) वि० जलद, चपळ.
**जस्त**-न० एक धातू आहे.
**जसा**-वि० ज्या प्रकारचा, जसला.
**जहर**-(फा) न० विष, विख. २ अतिकडु.
**जहागीर**-(फा) स्त्री० सरकारांतून दिलेली जमीन, ( **जाहगीर** पहा. )
**जहाज**-(फा) न० तारूं, गलबत.
**जहान**-(फा) न० जग, पृथ्वी.
**जहाल**-वि० जलाल, तिखट.
**जहांबाज**-वि० वस्ताद, हुशार, चलाख.
**जळ**-(सं) न० पाणी, उदक.
**जळण**-(सं) न० सर्पण, इन्धन, लांकडें, गवऱ्या.

**जळणें**–(सं) अ० भाजणें, पोळणें, पेटणें. २ तरफडणें.

**जळजळणें**–(सं) अ० खवखवणें, आग होणें, क्रोध–ज्वर यांनीं संतप्त होणें.

**जळफळणें**–अ० संताप करणें, रागावणें.

**जळबंब**–वि० जळतुंब, जळमय.

**जाई**–(सं) स्त्री० लताविशेष, चमेली, जाति. २ जायफळ.

**जाऊ**–स्त्री० दिराची बायको, बाई.

**जाग**–(सं) स्त्री० जागृतावस्था.

**जागणें**–(सं) अ० जागें राहणें, जाग्रण करणें, जागृत राहणें.

**जागतीज्योत**–(सं) स्त्री० जागरूक, सावध.

**जागरूक**–(सं) वि० जागा, सावध.

**जागसूद**–(सं) वि० सावध. २ जागता.

**जागा**–(सं) वि० सावध. २ स्त्री० स्थळ. ३ नोकरी.

**जागोजाग**–क्रि० ठिकठिकाणीं.

**जाच**–पु० त्रास, छळणूक, तसदी, जाचणूक.

**जाचणें**–स० छळणें, त्रास देणें. २ नडणें.

**जाचणूक**–स्त्री० ( **जाच** पहा. )

**जाज्वल्य**–(सं)वि० रागीट, भयंकर, कडकडीत.

**जाजम**–न० बिछाईत, अनेक लोकांस बसण्याजोगें आसन.

**जाजती**–(आ) वि० जास्ती, फार.

**जाट**–पु० रजपूत लोकांतील एक जात.

**जाड्य**–(सं) न० जडत्व. २ अपचन.

**जाड**–(सं) वि० जाडा, जाडगा, लठ्ठ, आकारानें–शरीरानें मोठा.

**जाडी**–(सं) स्त्री० जाडपणा. २ वि० जाड.

**जाणणें**–(सं) स० समजणें, माहीत असणें.

**जाणून बुजून**–क्रि० मुद्दाम, समजून उमजून, बुद्ध्या.

**जाणें**–अ० गमन करणें. २ संभोग करणें.

**जात**–(सं) स्त्री० ज्ञात, जाति. २ प्रकार, तऱ्हा.

**जातक**–(सं) न० ज्योतिषशास्त्रांतील एक विषय.

**जातखुद्द**–क्रि० स्वतः, खुद्द.

**जातवेद**–(सं) पु० अग्नि, विस्तव, आग.

**जातिवंत**–(सं) वि० कुलीन, संभावित.

**जाथू**–वि० कायमची, नेहमींची.

**जादा**–(आ) वि० जास्त, फाजील, जाफा.

**जादू**–(फा) स्त्री० चलाखी, चेटूक, इंद्रजाल.

**जादूटोणा**–पु० छाछू, चेटूक.

**जान्हवी**–(सं) स्त्री० गंगानदी.

**जानवसा**–पु० परगांवाहून आलेल्या वऱ्हाडाची उतरण्याची जागा.

**जानवें**–(सं) न० यज्ञोपवीत.

**जानु**–(सं) पु० गुडघा.

**जानोसा**–पु० ( **जानवसा** पहा. )

**जाफरा**–(आ) न० केशर, कुंकुम.

**जाफा**–(आ) वि० जास्ती, अधिक.

**जाब**–(फा) पु० जबाब, जबानी, उत्तर.

**जाबता**–(आ) पु० अमल, नजर, देखरेख.

**जाबसाल**–(फा) पु० प्रत्युत्तर, उलटून बोलणें.

**जाबाड**–न० जाभाड, जबडा.

**जाभाड**–न० तोंड, जबडा.

**जामदार**–(फा) पु० मुनीम, खजीनदार.

**जामा**–(फा) पु० झगा, मोठा अंगरखा.

**जामात**–(सं) पु० जांवई, जमाई.

**जामीन**–(आ) पु० ओळख, हमी. २ खात्री–ओळख देणारा.

**जायपत्री**–(सं) स्त्री० पत्री, जायफळावरची साल.

**जायफळ**–(सं) न० फळ व वनस्पतिविशेष.

**जायबंदा**–(फा) वि० निकामी, निरुपयोगी, जाया.

**जावळ**–न० लहान मुलाच्या डोक्यावरील केस.

**जाया**–(सं) स्त्री० बायको, विवाहित स्त्री, भार्या. २ (फा) वि० जायबंदी, निरुपयोगी.

जार-(सं) पु० यार, जिवलग, मित्र,सोयरा.
जारण-(सं) न० वैद्यकोक्त प्रयोगविशेष.
जारिणी-(सं) स्त्री० बदकर्मी स्त्री, कुलटा, छिनाल.
जारी-(फा) क्रि० चालू, सुरू. २ जोरानें सपाट्यानें.
जाल-(सं) न० घरटें, वेष्टन, जाळें.
जालिम-(आ) वि० जलाल, तीक्ष्ण.
जावक-वि० जाणारा, जाण्याचा.
जावत-(सं) क्रि० जोंपर्यंत, जावत्काल, जों-पावेतों.
जास्त-जास्ती-(आ) वि० पुष्कळ, पुरेसें, रगड, लइलूट.
जास्वंद-सुंद-(सं) स्त्री० एक फुलझाड व त्याचें पुष्प.
जासूद-(आ) पु० हलकारा, शिपाई,जाण्या-येण्याचें काम करणारा. हेर, टपाल पोंच-विणारा.
जाहंबाज-(फा) वि० पक्की, हुशार, हें वि-शेषण स्त्रियांविषयीं वापरतात.
जाहिरात-(आ) स्त्री० दंवडी, जाहिरनामा.
जाहीर-(आ) वि० प्रसिद्ध, मालूम,कळलेलें.
जाळ-(सं) स्त्री० ज्योत, ज्वाळा.
जाळणें-(सं) उ० वि० भाजणें, पेटविणें. २ त्रास देणें.
जाळवात-(सं) पु० रोगविशेष.
जाळी-(सं) स्त्री० खिडकी, बारी, झरोका. २ एक प्रकारचें विणकाम. ३ फुलांचा रचनाविशेष. ४ भोंवऱ्याभोंवतीं गुंडाळ-ण्याची दोरी. ५ झाडांची गर्दी.
जाळें-(सं) न० घरटें, अटकाव, अडथळा. २ जळमूट.
जांग-जांघ-(सं) स्त्री० मांडी, जंघा.
जांगड-वि० परत बोलीचा.
जांतण-(सं) न० जातें, जांतणी.
जांब-पु० पेला. २ फळविशेष.
जांभळा-(सं) वि० जांभळाच्या रंगाचा.
जांभूळ-(सं) न० एक प्रकारचें फळ.
जांवई-(सं) पु० (जामात पहा.)
जिक-(आ) वि०त्रासलेला,कंटाळलेला, दिक.
जिकडे-क्रि० ज्या जागीं, ज्या बाजूस.
जिकडेतिकडे-क्रि० सर्व ठिकाणीं, सर्व बाजूंस, सर्वत्र.
जिकीर-(आ) स्त्री० त्रास, कटकट, घा-सावीस.
जिगीषा-(सं) स्त्री० जिंकण्याची इच्छा, चढाओढ.
जिज्ञासा-(सं) स्त्री० माहिती मिळविण्या-ची इच्छा.
जिणें-(सं) न० जिवंत राहणें, अस्तित्व, जनन, जन्म.
जिन्नब-न० जमिनीचें उत्पन्न.
जित-(सं) वि० जिंकलेला, पराजय के-लेला.
जितका-वि० जेवढा, जो कोणी, जितपत.
जितखोर-वि० तिडतिड्या, चिडखोर.
जितणें-(सं) स० जिंकणें, पराभव करणें.
जिता-(सं) वि० जिवंत, न मेलेला, सजीव.
जिथचा-वि० जेथील, जिथला, ज्या ठि-काणचा.
जिथून-क्रि० ज्या ठिकाणापासून. जेथून.
जिथें-क्रि० वि० ज्या ठिकाणीं, जेथें.
जिद्द-(आ) स्त्री० पैज, अट. २ हट्ट.
जिन्नस-(आ) स्त्री० वस्तु, पदार्थ.
जिन-(सं) पु० जैनधर्मप्रवर्तक, बुद्ध.
जिनगर-(फा) पु० खोगीर तयार करणा-रा. चित्र बाहुल्या इत्यादि करणारा.
जिनगी-स्त्री० मालमत्ता.
जिना-(फा) पु० दादर, माडीवर चढून जाण्याचा मार्ग.

**जिभली**-(सं) स्त्री० जीभ, जिव्हा.
**जिम्मा**-(आ) पु० हवाला, जबाबदारी.
**जिम्मेदार**-(आ) पु० जबाबदार.
**जिरणें**-(सं) अ० पचणें, पचन होणें. २ मुरणें.
**जिरविणें**-(सं) स० पचविणें. २ मुरविणें.
**जिराईत**-(आ) न० किर्दसार, लागवडीचा, पावसाच्या पाण्यानें होणारें उत्पन्न-पिकणारें शेत.
**जिरी-जिरें**-(सं) न० जीरक.
**जिलहई**-(आ) स्त्री० तकतकी, मुलामा.
**जिल्हा**-(आ) पु० परगणा, प्रांत, इलाख्यापैकीं एक भाग. २ पोटभाग.
**जिलबी-जिलेबी**-स्त्री० पक्वान्नविशेष.
**जिलीब**-(आ) स्त्री० स्वारी, लवाजमा, डामडौल.
**जिव्हा**-(सं) स्त्री० जीभ, जिभली, जबान.
**जिव्हार**-न० मर्म, काळीज.
**जिव्हाळा**-पु० माया. २ झरा. ३ मर्म.
**जिव्हाळी**-स्त्री० मुख्यत्वें नखाच्या मांसाची जखम, प्राणघातक खोंच.
**जिवती**-(सं) स्त्री० एक देवता आहे.
**जिवाणूं**-(सं) न० जीव, जंतु, विषारी प्राणी.
**जिष्णु**-(सं) वि० नेहमीं जिंकणारा. २ पु० इंद्र. ३ अर्जुन.
**जिंकणें**-(सं) स० पराभव, पराजय करणें.
**जिंदगी-जिनगाणी**-(फा) स्त्री० जिनगी, मालमत्ता, संपत्ति. २ जिणें.
**जी**-ओ देण्याचा एक प्रकार आहे.
**जीत**-(सं) स्त्री० सरशी, जय, पराक्रम.
**जीन**-(सं) न० खोगीर, पलाण.
**जीभ**-(सं) स्त्री० जिभली, जिव्हा. २ व्यर्थ बडबड, भाषण. ३ अलगुजाला पाडलेली पायरी.
**जीमूत**-(सं) पु० मेघ, वादळ, अभ्र.
**जीर्ण**-(सं) वि० पुराणें, जुनें, फाटकें, फाटण्याजोगें. २ जिरलेलें, पचलेलें.
**जीव**-(सं) पु० प्राण. २ जंतु. ३ मति, मन, ध्यान.
**जीवत्-जीवंत**-(सं) जीव असलेला.
**जीवन**-(सं) न० पाणी. २ अन्न. ३ उद्योग, जीवनोपाय.
**जीवलग**-(सं) वि० जीवश्चकंठश्च, मित्र, दोस्त.
**जीविका**-(सं) स्त्री० उपजीविका. २ जीवन, प्रपंच, जीवित, जीवित्व.
**जुई**-(सं) स्त्री० सुवासिक पुष्पांची एक लता.
**जुकड-जुकाड**-न० जूं, जोखड.
**जुगणें**-अ० जुळणें, जुडणें, कबूल करणें, समजूत होणें.
**जुगार**-स्त्री० जुव्वा, पैसा लावून खेळणें.
**जुगारी**-वि० जुव्वेबाज, जुगार खेळणारा.
**जुगत**-(सं) स्त्री० युक्ति, कल्पना, क्लृप्ति.
**जुजबी**-(फा) वि० हलकें, थोडें, लहान, किरकोळ. २ क्रि० हळू हळू, बाताबेतानें.
**जुटणें**-अ० ( जुगणें पहा. )
**जुटी**-स्त्री० जूट, एकी, ऐक्य.
**जुडगा-गे**-पु० भारी, समुदाय, जुडा, संमीलन.
**जुडणें**-(सं) अ० जुटणें, जडणें, घडणें, होणें, मिळणें.
**जुती**-स्त्री० जोडा, खेटर, पायपोस, पैजार.
**जुदा**-(फा) वि० निराळा, अलग, वेगळा.
**जुनवट**-वि० जुना, पुराणा, प्राचीन, जुनाट.
**जुनावणें**-अ० जुना होणें, मुरणें.
**जुनेर-रें**-न० जुनें वस्त्र.
**जुपणी**-स्त्री० जुपण्याचें साधन.
**जुमला**-(आ) पु० रोख पैसा, रक्कम, रोकड, एकंदर.

**जुमानणें**-(फा) मानणें, भीड धरणें, मोजणें.
**जुलमाचा रामराम**-(आ) पु० जुलूम होईल या भीतीनें रामराम करितात तो. २ नाखुषीनें-बलात्कारानें करविलेलें काम.
**जुलाब**-(फा) पु० रेचक, ढाळक. २ विष्ठा.
**जुलूम**-(आ) पु० जबरदस्ती, बळजबरी.
**जुवा-व्वा**-पु० जुगार. २ कवडी, फासा.
**जुळणें**-उ०वि० मिळणें, जुटणें,घडणें,जुगणें. २ एके ठिकाणीं व्यवस्थित लावणें.
**जुळा**-वि० जुळून झालेला, जोडलेला, जोडीचा, आवळाजावळा.
**जुळी**-स्त्री० जोड, जुडी.
**जुळें**-न० द्वंद्व, जोडी, आवळीजावळीं मुलें.
**जुंजणें-झुंजणें-झुंझणें**-(सं) अ० भांडणें, लढणें, झोंबीस येणें.
**जुंझ-झुंज-झुंझ**-स्त्री० लढाई, झोंबी, कुस्ती.
**जुंझार-जुंजार**-पु० योद्धा, खिलाडू, लढाऊ.
**जुंपणें**-स० जोडणें, कामास लावणें. २ न० जुंपणी, जुंपण. ३ भांडण लागणें.
**जूग**-(सं) न०शरीर. २जोड, जोडणी, ऐक्य.
**जूट**-(सं) पु० ऐक्य. २ मंडळी, टोळी.
**जून**-(सं) वि० निबर, रांठ. २ पु० इंग्रजी साहावा महिना.
**जूं**-(सं) न० जुंव, जंव. जोखड.
**जंजाल**-पु० जंजाळ,त्रास. २ गोंधळ,धांदल.
**जेठी**-(सं)पु० पेलवान,मल्ल,वस्ताद,लढवय्या.
**जेथ**-क्रि० जेथें, ज्या ठिकाणीं.
**जेथचा**-वि० जेथला,जेथील,ज्या ठिकाणचा.
**जेथपर्यंत**-क्रि० जोंपावेतों, जोंवर.
**जेथून**-क्रि० जिथून, जेथोन, जेथपासून.
**जेथें**-क्रि० ( जेथ पहा. )
**जेधवां**-क्रि० जेव्हां, ज्या वेळेला.
**जेमतेम**-क्रि०जसें तसें, कसें तरी.
**जेर**-(फा) वि० अशक्त, निर्बल, दुर्बल, लचापेचा. २ खालचा.
**जेरबंद**-(फा) पु० मोहरा आणि तंग यांना जोडलेली वादी-दाल इत्यादि.
**जेवढा**-वि० जितका, ज्या आकाराचा.
**जेवण**-(सं) न० अन्न, खाणें, भोजन, स्वयंपाक.
**जेवणें**-(सं) अ० भोजन करणें, खाणें, क्षुधा शांत करणें.
**जेवीं**-क्रि० जसें, ज्या प्रकारचें, जैसें.
**जेव्हां**-क्रि० ( जधवां पहा. )
**जैं**-क्रि० जेव्हां. २ उ० जर, ज्या पक्षीं, ज्या अर्थी.
**जैसा**-सर्व० ज्या प्रकारचा, जसा.
**जो**-सर्व० अमका, फलाणा, ज्याची खूण पुढें सांगितलेली असते तो.
**जोकड-जोखड**-न० ( जूं पहा. )
**जोखणें**-स० मापणें, वजन करणें, अदमास करणें.
**जोखीम**-स्त्री० जोखम, जबाबदारी, जिम्मा.
**जोग**-(सं) पु० योग, वैराग्य.
**जोगता-जोगा**-(सं) वि० योग्य, लायक, बेताचा.
**जोगतीण**-स्त्री० बैरागीण. २ एलम्मादेवीला वाहिलेली स्त्री.
**जोगविणें**-उ० वि० ऊर्जा ठेवणें, जपणें, चारणें, चरणें.
**जोगी**-(सं) पु० योगी, बैरागी, साधू, विरक्त. २ स्त्री० रागिणीविशेष.
**जो जो**-सर्व० जो कोणी. २ स्त्री० झोंप. ३ क० अंगाई.
**जोट-ट**-पु० जोडें कापड.
**जोड**-पु० सांधा. २ जोडी. ३ मिळकत, फायदा. ४ मध्यमाच्या दोन तारा.
**जोडणें**-सांधणें, मिलाफ करणें, जुळविणें. २ जुंपणें.
**जोडपें**-न० जोडी, जोड, नवराबायको.

**जोडवें**–न० बोटांत घालण्याचा एक दागिना.
**जोडा**–पु० पायपोस. २ जोडी, नरमादी, नवराबायको.
**जोडाक्षर**–(सं) न० जोडलेलें अक्षर, जोड अक्षर.
**जोडी**–स्त्री० युग्म, दोहोंची सांगड, जोड. २ मुद्दल.
**जोत**–न० जूं, नांगर. हळ. २ स्त्री० प्रकाश, ज्योति.
**जोतें**–न० पाया व इमारत यांच्या मध्यें असते ती दगडाची रचाई.
**जोपा**–स्त्री० संरक्षण, ऊर्जा, पालन.
**जोबन**–न० कुच, स्तन, थान, छाती.
**जोम**–पु० दम, जोर, अवसान, ज्वानी.
**जोमदार**–वि० जोम असलेला, बळकट.
**जोर**–(फा) पु० ताकद, दम, जोम, शक्ति, सामर्थ्य, बळ.
**जोरा**–(फा) पु० अधिकार, हक्क, अखत्यार, जबरी.
**जोरावर**–(फा) वि० शीरजोर. जबरदस्त.
**जोशी**–(सं) वि० ज्योतिषी, भविष्य सांगणारा.
**जोहर**–(आ) न० जोहार, रत्न. जवाहीर.
**जोहार**–पु० लहानांनीं मोठ्यास वंदन करण्याचा शब्द : प्रायशः या शब्दाचा उपयोग महार करितात.
**जों**–क्रि० जेथपर्यंत, जोंवर.
**जों जों**–क्रि० जसजसा.
**जोंधळा**–(सं) पु० जवार, यावनाल, ज्वारी. २ ज्वारीचें शेत.
**जोंवर–री**–क्रि० जोंपावेतों, जोंपर्यंत.
**जंग**–(फा) पु० युद्ध. २ गंज, कळंक, काट, मैल.
**जंगणें**–अ० गंजणें, कळंक येणें.
**जंगम**–(सं) वि० चल. २ जातिविशेष.
**जंगल**–(सं) न० अरण्य, रान, वन, अटवी.
**जंगी**–(फा) वि० मोठा, अवाढव्य. विस्तीर्ण, दांडगा.
**जंघा**–(सं) स्त्री० मांडी, पट, कमरेपासून गुढग्यापर्यंतचा भाग.
**जंजाळ**–पु० व्याप, त्रास.
**जंजिरा**–(फा) पु० समुद्रांतील किल्ला.
**जंजिरी**–(फा) स्त्री० सांखळ, सांखळी.
**जंत्री**–(सं) स्त्री० अनुक्रमणिका, क्रम.
**जंत**–(सं) पु० क्रिमि, किडा, जीव. कृमि.
**जंबिया–जंब्या**–पु० शस्त्रविशेष.
**जंबीर**–(सं) न० फलविशेष, लिंबांची एक जात.
**जंबूक**–(सं) पु० कोल्हा, शियाल.
**जंव**–(सं) क्रि० जोंपर्यंत.

---

## झ.

**झयाझया**–घोड्यास गति यावी ह्मणून त्यास ह्या शब्दानें हांकतात.
**झ**–नववें व्यंजन.
**झक्क**–वि० चक्क, लख्ख.
**झक**–स्त्री० माशी. २ वि० चकचकीत, चक्क, छानदार.
**झकणें**–अ० गढणें, फसणें, चकणें, चुकणें.
**झकत**–क्रि० झक मारीत, आपल्या आपण, गडबड न करितां.
**झक मारणें**–अ० चुकणें, शेण खाणें, मूर्खाप्रमाणें वर्तन करणें.
**झकाकणें**–अ० ( **चकाकणें** पहा. )
**झकाकी**–स्त्री० चकाकी, झाकी, तेज.
**झगडणें**–अ० भांडणें, लढणें. २ न० झगडा, युद्ध, भांडण, तंटा.
**झगडा**–पु० भांडण, जाबजबाब.
**झगरें**–न० गोवऱ्यांचा मोठा विस्तव.

**झगा**–पु० पायघोळ आंगरखा, कंचुक, जुबा.
**झट**–क्रि० लौकर. २ न० लचांड.
**झटकणें**–अ० झाडणें, झडपणें. २ निघणें.
**झटकन–कर–दिशीं–दिनीं**–क्रि० पटकन.
**झट्कारणें**–उ० वि० (**झिटकारणें** पहा.) २ झटका, झटकारा, राग.
**झटकारा**–पु० झपाटा, नखरा. २ राग.
**झटणें**–अ० मेहनत घेणें, कामास जाणें, काम करणें, श्रमणें.
**झटपट–कन–दिनीं–दिशीं**–क्रि० लवकर, जलदी. जलद.
**झड**–स्त्री० एकसारखा पाऊस, पावसाची रिपरिप. २ झडी, झिंबड, धाड.
**झडणें**–अ० पडणें, नाहींसा होणें, गळून जाणें. ३ छकड चालणें.
**झडती**–स्त्री० बारिक शोध, तपास, झाडा, हिशेब, हिशोब.
**झडप**–स्त्री० उडी, उड्डाण. २ पगड. ३ दाराच्या फळ्यांपैकीं प्रत्येक.
**झडपणें**–स० वारा घालणें, पंखा हालविणें, भाता फुंकणें.
**झडी**–स्त्री० ( **झड** पहा. )
**झणका**–पु० रागाचा झटका.
**झणकारा**–पु०वेग, रागाचा झपाटा.
**झणझणणें**–अ० तिखट लागणें, मिर्च्या लागणें, आग होणें व दुखणें. २ झण-झण वाजणें.
**झणाणणें**–अ० ( **झणझणणें** पहा. )
**झणत्कार**–(सं) पु० टणत्कार, दणका, धनुष्याची दोरी ताणल्यावर आवाज होतो तो.
**झणी**–क्रि० सत्वर, लौकर.
**झपाटणें**–स० भूत लागणें. २खाऊन टाकणें, संपविणें.
**झपाटा**–पु० भुताचा संचार, सपाटा. २ एक सारखे केलेले श्रम, सपाटा,तडाका.
**झबलें**–न० डगलें, डगला, मुलांकरितां केलेला आंगरखा.
**झरझर**–क्रि० झरझरा, झरारा, लौकर, पटदिनी, पटदिशीं.
**झरझरां**–क्रि० ( **झरझर** पहा. )
**झरझरी**–स्त्री० गुडगुडीची नळी, गुडगुडी.
**झरझरीत**–( **झिरझिरीत** पहा.)
**झरणें**–अ० पाझरणें. संपण्यास लागणें, पाघळणें, गळणें.
**झरवणी**–स्त्री० अरून सांचलेला पदार्थ.
**झरा**–(सं) पु० टाकें, झिरा, पाण्याची वाट. २ विहीर इत्यादि जलाशयांस लागलेलें पाणी.
**झरोंका–खा**–पु० हवेकरितां ठेविलेलें छिद्र.
**झवणें–झंवणें**–स० चोदणें, संभोग करणें.
**झवतरोड**–वि० रोडका, बारीक, अशक्त, मुडामा, जरत्कारू.
**झवाडणें**–स० झवाडपट्टी काढणें, खरड काढणें, हजामत करणें. फजिती करणें.
**झवाडपट्टी**–स्त्री० खरड, खरडपट्टी.
**झवाडी**–स्त्री० छिनाल, शिनळ.
**झळ–झळई**–स्त्री० उष्णता, शेक, नुकसान, वाफारा, गरम वारा.
**झळक**–वि० चकचकित, प्रकाशमान, उज्वळ, उजळ, झळझळीत. २ स्त्री० चकाकी, प्रकाश.
**झळकणें**–अ०प्रकाशणें,तेज येणें,सतेज होणें.
**झळझळीत**–वि० साफ, झळक,झळकफळक.
**झळवणी**–न० उन्हांत तापलेलें पाणी.
**झाऊ**–पु० वृक्ष विशेष. २ वि० तकलादि, नाजुक, कमजोर.
**झाक–झाकी**–स्त्री० शान, छान, छानी. २ चकाकी. ३ छटा, किंचित् अंश.
**झाज**–(फा) न० जहाज, गलबत, तारूं, मचवा, तिरकटी.

**झाड**–न० वृक्ष, तरु, दरख्त, पेड.
**झाडझूड**–स्त्री० केरकचरा काढणें. २ लतागुल्म, झाडझुडूप.
**झाडणें**–स० झटकणें, साफ करणें, मेल नाहींसा करणें.
**झाडा**–पु० जुलाब, मलविसर्जन. २ झडती, निकाल, शेष न उरविणें.
**झाडी**–स्त्री० झाडांची गर्दी, दाट झाडें.
**झाडू**–स्त्री० केरसुणी, मार्जनी, झाडणी. २ पु० झाडणारा, भंगी.
**झार–झारा**–(फा) पु० नादविशेष, आवाज. २रवा. ३स्वयंपाकाचें एक अवजार.
**झारी**–स्त्री० तोटी असलेला गडू.
**झारेकरी**–पु० शोधणारा, सोनाराची राख वगैरे गाळून सोन्यारुप्यांचे कण काढणारा.
**झालर**–स्त्री० मगजी, गोंगा, शेवट, कांठ.
**झावळी**–स्त्री० नारळाच्या झाडाची फांदी, पात–ती, सांवळी.
**झाळणें**–स० डाक लावणें, जोडणें, सांधणें.
**झांक**–स्त्री० तेज, सफाई. २ मरगळ, आळस, झापड. ३ छटा. ४ डौल. ऐट.
**झांकण**–न० आच्छादन, आवरण, झांपण, झांकणी.
**झांकणें–झाकणें**–स० आच्छादून ठेवणें, लपविणें, आड करणें. २ लावणें, मिटणें.
**झांकलेंमाणिक**–न० ज्याचा गुण लोकांस कळला नाहीं असा.
**झांगड**–स्त्री० पुष्कळ वाद्यांचा आवाज.
**झांज–झांजरी**–स्त्री० एक प्रकारचें टाळासारखें वाद्य.
**झांट–झाट**–न० शप्प, शेंट, शिश्नावरचे केश, कुसळ.
**झांप**–पु० चटईसारखी विणलेली नारळाची सांवळी. २ स्त्री० झांपड.
**झांपा**–पु० काड्यामोड्यांचा दरवाजा, फटका.
**झिजणें**–अ० कमती होणें, झरणें, गळणें.
**झिजविणें**–स० घासून घासून कमती करणें, नाश करणें, व्यर्थ जाऊं देणें.
**झिटकारणें**–स० अपमान करणें, धिक्कारणें.
**झिपरी**–स्त्री० बट, आंखुड केस.
**झिम्मड**–स्त्री० ( **झड** पहा. )
**झिमझिम**–वि० थोडथोडा, बारिक थेंबाचा, झिरिमिरी.
**झिरझिरीत**–वि० फाटकें, अति पातळ, विरळ.
**झिरणें**–अ० ( **झरणें** पहा ).
**झिरपणें**–अ० पाझरणें, गळणें, झरणें.
**झिरा**– पु० ( **झरा** पहा. )
**झिरिमिरी**–वि० थोडथोडा, झिमझिम, बारिक थेंबांचा.
**झिरुमिरु**–वि० अति अशक्त, रोगी, कृश.
**झिलई**–स्त्री० तकाकी, सफाई, चकाकी, तेज, झील.
**झिंगणें**–अ० कैफ चढणें, अम्मल येणें.
**झिंजी**–स्त्री० झिटी, झिंजोटी, बट, झिपरी.
**झिंजोटी**–स्त्री० रागिणीविशेष.
**झीज**–स्त्री० नुकसान, खराबी, नाश. २घस.
**झीट**–स्त्री० घेरी, अंधेरी, चक्कर.
**झील**–स्त्री० झिलई. २ ध्रुवपद, पालुपद.
**झील ओढणें**–अ० ध्रुवपद–पालुपद म्हणणें २ हांजी हांजी करणें, अनुवाद करणें.
**झुकणें**–अ० वांकणें, कलणें, डुलणें, वळणें.
**झुकविणें**–स० वांकविणें, कलविणें, डुलविणें, फसविणें.
**झुकांडी–झुकाटी**–स्त्री० झोंकांडी, रस्त्यासंबंधी फसवणूक.
**झुगारणें**–स० फेंकणें, उडविणें.
**झुडुप–डूप**–न० लहान झाड, खुरटें झाड, मोठें न होणारें झाड.
**झुणका**–पु० आळण, पिठलें, बेसन.

**झुणा**–पु० लहान परकर. २ लहान घागर. ३ एक प्रकारचें गवत.

**झुबका–पका**–पु० गुच्छ, पुष्पांचा समुदाय, घोंस.

**झुरका**–पु० धुराचा गुटका, धुराचा घोंट.

**झुरणी**–स्त्री० क्षय. २ चिंता, काळजी.

**झुरणें**–अ० पाझरणें. २ चिंता–काळजी करणें.

**झुराबावरा**–वि० रंगेल, इष्की.

**झुलणें**–अ० डोलणें, डुलणें.

**झुलवाझुलव**–स्त्री० लबाडी, थापाथापी, फसवाफसव.

**झुलविणें**–स० नादीं लावणें, फसविणें.

**झुला**–पु० झोपाळा, हिंदोळा.

**झुलूप**–(फा) न० कानावरील डोक्याचे केस.

**झुळूक**–स्त्री० मंदगति वायु, माफक वायु.

**झुंज**–स्त्री० मुख्यत्वें बैलांची–गाईची–म्हशींची टक्कर, लढाई.

**झुंजणें–झुजणें**–अ० भांडणें, लढणें, कुस्ती करणें.

**झुंजविणें**–स० भांडविणें, लढविणें.

**झुंजार**–वि० योद्धा, विशेष शौर्याचा, लढाऊ.

**झुंजारराव**–पु० चांगल्या योद्ध्याची ही पदवी आहे. २ मोठा लढाऊ.

**झुंजूमुंजूं**–क्रि० पहाटेस, झुंजुरका.

**झुंजुरका**–क्रि० पहाटे, प्रातःकाळीं.

**झुंड**–स्त्री० टोळी, मंडळी, जमाव.

**झूज–झ**–स्त्री० ( **झुंज** पहा. ) लढाई, टक्कर, कुस्ती वगैरे.

**झूट**–वि० खोटें, लबाड, असत्य, मिथ्या.

**झूल**–स्त्री० जनावरावर घालण्याचें वस्त्र.

**झेलणें**–स० पकडणें, धरणें, वरच्यावर धरणें.

**झेला**–पु० गुच्छ, झुबका, पुष्पांचा तुरा. २ आंबे वगैरे उतरण्याचें हत्यार, खुडी.

**झेंगट**–न० संकट, लचांड, बखेडा, तंटा, झोंबट.

**झेंडा**–पु० निशाण, ध्वज.

**झेंप**–स्त्री० उडी.

**झेंपणें**–अ० आटोक्यांत येणें, अदमास असणें.

**झोका–झोंका–झोकांडी**–सुंवाल्या ( **झुकांडी** पहा. )

**झोज्या**–वि० भश्चोट, झोझ्यामल्हार.

**झोटिंग**–वि० लफंगा. २ पिशाच्च.

**झोटिंगपाच्छाई–पादशाही**–स्त्री० अंदाधुंदी.

**झोड**–स्त्री० सरीवर सरी, रगड पाऊस, खूप पर्जन्य.

**झोडणें–झोडपणें**–स० पाडणें. २ **मारणें.** ३ रिकामें करणें, संपविणें.

**झोल**–पु० घोळ, कोंम, सोगा, झोळ.

**झोला**–पु० थाप, गप्प. २ झोपाळा.

**झोळ**–पु० घोळ, सोगा.

**झोळी**–स्त्री० **झोळणा**–पु० रुमालाच्या ४ कोपऱ्यांच्या परस्परास गांठी दिल्या म्हणजे होणारी पिशवी, उलटी अंबारी.

**झोंक**–(फा) पु० ओघ, रोख, हेतु, विचार. २ ऐट, छान.

**झोंकणें**–स० सोडणें, सांगणें, फेंकणें. २ मद्य पिणें.

**झोंकदार**–वि० ऐटबाज, फक्कड, छानदार.

**झोंट–झोटिंग**–वि० निर्लज्ज, रांडपोर व घर नसलेला, बेपर्वा.

**झोंड**–वि० तिस्मारखान, अरेराव, बाजीराव, टिकोजीपंत.

**झोंप–झोप**–स्त्री० निद्रा, ग्लानि, नीज.

**झोंपडी–डें**–स्त्री० न० काड्यामोड्यांचें घर, लहान घर, आश्रम, पर्णकुटी.

**झोंपाळा**–पु० ( **झुला** पहा. )

**झोंबट**–न० ( **झेंगट** पहा. )

**झोंबणें**–अ० मस्ती करणें, लढणें, भांडणें, हस्तप्रसंग करणें.

**झोंबी**–स्त्री० मनुष्यांची झुंज, कुस्ती, झटणें.

**झंझावात**–(सं) पु० झपाट्याचा वारा, वावटळ, पर्जन्यासह वारा.

## ट.

**ट्याहां ट्याहां**–पु० अति लहान मुलाचें ओरडणें.

**ट**–अकरावें व्यंजन.

**टक्कर**–स्त्री० शिंगाच्या पशूंची ओंबी–झुंज. २ सामना, बरोबरी.

**टक्कल**–न० केश गेलेला मस्तकाचा भाग.

**टका–टका**–पु० हें मूळचें एका आण्याचें नांव होतें. २ पैसा, द्रव्य.

**टक्केटोणपे**–पु० दंगा, नाना त्रास, अडचणी, संकटें.

**टक**–स्त्री० एक सारखी दृष्टि, टकळी.

**टकटक**–क्रि० कटकट, टिकटिक, त्रास, एकसारखा आवाज.

**टकमक**–क्रि० चंचल दृष्टि, बावरी मुद्रा.

**टकल्या**–वि० टक्कल असलेला–पडलेला.

**टकली–लें**–स्त्री० लहान मस्तक, डोकी, टाळकें, माथा.

**टकळी**–स्त्री० एक सारखें मोठ्यानें बोलणें.

**टकोरा**–पु० ठोका, आवाज, नाद.

**टग्या**–पु० शिसें भरलेली मोठी कवडी. २ मोठा–दृढ–जंगी मनुष्य.

**टच**–स्त्री० सोन्याचा गुण, कस.

**टचका**–पु० तुणतुण्याच्या लावण्या म्हणण्यांतला झोंक, खटका. २ आघात.

**टचटचणें**–अ० गुबगुबीत होणें. लठ्ठ होणें, पूर्ण होणें.

**टणक–टणका**–वि० कठिण, दांडगा, भक्कम, मजबूत.

**टणकन–दिनी–दिशीं–कर**–क्रि० ( **चटकन** पहा. )

**टणटणा**–क्रि० भराभर, वरचेवर,पुनः पुनः.

**टणत्कार**–पु० धनुष्याची दोरी ओढल्यानें आवाज होतो तो.

**टप्पा**–पु० विश्रांतिस्थान, विसांवा घेण्याची जागा, घोडा इत्यादि बदलण्याचें स्थान. २ गाण्याचा एक प्रकार, ३ प्रांत, टापू.

**टप्पोर–पूर**–वि० मोठें, ठसठशित, ठळक.

**टपकणें**–अ० गळणें, पाझरणें, झरणें.

**टपका**–पु० ठपका, दोष, आरोप.

**टपणें**–अ० वाट पहाणें, दबा धरून बसणें.

**टपली**–स्त्री० चापटी, थप्पड.

**टपाल**–न० संदेशपत्र, डांक.

**टमटमीत**–क्रि० धट्टाकट्टा, निरोगी.

**टर**–स्त्री० फजेती, पच्ची, हुर्यो.

**टरकावणें**–स० फाडणें.

**टरंवटरंव–टरांव**–न० बेडकाचें ओरडणें.

**टरफल**–न० कवच, फोल, बाहेरील त्वचा.

**टरबूज**–न० खरबुजाची एक जात.

**टवका**–पु० आच्छादनाचा भाग, खपली.

**टवटवणें**–अ० प्रफुल्लित होणें, उत्तम होणें, उन्नतीस येणें, सुरेख होणें.

**टवटवी**–स्त्री० प्रफुल्लता, खबसुरती, तेज.

**टवळी**–स्त्री० एक शिवी, कारटी. २ करवंटी–करटी.

**टवळें**–न० समईचा वरचा भाग,वरचा भाग, ऊर्ध्व बाजू.

**टवाळ्या–टवाळक्या**–स्त्री० कुचेष्टा, थट्टामस्करी, उनाडक्या.

**टवाळ**–वि० उनाड.

**टहाळा**–पु० **टहाळी**–स्त्री० फांदी, खांदी, डहाळी.

**टळटळित**–वि० पूर्ण, तेजस्वी, पक्का, भर, स्पष्ट, ठळक.

**टळणें**–स० जाणें, न येणें, चुकणें.
**टाक**–पु० लेखणीचें अग्र. २ बिंदु. ३ छटाकाचा सोळवा हिस्सा.
**टाकणखार**–पु० क्षारविशेष.
**टाकणें**–स० सोडणें, काडी मोडणें. २ फेंकणें. ३ पानांत उरविणें. ४ वगळणें.
**टाकमटिका–कला**–पु० डामडौल, छानछोकी, नखरा. २ चुकारपणा, कुचराई.
**टाकळा–टांकळा**–पु० वनस्पतिविशेष.
**टाका–टांका**–पु० टांचा, शिवण.
**टाकाऊ**–वि० टाकण्याजोगा, सोडण्यालायक, त्याज्य.
**टाकी**–स्त्री० हौद, पाण्याचा सांठा, टाकें.
**टाकें**–न० अति लहान तळें, पाण्याचा सांठा, झरा, डोंगरांतील विहीर, टाकी.
**टाप–टांप**–स्त्री० घोड्याचा तळपाय, लाथ.
**टापटीप**–स्त्री० व्यवस्था, बेतबात, बंदोबस्त.
**टापशी**–स्त्री० शिरस्त्राणाला गुंडाळलेलें धोतर–वस्त्र. २ मूज.
**टापासटीप**–स्त्री० बेत, बेतामबेत.
**टापू**–पु० बेट. २ समुद्रांतील हद्द. ३ स्थान, प्रांत, टप्पा.
**टामटूम**–स्त्री० नगाऱ्याचा नाद, आवाज.
**टारगा**–वि० खुरटा, लहान, वामनमूर्ति, जळमाणूस, यःकश्चित्. २ चटोर, चावट.
**टाहळी**–स्त्री० डाहळी, फांदी, खांदी.
**टाहो**–पु० ओरड, ओरडणें.
**टाळ**–(सं) न० वाद्यविशेष.
**टाळकें**–न० तिरस्कारानें मस्तकास हा शब्द आहे, बोडकें, डोकें, माथा, शिर.
**टाळणें**–स० घालविणें, नाहींसा करणें, निवारणें, पार जाणें, चुकविणें.
**टाळा**–पु० नागा, नकार, नन्नाचा पाढा, चाल्या. २ दगळा, फांदी. ३ वरच्या जबड्याचा मध्य भाग.
**टाळाटाळ–ळी**–स्त्री० चुकवाचुकव, आळस, अळमटळम.
**टाळी**–(सं) स्त्री० हातावर हात मारिला म्हणजे जो ध्वनि निघतो तो. २ परस्परांचा बोलतांना एक मुद्दा.
**टाळू**–(सं) स्त्री० मस्तकाचा एक भाग.
**टाळें**–न० कुलूप, जोड्याचा तळ.
**टांकी**–(सं) स्त्री० पाथरवटाचें एक हत्यार.
**टांग**–स्त्री० ढांग. २ पाय.
**टांगणें**–स० लटकावणें, लोंबवणें.
**टांच–टाच**–स्त्री० तळपायाची चवड्या खेरीज राहिलेली बाजू. २ जोड्याच्या तळव्याची पाठीमागची बाजू. ३ दिवाणी खटल्याच्या हुकूमनाम्याची बजावणी.
**टांचण–टाचण**–न० टिपण, यादी.
**टांचणी**–स्त्री० टांचण्याचें सुईसारखें हत्यार.
**टांचणें–टाचणें**–स० टिपणें, लिहून ठेवणें. २ टांचा देणें.
**टांचळें**–न० टांचेला होणारा आजार.
**टांचा**–पु० टाका, शिवण.
**टांटोळा**–पु० केळीच्या पानाचा दांडा.
**टिकणें**–अ० रहाणें, वाचणें, दम धरणें.
**टिकला**–(सं) पु० टिका, टिक्का, टिळा.
**टिकली**–(सं) स्त्री० लहान टिक्का. २ वाटोळा लहान तुकडा.
**टिकविणें**–स० संभाळणें, राखणें. २ देणें.
**टिकाऊ**–वि० टिकण्याजोगा–जोगता–योग्य–लायक, मजबूत, दमदार.
**टिकाव**–पु० निभाव. २ पिकाव, कुदळ.
**टिकोजी**–पु० बाजीराव, कोणाचें कोण, हक्कदार.
**टिकोरणें–टिकोरें**–न० काठी, दांडकें, दांडा.
**टिकोरा**–पु० (टकोरा पहा.)
**टिचकी**–स्त्री० अंगुष्ठाच्या अटीनें तर्जनीनें केलेला प्रहार.

**टिचणें**–उ० वि० नेमणें, नेम धरणें, नेम साध्य होणें, नेमानें मारणें.
**टिटवी**–स्त्री० टिट टिट करणारा पक्षी.
**टिपका**–पु० ( **टिकला** पहा. ) २ थेंब.
**टिपण**–(सं)न०टांचण, यादी. २जन्मपत्रिका.
**टिपणें**–(सं) स० एक एक उचलणें घेणें. २ लिहिणें, टांचणें.
**टिपरी**–स्त्री० मापविशेष. २ पावशेर. शेराचा चौथा हिस्सा. ३ टिपरूं.
**टिपरूं**–न० नगारा वाजविण्याचा दांडू, लहान सोटगें. २ उंसाचा तुकडा.
**टिपू–टिपूस**–पु० थेंब, टिपका.
**टिबकणें**–अ० थेंब थेंब गळणें. २ न० टिपका, पाझरणें, पाझर.
**टिमकी**–स्त्री० दवंडी, जाहिरात. २ एक लहान वाद्यविशेष.
**टिल्लु**–वि० टारगा, लहान, खुजा, खुरटा.
**टिवल्या बाव्हल्या**–स्त्री० टंगळमंगळ, चेष्टा, कुचेष्टा.
**टिळक–टिळा**–(सं)पु०टिकला,टिळा,टिपका.
**टीच–टींच**–स्त्री० तर्जनी आणि अंगुष्ठ पसरल्यावर त्यांच्या शेवटांमधील अंतर.
**टिंब**–न० पूज्य, शून्य.
**टिंया**–पु० लहान राघु, पोपट.
**टीक–टिका**–स्त्री० बायकांचा एक दागिना.
**टीका**–(सं) स्त्री० कोटी, गुणदोषविवेचन. २ टिपा, व्याख्यान.
**टीप**–स्त्री० ( **टीका** पहा. ) २ शिवणविशेष. ३ याद, टिपण.
**टीर–टिरी**–स्त्री० टरी, कुल्ला,ढुंगण,नितंब.
**टुपणें**–अ० खुपणें, तुरुणें, शिरणें.
**टुसटुमित**–वि० गुबगुबित, गोल, ताजा, ताजतवाना.
**टुमणी**–स्त्री० पिरपिर, निकड, त्रास, नेट.
**टुमणें**–न० लकडा, तकादा, झेंगट.
**टुरटुर**–स्त्री० टरांव टरांव, डरांव डरांव. २ थोडा काळ चालणारी गोष्ट.
**टूक**–स्त्री० नियमितपणा, बेत.
**टूम**–स्त्री० पद्धत, चाल,मौज,रीत,नवी तऱ्हा.
**टूमदार**–वि० लहान असून चांगलें, अटपसर आणि दिखाऊ, नवीन तऱ्हेचें.
**टेक–टेंक**–स्त्री० टोंक, शिखर. २ अवसान, धैर्य, धीर.
**टेकडी–टेकड–टेकाड**–स्त्री० न० लहान डोंगर, उंचवटा.
**टेणा**–पु० दिव्यांतली मोठी ज्योत, कांकडा.
**टेप**–न० टेंकाड. २ ठप, कैद. ३ मोजण्याची एक प्रकारची दोरी.
**टेपर**–न० टेपरें, टोंपर, बोल, दोष.
**टेंभुरणी**–स्त्री० एक प्रकारचें झाड.
**टेर**–स्त्री० फजीती, पच्ची, हुर्यो, नक्कल.
**टेव**–स्त्री० वाईट संवय–खोडी–चाल, संवय.
**टेहळणें**–स० न्याहळून पहाणें, काळजीपूर्वक पहाणें.
**टेंकणें**–अ० विश्रांति पावणें, आराम करणें. २ आधार घेणें, आश्रय करणें. ३ न० उशी, तक्या.
**टेंगूळ–टेंगळ**–न० प्रहार होऊन शरीरावर जी सूज येते ती.
**टेंबा–टेंभा**–पु० मोठा कांकडा,मशाल,दिवा.
**टोकर–रा–री**–पु० स्त्री० हारा, पाटी. टोपलें, घमेलें.
**टोणका–कें**–पु० ओंडका, लांकडाचा तुकडा, ओंडा.
**टोणगा**–पु० रेडा, महिष, हल्या.
**टोणपा–प्या**–पु० ठोंब्या, मूर्ख, अक्षरशून्य मनुष्य, अक्षरशत्रु, दगड.
**टोप**–पु० मुकुट. २ पात्रविशेष. ३ खोटे बनविलेले वेणीचे केस.

**टोपकर**—पु० टोपस, टोपडा, टोपीवाला, साहेब.

**टोपडें-रें**—न० लहान टोपी, टकुचें.

**टोपण**—न० झांकण. २ वि० आड, दुसरें, वहिवाटींतलें.

**टोपलें**—न० पाटी, हारा.

**टोपसल**—न० मस्तकाचें चर्म, डोक्याची त्वचा.

**टोपी**—स्त्री० कान व डोकें यांना वारा लागूं नये म्हणून केलेलें आच्छादन. २ नुकसान, खर्च, धक्का.

**टोपी घालणें**—स० बुडविणें, गंडा घालणें, फसवून पैसे काढणें.

**टोमणा**—पु० टोला, धक्का, आघात, रट्टा. २ छद्मी भाषण.

**टोला**—पु० टोमणा, धक्का, रट्टा. २ रोडा, विटकर.

**टोली**—स्त्री० एक अष्टमांश पैसा, पैशाचा आठवा हिस्सा.

**टोंक-टोक**—न० टाक, शेवट, नोक. २ चोंच.

**टोंका**—पु० पोरकिडा.

**टोंच-टोच**—स्त्री० (टोळ पहा.)

**टोंचणें**—स० बोचणें, भोंक पाडणें.

**टौका**—पु० टरफल, टवका.

**टौकारणें**—अ० डोळे वटारून पहाणें, वटारणें, टवकारणें.

**टंक**—(सं) क्रि० बरोबर, तंतोतंत. २ वेळ.

**टंकण**—पु० एक क्षार, टांकणखार.

**टंकशाला-टांकसाळ**—(सं) स्त्री० नाणें पाडण्याचा कारखाना.

**टंकार**—(सं०) पु० टम्-टम् असा आवाज.

**टंगळमंगळ**—स्त्री० सुस्ती, आळस, आढेवेढे, चुकवाचुकव.

**टंचाई**—स्त्री० तंगाई, महागाई, महर्गता.

## ठ.

**ठ**— हें बारावें व्यंजन आहे.

**ठक**—वि० लुच्चा, फसविणारा, द्वाड, ठग.

**ठकठक**—स्त्री० टक टक वाजणें.

**ठकणें**—अ० फसणें, बुडणें.

**ठकबाजी**—स्त्री० ठकवणूक, लुच्चेगिरी, ठकवणी, कपट.

**ठकवाठकव**—स्त्री० फसवाफसव, चाळवणी.

**ठकविणें**—सं फसविणें, लबाडी करणें.

**ठकाईमावशी**—स्त्री० जादूच्या खेळांतलें भावलें.

**ठगबाजी**—स्त्री० लुच्चेगिरी, फसवणूक.

**ठणकणें**—अ० दुखणें, ठणका लागणें, वेदना होणें.

**ठणका**—पु० वेदना, दुःख, कळ, तिडिक.

**ठणकारा**—पु० डौल, तोरा.

**ठणकावणें**—अ० मारणें, चोपणें, मार देणें.

**ठणठण**—स्त्री० भांड्यावर आघात केला असतां त्याच्या अथवा घंटेच्या आवाजाचें अनुकरण.

**ठणठणपाळ**—पु० कफल्लक, दरिद्री.

**ठणठणाट**—पु० पाण्याचा दुष्काळ, २ बोंबाबोंब, शंखध्वनि.

**ठणठणां**—क्रि० मोठ्यानें, ठणठण आवाजानें.

**ठणठणित**—क्रि० ठणठण आवाज होण्याजोगें, अगदीं ( कोरडें. )

**ठपका**—पु० ( टपका पहा. )

**ठमकणें**— अ० नाजूक चालणें, गजगती चालणें, नखऱ्यांत चालणें.

**ठरणें**—अ० नियम होणें, होणें, निश्चय होणें. २ टिकणें, रहाणें, स्थिरावणें.

**ठराव**—पु० नियम, निश्चय. २ कायदा.

**ठसका**—पु० खोकला, ढांस, खोखो करण्याची क्रिया. २ ठणकारा, डौल, तोरा.

**ठसठशित-सित**—वि० घोसदार, घस्मरित, ठळक.

**ठसठसणें**–अ० दुखणें, ठणका लागणें, तिडिक लागणें.

**ठसणें**–अ० बिंबणें, मनांत उतरणें.

**ठसविणें**–स० पक्कें समजावणें, बिंबवणें.

**ठसा**– पु० छाप, प्रत, प्रतिबिंब, चित्र. २ छाप मारण्याचें यंत्र ३ ग्रह.

**ठळक**–वि० ठसठशित, ठळठळीत. २ निवडक, मोठमोठा. ३ स्पष्ट, नीट दिसेसा.

**ठाउक**–वि० माहीत, जाणीत, ज्ञात. २ ठेवा, लाभ.

**ठाकठिक–की**–स्त्री० व्यवस्था, बेतबात.

**ठाकणें**–अ० रहाणें, उभें रहाणें.

**ठाकूर**–पु० जातिविशेष.

**ठाण–ठाणें–ठाय**–(सं) न० स्थान, ठिकाकाण, जागा, लष्कर असण्याची जागा.

**ठाम**–वि० पक्का, कायम.

**ठाय**–स्त्री० आस्ताई, स्थायी.

**ठार**–क्रि० अगदीं, समूळ, अति, फार.

**ठारकरणें–मारणें**–स० जीवें मारणें, जीव घेणें.

**ठाव**–(सं) पु० अंत. २ पत्ता. ३ फाळका.

**ठावका–ठावा**–वि० माहीत असलेला, जाणलेला, समजलेला.

**ठावका–ठाव**–पु० पान, पत्रावळ.

**ठास–ठांस**–वि० कठिण, पक्का, मजबूत.

**ठासणी**–स्त्री० भरणी.

**ठासणें–ठांसणें**–स० भरणें, खच्चून भरणें.

**ठिक्कर**–वि० अतिशय काळा, काळाकुट्ट.

**ठिकरी**–स्त्री० एक प्रकारची फोडणी. २रोडा, कौलाचा अगर खापराचा तुकडा, विटकर, टोला. ३ बारीक तुकडा.

**ठिकाण–णा**–न० वरदार, जागा, जमीन जुमला. २ पत्ता, खूण.

**ठिगळ–ळी**–स्त्री० फाटक्या वस्त्रास दुसऱ्या वस्त्राचा लहान तुकडा लावितात तो, कपी.

**ठिणगी**–स्त्री० विस्तवाचा सूक्ष्म कण, परमाणू. २ भांडणाचें मूळ.

**ठिणकणें–ठिबकणें**–अ० गळणें, पाझरणें, थेंब थेंब पडणें.

**ठिपका–बका**–पु० ( टिपका पहा. )

**ठिसूळ**– वि० ढिसूळ, हलकें, लवकर मोडणारें.

**ठीक**–वि० बरोबर, प्रमाणाचा, शोभेसा. २ के० वाहवा, शाबास, खाशी.

**ठुमकणें**–( ठमकणें पहा. )

**ठुशी**–स्त्री० बायकांच्या गळ्यांतला एक दागिना. [दुखणें, कळ.

**ठुसठुस**–स्त्री० ठणका, ठसठस, एकसारखें

**ठुबरी–ठुमरी**–स्त्री० कविताविशेष.

**ठेका**–पु० ताल, गत. २ मक्ता, खोती.

**ठेप**–(सं) स्त्री० मर्यादा. २ कैद.

**ठेपणें**–(सं) अ० येऊन पोंचणें, येणें, भिडणें.

**ठेपाविणें**–(सं) स० आणवणें, बोलावणें, मर्यादेपर्यंत पोंचाविणें.

**ठेपसा**–पु० ढेपसा, ठेबसा, राखेचा खडा.

**ठेल**–स्त्री० विपुलता, सवंगाई, स्वस्ताई.

**ठेला**–पु० राहिला. २ पोतें, थैला, थेला, कोथळा.

**ठेव–ठेवा**–(सं) स्त्री० गुप्त जमा, अनामत, गुप्त खजिना, निधान.

**ठेवण**–(सं) स्त्री० रीत, तऱ्हा, चाल, वागणूक, २ बांधा, आंगलोट, वळण.

**ठेवणें**–(सं) स० सांठविणें, राखणें, संभाळणें, बाळगणें, २ न० ठेव, ठेवा, निधि.

**ठेवरेव**–(सं) स्त्री० व्यवस्था, बंदोबस्त, निरवानिरव.

**ठेंगणा–ठेंगू**– वि० टिल्लू, जळमाणूस, वामनमूर्ति, खुजा.

**ठेंच**–स्त्री० पायाच्या बोटास चालतांना लागलेली जखम. २ ठोकर. ३ अद्दल.

**ठेंचणें**–उ० नि० चेंचणें, तुडविलें जाणें, दबणें, ठेंचाळणें, ठासणें.
**ठेंचा–ठेचा**–पु० घणा. १ कोथींबिरीचें बीं. २ एक प्रकारची चटणी.
**ठोक**–वि० बरोबर, रोख.
**ठोकणें**–उ० वि० मारणें, बडवणें, तयार करणें, धूमसणें. २ न० ठोका, टोला.
**ठोकताळा**–पु० बरोबर अदमास, सरासरी, अटकळ, प्रतीति.
**ठोकर**–स्त्री० ठेंच, धक्का, ठोसा. २ अद्दल, नुकसान, तोटा.
**ठोकळ**–वि० मुख्यत्वेंकरून, ठळक. २ सरासरी, अदमासें. ३ घाऊक.
**ठोकळा**–पु० ओंडका, लांकडाचा तुकडा.
**ठोका**–पु० टोला, धक्का, मारा, ठुस्सा, आघात. २ प्रतीति.
**ठोठावणें**–स० खडखडावणें, वाजविणें.
**ठोंबा–ब्या–ठोल्या**–वि० मूर्ख, अक्षरशत्रु, लठ्ठनिरांजन, जंगी, अक्कलशून्य.
**ठोंसर**–वि० घस्मरित, मोठा, बोंसदार.

## ड.

ड–तेरावें व्यंजन.
**डकणें**– अ० चिकटणें, जमणें, मिळून जाणें.
**डकवणें–विणें**–स० चिकटवणें, जमविणें.
**डग**–न० भय, भीति. २ हरकत.
**डगडगणें**–अ० हलणें, डुलणें. २ डग् डग् आवाज होणें.
**डगणें**–अ० भिणें, भय वाटणें, बावरणें.
**डगमगणें**–अ० (डगणें पहा.)
**डगर**–स्त्री० कडा, कडपा, तुटलेला डोंगर.
**डगलें–ला**–न० पु० लहान आंगरखा, झबलें, बंडी, पेरण.
**डचकणें**–अ० दचकणें, भिणें.
**डचका**–पु० धसका, धास्ती, भय.
**डचडचणें**–अ० पेशांत जळणें, जळजळ करणें. २ ओतप्रोत भरणें, पूर्ण भरणें.
**डचमळणें**–अ० खालीं वर होणें.
**डपकें–बकें**–न० लहानशी पाणी सांठलेली जागा, टाकें, झिरा.
**डफ**–(फा) पु० वाद्यविशेष, कडें, डफडी-री. २ वि० खप्पड.
**डबर**–न० पायाचे कामीं लावण्याचे दगड.
**डबरा**–पु० खळगा, खड्डा.
**डबा**–पु० करंडा, धातूची पेटी, मोठी डबी.
**डबी**–स्त्री० डबडी, लहान डबा. २ लहान मुलांस होणारा एक रोग.
**डबोलें**–न० द्रव्य, गुप्त जमा, गुप्त पैसा, सांचवलेला पैका.
**डमरू**–(सं) पु० वाद्यविशेष.
**डर**–स्त्री० भीति, भय.
**डरकावणें**–स० भीति घालणें, भय दाखविणें. २ डरावणें, आरोळी मारणें.
**डरणें**–अ० भिणें, भय पावणें. धैर्य खचणें.
**डरांवडरांव**–पु० टरांवटरांव, बेडकाचें ओरडणें.
**डल्ला**–पु० खजीना, लाट, विपुल संपत्ति, गुप्त द्रव्य.
**डल्ली**–स्त्री० खोगरांतील एक सामान, घामाळें.
**डवचणें**–स० धक्का लावणें. २ अव्यवस्थित करणें. ३ त्रास देणें.
**डवली**–स्त्री० करवंटी, करटी.
**डसकर–डसका–डसरा**–वि० चावका, चावणारा.
**डसणें**–अ० चावणें, दंश करणें, नांगी मारणें.
**डळमळ**–स्त्री० नाकबुली, हरकत, दोन डगरींवर पाय देणें.

**डळमळणें**–अ० हलणें, अस्थिर होणें, डुलणें, झुलणें, चंचल होणें.
**डळमळीत**–वि० हलणारें, अस्थिर.
**डाक**–पु० डाग. २ कस्तर. ३सडक.
**डाकणें**–स० डाक देणें, कस्तर करणें, धातूंच्या तुकड्यांचा सांधा बसविणें.
**डाकलग**–वि० डाकाचें, डाक लावलेलें.
**डाका**–पु० वाटमार, रस्तेलूट.
**डाग**–पु० ठिबका, थेंब. २ बेअब्रू, बदनांव, अपकीर्ति. ३ भाजणें. ४दागीना.
**डागडुजी–डागदुजी**–स्त्री० नवेंजुनें, नीट नेटकें.
**डागणी**–स्त्री० डाग देण्याचें हत्यार–सळई इत्यादि.
**डागणें**–अ० भाजणें, जाळणें, चरका देणें.
**डागळणें**–अ० डाग लागणें, वाईट होणें, बेचव होणें, नासणें.
**डागळलेलें**–वि० डाग लागलेलें, नासलेलें.
**डागिणा–ना**–पु० दाग, जिन्नस, अलंकार.
**डाचणें**–अ० जळजळणें. २ सलणें, त्रास देणें.
**डामडौल**–पु० नखरा, तोरा, ऐट, झोंक.
**डामर–डांबर**–न० यक्षधूप.
**डालणें**–स० ठेवणें, लावणें.
**डाली**–स्त्री० ताल, बांध, धक्का. २ फळफळावळीची नजर–भेट.
**डाव**–पु० लाग, वेळ, प्रसंग. २ खेळ.३दांत, दंश, सूड घेण्याची इच्छा.
**डावरा**–वि० डावखोरा.
**डावखोरा**–वि० डाव्या हातानें उजव्या हातासारिखें काम करणारा, डावरा.
**डावपेंच**–पु० छक्केपंजे, तर्कज्ञान, अक्कल, लटपट, खुबी.
**डावा**–वि० डावेबाजूचा.
**डाहळा–ळी**–पु० स्त्री० खांदी, फांदी.
**डाळ**–(सं) स्त्री० दाळ, दाळिंबी.
**डाळ शिजणें**–अ० रिघाव–शिरकाव होणें.
**डाळिंब**–(सं) न० दाडिम, अनार.
**डाळिंबी**–(सं) स्त्री० डाळिंबाचें झाड. २ दल, हरभरा इत्यादींचा अर्धा भाग.
**डाळी**–स्त्री० ( **डांगळी** पहा. )
**डांक**–स्त्री० टपाल.
**डांग्या खोकला**–पु० रोगविशेष.
**डांगर**–न० उडदांच्या पिठाचें तोंडी लावणें. २ मोठा भोंपळा.
**डांगळी–शी**–स्त्री० फांदी, खांदी, फांटी, डाहळी, डाळी, बुंध्याकडे वांकण असलेली हातीं धरावयाची काठी.
**डांगोरा**–पु० दांडोरा, दवंडी, जाहिरात.
**डांबणें**–स० बांधणें, आवळणें, न सुटे असा ठेवणें.
**डांस**–(सं) पु० मुरकुट, चिलीट. २ दंश,डंश.
**डिकामाली–केमाली**–स्त्री० औषधिविशेष.
**डिखळ–डिखूळ**–न० ढिपळ, मातीचा खडा, मातीचा ठपसा.
**डिंक**–पु० चीक, गोंद, चिकट पदार्थ, चिकास, लबाब.
**डिंकदानी–णी**–स्त्री० डीकदाणी, डीक ठेवण्याचें पात्र.
**डिंगरी**–स्त्री० मुळ्याची शेंग, मोगरी.
**डीक–ग**–( **डिंक** पहा. )
**डुकर**–पु० सूकर.
**डुकली**–स्त्री० डुलकी, तंद्रा, थोडी झोंप.
**डुबकणें**–अ० डुंबणें, पाण्यांत खेळणें, ओले अंगानें असणें.
**डुबकळी**–स्त्री० डुबी, बुडी, डुबकी.
**डुबणें**–अ० बुडणें, बुडी मारणें. २नाश होणें.
**डुबी–डुबकी**–स्त्री० बुडी.
**डुरकणी–ण–णें**–स्त्री० न० डुरकावणी, डुरकणें, बैलाचें ओरडणें.

**डुलकी**–स्त्री० झोंपेचा चुटका, थोडी निद्रा, डुकली.
**डुलणें**–अ० झुलणें,डोलणें,हलणें,झोंक जाणें.
**डूल**–पु० कानांत घालण्याचा मुलांचा एक दागिना.
**डेंख–डेंख**–न० देठ, देंठ, मूळ.
**डेरका**–पु० पोटाचा नगारा, दोंद,मोठें पोट.
**डेरा**–पु० रांजण, मातीचें मोठें भांडें. २तंबु.
**डेंगणें**–अ० दमणें. २ न० शिश्न. [डोमकें.
**डोई**–स्त्री० डोसकी, डोकसी, डोकें, मस्तक,
**डोकरा**–वि० म्हातारा, वयस्क, वृद्ध.
**डोकावणें**–अ० मान पुढें करून पहाणें, न्याहाळून पाहणें, दृष्टि देऊन बघणें.
**डोणी–ण**–(सं) स्त्री० दगडाची कुंडी, दगडाचें पातेलें, द्रोण.
**डोफा**–पु० गुडघा, टोपर.
**डोमकावळा**–पु० डोंबकावळा.
**डोलहारा**–पु० लहानसा झोंपाळा.
**डोल**–(आ) पु० पोहोरा, विहीर इत्यादींतून पाणी काढण्याचें लोखंडाचें भांडें.
**डोलकर**–पु० डोली वाहणारे, डोली नेणारे, डोळकर, भोई.
**डोलकाठी**–स्त्री० जहाजावर अवजार लावण्याचा मुख्य खांब.
**डोलणें**–अ० ( डुलणें पहा. )
**डोलविणें**–स० हलवणें, डोलण्यास लावणें.
**डोला**–(सं) पु० ताबूत, ताज्या.
**डोली**–स्त्री० पाळणा, हलका मेणा.
**डोह**–पु० कोंड, नदींतला खळगा, ह्रद.
**डोहळा–डोहाळा**–पु०गर्भिणी स्त्रीची इच्छा, दोहद.
**डोळ्यांतलें काजळ काढणारा**–वि० अट्टल–कुशल चोर.
**डोळ्यामागें**–क्रि० परभारें, परोक्ष.
**डोळ**–पु० फोल, साल, फोलासुद्धां डाळ.
**डोळस**–वि० न्याहाळून पहाणारा, बघणारा, डोळे असलेला.
**डोळा**–पु० नेत्र, नयन, लोचन.२लक्ष,ध्यान.
**डोळेझांक–की**–स्त्री० दुर्लक्ष, कानाडोळा.
**डोळेफोड**–स्त्री० डोळ्यांना त्रास, पहाण्यानें उत्पन्न होणारा त्रास.२बारकाईनें पहाणें.
**डोंगर**–पु० पर्वत, पहाड, घाट.
**डोंगरवट**–वि० डोंगराळ, डोंगरी, पहाडी.
**डोंगराळ**–वि० डोंगरी, डोंगरवट.
**डोंगरी**–वि० डोंगराळ, डोंगर ज्यांत आहेत असा.
**डोंगळा**–पु० मुंगळा, मंकोडा.
**डोंगा**–पु० लहान नाव.
**डोंब**–पु० आगीचा लोळ. २ महार.
**डोंबकावळा**–पु०महार कावळा,डोमकावळा.
**डोंबारी–डोंभारी**–पु० एक हलकी जात.
**डौर**–पु० डमरु.२तुमान, पायजमा,चोळणा.
**डौल**–पु० अहंपणा, तोरा, नखरा. २ चांगला आकार, घाट. ३ लिहितांना अर्धी सोडलेली रेघ.
**डौलदार**–वि० नखरेबाज, छानदार, शोकी, रंगेला. २ चांगल्या आकाराचा, सुरेख.
**डौली**–वि० ऐटदार, ऐटी, नखरेबाज.
**डंका**–पु० वाद्यविशेष. २ शहाणपणाची प्रख्याति, कीर्ति.
**डंख**–(सं) पु० नांगा, कांटा, नांगी, दंश.
**डंखणें**–उ० वि० नांगी मारणें, चावणें, दंश करणें.
**डंखीण**–(सं) स्त्री० जखीण, हाडळ,डाकण.
**डंग**–पु० पोहे इत्यादि कुटण्याचें यंत्र.
**डंब**–वि० तुडुंब, तोंडोतोंड,ओतप्रोत,आकंठ.
**डंभ**–(सं) पु० दंभ. २ अवडंबर, आडंबर.
**डंवचणें**–स० विचकणें,खराब करणें, नासणें. २ धक्का लावणें.
**डंश**–(सं)पु० द्वेष. २ जखम. ३दंश, चावा.

## ढ.

**ढ**–चौदावें व्यंजनः मूर्ख, मूढ, निरक्षर.

**ढकलचंदपंचायशी**–वि० मागें पुढें न पाहून काम करणारा.

**ढकलणें**–उ० वि० कलांडणें, लोटणें, हालवणें, धक्का देणें.

**ढकलाढकली**–स्त्री० लाटालाटी, टोलवाटोलवी, कोलाकोली.

**ढका**–पु० धक्का, ढक्का, धक्की.

**ढग**–पु० मेघ, अभ्र, वादळ.

**ढणढण्णा**–पु० दगड, महामूर्ख, वेडझवा, गाढव, ढ, मूर्खाचे राजे.

**ढणढणणें**–अ० आवाज होणें, आदळणें, ढणढण आवाज होणें.

**ढपला**–पु० धपला, थलपा, तुकडा. [ढोल.

**ढब**–स्त्री० रीत, चाल, वर्तणूक, तऱ्हा, ऐट,

**ढबू–ब्बू**–वि० दुहेरी पैसा, दोन पैशांचा पैसा. २ लठ्ठभारती, अगडबंब.

**ढमढमा–म**–पु० स्त्री० नगाऱ्याच्या आवाजासारखा आवाज.

**ढलपा**–पु० ( **ढपला** पहा. )

**ढवळणें**–उ० वि० हलवणें, खालवर करणें. गढूळ करणें.

**ढवळा**–वि० धवल,पांढरा,सफेत, श्वेत, शुभ्र.

**ढवळाढवळ**–स्त्री० आदलाबदल, बदल. २ फेरफार. ३ खालचें वर वरचें खालीं करणें. ४ उलाढाल, अव्यवस्थितपणा.

**ढसळणें–ढसाळणें**–उ० वि० ढासळणें, फसणें, पडणें, व्यर्थ जाणें.

**ढसाण**–वि० अति आंबटपणा विवक्षित असतां **आंबट** या शब्दाबरोबर याचा उपयोग होतो.

**ढसाळ**–वि० सढळ, सैल.

**ढळढळा**–क्रि० मोठ्यानें, ओक्साबोक्शीं.

**ढळढळित**–वि० दृष्टीदेखत, माहीत असतांना, समक्ष, प्रत्यक्ष. २ टळटळित, स्पष्ट.

**ढळणें**–अ० हलणें, बदलणें, ढासळणें, ढसळणें.

**ढळता**–वि० उतरता, कललेला.

**ढाक**–स्त्री० पेंचविशेष.

**ढाण**–वि० ( **ढसाण** पहा. )

**ढाल**–(सं) स्त्री० खेटक, शरीराचें तरवारी वगैरे पासून रक्षण करण्याकरितां हातांत धरण्याचें चर्माचें हत्यार.

**ढासळणें**–उ० वि० ( **ढसळणें** पहा. )

**ढाळ**–पु० उतार. २ रेच, जुलाब.

**ढाळा–ढाळी**–पु० स्त्री० ( **खांदी** पहा. )

**ढांकण–ढांकणी–णें**–पु० स्त्री० न० (**झांकण** पहा.)

**ढांगळ**–वि० लांब पायांचा.

**ढांडोरा–ढांढोरा**–पु० जाहिरनामा, प्रसिद्धि, दवंडी, डांगोरा.

**ढांस–ढास**–स्त्री० खोकला, रोगविशेष.

**ढांसणें**–अ० खोकणें.

**ढिगर–ढिगारा**–पु० ढिगार, ढीग, थर, समुदाय, रास.

**ढिपळ–ढिपूळ**–न० डिखळ, ढेंकूळ.

**ढिरा**–पु० तुरा, नवी फूट, डिकशी, ढिरी.

**ढिलना–ढिला**–वि० मोकळा. २ सैल. ३ पु० नपुंसक, बोंचू.

**ढिवर–ढिंवर–ढीवर**–(सं) पु० कोळी, मासे मारणारा.

**ढिसळ–ढिसूळ**–वि० लवकर मोडणारें.

**ढीग**–पु० ( **ढिगर** पहा. )

**ढील**–वि० ढिला, मोकळा.

**ढुस्स**–वि० अतिकाळा, कुट्ट, कोळशांतलें माणिक.

**ढुंकून**–क्रि० ढुंगण करून, पाठमोरा.

**ढुंग–ढुंगण–ढुंगाण**–न० कुले, नितंब, फेंडे.

**ढुंडाळणें**-स० शोधणें, तपासणें, तलास करणें.
**ढेकर-ढेंकर**-पु० पोटांतून जो वायु वर येतो तो, उद्गार.
**ढेकूण-ढेंकूण**-पु० मत्कुण, खटमल.
**ढेबरा**-पु० ढेपसा. २ पोटाचा डेरका, दोंद.
**ढेर**-पु० घेर, परीघ. २ दोंद. ३ ढीग.
**ढेरपोट्या**-वि० दोंदिल, मोठ्या पोटाचा.
**ढेंकूळ-ढेकळ**-न० ढेंपळ, डिखूळ, ढेपसा.
**ढेंग**-स्त्री० तंगडी, पाय, चरण. २ फांदी.
**ढेंप**-स्त्री० भेली, गोळा.
**ढोपर-ढोंपर**-न० गुडघा.
**ढोबळ**-वि० मोठा, प्रशस्त. २ ढळढळित, स्पष्ट.
**ढोर**-पु० एक जातीचे लोक. २ न० गाई-बैल-म्हशी इत्यादींतून कोणतेंही जनावर.
**ढोसणें**-अ० खुपसणें, शिरकावणें, लावणें, स्पर्श करणें. २ घटघटा-फार पिणें.
**ढोसला**-पु० एक प्रकारची बांगडी.
**ढोंग**-न० सोंग, कांगावें, असत्यता, लबाडी.
**ढोंगधत्तुरा**-पु० कांहीं तरी, थातूरमातूर.
**ढोंगी**-वि० लबाड,खोटा,लुच्चा,फसविणारा.
**ढंग**-पु० खेळ, मूर्खपणा, सोंग,चाळे.२चाल.
**ढंगाळपार्वती**-स्त्री० अति उंच स्त्री.
**ढंगी-ग्या**-वि० खोड्याळ, खोडकर, वाईट चालीचा, दुष्ट स्वभावाचा, चाळेखोर.
**ढंढेरा**-पु० दोंद, पोटाचें डेरकें.

## त.

**त**-सोळावें व्यंजन.
**त्यक्त**-(सं) वि० सोडलेला, वर्ज केलेला.
**त्यजणें**-(सं) स० टाकणें, सोडणें, त्याग करणें, वर्ज करणें.
**त्याग**-(सं) पु० सोडणें, वर्जन.
**त्यागणें**-(सं) (**त्यजणें** पहा.)
**त्याज्य**-(सं) वि० टाकण्या लायक-योग्य.
**त्र्याण्णव**-वि० नव्वद आणि तीन.
**त्र्यायशीं**-वि० आयशीं आणि तीन.
**त्र्याहत्तर**-वि० सत्तर आणि तीन.
**त्रय**-(सं) न० तीन, त्रिकूट, त्रिवर्गः जसें-युगत्रय, दोषत्रय.
**त्रयोदशी**-(सं) स्त्री० (**तेरस** पहा.)
**त्रस्त**-(सं) क्रि० त्रासलेला, कंटाळलेला, दमलेला, पीडलेला.
**त्रागा**-पु० राग, संताप, अतिसंताप, डोक्यांत राख घालणें, संतापानें भलतें कृत्य करणें.
**त्राण**-(सं) न० रक्षण. २ अर्थ, दम,शक्ति.
**त्राता**-(सं) वि० वाली, पहाणारा, पोसणारा, संरक्षक.
**त्रास**-(सं) पु० पीडा, जाच. २ भय, भीति.
**त्रासणें**-(सं) अ० संतापणें, कंटाळणें.
**त्राहि त्राहि-त्राहे त्राहे**-के० दया कर, तारण कर, रक्षण कर.
**त्रि**-(सं) वि० तीन.
**त्रिक**-(सं) न० तिन्हींचा समुदाय, त्रय. २ पाठीच्या कण्याचा खालचा भाग.
**त्रिकूट**-(सं) पु० पर्वतविशेष. २ त्रिवर्ग, तिहींची टोळी.
**त्रिकोण**-(सं) पु० तिकोन.
**त्रिकोणमिति**-(सं) स्त्री०त्रिकोणाचें गणित.
**त्रिघात**-(सं) पु० घन.
**त्रिज्या**-(सं) स्त्री० ज्या, अर्धा व्यास.
**त्रिशूल**-(सं) पु० तीन फाळांचें हत्यार.
**त्रुटित**-(सं) वि० मोडलेलें, तुटलेलें, अपूर्ण, पानें गेलेलें.
**त्रेचाळीस**-वि० ४३, चाळीस आणि तीन.
**त्रेत-त्रेता-त्रेतायुग**-(सं) न० दुसरें युग.

**त्रेधा**–(सं) स्त्री० तिरस्थळी यात्रा, पच्ची, फजेती.

**त्रेपन्न**–वि० ५३, पन्नास आणि तीन.

**त्रेसष्ट**–वि० ६३, साठ आणि तीन.

**त्रोटक**–न० नाटकाचा एक प्रकार. २ वि० लहान. [तोडणें.

**त्रोटणें**–(सं) उ० वि० तुटणें, मोडणें, भंगणें,

**त्वक्-चा**–(सं) स्त्री० कातडी, चर्म.

**त्वदीय**–(सं) सर्व० तुझें, तुमचें.

**त्वरा**–(सं) स्त्री० जल्दी, उतावळी, घाई.

**त्वरित**–(सं) क्रि० लौकर, जल्दी.

**त्वेष**–(सं) पु० आवेश, अवसान, स्फुरण.

**तई**–क्रि० त्या वेळेस, तेव्हां, त्याकाळीं.

**तक्षक**–(सं) पु० सर्पविशेष.

**तक्षीम**–(आ) स्त्री० जाती. २ हिस्सा, भाग, वांटा.

**तक्षीमदार**–(फा) पु० भागीदार, हिस्सेदार.

**तक्त**–(फा) न० राजस्थान, सिंहासन, गादी, मानाची जागा.

**तक्तपोशी**–(फा) स्त्री० कडीपाट, पटई.

**तक्ता**–(फा) पु० फळी, २ ताटवा, ३नमुना.

**तक्या**–(फा) पु० उशी. २ फकीरांची राहण्याची जागा.

**तक्र**–(सं) न० ताक, छास.

**तकट**–न० आच्छादन, धातूचा आभ्रा.

**तकतकणें**–अ० चमकणें, चकचकणें.

**तकतकी**–स्त्री० चकाकी, तुळतुळितपणा.

**तकरार**–(आ) स्त्री० बोलाचाली, भांडण, तंटा. २ फिर्याद. [खोर.

**तकरारी**–(आ)वि० तकरारकरणारा, भांड-

**तकलादी**–(आ) वि० कमकुवत, मजबुत नसलेलें, दिखाऊ, हलकें.

**तकवा**–(आ) पु०दम, शक्ति,ताकद, कुवत.

**तकशीर-सीर**–(आ) स्त्री० गुन्हा, अपराध, वाईट काम.

**तकबी**–(आ) स्त्री० बंदी, मनाई. [धरणें.

**तगणें**–अ० जगणें, रहाणें, टिकणें, टिकाव

**तगमग**–स्त्री० गलबल, घालमेल.

**तगर**–(सं) स्त्री० एक फुलझाड.

**तगादा**–(आ) पु० लकडा, निकड, निकडीची मागणी, अडवून मागणी.

**तज**–स्त्री० वनस्पतिविशेष, दालचिनी.

**तजवीज**–(आ) स्त्री० युक्ति, हिकमत, उपाय, व्यवस्था.

**तजेला**–(आ) पु०सुरखाई,तेज,पाणी,सब्जी.

**तटचा**–पु० बांबूची चटई.

**तट**–(सं) पु० पक्ष. २ किनारा. ३ कोटाची भिंत.

**तटणें**–अ० खोळंबणें, थांबणें, अडून बसणें.

**तटबंदी**–स्त्री० तटाविषयीं बंदोबस्त.

**तटस्थ**–(सं) वि० एकसारखा, दगडासारखा. २ उदासीन. ३ चकित.

**तटाक**–(सं) पु० किनारा,कांठ.२तळें,तलाव.

**तटाग-तडाग**–न० लहान तलाव, तळें, सरोवर.

**तटाणी**–स्त्री० घोडी, तट्टू, घोडें.

**तटिनी**–(सं) स्त्री० नदी.

**तड**–(सं) स्त्री० तीर, कांठ. २शेवट, समाप्ति.

**तडक**–क्रि० एकदम, झपाट्यानें, थेट.

**तडकाफडकी**–क्रि० तत्काळ, ज्यावेळच्या त्यावेळीं.

**तडकणें**–अ० चीर जाणें, फाटणें, फुटणें.

**तडतडणें**–अ० आग होणें, दुखणें.

**तडफड**–स्त्री० धडपड.

**तडफडणें**–अ० संतापणें, रागावणें. २ फडफडणें, तळमळणें.

**तडफडाट**–पु० संताप. २ तळमळ. [सपाटा.

**तडाका-खा**–पु० ठोसा, गुध्धा. २ झपाटा,

**तडीतापडी**–वि० गरीब, दुबळा, अतीत, अभ्यागत, गोसावी, बैरागी.

**तणावा**–पु० ताण, ओढ.
**तणावणें**–अ० निजणें.
**तत्क्षणीं**–(सं) क्रि० तत्काल,त्यावेळेस,तेव्हां.
**तत्काळ**–(सं) क्रि० त्याचवेळीं, त्यावेळेस.
**तत्पर**–(सं) वि० निमग्न, गुंग.
**तत्पुरुष**–(सं) पु० समासविशेष.
**तत्राप- पि**–(सं) उ० तथापि,तरी,देखील.
**तत्त्व**–(सं) न० सत्य. २ सत्व, अर्क, सार. ३ पदार्थ, द्रव्य.
**तथ्य**–(सं) न० तत्व, सत्य.
**तथा**–(सं) क्रि० तसा. २ स्त्री० बाकी.
**तथापि–तदपि**–(सं)तत्रापि, तरीही, तरी देखील.
**तथास्तु**–(सं) के० तसें असो.
**तधीं**–क्रि० त्या कालीं, तेव्हां, त्यावेळेस.
**तन्मय**–(सं)वि०त्यांत मिळालेला,एकच झालेला गर्क, गुंग, तल्लीन.
**तन**–(सं) न० शरीर, अंग,तनु. २तृण,गवत.
**तनखा**–(फा) पु० पगार, मुशाहिरा.
**तनमणी–तन्मणी**–पु० भूषणविशेष.
**तनय**–(सं) पु० मुलगा, पुत्र.
**तनया**–(सं) स्त्री० मुलगी, कन्या.
**तनसडी**–स्त्री० गवताची काडी, कपर्दिक.
**तनु–नू**–(सं)स्त्री०(तन१पहा.)२वि०नाजूक.
**तप्त**–(सं) वि० तापलेला, संतप्त, रागावलेला.
**तप**–(सं) न० तपश्चर्या, सद्गुणाचें आचरण. २ बारा वर्षांची मुदत.
**तपकीर–ल**–स्त्री० हुंगणी, तंबाकूची पूड.
**तपश्चर्या**–(सं) स्त्री० तपस्या, तप.
**तपशील–सील**–(फा) पु० कच्चा हिशोब, जमाखर्च, आयव्यय.२ कच्ची हकीकत.
**तपशीलवार**–(फा) वि० इत्थंभूत, सारी.
**तपस्या**–(सं) स्त्री० तप, तपश्चर्या.
**तपस्वी**–(सं) पु० तप करणारा, तापस.
**तपास**–(आ) पु० शोध, वास्तपुस्त, तलास.
**तपासणें**–उ० वि० परीक्षा करणें. २ शोधणें, झडती घेणें.
**तपेली**–स्त्री० एक प्रकारचें धातुपात्र.
**तपोधन–निधि**–(सं) पु० तपस्वी, तापसी, साधु, तप आचरणारा.
**तपोवन**–(सं) न० तप आचरण्याची जागा, तपस्वी ज्यांत रहातात तें अरण्य.
**तफावत**–(आ) स्त्री० फरक, अंतर.
**तब्बल**–वि० रग्गड, पुष्कळ, पुरेसा, पूर्ण.
**तबक**–(आ) न० ताटासारखें पसरट पात्र.
**तबकडी**–(आ) स्त्री० थाटी, लहान तबक. २ धातू वगैरेचें झांकण.
**तबलजी**–(आ) पु० साजिंदा, तबला वाजविणारा, पखवाज्या.
**तबला**–(आ) पु० वाद्यविशेष, पखवाज.
**तबियत–तबेत–तब्यत**–(आ) स्त्री० प्रकृति, स्थिति, वृत्ति.
**तबेला**–(आ) पु० पागा, जनावरांची जागा.
**तम**–(सं) न० अंधार, अंधकार. २ तमोगुण.
**तमंचा**–पु० शस्त्रविशेष, लहान बंदुक.
**तमा**–(आ) स्त्री० फिकीर, काळजी, गुमान.
**तमाम**–(आ) वि० सर्व, सगळे,संपूर्ण,समाप्त.
**तमालपत्र**–(सं) न० वनस्पतिविशेष.
**तमाशा**–(फा) पु० खेळ, मौज, गम्मत.
**तमोगुणी**–(सं) वि० तामस, तामसी.
**तयार**–(फा) वि० योग्य, जोगा. २ उपयोगायोग्य. ३ सज्ज. ४ भरलेला, पुष्ट.
**तर्क**–(सं)पु०विचार,अंदाज, अक्कल, कल्पना.
**तर्जनी**–(सं) स्त्री० आंगठ्याजवळचें बोट.
**तर्पण**–(सं) न० मेलेल्याच्या नांवानें पाणी देणें. २ तृप्ति.
**तर्‍हा**–(आ) स्त्री० चाल,रूढी,आचार,रीति.
**तर**–उ० तर मग, दुसऱ्या अर्थी, दुसऱ्या पक्षीं. २ स्त्री० होडी, नाव.
**तरकट**–न० वेडावांकडा तर्क–कल्पना.

**तरकटी**–वि० भलत्याच कल्पना करणारा.
**तरकणें**–अ० समजणें,तर्क येणें, होणें,सुचणें.
**तरकारी**–स्त्री०भाजी, शाक.
**तरंग**–(सं) पु० लाट, ऊर्मि. २ तर्क, कल्पना, विचार.
**तरंगणें**–अ० पोहणें, पेंवणें, तिरणें, तरणें, वरचेवर रहाणें. २ लोंबत रहाणें.
**तरच**–क्रि० अमुक झाल्यास मात्र.
**तरजुमा**–(आ) पु० भाषांतर, छाया.
**तरट**–न० गोणपाट–ताट, गोण–ता.
**तरणा**–(सं) वि० जवान, तरुण.
**तरणें**–अ० वरचेवर रहाणें. २ पार जाणें.
**तरणोपाय**–(सं) पु० सुटका, धडगत.
**तरतरी**–स्त्री० चलाखी, चांचल्य, चपलता.
**तरतूद**–(आ) स्त्री० व्यवस्था, बंदोबस्त, जोपासना, तजवीज.
**तरफ**–(आ) स्त्री० बाजू,कड, पक्ष. २ भाग, प्रांत. ३ टेंकू.
**तरफदारी**–(फा) स्त्री० कैवार, पक्षपात.
**तरफडणें**–अ० ( **तडफडणें** पहा. )
**तरबेज–त**(आ) वि० निष्णात, ज्ञानी, हुशार, माहितगार.
**तरवार–तलवार**–(सं) स्त्री०समशेर, खड्ग.
**तरस**–(सं) पु० हिंस्रपशुविशेष.
**तरसणें**–(सं) अ० त्रासणें, संतापणें.
**तराजू**–(फा) स्त्री० तागडी, तुला, कांटा.
**तरांडें**–(सं) न० तारूं, जहाज, वहाण.
**तरी**–(फा) स्त्री० भात लावण्याची जमीन. २ नौका, नाव. ३ उ० तथापि.
**तरु**–(सं) पु० झाड, पेड, रोपा, वृक्ष.
**तरुण**–(सं) वि० ( **तरणा** पहा. )
**तल्लीन**–(सं) वि० गर्क, तन्मय, गुंग.
**तल–ळ**–(सं) पु० शेवट, खालचा पृष्ठभाग. २ खालचा भाग. ३ गाड्या येण्याचें स्थान. ४ सैन्याचें मार्गांतल्या मुक्कामाचें स्थळ.
**तलख**–(फा) वि० दुःख देणारा. तिखट, चलाख, चपळ.
**तलखली–तलखी**–स्त्री० उष्णता, गर्मी.
**तलफ–ब**–(आ) न० व्यसनाची इच्छा. २ बोलावणें, मागणी.
**तलम**–वि० बारीक, नाजूक, नरम, पातळ.
**तलाव**–पु० तडाग, तळें, सरोवर, तरण.
**तलास–श**–(फा) पु० शोध, झाडा, झडती, तपास.
**तव**–(सं) सर्व० तुझें. २ पातळ कानडें.
**तवकीर–कील**–न० बटाट्याचें वगैरे सत्व.
**तवशी–तवशीण**–स्त्री० एका प्रकारच्या काकडीचा वेल व तिचें फळ.
**तवसें**–न० तवशीचें फळ, एका जातीची काकडी.
**तवा**–पु० स्त्री० भाकरी इत्यादि पदार्थ भाजण्याकरितां केलेलें लोखंडाचें पात्र.
**तवाका–वांका**–(आ) पु०तकवा, आवांका, ताकद, शक्ति.
**तवाना**–(फा) वि० ताजा, हुशार, समर्थ.
**तवी**–स्त्री० लहान तवा.
**तस्कर**–(सं) वि० चोर, भामट्या.
**तस्त**–(फा) न० रुंद पिकदाणी, पिकपात्र.
**तस्मात्**–(सं) क्रि० ह्मणून, ह्या कारणामुळें.
**तसदी–तस्दी**–(आ) स्त्री० मेहनत, श्रम, त्रास, पीडा, संकट.
**तसवीर–तस्वीर–तसवीर**–(आ) स्त्री० नकाशा, चित्र.
**तसलमात**–(आ) स्त्री० मार्फत.
**तसला–तसा**–वि० त्या प्रकारचा.
**तसू**–स्त्री०दोन बोटें, गजाचा बारावा हिस्सा.
**तह**–(फा) पु० करार, तडजोड. तहनामा.
**तहनामा**–(फा) पु०तहाच्या बाबीचा कागद.
**तहकूब**–(आ) वि० महकूब, बंद, थांबलेलें.
**तहशील**–(आ) स्त्री० उत्पन्न, जमाबंदी, वसूल.

**तहशीलदार**–(आ) पु० मामलेदार, कमाविसदार.
**तहान**–(सं) स्त्री० तृषा, पाणी पिण्याची इच्छा.
**तहाहयात**–द–(फा) क्रि० मरेपर्यंत–पावेतों. यावज्जीव.
**तळ**–(सं) पु० ( **तल** पहा. ) [लेला पाक.
**तळण**–न० तळप, तळणें, तेलांत–तुपांत क-
**तळणें**–उ० वि० तुपांत–तेलांत शिजविणें.
**तळतळ**–स्त्री० शाप, तळतळाट.
**तळतळाट**–पु० शाप, संतापाचें भाषण.
**तळप**–न० बायकांचा एक कानांतला दागिना २ तळण.
**तळपणें**–अ० चकाकणें. [निसंतान, निर्वंश.
**तळपट**–न० तळण, तळप. २ नाश, वाईट,
**तळपाय**–(सं) पु० पायाचा तळ, पायाचा खालचा–टेंकण्याचा भाग, तळवा.
**तळमळ**–स्त्री० ( **गलबल** पहा. )
**तळवट**–न० तळ, खालचा भाग.
**तळहात**–(सं) पु० हाताचा तळ–तळवा.
**तळहाताचा फोड**–वि० अति नाजुक वस्तु, अतिप्रिय– न दुखविण्याजोगी वस्तु.
**तळाटी–तळटदार**–पु० कुळकर्णी, गांवचा सरकारी कारकून, करण.
**तळाव**–(सं) पु० ( **तलाव** पहा. )
**तळी**–स्त्री० टाकें. २ नारळ. ३ जात्याचा एक दगड.
**तळें**–न० ( **तलाव** पहा. )
**ताई**–स्त्री० आका, थोरली बहीण.
**ताईत**–(आ) पु० गळ्यांत–अगर हातांत बांधण्याचा दागिना, ताइती.
**ताऊज–स**–(फा) पु० वाद्यविशेष.
**ताक**–(सं) न० ( **तक्र** पहा ) पाणी घालून घुसळलेलें दहीं.
**ताकत**–द–(आ) स्त्री० शक्ति, दम, तकवा, अवसान, राम.
**ताका–गा**–पु० कापडाचें ठाण, मागावरचें अखंड कापड.
**ताकीत**–द–(फा) स्त्री० आज्ञा, हुकूम.
**ताग**–पु० वनस्पतिविशेष. [दांडी.
**तागडी**–स्त्री० तराजू, तोल, ताजवा, तुला,
**तागाईत–यत**–(फा) श० पर्यंत, पावेतों.
**ताज्या घोड्याची गोमाशी**–स्त्री० शाकूसोवती, होळीचे होळकर.
**ताजा**–(फा) वि० तवाना, श्रम हरलेला. २ पु० डोला, ताबूद–त. [मजकूर.
**ताजाकलम**–(फा) पु० मागाहून सुचलेला
**ताजीम**–(आ) स्त्री० मान, अभ्युत्थान.
**ताट**–न० जेवणाचें पात्र.
**ताटकळणें**–अ० दमणें, दम लागणें, श्रमणें.
**ताटका–त्राटिका–ताटिका**–(सं) स्त्री० रावणाची बहीण. २ उग्र बायको.
**ताटली**–स्त्री० लहान ताट, मुलांकरितां ताट.
**ताटवा**–पु० तक्ता, वाफा.
**ताटी**–स्त्री० बांबूची जाळी. २ मुखवटा.
**ताठ–म–ताठर**–वि० घट्ट, आंवळ.
**ताठणें**–अ० दाटणें, घट्ट होणें.
**ताठा**–पु० डौल,मान,अहंपणा,गर्व,अभिमान.
**ताड्या**–पु० सपाटा, तडाका.
**ताड**–(सं) पु० तालवृक्ष.
**ताडकन–दिशी–दिनी–कर**–क्रि० ताड् अशा आवाजासह.
**ताडगोळा**–पु० ताडाचें फळ.
**ताडणें**–(सं) उ० वि० मारणें, चोपणें. २ धोरणानें–अनुमानानें जाणणें.
**ताडन–ण**–(सं) न० मार, चोप, शिक्षा.
**ताडपत्र**–(सं) न० ताडाचें पान.
**ताडपत्री**–स्त्री० पावसाचे निवारणार्थ आच्छादन.
**ताडातोड**–स्त्री० वाताहत, वियोग, विरह.
**ताडी**–स्त्री० मद्यविशेष.

**ताण**—(सं) पु० राग. २ स्त्री० वाण. ३ अनुकूल वारा. ४ वरचढ, आधिक्य.
**ताणणें**—उ० वि० ओढणें, लांब करणें.
**ताणा**—(सं) पु० ओढलेला पदार्थ, धागा.
**तात्काल**—(सं) क्रि० ( तत्काल पहा. )
**तात्पर्य**—(सं) न० सार, सारांश, हाशील, तत्व.
**तात्या**—(सं) पु० ताता, तात, पिता. २ गुरुजी. ३ एक विशेषनाम.
**तात**—(सं) पु० संबोधनार्थी या शब्दाचा उपयोग करितात, बाबा. [ निकड, नेट.
**तातड-डी—तांतड-डी**—स्त्री० घाई, जलदी,
**तादृश**—(सं) वि० तसा, त्यासारखा. २ अगदीं, नजरेस येण्या जोगता, अल्पही.
**तान्ह**—(सं) स्त्री० तहान, तृषा, तान.
**तान्हा**—(सं) वि० आईचे अंगावर पिणारा, लहान, नादान, स्तनंधय.
**तान्हुला**—(सं)वि० लहानगा, अंगावर पिणारा.
**तान**—(सं) स्त्री० स्वरांची ओळ. २ तहान.
**तानमान**—न० अदमास, बेतबात.
**ताप**—(सं) पु० ज्वर. २संताप. ३ गरमी, उष्णता. ४ त्रास, पीडा.
**तापट—ड**—(सं) वि० तलख, कडक, तडफड्या.
**तापणें**—(सं) अ० संतापणें, रागावणें. २ गरम होणें.
**तापता—फता**—पु० रेशमी वस्त्रविशेष.
**तापस**—(सं) पु० तपस्वी, तपी, तपोधन, योगी.
**ताफा**—(आ) पु० टोळी, तांडा, ताटी, जाळी.
**ताबडतोब—प**—क्रि० ह्याचपावलीं, अगदीं लवकर, जलदी.
**ताबा**—(फा) पु० कबजा, अंमल.
**ताबूत—द**—(आ) पु० डोला, ताजा.
**ताबेदार**—(फा)वि० कबजांतला, बंदा, अधीन.
**ताम्र**—(सं) न० तांबें.
**ताम्रन**—न० एक प्रकारचें पात्र, संध्येचें पाणी सांडण्याचें पात्र.

**तामशी—स**—(सं) वि० तापट, रागीट.
**तार**—(सं) स्त्री० तंत्री, तंतू. २ कफ, घुंदी. ३ वि० उच्च, चढा, मोठा.
**तारक**—(सं) वि० तारणारा.
**तारकस**—(सं) पु० तार काढणारा.
**तारका**—(सं) स्त्री० चांदणी, नक्षत्र, तारा.
**तारण**—(सं) न० मुक्ति. २ गहाण, बदला.
**तारणें**—(सं) स० बचावणें, मुक्त करणें. २ पाण्यांतून पार नेणें.
**तारदखाना**—(फा) पु० शेतखाना, शौचकूप.
**तारतम्य**—(सं) न० धोरण, तर्क, विचार.
**तारंबळ**—स्त्री० घाई, धांदल. २ फजीती, पचपची.
**तारवटणें**—अ० कफ चढणें, अंमल येणें.
**तारा**—(सं) पु० तारका, नक्षत्र. २ कमळ.
**तारीख**—( आ ) स्त्री० मिती, दिवस.
**तारीफ**—( आ ) स्त्री० स्तुति, वाहवा, प्रशंसा, गुणवर्णन.
**तारुण्य**—(सं) न० तरुणावस्था, ज्वानी, यौवन.
**तारूं**—न० नौका, जहाज.
**ताल**—(सं) पु० कालमान २. नाड. ३ स्त्री० बांध.
**तालामाला**—पु० बातबेत, तारतम्य, विचार.
**तालीम**—(आ) स्त्री० शिक्षण. २ व्यायामाची जागा.
**तालु**—(सं) स्त्री० टाळू, मेंदूचे वरचा डोक्याचा भाग.
**तालुका**—(आ) पु० देशाचा विभाग, महाल.
**तालेवार**—वि० श्रीमंत, पैसेवाला, धनिक.
**ताव**—पु० कागद, दोन बंद. २ हात. ३ आंच.
**तावडी**—स्त्री० अधीनता, झपाटा, तडाका, हात.
**तावणें**—(सं) उ० वि० तापवणें, तापणें. २ कातावणें, संतापणें. ३ उष्मा-गरमी होणें.
**तावत्**—(सं) क्रि० तोंपर्यंत, तों, तंव.
**तावदान**—(फा) न० भिंग, कांच, आरसा. २ भिंगाचें आच्छादन.
**ताशा—सा**—(आ) पु० वाद्यविशेष.

**तास**–(आ) पु० घंटा. २ कांठ. ३ पक्षिविशेष. ४ पाळ.
**तासडपट्टी**–स्त्री० खरडपट्टी, हजामत, खवडा.
**तासणी**–स्त्री० वाकस. २ वि० कापणारें.
**तासणें**–उ० वि० सोलणें, किसणें, छिलणें.
**ताळ**–पु० मर्यादा, सीमा.
**ताळा**–(सं) पु० प्रतीति, प्रचीति. २ मेळ.
**ताळेबंद**– पु० ताळा पाहण्याचा कागद.
**तांगड**– स्त्री० रांग, ओळ, तांडा.
**तांगडणें**– स० श्रम करविणें, मेहनत घेणें, जखडणें, आपल्या बरोबर खूप हिंडविणें.
**तांडव**–(सं) न० नृत्य, थै थै नाचणें, हावभाव करून नाचणें.
**तांडा**– पु० रांग, ओळ, पंक्ति. २ ताफा, टोळी.
**तांडेल**– पु० नाखवा, गलबतावरचा मुख्य.
**तांत**–(सं) स्त्री० तंतु, तार, आंतडें.
**तांतू**–पु० ( तंतू पहा )
**तांब्या**–(सं) पु० गडवा, तांब्याचें पात्रविशेष.
**तांब**–(सं) स्त्री० जंग, गंज. २ गहूं इत्यादिकांचा एक रोग. ३ एक प्रकारचा पिठाचा अंश.
**तांबट**–वि० तांब्याचें काम करणारा.
**तांबडमाती**–स्त्री० लालमाती, तामडमाती.
**तांबडा**–वि० लाल, रक्तवर्ण.
**तांबूल**–(सं) पु० विडा, पानसुपारी.
**तांबूस**–वि० कांहींसा तांबडा.
**तांबें**–(सं) न० ताम्र, एक धातु.
**तांबोळी**–(सं) वि० तांबूल विकणारा, विड्याचीं पानें विकणारा.
**तिकटें**–(सं) न० त्रिकोण, लांकडाची तिवटी.
**तिकडे**–वि० त्याबाजूस, तिकडच्या बाजूस.
**तिखट**–(सं) न० मिरच्यांची भुकटी. २ वि० तिक्त. ३ तीव्र, तीक्ष्ण.
**तिखें**–न० पोलाद.
**तिगस्ता**–क्रि० मागल्याच्या मागील वर्षी.
**तिघे**–(सं) वि० तीनजण, तीन असामी.
**तिजोरी**–वि० तीन जोरांचें.
**तिटकारणें**–स० द्वेष करणें, रागावणें.
**तिटकारा**–पु० तिरस्कार, कंटाळा, त्रास.
**तिठा–तिवाठा**–पु० तीन रस्त्यांचा मध्य.
**तिडणें**–अ० लागणें, दुखणें, ठुसठुसणें.
**तिडा**–पु० तिहींचा घोटाळा, तेढा, गुंत.
**तिडीक**–स्त्री० वेदना, कळ, रग, ठुसठुस.
**तितका**–वि० तेवढा, त्या आकाराचा, तितुका.
**तितपत**–वि० तितका, त्यामर्यादेपर्यंत.
**तितर–त्तर–त्तिर**–(सं) पु० पक्षिविशेष.
**तितिक्षा**–(सं) स्त्री० क्षमा, शांति.
**तिथि–तीथ**–(सं) स्त्री० मिती, तारीख, दिवस.
**तिधारी**–वि० त्रिधारी, तीन धारांचा.
**तिमिर**–(सं) न० अंधार, काळोख, तम.
**तिर्कटी**–न० तीन शिडांचें तारूं, जहाज.
**तिऱ्हाईत**–वि० निराळा, स्वतंत्र, परका.
**तिरका–पा**–(सं) वि० वांकडा, तिरकस, तेढा.
**तिरकी**–स्त्री० एक अल्पमोली नाणें.
**तिरकाटी**–स्त्री० तारवाच्या मुख्य तीन काठ्यांपैकीं एक.
**तिरडी**–स्त्री० शेवटची पालखी, ताटी.
**तिरंदाज**–(फा) वि० तीर मारणारा.
**तिरपगडें**–न० फाशांतील एक दान.
**तिरपिट**–स्त्री० त्रेधा, पचपी, फजिती, गोंधळ.
**तिरमिरणें**–अ० मिरमिरणें, मूर्छा येणें.
**तिरमिरी**–स्त्री० चक्कर, मूर्छा, घोंड.
**तिरवट–तिरवा–तिरसा**–वि० वांकडें पहाणारा, काणा, तिरळा. [पिष्ट.
**तिरशिंगराव**–पु० दुष्टाचार्य, आरेराव, को-
**तिरस्कार**–(सं) पु० तिटकारा, कंटाळा, त्रास.
**तिरस्कारणें**–(सं) स० धिक्कार–करणें–णें, कंटाळणें.
**तिरसट**–वि० रागीट, एककल्ली.
**तिरळा**–वि० तिरवा, काणा

**तिरीप-म**-स्त्री० भग, तिरपें किरण.
**तिल**-(सं) तीळ.२अंगावरील काळा टिपका.
**तिवई**-स्त्री० तीन पाई, तिपायी. ३ पायांची घडवंची.
**तिवठा-तिवाठा**-पु० तिठा, एका रस्त्याला दुसरा जेथें मिळतो ती जागा.
**तिवाशी**-स्त्री० तक्या, उशी.
**तिशी**-(सं) स्त्री० तीस वर्षांची उमर.
**तिष्ठणें**-(सं) अ० उभा असणें, वाट बघणें.
**तिस्मारखान**-(आ) पु० तिरांशिंगराव,लालभुजःकण. [ तिन्हाईत.
**तिसरा**-वि० दुसरा व चवथा यांमधील. २
**तिहेरी**-वि० तीन पदरी, तिपदरी.
**तिहोत्रा**-पु०शेंकडा ३ रुपये व्याजाचा दर.
**तिळतिळ**-(सं) वि० थोड थोडा, हळू हळू.
**तिंबणें**-उ० वि० मळणें, तुडविणें.
**ती**-सर्व० तो ह्याचें स्त्रीलिंग.
**तीक्ष्ण**-(सं) वि० तीव्र, तिखट, जलाल.
**तीज**-(सं) स्त्री० तृतीया, तिसरी तिथि.
**तीट**-स्त्री० तिटकारा, तीड, वीट. २वांकण. ३ काळा टिळक. [कारा.
**तीड**-स्त्री० वांकण, तीरपेपणा.२ तेड, तिट-
**तीन**-वि० त्रि, ३.
**तीनतेरा**-वि० वायफळ, पोकळ, दिखाऊ. २ वाताहत, नाश.
**तीर्थ**-(सं) न० पुण्यक्षेत्र. २ शुद्धोदक.
**तीर्थरूप**-(सं) सा० बाप व आई यांस लिहिण्याची पदवी, बाप, वडील.
**तीर्थस्वरूप**-(सं) सा० आईबापांशिवाय इतर वडील मनुष्यांस लिहिण्याची पदवी.
**तीर**-(सं) पु० किनारा, कांठ. २ बाण,शर.
**तीरकमठा**-(पु०)-**कमान**-(स्त्री०)-**कामटा**-पु० धनुष्यबाण, कामटा.
**तीव्र**-(सं) वि० जलाल,चलाख,तीक्ष्ण, उग्र.
**तीस**-वि० त्रिंशत्, वीस आणि दहा, ३०.
**तीळ**-(सं) पु० ( तिल पहा. )
**तुक्कल**-स्त्री० पतंगविशेष. वावडी.
**तुक्का**-(फा) पु० बोथट तीर. २ संधान.
**तुकडा**-पु० भाग, हिस्सा. फोड.
**तुकतुकी**-स्त्री० हुशारीची छाया, तजेला.
**तुच्छ**-(सं) वि० तिरस्कार्य, नीच.
**तुट्टी**-स्त्री० बेबनाव, दावा.
**तुटक-का**-(सं)वि०वेगळा, निराळा, भिन्न.
**तुटणें**-(सं) अ० मोडणें, फुटणें. [भरलेलें.
**तुडुंब-डुम**-वि० भरपूर, तुंबलेलें, कांठापर्यंत
**तुणणें**-म० सांधणें, शिवणें, तुरपणें.
**तुणतुणें**-न० वाद्यविशेष.
**तुतें**-न० तुतीचें फळ.
**तुतारी**-स्त्री० वाद्यविशेष.
**तुती**-(आ) स्त्री० वृक्षविशेष.
**तुफान**-(आ) न० वावटळ. २ आरोप, बालंट. ३ वि० आवरेनासा, द्वांड, मस्त.
**तुम्ही**-सर्व० तूंचें अनेकवचन.
**तुमान**-(फा) स्त्री० विजार, चोळणा.
**तुर्तातुर्त**-क्रि०बेतापुरतें, बेताचें,तुरुत,सध्यां.
**तुर्क**-(सं) पु० दुराणी, तुरुष्क.
**तुर्कस्तान**-न० तुर्क लोकांचा देश.
**तुरकी चाल**-स्त्री० अश्वगतिविशेष.
**तुरग-रंग-रंगम**-(सं) पु० घोडा, अश्व.
**तुरट**-(सं) वि० तुरटीच्या रुचीसारखा.
**तुरपणें**-उ० वि० तोडणें. २ शिवणें.
**तुरमा**-पु० तुरा, तुरमी, डिकशी, मंजिरी.
**तुरळ-तुरळक-तुरळक तुरळक**-वि०क्वचित, थोडें थोडें, किंचित्.
**तुरा**-(आ) पु० फुलांचा गुच्छ. २ मोत्यांचा दागिनाविशेष. ३ मोराची शेंडी, शिखा.
**तुरी**-(सं) स्त्री० थोटें.
**तुरुक**-(सं) पु० घोडेस्वार, बारगीर, तुर्क.
**तुरुंग**-पु० बंदीखाना, कैद. २ टेंप.
**तुरूत**-क्रि० ह्याक्षणीं, आतां, सध्यां.

**तुलना**–(सं) स्त्री० सादृश्य, साम्य. २ताल.
**तुलसी**–(सं) स्त्री० ( **तुळस** पहा. )
**तुला**–(सं) स्त्री० वजन, माप, तोल.* २ दांडी, तराजू, कांटा. ३ तूळरास.
**तुष्ट**–(सं) वि० तृप्त, संतुष्ट, खुष.
**तुष्टणें**–(सं) अ० संतोषणें, संतोष वाटणें.
**तुषार**–(सं) पु० शितोंडा, छिटा, थेंब.
**तुसडा**–वि० तिरसट, हेकड.
**तुसळ**–न० ( **कुसळ** पहा. )
**तुळई**–स्त्री० बहाल, खांड.
**तुळणें**–(सं) स० तोलणें, वजन करणें.
**तुळशीपत्र**–(सं) न०तुळशीचें पान.२अंगावरचा तुळशीपत्रासारखा काळा डाग.
**तुळस**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**तुंद**–(सं) वि० तुंदिल, लठ्ठ. [भोपळा.
**तुंब–तुंबा** पु० चाकाचा एक अवयव. २
**तुंबडी**–स्त्री० पिशवी. २ रक्त काढण्याचें हत्यार.
**तुंबणें**–अ० फुगणें, सांठणें.
**तुंबळ**–(सं) वि० उग्र, भयंकर, तुमुल.
**तुंबा**–(सं) पु० भोपळा, तुंबी, कद्दु. [विशेष.
**तूक**–न० निष्काचा सोळावा हिस्सा, वजन-
**तूट**–स्त्री० नुकसान, खोट, तोटा. २कमीपणा.
**तूण–तूणीर**–(सं) पु० भाता.
**तूप**–न० घृत, घी, आज्य.
**तूर्त**–क्रि० सध्यां, आतां, चालू काळांत.
**तूर–तुरी**–(सं) स्त्री० धान्यविशेष.
**तूस**–(सं) न०तांदुळाचें फोल,भाताचा कोंडा.
**तूळ**–(सं) स्त्री० सातवी रास. २ पु०कापूस.
**तूं**–सर्व० द्वितीयपुरुषवाचक सर्वनाम.
**तृण**–(सं) न० गवत, घास, चारा.
**तृतीय**–(सं) वि० तिसरें.
**तृतीया**–(सं) स्त्री० तिसरी. २ तिसरी तिथि, • तिसरी विभक्ति.
**तृप्ति**–(सं) स्त्री० समाधान, संतोष.
**तृषा–तृष्णा**–(सं) स्त्री० तहान, तान. २ इच्छा, लोभ.
**तृषार्त**–(सं) वि० तहान लागलेला, तृषाक्रांत, तृषापीडित, तृषातुर, तान्हेला.
**तेग–गा**–(फा) पु० तरवार, खड्ग. [तीव्र.
**तेज**–(सं) न० कांति, दीप्ति, प्रकाश. २
**तेजी**–(फा) पु० घोडा, अश्व. २ स्त्री० महर्गता, महागाई. [तिडा.
**तेडा–ढा**–वि० वांकडा, आडवा, तिरपा,
**तेतीस**–वि० तीस आणि तीन, तेहतीस.
**तेथें**–क्रि० त्या जागेवर, त्या ठिकाणीं.
**तेधवां**–क्रि० त्या वेळीं, तेव्हां, त्या काळीं.
**तेरडा**–पु० वनस्पतिविशेष.
**तेरवां**–क्रि० दोन दिवस अगोदर.
**तेरस**–(सं) स्त्री० त्रयोदशी.
**तेरा**–वि० त्रयोदश, दहा आणि तीन.
**तेरावा**–पु०मेल्याच्या तेरावे दिवशींचें श्राद्ध.
**तेरीज**–न० बोटखत. [भांडण.
**तेरीमेरी**–स्त्री० लढाई, बोलाचाली, तंटा,
**तेल**–(सं) न० तैल, स्नेह, रोगण. [विशेष.
**तेलसाडी–तेलफळ**–स्त्री० लग्नांतील बक्षीस-
**तेली**–पु० तेल काढणारा, तेल विकणारा.
**तेलीण**–स्त्री० तेल्याची बायको.
**तेलीतांबोळी**–पु० हलकी जात.
**तेव्हां**–क्रि० त्या वेळीं, त्या काळीं.
**तेवढा**–वि० तितका,त्या आकाराचा, तसला.
**तेवीं**–क्रि० तसा, त्या प्रकारचा, तसला.
**तेवीस**–वि० संख्याविशेष, वीस आणि तीन.
**तें**–सर्व० तृतीयपुरुषी नपुंसकलिंगी सर्वनाम.
**तैनात**–(आ) स्त्री० लवाजमा, परिचारक.
**तैल**–(सं) न० ( **तेल** पहा. )२तीव्र,चलाक.
**तैलबुद्धि**–(सं) स्त्री० तीव्रबुद्धि, जलद ग्रहण करण्याची शक्ति, कुशाग्रबुद्धि.
**तैसा**–वि० तसा, तसला, तसल्या प्रकारचा.
**तो**–सर्व० तृतीयपुरुषवाचक पुल्लिंगी सर्वनाम.

**तोकडा**–वि० लहान, आंखूड, न पुरेसा.
**तोटगा**–पु० ( **तोडगा** पहा. )
**तोटा**–पु० नुकसान, खोट, ठोकर, आंतबट्टा.
**तोटी**–स्त्री० नळी.
**तोठरा**–पु० खरबरितपणा, जडत्व. २ घशाला बसलेला बांध.
**तोड**–स्त्री० युक्ति, कल्पना, उपाय. २ तोडणी. ३ सोंगटी मारणें. ४ उलट पेंच.
**तोडगा**–पु० टाणाटोणा, जादु, कृतिविशेष.
**तोडजोड**–स्त्री० तडजोड, समजूत.
**तोडणें**–स० निकालास लावणें, मिटविणें. २ तुकडे करणें, चिरणें, फाडणें.
**तोडा**–पु० पायांतला दागीना, सांखळी. २ हजार रुपये. ३ कांकडा.
**तोतया**–वि० लबाड, लुच्चा, ढोंगी.
**तोतरा**–वि० लागून बोलणारा, चोचरा.
**तोता**–(फा) पु० राघू, पोपट, शुक, कीर.
**तोफ**–(फा) स्त्री० मोठी बंदुक, उल्हाटयंत्र.
**तोफा**–(आ) वि० उत्तम, बेष, नामी, छान.
**तोबरा**–पु० कवलपात्र.
**तोबरी**–स्त्री० कातड्याची पिशवी.
**तोबा**–(आ) पु० अनर्थ. २ अरेरे नको नको. ३ वस्त्रास पीळ भरून केलेलें मारण्याचें साधन. [ २ जरीचें कापड.
**तोय**–(सं) न० पाणी, जल, उदक, नीर.
**तोरण**–(सं) न० दारवठा, खिडकी. २ शोभाविशेष, दारावर बांधण्याचें माळ इत्यादि भूषण.
**तोरा**–पु० नखरा, डौल, ताठा, दिमाख.
**तोल**–(सं) न० वजन, माप, तुलना, मान.
**तोलणें**–स० वजन करणें, मापणें, जोखणें.
**तोशीस**–(आ) स्त्री० घस, झीज.
**तोष**–(सं) पु० सुख, तृप्ति, खुषी, संतोष.
**तोषणें**–(सं) अ० संतोष पावणें–होणें.
**तोषविणें**–(सं) स० संतोष–सुख देणें.
**तोसतान–दान**–(फा) न० काडतुसें वगैरे ठेवण्याची पेटी, पिशवी. [ बालंट.
**तोहमत–होमत**–(आ) स्त्री० खोटा आरोप,
**तोळा**–(सं) पु० बारा मासे.
**तों**–क्रि० त्यापर्यंत, तोंपावेतों.
**तोंड**–(सं) न० मुख, वदन, चेहरा. २ अति भाषण.
**तोंडलें**–न० भाजीचें फळविशेष.
**तोंडाळ**–वि० बडबड्या, फार बोलणारा.
**तोंवर–वरी–वेरी**–क्रि० ( **तों** पहा. )
**तंग**–(फा) वि० घट्ट. २ खोगीर आंवळण्याची दोरी–वादी–नाडी वगैरे.
**तंगड–डी**–स्त्री० पाय. [ ओढ.
**तंगाई–तंगी**–(फा) स्त्री० महागाई, तेजी,
**तंटा**–पु० वाद, भांडण, कज्जा.
**तंडुल**–(सं) पु० तांदुळ, चावल, भात.
**तंत्र**–(सं) न० गति, काम. २ टाणाटोणा, तोडगा. ३ क्रिया, कर्म.
**तंत**–(सं) **तंतोतंत**–क्रि० बराबर, बरहुकूम.
**तंतरणें**–स० फसविणें, विश्वासघात करणें.
**तंतु**–(सं) पु० बारिक दोर, सूत्र, वात.
**तंद्रा**–(सं) स्त्री० चंद्री, गुंगी.
**तंबाकू–खू**–(सं) स्त्री० तमाखू.
**तंबी**–(आ) स्त्री० मार, चोप. २धाक, धास्ती.
**तंबू**–पु० डेरा, कापडाचें घर.
**तंबुरा–तंबोरा**–(आ) पु० वाद्यविशेष, वीणा.
**तंव**–क्रि० तों, तोंपावेतों, तोंपर्यंत.

## थ.

**थ**–सतरावें व्यंजन.
**थक्क**–वि० आश्चर्य पावलेला, चकित.
**थकणें**–अ० दमणें, त्रासणें, श्रमणें.
**थट्टा**–स्त्री० मस्करी, चेष्टा, खोडी.

**थड**–(सं) स्त्री० बाजू, किनारा, कांठ.
**थडकणें**–अ० लागणें, आदळणें, येऊन पोंचणें.
**थडगें–थडें**–न० समाध, मेलें मनुष्य पुरल्याची निशाणी.
**थप्पड–थपडाक**–स्त्री० चपराक, चापटी.
**थबकडा**–वि० चापट, बसक्या घाटाचा.
**थबकणें**–अ० थांबणें, रेंगाळणें, उभें राहणें.
**थबथब**–क्रि० थॅबथॅब, टपटप.
**थबथबणें**–अ० भिजणें, पाणी गळणें.
**थर्र**–क्रि० थरकांपासह, सरोमांच.
**थर**–पु० ढीग, रास. २ निकर, शेवट.
**थरकांप**–पु० अतिभय, महाभीति.
**थरथरणें**–अ० कांपणें, हलणें, लटलटणें.
**थरारणें**–अ० थर्र होणें, थरथरणें.
**थलथलणें**–अ० दलदलणें, हलणें.
**थलथलित**–वि० हलणारें.
**थवा**–(सं) पु० समाज, मंडळी, टोळी, जमाव.
**थळ**–(सं) न० स्थळ, जागा, स्थान.
**थाट**–पु० मजा, मौज, गम्मत. २ थाटमाट, जामानिमा. ३ रचना.
**थाटणें**–उ० वि० करणें, बनविणें, मांडणें.
**थान**–(सं) न० स्तन, मामू, अंचळ.
**थाप्पा**–पु० कंडा, गवरी, रानशेणी, उपली.
**थाप**–स्त्री० गप्प, बढाईची गोष्ट, मिथ्या गोष्ट. २ गर्दी, ठेप, भीड.
**थापट–डी–ड**–स्त्री० थप्पड, चापट.
**थापटणें**–न० कुंभाराचें हत्यारविशेष. २ थप्पड मारणें. ३ थोपटणें. [बनविणें.
**थापणें**–(सं) स० रचणें, बनविणें, करणें,
**थापी**–स्त्री० करणी, गवंड्याचें हत्यार.
**थार–थारा**–पु० आश्रा, आसरा, टेका.
**थारेपालट**–पु० बदलेली जागा, हवाखाण्याकरितां जागा बदलणें.
**थारोळें**–न० कुंड, डबरा, डोह, डबकें.
**थाली**–(सं) स्त्री० परात, थाळा.
**थालीपीठ**–न० भाजणीचा वडा, खाद्यविशेष.
**थावर**–पु० वमेलें, मोठी कढई.
**थाळ**–पु० एकावर एक रचलेल्या गोऱ्या.
**थाळा**–पु० ताट, परात.
**थाळी**–स्त्री० दौंडी, जाहिरात. २ ताट.
**थांग**–पु० पत्ता, शोध, समाचार.
**थांबणें**–अ० थबकणें, रेंगाळणें, बंद पडणें. २ वाट बघणें.
**थिजणें**–अ० जमणें, एकवट होणें–बनणें, गोठणें, घट्ट होणें. २ विरघळणें, चरकणें, तोंड उतरणें. [घट्ट करणें.
**थिजविणें**–स० थिजण्याविषयीं यत्न करणें,
**थिबकणें**–अ० ( **टिबकणें** पहा. )
**थिरावणें**–(सं) उ० वि० स्थिर होणें, एक ठिकाणीं करणें, शांत होणें.
**थिल्लर–थिल्लोर**–वि० उथळ्या, चंचल बुद्धीचा, अल्पमति, खिलाडू, चंचल.
**थूथू**–स्त्री० पच्ची, हुर्यो, फजिती, छीछी.
**थुकणें**–अ० पिंक टाकणें, थुंकणें.
**थुंकणें**–अ० थुकणें, थुंका–थुका–थुकी–थुंकी टाकणें. २ दोष देणें.
**थुंकी**–स्त्री० तोंडांतील लाळ, मुखरस.
**थू**–(सं) के० धिक्. [२समोर, तडक.
**थेट**–क्रि० स्वच्छ, तसेंच, अगदीं एकसारिखें.
**थेर**–पु० चाळे, तऱ्हा.
**थेरडा**–वि० वृद्ध, म्हातारा, पिकलेला, वृद्ध.
**थेंब–थेंबका–थेम**–पु० बुंद, टिपका, टिपूस.
**थैथै**–क्रि० आनंदानें, खुष होऊन, थैथै या शब्दासह.
**थैला**–पु० मोठें पोतें, थैली, पोतें, पिशवी.
**थैली**–स्त्री० ( **थैला** पहा. )
**थोटा–थोंटा–थोटका**–वि० हात नसलेला, खुळपा, लुळा.
**थोंटापिंपळ**–पु० रांडपोरांशिवायचा मनुष्य.
**थोडका–थोडा**–वि० लहान, अपरा, ऱ्हस्व.

**थोतांड**—न० कुभांड, खोटा व्यूह, पाखंड.
**थोप**—स्त्री० थाप. २ पाण्याची लाट.
**थोपटणें**—उ० वि० थापटणें.
**थोबाड**—न० गाल, तोंडाची एक बाजू.
**थोबाडणें**—उ० वि० तोंडांत मारणें, गालफडांत देणें, थोबाडींत मारणें.
**थोर**—वि० श्रेष्ट, मोठा, मान्य.
**थोरवी**—**थोराई**—**थोरीव**—स्त्री० मोठेपणा, मान, सन्मान, वर्चस्व.
**थंड**—वि० गार. २ सुस्त, मंद.
**थंडाई**—स्त्री० थंडपणा, गारठा. २ गर्मी–ऊष्मा इत्यादि निवारणार्थ पेय. भांग.
**थंडावणें**—अ० ओलें असणें, भिजणें, गार वाटणें, गारठणें. २ निवणें. थंड होणें.

द

**द**—अठरावें व्यंजन. [जुगार.
**द्यूत**—(सं) न० पैसे लावून खेळणें, जुव्वा.
**द्रव्य**—(सं) न० दौलत,संपत्ति,पैसा.२ पदार्थ.
**द्रव**—(सं) पु० रस, पातळ पदार्थ, २ दया.
**द्रवणें**—अ० पाणी सुटणें, द्रव येणें–होणें, पाझरणें.२ वितळणें. ३ दया येणें.
**द्राक्ष**—(सं) न० किसमिस,ओला बेदाणा.
**द्राव्य**—**द्रवार्ह**—(सं) वि० द्रवणारें, ओलें करण्या जोगें.
**द्राविड**—(सं) पु० द्रविड देशांतला मनुष्य.
**द्राविडी प्राणायाम**—(सं) पु० उलटरस्ता, लांबणीचा रस्ता, आडवळण.
**द्रुम**—(सं) पु० वृक्ष, झाड.
**द्रोण**—(सं) पु० अश्वत्थाम्याचा पिता.२ पानाची वाटी. ३ परिमाणविशेष.
**द्रोह**—(सं) पु० द्वेष, मत्सर, खुनस, हेवा.
**द्वय**—(सं) न० जोडपें, जोडा, जोडी.
**द्वाड**—वि० दुष्ट, खोडकर, व्रात्य.
**द्वादश**—(सं) वि० बारा, १२.
**द्वादशी**—(सं) स्त्री० बारस, बारावी तिथी.
**द्वापर**—**पार**—(सं) न० तिसरें युग.
**द्वार**—(सं) न० दार, दरवाजा. २ कवाड, झडपा, दाराची फळी. ३ मार्ग.
**द्वारा**—(सं) श० मार्फत, कडून.
**द्वाही**—(सं)स्त्री० दवंडी, दांडोरा, थाळी.
**द्वि**—(सं) वि० दोन, बे.
**द्विज**—(सं) पु० दोन वेळां जन्मलेला–संस्कार झालेला मनुष्य, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य. २ दांत. ३ पक्षी.
**द्विरुक्त**—(सं) वि० दुप्पट, दुणा, जोड, संयुक्त.
**द्वितीय**—(सं) वि० दुसरा, दुजा. [विवाह.
**द्वितीय संबंध**—(सं) न० दुसरें लग्न, दुसरा
**द्वितीया**—(सं) स्त्री० दुसरी तिथी–विभक्ति.
**द्विधा**—(सं) क्रि० दोन तऱ्हेचें,दोन प्रकारचें.
**द्विप**—(सं) न० बेट, पाण्यानें वेष्टित भूमि.
**द्वेष**—(सं) पु० मत्सर, दुष्मनी, दावा, राग.
**द्वैत**—(सं) न० जीवशिवांचा भेद. २ भेद,दुजाभाव.
**दउड**—स्त्री० धांवणें, शर्यत, दौड, पळणें.
**दऊत**—(आ) स्त्री० खडिया, मषीपात्र, शाईचें पात्र.
**दक्ष**—(सं) वि० सावध, हुशार, धूर्त.
**दक्षिण**—(सं) स्त्री० उजवी बाजू. २ आग्नेयी व नैऋत्य यांमधील दिशा. ३ वि० दक्ष.
**दक्षिणा**—**क्षणा**—(सं) स्त्री० ब्राह्मणास धर्म ह्मणून दिलेलें द्रव्य.
**दक्षिणायन**—(सं) न० कर्क संक्रांतीपासून मकर संक्रांतीपर्यंतचा काळ.
**दखल**—(आ) वि० ओळख करणें, ओळखणें, ओळख देणें.
**दग्ध**—(सं) वि० जळलेला, भाजलेला.

**दगड**—पु० पाषाण, धोंडा, पथ्थर. [एक द्रव्य.
**दगडफूल**—न० औषधिविशेष, मसाल्यांतील
**दगडफोड्या**—वि० धोंडफोड्या, पाथरवट.
**दगडाळ**—वि० दगडी, पहाडी, खडकाचें.
**दगडावरची रेघ**—स्त्री० ब्रह्मलिखित, पक्की गोष्ट. [वि० दगडाचें.
**दगडी**—स्त्री० दगडाचें भांडें, पाषाणपात्र. २
**दगदग**—स्त्री० मेहनत, श्रम, त्रास.
**दगल**—(आ) स्त्री० लबाडी, कपट, घात, फसवणूक.
**दगलबाज**—वि० लुच्चा, लबाड, फसव्या.
**दगलबाजी**—स्त्री० (दगल पहा.)
**दगा**—(फा) पु० ( दगल पहा. ) [मरणें.
**दगावणें**—अ० नुकसान येणें, तोटा येणें. २
**दचकणें**—अ० धसका बसणें, भीति वाटणें असणें, भय वाटणें, बावरणें.
**दचका**—पु० धसका, धक्का, वचक, भीति, भय.
**दट्या**—पु० बूच, दाट, झांकण. २ नेट. ३ शिफारस.
**दटावणें**—स० भिवविणें, भय घालणें, भीति दाखविणें, रागें भरणें.
**दडणें**—अ० लपणें, छपणें, आड होणें.
**दडदडणें**—अ० आपटणें, अक्षराचा उच्चार कोठून तरी होणें.
**दडपणें**—उ० वि० दाबणें, सपाटून खाणें-पिणें, चेपणें.
**दडपादडप**—स्त्री० लाटालाट, उपटाउपट.
**दडविणें**—उ० वि० लपविणें, छपविणें, पाठीशीं घालणें.
**दडस**—वि० कठिण, मजबूत, निबर.
**दडा**—पु० चेंडू. २ कानठाळी.
**दडी**—स्त्री० दडकी, बुडी, अस्त, तळ.
**दणका**—पु० गुद्दा, ठुस्सा, टोला, घाव.
**दणकावणें**—उ० वि० मारणें, हाणणें, लगावणें.

**दत्त**—(सं) वि० दिलेला. २ न० नशीब. ३ पु० दत्तात्रेय. [लगा.
**दत्तक**—(सं)पु० मांडीवर दिलेला-घेतलेला मु-
**दत्तविधान**—(सं)न० दत्तक घेण्याचा विधि.
**दत्तात्रेय**—(सं) पु० दत्त, गुरुदत्त, अत्रि ऋषीचा मुलगा. [रूर, तोटा.
**ददात-ती-दधात**—स्त्री० वाण, गरज, ज-
**दधि**—(सं) न० दहीं. [टून नेणारा.
**दपट्या**—वि० उपट्या, लाड्यागंगाजी, दप-
**दपटणें**—उ० वि० ( दडपणें पहा. )
**दपटशहा**—पु० तंबी, भेवडावणी, धाक.
**दफतर-दप्तर**—(आ) न० कागदपत्र. २ मुलाचें कागद वगैरेचें गांठोडें.
**दफेदार**—(फा)पु० तोफखान्याचा अधिकारी.
**दब्ब**—वि० जड, फुगीर, दडस.
**दबकणें**—अ० वांकणें, थांबणें, चोपणें. २ भिणें, धाकांत राहणें.
**दबणें**—अ० लपणें, छपणें, दबकणें. २ भिणें, धाकांत राहणें.
**दबा**—पु० आड लपून राहणें. २ जाड्य.
**दबावणें-दबाविणें**—स० दाबणें, भिवविणें, भय घालणें, चप करणें. [वसान.
**दम**—(फा) पु० श्वास. २ जोर, ताकद. अ-
**दम खाणें**—अ० विराम. विश्रांति घेणें, थांबणें.
**दमट**—वि० आंबट ओला, भिजलेला, ओलसर.
**दमटणें**—अ० भिजणें, ओलसर होणें.
**दमडी**—स्त्री० पैशाची चौथाई, अर्धा अधेला.
**दमणें**—अ० श्रमणें, त्रासणें, थकणें.
**दम धरणें**—अ० थांबणें.
**दमविणें**—स० जिंकणें, थांबविणें, थकविणें.
**दमा**—(फा) पु० श्वास, रोगविशेष.
**दमान**—(फा) न० दोरखंड, जहाजाचा दोर.
**दया**—(सं) स्त्री० कृपा, मेहेरबानी, मर्जी.
**दर्ज**—(फा) स्त्री० इमारतीस असलेल्या दोन विटा अगर दगडांमधील जागा, भेग, चीर.

**दर्जा**-(आ) पु० अधिकार, योग्यता, पदवी.
**दर्जी-दरजी**-(फा) पु० शिंपी, शिवण काम करणारा.
**दर्प**-(सं) पु० उद्दाम वास. २ गर्व, ताठा.
**दर्पण**-(सं) पु० आरसा, आयना. [पाध्याय.
**दर्भर्या**-(सं) पु० कारटा, अंत्यकर्माचा उ-
**दर्भ**-(सं) पु० तृणविशेष. [अवकाशांत.
**दर्म्यान**-(फा) क्रि० मध्यस्थितींत, मधल्या
**दर्या-दर्याव**-(फा) पु० समुद्र, सागर.
**दर्याफ्त-ती**-(फा) स्त्री० माहिती, शोध, तपास.
**दर्यावर्दी**-(फा) पु० समुद्रावर राहणारा मनुष्य.
**दर्श**-(सं) पु० अमावास्या-व त्या दिवसाचें श्राद्ध. [विशेष.
**दर्शक सर्वनाम**-(सं) न० व्याकरणसंज्ञा-
**दर्शन**-(सं) न० पाहणें. २ ज्ञान. ३ भेट. ४ शास्त्र. ५ पुढचा-दृश्य भाग. [पदेश.
**दर्शनानुशासन**-न० नेत्रशास्त्र. २ शास्त्रो-
**दर्शविणें**-(सं) उ० वि० दाखविणें, समजावणें, सूचना करणें.
**दर**-(सं) पु० निरख, किंमत, मोल. २ छिद्र. ३ स्त्री० भेग. ४ क्रि० हर, प्रत्येक.
**दरकार-कार**-(फा) स्त्री० पर्वा, गरज, जरूरी.
**दरखास्त**-(फा) स्त्री० लेखी फिर्याद, अर्ज.
**दरगा**-(फा) पु० मुसलमानांचें पूज्य स्थान, मशीद.
**दरड**-(सं) स्त्री० कड, डोंगराची तुटकी बाजू, नदीचा कांठ, थड. [दपटशा देणें.
**दरडावणें**-उ० वि० भिवविणें, घाबरवणें,
**दरद-दर्द**-(फा) पु० रोग. २ काळजी घेणारा, माहितगार.
**दरदरणें**-अ० घाम येणें, घामानें भिजणें.
**दरदी**-(फा) वि० काळजी घेणारा, माहितगार.
**दरबार-दर्बार**-(फा) पु० न० कचेरी, राजसभा, सभा.
**दरवडा**-पु० दरोडा, घाला, मोठी चोरी, डाका
**दरवाजा**-(फा) पु० द्वार, कवाड, दार, झांपा
**दरवेशी**-(फा) पु० फकीर, गोसांवी, मुसलमानांतील विरक्त लोक.
**दरा-री**-(सं) पु० स्त्री० पर्वताचा कोपरा डोंगरांतील खोरें, नीर. २ पोट.
**दरारा**-पु० धास्ती, भय, धाक. [न, भिकारी.
**दरिद्री**-(सं) वि० गरीब, कंगाल, धनही-
**दरी**-(सं) स्त्री० दरा, खोरें. [पहाणारा.
**दरोगा**-पु० अधिकारी, अंमलदार, देखरेख
**दरोडा**-पु० ( **दरवडा** पहा. )
**दरोबस्त**-(फा) वि० सर्व, चटमोर, झाडून सर्व.
**दल**-(सं) न० पत्र, पान. २ पाकळी. ३ सैन्य. ४ पेळू.
**दलदल-ली**-स्त्री० रेवण, भुसभुशीत-ओली जमीन.
**दलदलणें**-अ० हलणें, खालींवर होणें.
**दलामालकी**-(फा) स्त्री० रिकामा काथ्याकूट, व्यर्थ घासघीस. २ दुसऱ्याकडून काम घेणें.
**दलाल**-(आ) पु० मध्यस्थ, अडत्या. [दौड.
**दवड**-स्त्री० व्यायामाकरितां पळणें, धांव,
**दवणा-ना**-(सं) पु० वनस्पतिविशेष.
**दवंडी**-स्त्री० थाळी, दौंडी, डांगोरा, जाहिरात.
**दवा**-(आ) पु० औषध, उपाय, इलाज.
**दवासन**-न० घोड्याचे गळ्यास बांधण्याच्या दोऱ्या, अघाडी.
**दश**-(सं) वि० दहा. [फजिती.
**दशा**-(सं) स्त्री० स्थिति. २ टोंक, शेवट. ३
**दशी**-स्त्री० टोंक, शेवट, आंचळी.
**दस्कत दस्तखत-दसकत**-न० हस्ताक्षर, निशाणी, सही.
**दस्त**-(फा) पु० कर, हात. २ सारा. ३ कागद.
**दस्तऐवज**-(फा) पु० खत, लेख.
**दस्तक**-(फा) पु० परवाना, परवानगी.

**दस्ता**--(फा) पु० चोवीस ताव, २४ कागद. बंदुकीचा मागला भाग, बत्ता.
**दस्ती**-(फा) पु० पवित्रा, सलामी, हाताला हात भिडविणें.
**दस्तुर**--(आ) पु० दस्तुरी. २ हस्ताक्षर.
**दस्तुरी**-(आ) स्त्री० कर, जकात.
**दस्तूर**-(फा) पु० चाल, रिवाज, रीत.
**दसरा**-(सं) पु० विजयादशमी, सणविशेष.
**दहं**-(सं)वि० दहा, दश, संख्यास्थानविशेष.
**दहन**-(सं) न० जळण्याची क्रिया, जळणें, दाह.
**दहशत**-(फा) स्त्री० धास्ती, धाक. रुबाब.
**दहिंवर**-न० दंव, हिम.
**दहीं**-(सं) न० दधि, विरजलेलें दूध.
**दळ्या**-वि० भित्रा. २ तृतीयाप्रकृति.
**दळ**-(सं) न० (दल पहा.) २दळयाचे लाडू.
**दळण**-(सं) न० दळण्याचा जिन्नस. २ दळण्याची क्रिया.
**दळणवळण**-न० व्यवहार, मैत्री, स्नेह, ओळखदेख, जाणें येणें.
**दळणें**-(सं)अ०पिसणें,जात्यानें बारीक करणें.
**दळा** पु० जाळून माफ केलेला डोंगर.
**दळिया**-पु० पक्वान्नविशेष, दळ.
**दाई**-स्त्री० तान्ह्या मुलास पाजण्याकरितां ठेवलेली बाई, धात्री.
**दाईज**--(सं) पु० नातेवाईक, आप्त,भाऊबंद.
**दाखल**-(आ) वि० हजर, माहीत,पोंचलेला.
**दाखला**--पु० उदाहरण, नमुना, मुद्दा.
**दाखविणें--दावणें**--उ० वि० प्रत्ययास आणणें, दृश्यमान करणें-होणें, समजावणें.
**दाट**-वि० घट्ट, जाड, घन.
**दाटणें**-अ० घट्ट होणें. २ भरून येणें.
**दाटा**--पु० बूच, गुडदी, झांकण.
**दाटी**--स्त्री० गर्दी, भीड, खेंच.
**दाटून**--क्रि० मुद्दाम, जाणून, समजून--उमजून,बळेंनें.
**दाठरणें**-अ०सक्त होणें,निबर होणें,घट्ट होणें.
**दाढ**-(सं) स्त्री० दुहेरी दांत, गालांतले दांत. २ भाजलेली जमीन.
**दाढी**-(सं) स्त्री० हनुवटीचे केस.
**दाण**--न० हशील, दस्तुरी.
**दाणा**--(फा) धान्य, धान्याचा कण, एक संख्या. २ शहाणा, समंजस.
**दाणागोटा**-पु०धान्य,सामुग्री,सामानसुमान.
**दाणादाण**--स्त्री० पळापळ, धांदल,फजेती.
**दाणापाणी**-न० उपजीविकेचें साहित्य, सामग्री, बेगमी.
**दात**-पु० दंश, डूख, सूड घेण्याची इच्छा.
**दाता**-(सं) वि० उदार, दानशील, सखीचा लाल, कर्ण.
**दातृत्व**-(सं) न० उदारता, औदार्य.
**दाद**--(फा) स्त्री० इनसाफ, न्याय. २ पु० त्वग्रोगविशेष.
**दादर**--(सं) पु० जिना. २ रोगविशेष.
**दादरा**-पु० ताल-कविताविशेष. २ दाट, झांकण.
**दादला**-पु० नवरा, पति, भ्रतार.
**दादा**--पु०थोरला भाऊ. २बापाचा बाप,आजा.
**दान**--(सं) न० धर्म, बक्षीस. २ डाव.
**दानत**--(आ) स्त्री० इमान, विश्वास, नियत.
**दानव**--(सं) पु० असुर, दैत्य, राक्षस.
**दाब**--पु० धाक, धास्ती, रुबाब. २ वजन.
**दाबणें**--उ० वि० गप्प करणें. २ वजनाखालीं ठेवणें.
**दाभण**-पु० मोठी सुई, शिवण्याचें हत्यारविशेष.
**दाम**-पु० पैसा, द्रव्य. २ एका पैशाचा साडे सातवा हिस्सा. ३ दांवें, दोरी.
**दामटणें**-उ० वि० हाकलणें. २ वापरणें.
**दामदुप्पट**--स्त्री० मुद्दलाच्या दुप्पट, रक्कम.
**दामाजीपंत**--पु० ( दाम १ पहा. )
**दामुखा**--पु० बाभळीचें बीज.

**दामोदर**–वि० श्रीमंत, धनवान, सावकार. २ पु० कृष्ण.
**दाय**–(सं) पु० वडिलोपार्जित हक्क, पिढ्या.
**दायाद**–(सं) पु० वारस, आप्त.
**दार**–(सं) न० दरवाजा, कवाड. २ एक प्रत्यय धारण करणारा या अर्थी. ३भार्या.
**दारकस**–न० कुसूं.
**दारा**–(सं) स्त्री० भार्या, बायको, बाईल.
**दारिद्य**–(सं) न० गरीबी, दीनावस्था.
**दारुण**–वि० भयंकर,अघोर, घोर.
**दारुणा**–पु० रोगविशेष,मल.
**दारू**–(फा) स्त्री० सुरा, शराब. २ गंधक–सोरा–इत्यादि पदार्थांचें मिश्रण. ३ दवा.
**दाल**–(फा) पु० रेशमीकांठ,मगजी,किनार.
**दालचिनी**–स्त्री० औषधिविशेष.
**दालदी**–पु० जहाजवाला, नाखवा, नावाडी.
**दालन–लान**–(फा) न० सभामंडप, कचेरी, दिवाणखाना.
**दाव**–(सं) न० वन, जंगल, विपिन, अरण्य. २ वणवा. [ दोरी.
**दावण**–स्त्री० रांग, ओळ, गुरें बांधण्याची
**दावा**–(आ) पु० शत्रुत्व, दुष्मनी. २ फिर्याद. ३ हक्क. [ दोरी.
**दावें–दांवें**–(सं) न० गुरांना बांधावयाची
**दास्तान**–(फा) न० कोठी, मालाची जागा.
**दास्य**–(सं) न० चाकरी, नोकरी, काम.
**दास**–(सं) पु० चाकर,नोकर, गडी, गुलाम.
**दासी**–(सं) स्त्री० स्त्री चाकर, बांदी.
**दाह**–(सं) पु० आग, जळणें, भडका.
**दाळ–डाळ**–(सं) स्त्री० तुरी हरबरे वगैरेंचे दोन निरनिराळे तुकडे, दळ, दल.
**दाळिंब**–(सं) न० अनार, दाडिम.
**दांड**–(सं) वि० दांडगा,आडदांड,माजोरी.
**दांडकें**–(सं) न० दांडू, दंड, सोडगें.
**दांडगा**–(सं) वि० दांड, बळकट,द्वाड,मस्त.
**दांडगाई**–स्त्री० मस्ती, चाळे.
**दांडा**–(सं) पु० दांडू, पकड, सोटगा.
**दांडारा**–पु० नाकाचा दांडा–शीर.
**दांडी**–(सं) स्त्री० काठी. २ पाण्यांत गेलेली जमिनीची सोंड. ३ तराजूची काठी.
**दांडू**–(सं) पु० खेळण्याचें सोडगें, दांडा.
**दांडोरा**–पु० ( दवंडी पहा. )
**दांत**–(सं) पु० दंत, तोंडांतील हडकें, मुळे, दाढा व त्याशेजारील हडकें. [मिळणें.
**दांतकडी–खिळी–खीळ**–स्त्री० दांतास दांत
**दांतरी**–(सं) स्त्री० लहान दांत,मुलांचे दांत.
**दांतवण**–(सं) न० दांतांस लावण्याची पूड, औषधविशेष.
**दांता**–(सं) पु० फणी–कंगवा वगैरेचे दांत.
**दांभिक**–(सं) वि० ढोंगी, दंभ माजविणारा.
**दिक्**–(सं) स्त्री० दिशा, प्रांत, मुलूख.
**दिक्क**–(आ) वि० थकलेला, त्रासलेला, उदास, आजारी.
**दिक्कत**–(आ) स्त्री० संशय, वहीम, शंका.
**दिगंतर**–(सं) न० दुसरी दिशा, परदेश.
**दिगंबर**–(सं) वि० नागवा, नंगा, २ महादेव. ३ बौद्धानुयायी एक पंथ.[४ दुसरा.
**दिगर**–(फा) क्रि० शिवाय, खेरीज, वांचून.
**दिडकी**–स्त्री० पैसा, नाणेंविशेष.
**दिधणें**–उ० वि० देणें, स्वाधीन करणें.
**दिन**–(सं) पु० दिवस, अहोरात्र.
**दिपणें**–(सं) अ० अंधेरी येणें, चक्क होणें.
**दिम्मत**–(आ) स्त्री० मार्फत, विश्वास.
**दिमक**–स्त्री० वाळवी, उधई.
**दिमाख**–(आ) पु० तोरा, डौल, नखरा.
**दिरंग–रिंग**–(फा) पु० उशीर, वेळ, काळ.
**दिल**–(फा) पु० मन, अंतःकरण. २ खुषी.
**दिलगिरी**–(फा) स्त्री० मनाची वाईट स्थिति, दुःख, आधि. [ल्या मनाचा.
**दिलदार**–(फा) वि० मनाचा मोकळा, खु-

दिलभर (फा) पु० आपक, प्रिय, प्रेमपात्र.
दिलासा पु० उत्तेजन, शाबासकी, वाहवा.
दिव्य (सं) न० चमत्कार, अद्भुत कृत्य, ईश्वरी कृत्य. २ वि० ईश्वरी.
दिवटा वि० मूर्ख, पाजी.
दिवटी स्त्री० हिलाल, लहान दिवा.
दिवल न० सर्पविशेष.
दिवली (सं) स्त्री० लहान दिवा, पणती, दीपिका.
दिवस (सं) पु० अहोरात्र, दिन.
दिवा (सं) पु० आराप, जोत, समई. २ वि० दिवटा, मूर्ख.
दिवाण (फा) पु० मुख्यमुत्सद्दी, मुख्यप्रधान, कारभारी.
दिवाणी (फा) वि० देण्याघेण्यासंबंधी.
दिवांध (सं) वि० ज्याला दिवसास दिसत नाहीं तो. २ पु० घुबड.
दिवाना णा (फा) वि० वेडा, मूर्ख चळलेला, पिसा.
दिवाभीत (सं) वि० घुबड, उलूक. २ लाजाळू. ३ चोर.
दिवाल र (फा) स्त्री० भिंत, कुड, चांदई.
दिवाळखोर वि० उधळ्या, दिवाळें काढणारा.
दिवाळी (सं) स्त्री० हिंदु लोकांचा एक सण विशेष, दीपावली, दिपवाळी.
दिवाळें न० जवळ पैसे नाहींत अशी स्थिति.
दिशा (सं) स्त्री० बाजू, प्रांत. २ मार्ग.
दिसणें अ० दृष्टीस येणें, नजरेस पडणें.
दिंड न० पक्वान्नविशेष. २ कापडाचा गठ्ठा.
दिंडी स्त्री० दरवाज्याची खिडकी. २ छंदविशेष. ३ छबिना, साधुसंतांची भजनयुक्त मिरवणूक.
दीक्षा (सं) स्त्री० उपदेश, शिक्षण, गुरूपदेश.
दीक्षित (सं) वि० दीक्षा घेतलेला. २ यज्ञ केलेला, अग्निहोत्री.
दीड वि० एक आणि अर्धा.
दीन (सं) वि० गरीब. २ (आ) पु० धर्म.
दीप्त (सं) क्रि० प्रकाशित, चकाकित.
दीप (सं) पु० ( दिवा १ पहा. )
दीर्घ (सं) वि० मोठा, लांब. २ गुरु.
दीर (सं) पु० भाऊजी, नवऱ्याचा भाऊ, देवर.
दीस पु० ( दिवस पहा. )
दु एक उपसर्गः वाईट. २ दोन.
दुक्का पु० ( दुवा -व्वा पहा.)
दुकटा वि० दुप्पट, एकादा.
दुकळ काळ (सं) पु० महागाई, महर्गता, काळ, आपत्ति.
दुकाटी वि० दोन टोकांचें. २ न० एक प्रकारचें जहाज.
दुकान (फा) न० विक्रीची जागा.
दुःख (सं) न० त्रास, वेदना, संकट, रोग.
दुखणाईत वि० आजारी, बेमार, दुःख झालेला.
दुखणें (सं) अ० वेदना होणें, ठणकणें. २ न० आजार, बेमारी.
दुखवटा पु० शोक, सुतक, अशौच. २ शोकाची देणगी.
दुखापत (सं) स्त्री० जखम, खोंक.
दुग्ध (सं) न० दूध, क्षीर, पय.
दुग्धा पु० संशय, भ्रम, वहीम, भ्रांति.
दुगाणी स्त्री० एक प्रकारचें नाणें, अर्धा पैसा. २ दोन पाय.
दुजा वि० दुसरा, दुकटा, परकी.
दुट्टे टें न० मापण्याची दोरी, कांडें. २ त्रास.
दुट्टा पु० कागदाचा ताव, तुंडा.
दुडकी स्त्री० दुडकी चाल, घोड्याची एक चाल.
दुढ्ढाचार्य पु० शेकोजी, गोमाजी कापशे.
दुड्डी स्त्री० दोन फाशांतलें चारांचें दान.
दुणणें दुप्पट करणें, दुहेरी करणें.
दुणा वि० दुप्पट, दुहेरी.
दुणावणें उ० वि० दुप्पट करणें-होणें.
दुतर्फा (फा) क्रि० दोन्ही बाजूंनीं.
दुतोंडें (सं) न० दोन मुखांचा प्राणी, सर्पविशेष.
दुथडी स्त्री० दोन कांठ.
दुध्या पु० पांढरा मुग्गा भोपळा, कद्दु, दुधीया.
दुनिया (फा) स्त्री० पृथ्वी, जग, भूलोक.

**दुपतें-दुभतें**-न० दुधाची सोय, गाय-म्हैस इत्यादि.

**दुपार**-(सं) स्त्री० मध्यान्ह, अपराण्ह, दोन प्रहर.

**दुपेटा-पट्टा**-पु० उपरणा, फर्द. [ जारी.

**दुबळ्या**-(सं) वि० पंगु, अशक्त, रोगी, आ-

**दुमची**-(फा) स्त्री० निकड. २ घोड्याची लाथ.

**दुमड**-स्त्री० घडी, सुरकुती, चुणी.

**दुमाला**-(फा) पु० पुरवठा, जोर, दुहेरी मदत. २ वि० दोन मालकांचें.

**दुय्यम**-वि० नायब, दुसऱ्या प्रतीचा.

**दुर्ग**-(सं) पु० किल्ला, गड, गढ, कोट. २ कठिण प्रसंग.

**दुर्गा**-(सं) स्त्री० देवीविशेष.

**दुर्**-(सं) एक उपसर्गः वाईट, खराब.

**दुरडी**-स्त्री० एक प्रकारचें टोपलें, रोळी.

**दुरवा**-(सं) स्त्री० गवतविशेष, हरळी, दूर्वा.

**दुरील**-वि० दूरचा, लांबचा.

**दुरुस्त**-(फा) वि० योग्य, बरावर. २ बिन-चूक, चुका काढून टाकलेलें.

**दुलई**-स्त्री० रजई, पातळ लेप.

**दुलदुलित**-वि० गुबगुबित, पुष्ट, लट्ठ.

**दुलाच्या-दुलीच्या-दुमच्या**-स्त्री० घो-ड्याच्या मागच्या लाथा.

**दुलाव**-स्त्री० अट-बैठक, फरताळ.

**दुवक्तां**-(आ) क्रि० दोन्ही वेळां, दोन्हीसमयीं.

**दुवा**-(आ) पु० उपकार मानणें, आशीर्वाद. २ सांखळीचा अवयव.

**दुस्मान**-(फा) पु० शत्रु, दावेदार.

**दुशाला**-पु० दुहेरी शाल, शालजोडी.

**दुष्ट**-(सं) वि० वाईट, खराब, दुराचारी.

**दुस्तर**-(सं) वि० कठिण, असाध्य.

**दुस्मान-समान**-(फा) पु० शत्रु, वैरी.

**दुसड**-वि० दोन सडीचा, दोन वेळां सडलेला.

**दुसरा**-वि० दोन ह्या संख्येचा, द्वितीय.

**दुहजबी**-वि० दोन कामांचा, दुकामी.

**दुहणें**-(सं) उ० वि० दूध येणें, देणें.

**दुहिता**-(सं) स्त्री० कन्या, मुलगी.

**दुहेरी-हिरी-हेरा**-वि० दुप्पट, जोड, दु-प्पट असलेला.

**दुंदुभि**-(सं) पु० नगारा, नौबत, चौघडा.

**दूड**-स्त्री० दोन गळेभर.

**दूण**-स्त्री० मुरड, सुरकुती. [ सूद.

**दूत**-(सं) पु० हेर, बातमीदार, चाकर, जा-

**दूतिका-ती**-( सं ) स्त्री० स्त्रीचाकर-हेर-जासूद. [ क, डीक.

**दूध**-(सं) न० दुग्ध, पय, क्षीर. २ पु० चो-

**दूम**-(फा) स्त्री० शेंपूट. २ पेंचविशेष. ३ वि० दुय्यम.

**दूर्वा**-(सं) अने० दुरवा, हरळी. [ एकीकडे.

**दूर**-(सं) वि० लांब, अंतरावर, अलग,

**दूषक**-(सं) वि० दोष देणारा-ठेवणारा, निंदक.

**दूषण**-(सं) न० दोष, अपराध, गुन्हा, निंदा.

**दूषणें**-(सं) उ० वि० दोष देणें.

**दृढ**-(सं) वि० निश्चयाचा, घट्ट, पक्का.

**दृढभाजक**-(सं) पु० गणितसंज्ञाविशेष.

**दृश्य**-(सं) वि० दिसण्याजोगा, नजरेस ये-ण्याजोगा. [ घणें, दृष्ट पडणें.

**दृष्टावणें-ष्टावणें**-अ० नजर लागणें-बा-

**दृष्टांत**-(सं) पु० उदाहरण, दाखला, गोष्ट.

**दृष्टादृष्ट**-(सं) स्त्री० नजरानजर.

**दृष्टि**-(सं) स्त्री० नजर, ध्यान, चंद्री. [स्थान.

**देऊळ**-(सं) न० देवालय, मंदिर, ईश्वराचें

**देखणा**-वि० सुंदर, सुरेख, सुरूप.

**देखणाऊ-देखाऊ-दिखाऊ**-वि० दिस-ण्यांत मात्र चांगला.

**देखणें**-स० पहाणें. [तां, समक्ष.

**देखत-देखतां**-क्रि० पहातां, पहात अस-

**देखरेख**-स्त्री० नजर, पहाणी.

**देखावा**-पु० गृहवृक्षादिरचना, कृत्रिम र-चना-लेखविशेष.

**देखील**–श० सुद्धां, ही.
**देग**–(फा) स्त्री० मोठें भांडें–पात्र. [हार.
**देघे**–स्त्री०व्यापार, देणें–घेणें, पैशाचा व्यव-
**देटी–ठी**–स्त्री० फांदी–खांदी, दांडा, देंठ.
**देठ–देंठ**–पु० कोंब, मूळ, फांदी, ज्याला फूल किंवा फळ धरतें तो झाडाचा भाग.
**देणगी**–(सं) स्त्री० नजर, भेट, नजराणा, बक्षिस, दान.
**देणावळ**–(सं) स्त्री० कामाची मजूरी, भाडें.
**देणें**–(सं) न० कर्ज, ऋण. २ हवाली–स्वाधीन करणें. [कचकित.
**दे–दैदीप्यमान**–(सं) वि० प्रकाशमान, च-
**देव्हारा**–पु०देव ठेवण्याकरितां केलेला चौरंग.
**देव्हारें**–न० ढोंग. २ मानमरातब, प्रतिष्ठा.
**देव**–(सं) पु० जगन्नियंता, प्रभु,ईश्वर, देवता.
**देवघेव**–स्त्री० ( **देघे** पहा. )
**देवडी–ढी**–स्त्री०चौकी,पाहरेकऱ्यांची जागा.
**देवदार–द्वार–दारु**–(सं) पु० वृक्षविशेष.
**देवदेव**–स्त्री० ईश्वराप्रीत्यर्थ काळ लोटणें, हरिहरी, देवधर्म.
**देवनागरी**–(सं)स्त्री०बाळबोध लिपि, मराठी.
**देवभाषा**–(सं) स्त्री० संस्कृत–गीर्वाण भाषा.
**देवर**–(सं) पु० (**दीर** पहा.)
**देवऋषि**–**रुषी**–(सं) पु० पंचाक्षरी, मंत्री, छांछू करणारा मनुष्य. [ वाचें कृत्य.
**देवस्की**–स्त्री० देवासंबंधीं देणें, नवस, दे-
**देवस्थान**–( **देऊळ** पहा. ) [ खोलगा.
**देवळी**–स्त्री० कोनाडा, भिंतींत ठेविलेला
**देवाण घेवाण**–स्त्री० अदलाबदल, नजराणा पाठविणें व घेणें.
**देवालय**–(सं) न० देऊळ, देवस्थान, मंदीर.
**देवी**–(सं) स्त्री० स्त्रीदेव, देवता. २ रोगविशेष, माता. ३ राणी.
**देश**–(सं) पु० प्रांत, परगणा, मुलूख. २ पश्चिमघाटापासून पूर्वघाटापर्यंतचा मुलूख.
**देशधडी–देशोधडी**–क्रि० वाताहत, देशोदेश हिंडण्याची स्थिति.
**देशपांड्या**–पु० महालकरी. [ **अधिकारी.**
**देशमुख**–पु० परगण्याचा मुख्य, **देशाचा**
**देशस्थ**–(सं) वि० देशांत रहाणारा. २ ब्राह्मणजातिविशेष. [झालेला, गांवठी.
**देशी–देशीय**–वि०स्वदेशी, आपल्या देशांत
**देसाई**–पु० ( **देशमुख** पहा. )
**देह**–(सं) पु० काय, शरीर, अंग, काया.
**देही**–(सं) पु० शरीरी, आत्मा.
**दैत्य**–(सं) पु० राक्षस, असुर, दानव.
**दैन्य**–(सं) न० दरिद्रावस्था, गरीबी, दैना.
**दैनंदिन**–(सं) वि० प्रतिदिवशींचें.
**दैव**–(सं) न० नशीब, प्रारब्ध–लब्ध.
**दैवत**–(सं) न० ( **देव–देवता** पहा. )
**दैववशात्–वशें**–क्रि० प्रारब्धानें, नशिबानें.
**दोकडा**–पु० नाणें–वजनविशेष, अधेला, कच्चाचा १० वा हिस्सा.
**दोडका**–पु० फळविशेष.
**दोडकी**–स्त्री० दोडक्याचा वेल.
**दोघे**–वि० दोन्ही, दोन.
**दोन**–(सं) वि० द्वि, दोवे, २.
**दोर**–(सं) पु० दोरखंड, मोठी दोरी.
**दोरवा**–पु० एक प्रकारचें कापड.
**दोरा**–पु० धागा, दोरी. २ संबंध.
**दोला**–(सं) पु० झोंपाळा, झुला.
**दोष**–(सं) पु० अपराध, गुन्हा, पातक.
**दोषी**–(सं) वि० अपराधी, गुन्हेगार, पातकी.
**दोस्त**–(फा) पु० मित्र, स्नेही.
**दोस्ती**–(फा) स्त्री० मित्रत्व, प्रेम, स्नेह.
**दोहद**–(सं) न० डोहाळा, गर्भवती स्त्रीची इच्छा. २ झाडाला फळें किंवा फुलें येण्यासाठीं केलेला तोडगा.
**दोहन**–(सं) न० दूध काढणें.
**दोहरा**–पु० हिंदुस्थानी कविताविशेष.

**दोहोत्रा**–पु० शेकडा २ रुपयांप्रमाणें व्याज, दुहोत्रा.
**दोंद**–न० मोठें पोट, सुटलेलें पोट, मेद.
**दोंदिल**–वि० दोंद सुटलेला.
**दौड**–स्त्री०( **दवड** पहा. )
**दौत**–(आ) स्त्री० मषीपात्र, शाईचें भांडें.
**दौलत**–(आ) स्त्री० द्रव्य, धन, खजिना.
**दौहित्र**–(सं) पु० मुलीचा मुलगा, नातू. २ न० मुलीच्या मुलानें करावयाचें मातामहश्राद्ध. [ पें. ३ भांडण.
**द्वंद्व**–(सं) पु० समासविशेष. २ न० जोड-
**दंग**–वि० गुंग, तल्लीन, तन्मय, गर्क, चूर.
**दंगल**–पु० आखाडा, दंगा करण्याची जागा. २ दांडगाई.
**दंगा**–पु० घोटाळा, गोंधळ, भांडाभांडी.
**दंड**–(सं) पु० शिक्षा, सजा. २ स्त्री० काठी. ३ बोटांपासून खांकेपर्यंत सगळा हात, खांकेपासून कोपरापर्यंतचा हाताचा भाग. ४ जोर. [करणें, मारणें.
**दंडणें**–(सं) उ० वि० शिक्षा करणें, सजा
**दंडन**–(सं) न० ( **दंड** पहा. )
**दंडवत**–न० नमन, नमस्कार, पायां पडणें, साष्टांग नमस्कार. [ यारी, बिछाना.
**दंडासन**–न० अंथरूण, झोंप घेण्याची त-
**दंडुका–दंडोका–दंडूक**–पु० दांडू, लहान सोटा, दांडकें, सोडगा.
**दंत्य**–(सं) वि० दांतांशीं जिभेच्या स्पर्शानें ज्यांचा उच्चार होतो ते.
**दंत** (सं) पु० दांत,सुळा,द्विज. [ स्त्रीपुरुष.
**दंपती–दंपत्य**–(सं) न० जोडपें, म्हणून,
**दंभ**–(सं) न० ढोंग, बंड, सोंग.
**दंव**–न० दहिंवर, हींव, हिम.
**दंश**–(सं) पु० डांस, चावा, नांगी मारणें.

## ध

**ध**–सोळावें व्यंजन.
**ध्यान**–(सं) न० लक्ष, विचार. २ मूर्ति, सोंग. ३ भक्तिविशेष. ४ आठवण, स्मरण.
**ध्यास**–(सं)पु०चळ, वारंवार आठवणें, चाळा.
**ध्रुपद**–(सं) न० ध्रुवपद, पालुपद. २ ध्रुपद, छंदविशेष. [वि० अचल, स्थिर, निश्चित.
**ध्रुव**–(सं) पु० उत्तरेकडील अचळ तारा. २
**ध्रुवपद**–(सं) न० ( **ध्रुपद** पहा. )
**ध्वज**–(सं) पु० निशाण, पताका.
**ध्वनि**–(सं) पु० आवाज,शब्द.२ काव्यभेद.
**ध्वंस–ध्वसन**–(सं) पु० नाश.
**ध्वांत**–(सं) न० अंधार, काळोख. [ ढकलणें.
**धका–क्का**–पु० हिसका, धकलणें, धकाधकी,
**धकी–धकी**–स्त्री० ( **धका** पहा.)
**धग**–स्त्री० दाह, उष्मा, आंच.
**धगड**–पु० नवरा. २ वि० आवडता, प्रिय.
**धज–जा**–(सं) पु० स्त्री० ध्वजा, पताका, निशाण. [ दाखविणें.
**धजणें**–अ० धाडस करणें, धजावणें, धैर्य
**धट्ट–ट**–वि० धीट, धैर्यवान, साहसी.
**धट**–(सं) पु० टांगलेला वजन करण्याचा कांटा, तागडी. २ वि० धीट.
**धटाई–टाई**–स्त्री० धैर्य, साहस, अवसान, छाती, दांडगेपणा. [जी, जंगी, धट्टाकट्टा.
**धटिंग–धटिंगण**–वि० बळकट, निष्काळ-
**धड**–न० मुंडक्याखेरीज शरीर. २ क्रि० स्पष्टपणें, उघड. ३ सबंध.
**धडक**–स्त्री० धास्ती, भीति, धाक. २ धक्का, एक प्रकारचा पेंच. ३ टक्कर. ४ क्रि० थेट, नीट.
**धडकणें**–स्त्री० थडकणें, पोंचणें, येणें.
**धडका**–वि० सबंध. न फाटलेला. २ पु० धडक, धक्का. ३ धडकी, धास्ती.

**धडकी**–स्त्री० ( **धडका** पहा. ) [वडणें.
**धडधडणें**–अ० छाती उडणें. २ पडणें, घड-
**धडधडीत**–क्रि० स्पष्टपणें, उघड, उघड-
रीतीनें, प्रत्यक्ष. [रदार.
**धडधाकट**–ड–वि० धट्टाकट्टा, भक्कम, जो-
**धडपड**–स्त्री० खटपट, खटाटोप, मेहनत करणें.
**धडपडणें**–अ० खटपट–मेहनत करणें.
**धडसा–स**–वि० धडका, धड, सबंध.
**धडा**–पु० पाठ. २ रोग. वि० ३ कांहींशेर माप–देशपरत्वें व पदार्थपरत्वें हें वेगळें असतें. ४ कांटा, दांडी, तराजू. ५ निश्चय.
**धडाका**–पु० धक्का, झपाटा, तडाका.
**धडी**–स्त्री० रास. २ कांटा. ३ तोलाचें प्र-
माण, ( **धडा** ३ पहा. ) [पात्र.
**धडीपगडी**–स्त्री० कपडालत्ता, पोषाख, वस्त्र-
**धडूत–धडवती–धडोत**–नेहमीं वापरण्याचें वस्त्र–कपडा.
**धणा–ना**–(सं) पु० कोथिंबिरीचें बीं.
**धणी**–(सं) पु० मालक, मुखत्यार. २ स्वामी.
**धत्तुरा**–पु० बांग, आंगठा.
**धत्तूर**–(सं) पु० धोतरा.
**धन्य**–(सं) वि० कृतकृत्य.
**धन्वंतरी**–(सं) पु० वैद्यविशेष.
**धन**–(सं) न० द्रव्य, पैसा, पैका, रुपये, सं-
पत्ति, दौलत. २ स्त्री० राशीविशेष. ३ गणितांतलें चिन्हविशेष, +. [देणारा.
**धनको**–सा० सावकार, पैसा देणारा, कर्ज-
**धनगर**–पु० जंगलांत रहाणार गुराखी.
**धनत्तर**–(सं) वि० बळकट, मोठें, शिकंदर.
**धनतेरस–त्रयोदशी**–(सं) स्त्री० आश्विन-
वद्य त्रयोदशी.
**धनिक**–(सं) वि० धनवान, श्रीमान.
**धनिष्ठा**–(सं) स्त्री० नक्षत्रविशेष.
**धनी**–(सं) पु० ( **धणी** पहा. ) २ धनवा-
न्, श्रीमान्, संपन्न.
**धनीजोग**–(सं) वि० घेणाराच्या नांवाची.
**धनीन**–(सं) स्त्री० मालकीण, यजमानीन.
**धनु**–(सं) न० धनुष्य, कमठा, कमान, धनु-
ष्याची काठी, चाप. २ धनरास.
**धनुकली**–(सं) स्त्री० कापूस पिंजण्याचें धनु-
ष्य. २ लहान धनुष्य.
**धनुष्य**–(सं) न० ( **धनु** पहा. )
**धनेश्वर**–(सं) वि० श्रीमंत, पैसेवाला.
**धपका**–पु० पोकळ थापटी, धप्पा.
**धपला–ली**–पु० स्त्री० साल, धलपा, लां-
कडाची त्वचा, तुकडा, ढपला–ली.
**धपाटा–धप्पा**–पु० आवाज होण्याजोगी पो-
कळ चापट.
**धबधबा**–पु० पाण्याचें उंचावरून पडण्या-
चें स्थान. २ सांटा, उसवास.
**धमक**–स्त्री० अवसान, हिम्मत, तकवा. २ चमक, उसण.
**धमकणें**–अ० उडणें, दुखणें, हलणें.
**धमकावणी**–स्त्री० धमकी, भय, भीतीनें वाबरविणें.
**धमकावणें**–उ० वि० धमकी देणें–वालणें.
**धमनी**–(सं) स्त्री० शीर. २ नळी. ३ फुंकणी.
**धर्म**–(सं) पु० सशास्त्र कर्म. २ दान. ३ गुण, स्वभाव. ४ धर्मराज, युधिष्ठिर.
**धर्मज्ञ**–(सं) वि० धर्म जाणणारा.
**धर्मशीळ–ल**–(सं) वि० धर्माप्रमाणें वागणारा.
**धर्मात्मा**–(सं) पु० उदार पुरुषः
**धर्मोपदेश**–(सं) पु० धर्म सांगणें.
**धर्मोपदेशक**–पु० धर्माचा उपदेश करणारा.
**धर**–(सं) पु० आधार, पकड. २ ह्याचा उ-
पयोग प्रत्ययासारखा होतो तेव्हां याचा अर्थ–धरणारा–असा होतो. जसें–श्रीधर, गिरिधर.
**धरण**–(सं) न० बांध, बंधारा.
**धरणी**–(सं) स्त्री० पृथ्वी, दुनिया, जग.

**धरणीकंप**-(सं) पु० भूकंप.
**धरणें**-(सं) उ० वि० पकडणें. २ आठवणें, ध्यानांत ठेवणें. ३ न० तगादा.
**धरती**-(सं) स्त्री० पृथ्वी. २ चाल, रीति.
**धरबंद-ध**-( सं ) पु० कायदा. २ धरणें, मर्यादा. [ वेठ, बिगार.
**धरबिगार**-स्त्री० ओझें नेण्याकरितां लोक,
**धरमधक्का**-पु० फुकट श्रम. २ विनाकारण नुकसान.
**धरसांड**-स्त्री० धरसोड.
**धरा**-(सं) स्त्री० पृथ्वी, जग.
**धराधर-री**-(सं) स्त्री० पकडापकडी.
**धलपट**-न० **धलपा**-पु० **धलपी**-स्त्री०लांकूड वगैरेचा बाहेरील तुकडा, ढलपी.
**धव**-(सं) पु० पति, नवरा.
**धवल**-(सं) वि० पांढरा, शुभ्र.
**धश्चोट**-वि० दांडगा, अडाणी, पशुतुल्य.
**धष्ट**-(सं) वि० ( धट्ट पहा. )
**धष्टपुष्ट**-वि० शरीरानें मजबूत-बळकट.
**धस्स**-न० धसका, धक्का.
**धस**-पु० खिळा, कोणत्याही वस्तूचें बारीक टोंक. २ धसकट, कुसळ.
**धसकट**-न० धस, कुसळ.
**धसका**-पु० धक्का.
**धसाडा**-वि० खडबडित, ओबडधोबड.
**धाक**-पु० वडील माणसाचें भय.
**धाकटा-ला**-वि० वयानें लहान.
**धागधुगी-ग**-स्त्री० मनाचा अनिश्चितपणा.
**धागा**-पु० दोरा, सूत.
**धाटणी-धाटी**-(सं) स्त्री० शैली, मार्ग, रीति, ढब. [ ड अशा आवाजानें.
**धाडकन्-दिशी**-स्त्री० मोठ्या जोरानें, धा-
**धाडणें**-स० पाठविणें, रवाना करणें.
**धाडशी**-वि० साहसी.
**धाडस**-न० साहस, छाती.
**धाणें**-अ० तृप्त होणें.
**धात्री**-(सं) स्त्री० दाई. २ पृथ्वी.
**धात**-(सं) स्त्री० वीर्य, रेत, धातु.
**धाता**-(सं) पु० ब्रह्मदेव, सृष्टिकर्ता.
**धातु**-(सं) स्त्री० वीर्य. २ क्रियापदाचें मूळ रूप. ३ तांबें लोखंड इत्यादि खनिज पदार्थ.
**धातुसाधित**-वि० व्याकरणसंज्ञाविशेष.
**धादांत**-क्रि० प्रत्यक्ष, उघड. २ गुप्त मत.
**धाधांवणें**-अ० फार हाव सुटणें, अतिशय क्षुधेनें व्यापून जाणें.
**धान्य**-(सं) न० दाणे.
**धाप**-स्त्री० दम.
**धाबळ-ळी**-स्त्री० लोंकरीचें वस्त्र. २ खबुतरांची बसावयाची जागा.
**धाबें**-न० मातीची गच्ची. २ धूर जाण्यासाठीं राखलेलें भोंक. ३ मन, छाती.
**धाम्या**-पु०माध्यंदिन, यजुर्वेदी ब्राह्मण.
**धाम**-(सं) न० गृह, घर. २ तेज.
**धामधूम**-स्त्री० दंगा, बखेडा. २ गडबड.
**धामा**-पु० धाम. २ रगडा, तळ.
**धाय**-स्त्री० धास्ती. २ लोखंडी गोल पट्टी.
**धाया**-स्त्री० तृप्ति, संतोष.
**धार**-(सं) स्त्री० हत्याराची कापण्याची कड. २ पातळ पदार्थाचा बारीक लंब प्रवाह. ३ प्रवाह. ४ दोहन.
**धारजिणा**-वि० अनुकूल.
**धारण**-(सं) स्त्री० धान्याचा दर, निरख. २ मुसळखांबा. ३घराचा मध्य आधार खांब.
**धारणा**-(सं) स्त्री) धरण्याची शक्ति.२बुद्धि.
**धारराव**-पु० रिकामा सरदार. [ ३ धार.
**धारा**-(सं) पु० जमिनीचा सारा. २ रिवाज.
**धारिष्ट**-(सं) न० धीटपणा, साहस.
**धारुष्ण-रोष्ण**-(सं) न० धार काढल्याबरोबरचें दूध.
**धारें**-न० झरोका, जाळी, गवाक्ष.

धावडा–पु० वृक्षविशेष.
धावरें–न० एक प्रकारचा रोग.
धावाधाव–स्त्री० पळापळ.
धावा–वां–पु० स्तव, हाक.
धास्ती–(आ) स्त्री० भीति, धाक, दहशत.
धांगडधिंगा–पु० धुमाकुळी, दांडगाई.
धांडळणें–धांडुळणें–स० बारीक तऱ्हेनें शोधणें–पाहणें, धुंडाळणें.
धांडोरा–पु० दवंडी. [रुंद चिंधी.
धांद–धांदोटी–स्त्री० कापड वगैरेची अ-
धांदरणें–अ० घाबरून जाणें.
धांदलणें–अ० गडबडणें, घाबरणें.
धांदल्या–पु० धांदल करणारा, गडबड्या.
धांदल–स्त्री० लगबग, घाई, गोंधळ.
धांव–धाव–स्त्री० पळ. २ गाडीच्या चाकाचें लोखंडी संरक्षण. ३ मोटेचे बैल जाण्यायेण्याची उतरती जागा. ४ महत्त्वाकांक्षा.
धांवणें–(सं) अ० पळणें, जलद चालणें.
धिक्कार–(सं) पु० तिरस्कार.
धिक्–(सं) के० धिग्, धिक्कार असो, थू.
धिट–वि० धैर्यवान्, धीट.
धिप्पाड–वि० उंच व लठ्ठ.
धिमा–म्मा–वि० शांत, धैर्यवान्.
धिरडें–न० पक्वान्नविशेष.
धिरा–पु० टेका, टेकण, आधारस्तंभ.
धिंगाणा–पु० धिंगामस्ती.
धिंड–स्त्री० (वाईट अर्थी) मिरवणूक.
धिंडका–स्त्री० त्रासदायक मनुष्य.
धी–(सं) स्त्री० बुद्धि, मति.
धीट–वि० धैर्ययुक्त, धिट. [ळी, भोई.
धीवर–(सं) पु० मासे धरणारे लोक, को-
धुई–स्त्री० धुकें.
धुकें–कट–पु० धुई.
धुडकावणें–स० हांकून देणें–लावणें.
धुडगूस–पु० धुमाकूळ, दांडगाई.

धुणावळ–स्त्री० धुण्याची मजुरी.
धुणी–स्त्री० धुण्याची जागा–चिरगुटें.
धुणें–न० धुण्याचा कपडा. २ स० स्वच्छ करणें, प्रक्षालन करणें.
धुनी–स्त्री० शेकोटी, बैरागी लोकांचा विस्तव.
धुपणी–स्त्री० स्त्रीरोगविशेष.
धुपणें–अ० धुवून जाणें.
धुपविणें–स० केशांस वगैरे धूप देणें.
धुपारत–ती–(सं) स्त्री० धूपपात्र देवाचे तोंडाभोंवतीं ओवाळणें.
धुमक–नुक–स्त्री० बारीक आवाज.
धुमकूस–स्त्री० धुमाकूळ, धुडगूस.
धुमसणें–अ० पेटत पेटत जाणें.
धुमाळी–कुळी–स्त्री० आनंदानें उड्या मारणें, धुडगूस.
धुमी–नी–णी–स्त्री० गोसाव्यांची आगटी.
धुमें–न० धुकें, धुई.
धुरकट–वि० धुराच्या रंगाचा.
धुरंधर–पु० हुषार, कुशल. २ मोहरक्या, मुख्य.
धुराला–ळा–पु० माती, धूळ. [२ धुपविणें.
धुरी–स्त्री० बैल इत्यादींकांचे मानेवरचें जूं.
धुवट–वि० सफेत, धुतलेला.
धुवण–धूण–न० तांदुळ धुतलेलें पाणी.
धुसमसणें–मुसणें–अ० स्फुंदणें, मनांतल्या मनांत चरफडणें. [मात्रट.
धुळवट–कट–वि० मातकट, मातीचे रंगाचा,
धुळवड–डी–स्त्री० होळीचे दुसरे दिवशीं राड खेळणें व त्याचा दिवस.
धुळाक्षर–न० लाहन मुलें पाटीवर अक्षर काढतात तें, अंकलिपि.
धुंडणें–स० सोधणें, पत्ता लावणें.
धुंद–वि० गर्क, गुंग. २ चेवलेला. [मद.
धुंदी–स्त्री० मंददृष्टि, कैफाचा अम्मल, गर्व,
धूप–(सं) पु० सुवासिक पदार्थविशेष.
धूम्र–(सं) पु० धूर.

**धूम**–(सं) पु० धूर. २ स्त्री० दांडगाई, पळ.
**धूमकेतु**–(सं) पु० शेंडेनक्षत्र. [लुच्चा.
**धूर्त**–(सं) वि० हुषार चतुर, शहाणा. २
**धूर**–पु० धूम्र.
**धूली**–ळ (सं) स्त्री० धुराळा.
**धूळधाण**–स्त्री० गोंधळ. २ नाश.
**धूळपट्टी**–स्त्री० शब्दांनीं बोडंतो, रेवडी.
**धृति**–(सं) स्त्री० धैर्य.
**धेड**–पु० एक नीच जात.
**धेडगुजरी**–स्त्री० अनेक भाषांचें मिश्रण.
**धेनु**–(सं) स्त्री० गाय. [द्धान, प्रस्थ.
**धेंड**–न० मोठा मनुष्य, कीर्त्तिमान पुरुष, वि-
**धैर्य**–न० धीर, धृति, धीटपणा.
**धोकटी–धोंकटी–धोंगटी**–स्त्री० न्हाव्याची वस्तारे वगैरे सामान ठेवण्याची पिशवी.
**धोका**–पु० तोटा, नुकसान. २ भय, भीति.
**धोटा**–पु० जलदी पिण्याची क्रिया.
**धोटें**–न० विणण्याचें एक हत्यार.
**धोत**–पु० ज्वाला, झोत.
**धोतर**–न० वस्त्र, प्रावरण, अंगवस्त्र.
**धोपट**–वि० समोरचा, सरळ.
**धोपटणें**–उ० वि० मारणें, बडविणें.
**धोबड**–वि० अवाढव्य, खरबरीत.
**धोबी**–पु० परीट, रजक.
**धोरण**–न० अटकळ, लक्ष, कल, रीति.
**धोशा–धंशा**– पु० झपाटा, पाठलाग, अ-व्याहत एक क्रिया करणें.
**धोंड**–स्त्री० धोंडा, दगड, २ नुकसान, दुःख.
**धोंडभट्टी**–स्त्री० ढोंगभट्टी, स्नानसंध्या झा-ली आहे असें दाखविण्याचा वेश.
**धोंडफोड्या**–पु० पाथरवट. २ वि० धोंडे फोडणारा.
**धोंडा**–पु० धोंड, दगड, पत्थर. २ अधिकमास.
**धंदा**–पु० रोजगार, कामकाज, उद्योग, पैसे मिळविण्याचें साधन, वृत्ति.

## न

**न**–विसावें व्यंजन. २ नकार, नाहीं.
**न्याहरी–हारी**–स्त्री० सकाळचें खाणें, फराळ.
**न्यहाल–न्याहाल**–वि० सुखी, खुशाल.
**न्याहळणें**–(सं) स० लक्षपूर्वक पहाणें.
**न्याय्य**–(सं) वि० न्यायाचें, योग्य, कायदेशीर.
**न्याय**–(सं) पु० इनसाफ. २ तर्कशास्त्र. ३ रीत.
**न्यायमनसुबा–सोबा**–पु० चौकशी, तलास.
**न्यायसभा**–(सं) स्त्री० अदालत, न्यायकचेरी.
**न्यायाधीश**–(सं) पु० न्याय करणारा.
**न्यारा**–वि० दुसरा, निराळा, नवीन.
**न्यून**–(सं) वि० कमी. २ न० कमताई.
**न्हावी–नहावी**–पु० हजाम, नापिक, न्हाऊ.
**नऊ**–(सं) वि० नव, नौ, ९.
**नक्षत्र**–(सं) न० तारा, चांदणी.
**नक्षा–क्शा**–पु० ताण, कीर्ति, नांव, वरचढ.
**नक्षी–क्शी**– (फा) स्त्री० वेलबुटी, चित्र-विचित्र काम.
**नक्कल–कल**–(आ) न० प्रत. २ स्त्री० गोष्ट. ३ गम्मत, मौज.
**नक्की–नकी**–(आ) वि० सत्य. २ नेमलेलें.
**नक्त**–(सं) न० संध्याकाळपर्यंतचा उपास. २ (फा.) वि० रोख पैसा, नगद.
**नक्र**–(सं) पु० सुसर, मगर.
**नकटा**–वि० अपरा, चपट्या नाकाचा. २ व्यंग.
**नकटी**–स्त्री० **नकटें**–न० नाक. [लुगडें.
**नकली**–वि० दिखाऊ, तकलादी, एक प्रकारचें
**नकशा–काशा**–(आ) पु० चित्र, प्रत. २ तो-रा, चढाई.
**नकार**–पु० नचा पाडा, नाट, नन्ना.
**नकुल–ळ**–(सं) पु० मुंगूस. २ धर्मराजाच्या तिसऱ्या भावाचें नांव.
**नको–को**–क्रि० जरूर नाहीं.

**नख**–(सं) न० नाखून, बोटावरचें हाड, सुगंधिद्रव्यविशेष.
**नखभर**–क्रि० थोडेंसें, परमाणू इतकें.
**नखरा**–पु० डौल, ऐट, मिजास, पाणी.
**नखी**–(सं) स्त्री० तारेचें वाद्य वाजविण्याचें हत्यार. २ गुराचें नख, खुरकी.
**नखुरडें**–(सं) न० नखरोगविशेष.
**नग्न**–(सं) वि० नागवा, दिगंबर.
**नग**–(सं) पु० दागिना.२ वस्तु,रक्कम.३पर्वत.
**नगद**–(आ) वि० रोख, नगदी.
**नगदमाल**–पु० ऐन–अईन जिन्नस.
**नगर**–(सं) न० नगरी, पुर, शहर, गांव.
**नजर**–(आ) स्त्री० दृष्टि. २ बक्षीस. ३ भेट. ४ अदमास.
**नजरबंदी**–(फा) स्त्री० जादूटोणा, हातचलाखी.
**नजराणा**–(फा) पु० भेट, बक्षीस, नजर.
**नजरानजर**–स्त्री० दृष्टादृष्ट.
**नजाणो**–क्रि० कोण जाणे, कदाचित्.
**नजीक**–(फा) श० जवळ, आसपास.
**नट**–(सं) पु० सोंगाड्या, विदूषक, वेषधर.
**नटणें**–अ० सोंग घेणें. २ डौल करणें. ३ नाकारणें.
**नटवा**–पु० नट, नाटकी मनुष्य, नाच्या.
**नटविणें**–स० शोभा आणणें.
**नटी–नटवी–नटिनी**–(सं) स्त्री० नाचणारी, वेश्या. २ सूत्रधाराची बायको.
**नठारा**–वि० निरुपयोगी, निकामा.
**नड**–स्त्री० अडचण, त्रास. [अडणें.
**नडणें**–अ० अडथळा होणें, कुंठित होणें,
**नणंद**–(सं) स्त्री० नवऱ्याची बहीण, वन्सं.
**नतद्रक्ष–ष्ट**–(सं) वि० कंजूष, द्वाष्ट, खाष्ट.
**नथ–थनी–णी**–(सं) स्त्री० बायकांच्या नाकाचा दागिना.
**नद**–(सं) पु० नदी, मोठी नदी.
**नपुंसक**–(सं) पु० तृतीयाप्रकृति, गांडू, हिजडा, पंढ, बोचू.
**नफर**–(आ) पु० हलका चाकर.
**नफा**–(आ) पु० फायदा, मिळकत, कमाई.
**नबळा**–(सं) वि० अशक्त, असमर्थ, दुर्बल.
**नभ**–(सं) न० आकाश. २ पु० ढग, मेघ.
**नभोमंडल**–(सं) न० आकाशमंडल,खगोल.
**नम्र**–(सं) वि० नमलेला, वांकलेला, नरम आलेला.
**नमणें**–(सं) अ० वंदणें, वांकणें, लवणें.
**नमन**–(सं) न० नमस्कार, वंदन.
**नमाज**–(फा) पु० मुसलमान धर्मांतील ईश्वराची प्रार्थना, निमाज.
**नमुना–मोना**–(फा) पु० मासला. २ प्रत.
**नमूद–मोद**–(फा) वि० दाखल, लेख, बार.
**नयन**–(सं) पु० आंख, डोळा, नेत्र.
**नये**–क्रि० न, येत नाहीं,निषेधार्थक अव्यय.
**नर्तन**–(सं) न० नाच, नृत्य.
**नर**–(सं) पु० मनुष्य. २ पुरुष. ३ अर्जुन.
**नरक**–(सं) पु० मैल, विष्टा. २ नीच लोकविशेष.
**नरटी**–स्त्री० कवच, करटी, करवंटी.
**नरडी**–स्त्री० नरडें, गळा.
**नरद**–स्त्री० सोंगटी. २ प्रसंग.
**नरभू**–(सं) स्त्री० भूलोक.
**नरम**–(फा) वि० मऊ, गुळगुळित, मृदु.
**नरमणें**–अ० कमी होणें, उतरणें, वरमणें. २ नरम होणें.
**नरसाळें**–न० ओतणी, ओतणें, नसराळें.
**नराणी–हाणी**–स्त्री०नखें काढण्याचें हत्यार.
**नराटी**–स्त्री० ( **नरटी** पहा. )
**नरी–ही**–स्त्री० कमावलेलें कातडें, सागळ.
**नलगे**–क्रि० नको, जरूर नाहीं.
**नव्याण्णव**–वि० एक उणा शंभर.
**नव्यायशी**–वि० एक उणा नव्वद.

**नव्वा**–वि० नववा.
**नव**–(सं) वि० नवीन. २ नऊ.
**नवखा**–(सं) वि० नवा, नवीन, परकी.
**नवज्वर**–(सं) पु० एक प्रकारचा ताप, विषमज्वरभेद. [पावशेर.
**नवटांक**–(सं) पु० नवाटकें, आतपाव, अर्धा
**नवती**–(सं) स्त्री० तारुण्य. २ पालवी.
**नवनीत**–(सं) न० लोणी, माखण. २ पुस्तकविशेष.
**नवमी**–(सं) स्त्री० नववी तिथि.
**नवरदेव**–पु० नवरा, नवरामुलगा, वर.
**नवरा**–पु० पति, भर्ता.२वरबशा. जबरदस्त.
**नवरी**–स्त्री० विवाह उपस्थित झालेली मुलगी.
**नवल**–(सं) न० आश्चर्य, चमत्कार, नवाई.
**नववा**–वि० नवसंख्याविशिष्ट.
**नवशिका–खा**–वि० नवा शिकणारा, नवीन, नवीन शिकलेला.
**नवस**–पु० देवा ! अमुक झालें असतां अमुक करीन अशी सांकेतिक प्रतिज्ञा–संकल्प.
**नवसागर**–पु० क्षारविशेष.
**नवा**–(सं) वि० नवीन, नवसर, नवखा.
**नशा**–(आ) स्त्री० निशा, कैफ, अंमल.
**नष्ट**–(सं) वि०नासलेलें. २दुष्ट, खाष्ट, व्रात्य.
**नस्तर**–(फा) न० शस्त्र.
**नस्य**–(सं) वि० नाकासंबंधी, औषधविशेष.
**नसणें**–(सं) अ० नाहींसा होणें, अभाव असणें. [दैव.
**नसीब–शीब**–(आ) न० प्रारब्ध, प्रालब्ध,
**नहर**–पु० पाण्याची जागा, कालवा.
**नहाण**–(सं) न० स्नान. २ रजोदर्शन, ऋतुप्राप्ति.
**नळ**–पु० शरीरांतील रक्तवाहक भागविशेष. २ मोठी नळी, पन्हळ. ३ नैषध, निषधाधिप. ४ रामायणप्रसिद्ध एक वानर.
**नळकंडी–कांडी**–स्त्री० नळी.
**नळकंडें**–न० लांकडी किंवा धातूची नळी.
**नळी**–स्त्री०लहान नळ, नळकंडी.
**ना**–क्रि० नाहीं.
**नाइलाज**–पु० निरुपाय.
**नाईक**–(सं) वि० मुख्य, देखरेख करणारा, नायक.२ पु०शिपायांच्या टोळीचा मुख्य.
**नाईब–यब**–(फा) पु० दुय्यम,दुसऱ्या प्रतीचा.
**नाक**–(सं)न०नासिका.२ स्वर्ग.३ अग्रभाग.
**नाकतोडा**–पु० जीवविशेष.
**नाकपुडी**–स्त्री०नाकाची प्रत्येक नळी. [मत.
**नाकबूल**–(फा) वि० कबूल नसलेला, असं-
**नाकसूर**–पु० वाद्यविशेष.
**नाकेला**–वि० प्रशस्त नाकाचा.
**नाकें**–न० चौकी.
**नाखवा**–(फा) पु० तांडेल, मुख्य नावाडी, जहाजावरचा मुख्य मनुष्य.
**नाग**–(सं) पु० सर्पविशेष. २ हत्ती.
**नागकेशर**–(सं) न० औषधविशेष.
**नागर**–पु० ब्राह्मणजातिविशेष.
**नागरमोथा**–पु० औषधविशेष.
**नागवा–डा**–वि० नग्न, उघडा, दिगंबर.
**नागवेल**–स्त्री० विड्याचे पानांची वेल.
**नागा**–(फा) पु० सुट्टी, खाडा, गैरहजिरी.
**नाच्या**–पु० नटवा, नट.
**नाच**–पु० नर्तन, नाचणें.
**नाचणी**–स्त्री० धान्यविशेष, नागली.
**नाचणें**–अ० उड्या मारणें, तालावर उड्या मारणें, नृत्य करणें. [ काव्याचा प्रयोग.
**नाटक**–(सं) न० दृश्य काव्य. २ दृश्य.
**नाट**–पु० नड, हरकत. २ अपशकुन.
**नाडा**–पु० नाडी, दोरा, सोल, चऱ्हाट.
**नाडापुडी**–स्त्री० सूत व पुडी ( अबीर शेंदूर इत्यादि. )
**नाडी–ड**–(सं) स्त्री० रक्तवाहिनी, शीर. २ दोरी, दाल.

**नाणें**—न० मोहोर—रुपया—अधेली—पावली—चवली—पैसा—पै—इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध सोनें—चांदी—तांबें इत्यादींचे मुद्रित तुकडे, मुद्रा.

**नाणेवटी**—पु० सराफ. [ल्गी.

**नात**—(सं) स्त्री० मुलाची अथवा मुलीची मु-

**नातलग**—वि० आप्त, सोयरा, संबंधी, नातेवाईक. [ मूळ.

**नातवंड**—न० नातरूं, मुलाचें किंवा मुलीचें

**नाताळ**—न० डिसेंबरच्या २४ तारखेपासून १० दिवस.

**नातु**—(सं) पु० मुलाचा किंवा मुलीचा मुलगा.

**नातें**—न० संबंध, सोयरीक, आप्तपणा.

**नाथ**—(सं) पु० स्वामी, मालक. २ पति, कांत.

**नाद**—पु० आवाज. २ छंद.

**नादान**—(फा) वि० मूर्ख, बेवकूब.

**नादार**—(आ) वि० फुकट, गरीब. २ पु० सारा देण्यास किंवा कर्ज फेडण्यास असमर्थ कूळ. [ वृक्षविशेष.

**नाना**—(सं) वि० पुष्कळ. २ नामविशेष. ३

**नानू**—स्त्री० कांकूं, अडथळा, हरकत.

**नापत**—स्त्री० बेअब्रू, अपकीर्ति.

**नापसंत**—(फा) वि० नावडतें.

**नापित—पीत**—(सं) पु० न्हावी, हजाम.

**नापीक**—न० पीक न येणें.

**नापेर**—स्त्री० पेरणीचा अभाव.

**नाभि**—(सं) स्त्री० बेंबी. २ चाकाचा तुंबा.

**नाम**—(सं) न० नांव, अभिधान. २ व्याकरणसंज्ञाविशेष.

**नामदार**—(फा) वि० कीर्तिमान, प्रख्यात.

**नामधारक—धारी**—(सं) वि० प्रख्यात नांवाचा. २ आडनांवाचा, नांवाचा.

**नामर्द**—(फा) वि० अशक्त, भित्रा, तृतीयाप्रकृति, गांडू, हिजडा.

**नामरूप**—न० नांव व स्वरूप.

**नामांकित**—(सं) वि० प्रसिद्ध, नांवाजलेला.

**नामाभिधान**—(सं) न० नांव, नाम.

**नामावळ—ळी**—(सं) स्त्री० नांवांची यादी—ओळ—पंक्ति. २ वस्त्रविशेष.

**नामी**—वि० छान, उत्तम, उत्कृष्ट.

**नामोश—स—शी**—(आ) स्त्री० बट्टा, दोष.

**नाय**—स्त्री० एक चालणारी वनस्पती.

**नायक**—(सं) पु० मुख्य, श्रेष्ठ मनुष्य, सूत्रधार. २ पुरुषांतलें मुख्यपात्र. [वेश्या.

**नायकीण**—स्त्री० मुकादमीण. २ कसबीण,

**नायटा**—पु० त्वग्रोगविशेष.

**नायिका**—(सं) स्त्री० स्त्रियांतलें मुख्यपात्र.

**नार**—(सं) स्त्री० नारी, स्त्री. २ पु० लांकडांतील गाभा.

**नारक—की—कीय**—(सं) वि० नरकासंबंधी.

**नारंग—रंगी—रिंग**—एक जातीचें लिंबू.

**नारद**—(सं) पु० ऋषिविशेष. २ वि० कळलाव्या.

**नारळ**—(सं) पु० वृक्षविशेष. २ नारिकेल.

**नारळीपदर**—पु० ज्यावर नारळाचें झाड काढलेलें आहे असा पागोट्याचा पदर.

**नाराज**—(फा) वि० नाखुष.

**नाराजी**—(फा) स्त्री० इतराजी, नाखुषी.

**नारायण**—(सं) पु० विष्णूचें एक नांव.

**नारू**—पु० वाळा, रोगविशेष. २ अलुता.

**नाल**—(आ) पु० घोड्याचा जोडा. २ टोलाविशेष. ३ मोठा मृदंग.

**नाला**—पु० ओढा, झरा. २ मोरी. [ हाडी.

**नालिश—स्त—लस्ती**—(फा) स्त्री० तकरार, च-

**नाव**—स्त्री० नौका, होडी.

**नावाडी**—पु० नाव चालविणारा, नाविक.

**नाविक**—(सं) पु० नावाडी, नाखवा.

**नाश**—(सं) पु० नास, तोटा, नुकसान.

**नाशह**—(फा) पु० बुद्धिबळांचे खेळांतील संज्ञाविशेष, राजाला शहांतून काढणें.

**नाशिक**—(सं) न० पुरविशेष. २ नासिका, नाक.

**नास्तिक**-(सं) पु० निरीश्वरवादी.
**नास्तिक मत**-(सं) न० निरीश्वरवाद.
**नासणें**-(सं) उ० वि० खराब होणें-करणें, बिघडणें.
**नासधूस**-स्त्री० धूळधाणी, खराबी.
**नासपात**-(फा) न० फळविशेष.
**नासरी**-स्त्री० टोली, एक नाणें.
**नासिका-क**-(सं) न० नाक, घ्राणेंद्रिय.
**नासूर**-न० रोगविशेष.
**नाहक-हाक**-(फा) क्रि० व्यर्थ,विनाकारण.
**नाहण-न्हाण**-न० अभ्यंग स्नान. २ रजोदर्शन.
**नाहणवली-न्हाणवली**-स्त्री० प्रथम ऋतु प्राप्त झालेली स्त्री.
**नाहणी-न्हाणी**-स्त्री० मोरी,खराब पाण्याचा निकाल. २ स्नान करण्याची स्वतंत्र जागा.
**नाहणें**-(सं) उ० वि० स्नान करणें-होणें.
**नाहतीधुती**-वि० तरुण,विटाळशी होत असलेली.
**नाहवी**-पु० हजाम, कारागीर, नापित.
**नाहीं**-अ० नाहींसे होणें, अभाव असणें.
**नाहींतरी**-क्रि० निदानपक्षीं, अदमासें.
**नाहींतेच**-वि० भलतेंच, असंबद्ध.
**नाळ**-स्त्री० बेंबीचें कातडें.२ सुकाणू.
**नाळगुद-नळगुद**-न० रोगविशेष. [ णारा.
**नांगऱ्या**-वि० मूर्ख, अविद्वान,नांगर हाक-
**नांगर-नागर**-पु० हळ, आऊत.
**नांगरणें**-अ०नांगरानें उकरणें,नांगर धरणें.
**नांगा**-पु० **नांगी**-स्त्री०कांटा, अंकडा.२डंख. ३ डिरी. [समाधानानें रहाणें.
**नांदणें**-अ० वागणें, रहाणें, टिकणें, सुखा-
**नांदी**-(सं) स्त्री० नमन, मंगलाचरण, नाटकाच्या आरंभींचें पद्य.
**नांव**-(सं) न० नाम, अभिधान.
**नांवनिशाण**-(फा) न० खाणखूण, पत्ता.
**नांवनिशी**-(फा) स्त्री० नांवांची यादी, नामावळी.
**नांवरूप**-(सं) न० नांवलौकिक, रंगरूप.
**निक्षिप्त**-(सं) वि० ठेवलेलें, निवडलेलें.
**निक्षेप**-(सं) पु० ठेव, ठेवा.
**निक्षून**-क्रि० उघड, साफ, स्वच्छ.
**निकृष्ट**-(सं) वि० शेवटला, अखेरचा, नीच.
**निकट**-(सं) वि० जवळचा.
**निकड**-(सं) स्त्री० लकडा,जरूरी,घाई,नेट.
**निकर**-(सं) पु० अतिजोर, आणीबाणी.
**निका**-(आ) नि० नक्की, निर्मळ. २ मुसलमानाचें पाटाचें लग्न.
**निकाडा**-(सं) पु० काढ्यांतील चोथ्याचा फिरून केलेला काढा.
**निकामी**-(सं) वि० निरुपयोगी. समाप्ति.
**निकाल**-पु० शेवट,अखेर,परिणाम,इतिश्री.
**निकोप-पी**-वि० निरोग-गी.
**निखर्व**-(सं) वि० संख्याविशेष.
**निखळणें**-उ० वि० सुटणें, सोडणें,उखळणें
**निखारा**-पु० विस्तव,इंगळ,अंगार.
**निखालस**-वि० उघड,स्पष्ट, निर्मळ, नक्की.
**निखिल**-(सं)वि० संपूर्ण. सर्व, सगळें.
**निखोड**-वि० खोडीशिवाय, चोख.
**निग्रह**-(सं) पु० निश्चय, नियम.
**निगम**-(सं) पु० वेद. २ शेवट, परिणाम.
**निघंट**-(सं) पु० वेदांगविशेष. २ वैद्यकग्रंथविशेष. [ येणें, निपजणें, होणें.
**निघणें**-अ० जाणें, तयार होणें. २ उत्पन्न
**निचरणें**-अ० पाझरणें, द्रवणें, झरणें.
**निचव**-वि० बेचव, रुचिहीन.
**निचिंत**-(सं) वि० बेफिकीर, निष्काळजी.
**निचेत**-(सं) वि० निचेष्ट, हालचाल रहित.
**निज**-(सं) वि० आपलें, स्वतःचें. [ करणें.
**निजणें**-अ० निद्रा घेणें, पडणें. २ संभोग

निजविणें–उ० वि० झोंपीं घालविणें.
निजोर–री–वि० अशक्त, कमजोर.
निटावणें–अ० नीट, सरळ–होणें, जोर येणें, जोमांत येणें.
निठवें–न० मापी अर्धाशेर व तें पात्र.
निढळींचा–(सं) वि० मेहेनतीचा, श्रमाचा.
नित्य–(सं) वि० नेहमीं, हमेशा, सतत. २ क्रि० नित्यशः
नितकोर–पु० अर्धा चतकोर.
नितंब–(सं) पार्श्वभाग, कुला–ला.
नितळणें–अ० गळणें, टिबकणें.
निद्रा–(सं) स्त्री० झोंप. नीज, डुलकी.
निदान–(सं) न० आदिकारण. २ शेवट. ३ रोगोत्पत्तीचें कारण. [ सांठा.
निधान–(सं) न० निधि, द्रव्य, खजिना, ठेवा,
निपजणें–अ० होणें, येणें, उत्पन्न होणें.
निपटणें–उ० वि० खरडून काढणें.
निपटीशिपटी–स्त्री० बाकी, शिल्लक.
निपणजा–पु० आज्याचा आजा.
निपणतू–पु० नातवाचा नातू.
निपसणें–उ० वि० उसपणें, काढणें.
निपाणी–वि० निर्जल, पाणी नसलेला.
निःपात–(सं) पु० नायनाट, नाश.
निपुण–(सं) वि० निष्णात, वाकबगार, प्रवीण.
निपुत्रिक–वि० पुत्राशिवाय.
निबंध–(सं) पु० लेखी व्याख्यान, ग्रंथ.
निबर– वि० जून, कठिण. ( भिडलेलें.
निबिड–(सं) वि० दाट, खेचलेलें, घन,
निभणें–अ० बचणें, जगणें, निभावणें.
निभाव–(सं) पु० टिकाव, स्थिरता, निभावणी.
निभावणी–(सं) स्त्री० टिकाव, निभाव.
निमक–(फा) न० मीठ, लोण.
निमकहरांम (फा) वि० कृतघ्न, खाल्या वरचे वामे मोजणारा.
निमकहरामी–(फा) स्त्री० कृतघ्नपणा.
निमकहलाल–(फा) वि० कृतज्ञ, उपकार स्मरणारा.
निमग्न–(सं) वि० तत्पर, तल्लीन, गर्क, गुंग.
निमगोल–वि० अर्धवर्तुलाकार.
निमंत्रण–(सं) न० बोलावणें, आमंत्रण.
निमा–(फा) वि० अर्धा. २ पु० निमें आंगरखा. [ पुढें होणें.
निमित्त–(सं) न० कारण. २ खुसपट. ३
निमिष–(सं) न० पापणीचें लवणें. २ थोडा अवधि.
निमुळता–वि० गायधूम, उतरता.
निमूट–वि० आपण होऊन, मुकाट्यानें.
निमनिम–वि० अर्धाअर्ध, बराबर अर्ध.
निमशिमें क्रि० अर्धामुर्धा.
नियत–(सं) वि० निश्चित, नियमित. २ चिकटलेला. ३ स्त्री० दानत, बुद्धि.
नियंता–(सं) वि० नियम करणारा, त्राता. २ शास्त्र. ३ बाण, तोटा.
नियम–(सं) पु० कायदा, वहिवाट, ठराव.
नियुक्त–(सं) वि० नेमलेला, आज्ञा केलेला.
निर–(सं) एक उपसर्ग ह्याचा उपयोग नकारार्थी किंवा अतिशयार्थी होतो.
निर्गत–(सं) वि० बाहेर गेलेला.
निर्गम–(सं) पु० बाहेर–पार पडणें.
निर्गुण–(सं) वि० गुणाशिवाय.
निर्जन–(सं) वि० ओसाड, एकांताचा.
निर्जीव–(सं) वि० मेलेला. २ अशक्त.
निर्ढवणें–अ० रावणें, वहिवाटींत असणें. २ सवय पडणें, निगरगट्ट होणें.
निर्णय–(सं) पु० न्याय, शेवट, निकाल, निश्चय.
निर्दय–(सं) वि० दुष्ट, दयाहीन, कठोर.
निर्दोष–(सं) वि० दोषमुक्त, दोषरहित.
निर्धन–(सं) वि० दरिद्र, गरीब.
निर्धार–(सं) पु० निश्चय, नियम.

**निर्धास्त**–वि० निर्धोक, निर्भय.
**निर्फळ**–(सं) वि० व्यर्थ, विनाकारण.
**निर्बंध**–(सं) पु० मर्यादा.
**निर्बळ**–वि० निर्जीव, अशक्त.
**निर्भर्त्सना**–(सं) स्त्री० उपहास, धिक्कार.
**निर्भीड**–वि० भिडेखेरीज, बेमुरवत,निःस्पृह.
**निर्मळ**–(सं) वि०स्वच्छ, मळाखेरीज, शुद्ध.
**निर्माण**–(सं) न० निर्मित वस्तु, उत्पन्न केलेले पदार्थ, उत्पादन, कृति. [वस्तु.
**निर्माल्य**–(सं) पु० वाहिलेलीं फुलें इत्यादि
**निर्मिणें**–(सं) स० उत्पन्न करणें.
**निर्लज्ज**–(सं) वि० बेशरम, बेपर्वा, मुरवत नसलेला.
**निर्लेप**–(सं) वि० खरकट्याशिवाय, फराळाचें. २ अलिप्त, सोंवळा, शुचिर्भूत.
**निर्वंश**–(सं) पु० निसंतान. २ वि० संतानाखेरीज. [गेलेलें.
**निर्वाण**–(सं) न० मरण. २ शेवट. ३ वि०
**निर्वाह**–(सं) पु० उपजीविका, पोट भरणें, गुजारा.
**निर्विघ्न**–(सं) वि०विघ्नाशिवाय,बिनहरकत.
**निर्विवाद**–(सं) वि० वादाशिवाय.
**निर्वीर्य**–(सं) वि० हतवीर्य–बल.
**निर्वेध**–(सं) वि० निश्चित, वेधाशिवाय, निष्काळजी.
**निर्व्यसन**–(सं) वि० व्यसनाखेरीज.
**निरख**–(फा) पु० दर, किंमत.
**निरखणें**–(सं) उ० वि० न्याहाळणें, लक्षपूर्वक पहाणें.
**निरण**–न० जनावराच्या मादीचें जननेंद्रिय.
**निरंतर**–(सं) क्रि० नेहमीं, सतत, नित्य.
**निरपेक्ष**–(सं) वि० निरिच्छ. २ वास्तविक.
**निरर्थक**–(सं) वि०व्यर्थ,उगाच,निरुपयोगी.
**निरशन**–(सं) न० उपोषण, लंघन, उपास, न खाणें.
**निरस**–वि० हलकें, खालच्या प्रतीचें,नीरस.
**निरसें**–वि० पाण्याशिवाय.
**निरक्षर**–(सं) वि० अक्षराशिवाय,अविद्वान्.
**निरा**–पु० गोडी ताडी, नारळाचें पाणी. २ वि० निर्भेळ, शुद्ध.
**निराकरण**–(सं) न०शेवट, निश्चय, निकाल.
**निराकार**–(सं) वि० आकाराशिवाय.
**निराधार**–(सं) वि० आधाराखेरीज, निराश्रित. २ अप्रमाण.
**निराशा**–(सं) स्त्री० आशा नसणें.
**निराहार**–(सं) पु० उपास, फराळ.
**निराळें**–वि० पृथक्, अलाहिदा.
**निरिच्छ**–(सं) वि० इच्छेखेरीज.
**निरी**–स्त्री० चुणी–नी, मिरी.
**निरुत्तर**–(सं) वि० उत्तर देण्यास असमर्थ. २ ज्यावर उत्तर नाहीं असें, निर्विवाद.
**निरुंद**–वि० अरुंद, आंखुड.
**निरुपाय**–(सं) पु० नाइलाज.
**निरूपण**–(सं) न० विवेचन, व्याख्यान.
**निरूपणें**–उ० वि० सांगणें, समजावणें.
**निरोगी**–(सं) वि० रोगविरहित, नीरोग, घट्टाकट्टा.
**निरोध**–(सं) पु० अवरोध, बंद ठेवणें.
**निरोप**–(सं) पु० संदेश, मजकूर, (लहानानें मोठ्यास पाठविलेला) विज्ञापना, विनंति; (मोठ्यानें लहानास पाठविलेला) आज्ञा.
**निलाजरा**–वि० (**निर्लज्ज** पहा.)
**निवटणें**–अ० निघणें. २ सुधारणें. ३ स० मारणें. ४ स्वच्छ करणें.
**निवड–डणी**–स्त्री० पसंती, निवडणूक.
**निवडणें**–स० पसंत करणें. २ नीट करणें.
**निवणें**–अ० थंड होणें. २खचणें. ३न० इंडोणी, एक प्रकारची चुंबळ.
**निवर्तणें**–(सं) अ० परतणें.२थांबणें.३मरणें.

**निवळ**–स्त्री० साय, पातळ पदार्थावरचा थर. २ वि० निव्वळ, केवळ, निर्भेळ.
**निवळी**–स्त्री० साय, पातळ पदार्थावरचा थर. २ वनस्पतिविशेष, तिची बी.
**निवळणें**–अ० स्वच्छ होणें. २ सुधारणें.
**निवाडपत्र**–न० जप्ती, हुकुमनामा.
**निवाडा**–पु० फैसला, निकाल, न्याय.
**निवांत**–(सं) वि० शांत, एकांत, स्तब्ध.
**निवारण**–(सं) न० दूर करणें, बंदी.
**निवारणें**–(सं)प्र०हरणें,वाळविणें, बंद करणें.
**निवारशी**–वि० बिनवारशी, निवारशीक.
**निवारा**–पु० निर्वात स्थळ, वारा न येई अशी जागा.
**निवास**–(सं) पु० वास, रहाणें, स्थान.
**निवासी**–(सं) वि० रहाणारा, कर.
**निवीति त**–(सं) स्त्री० जानव्याची छाती-वर असण्याची स्थिति,कंठीमारखें जानवें.
**निवृत्ति**–(सं) स्त्री० परतणें, थांबणें.
**निवेद्य–द**–(सं) पु० नैवेद्य, नजर, देणगी.
**निवेदन**–(सं) न० सांगणें, कथन.
**निश्चक्र**–(सं) वि० निर्जळी.
**निश्चय**–(सं) पु० नियम, बेत, नेम, भरंवसा.
**निश्चिंत**–(सं) वि० निष्काळजी, बेफिकीर.
**निश्वास**–(सं) पु० श्वास, श्वासोच्छ्वास.
**निःशक्त**–(सं) वि० अशक्त, नाताकद.
**निःशंक–श्शंक**–(सं) वि० शंकाहीन.
**निशा**–(सं)स्त्री०रात्र. २खात्री,हमी. ३कैफ.
**निशाचर**–(सं) वि० रात्रिचर, राक्षस. २ रात्रीं भटक्या मारणारा.
**निशाण–न**–(फा) न० पताका, ध्वज, नेम.
**निशाणी**–(फा) स्त्री० खूण, ओळख.
**निशापति**–(सं) पु० निशाकर, चंद्र.
**निशिगंध**–(सं) पु० गुलछबू.
**निशिभार्गव**–(सं) पु० शुक्रवाराचें नक्त.
**निशीं**–श० सह, युक्त, सुद्धां.
**निःशेष**–(सं) वि० शेषरहित, संपूर्ण.
**निशोत्तर**–(सं) न० वनस्पतिविशेष, तेड.
**निष्कंटक**–(सं) वि० अकंटक, निर्धास्त.
**निष्कपट**–(सं) वि० अकपट, अकृत्रिम.
**निष्कांचन**–(सं) वि० द्रव्यहीन, निर्द्रव्य, गरीब.
**निष्काम**–(सं) वि० फलेच्छेशिवाय केलेलें.
**निष्कारण**–(सं) क्रि० उगाच, कारणाखे-रीज. २ वि० ज्याचें कारण नाहीं असें.
**निष्ठा**–(सं) स्त्री० श्रद्धा, विश्वास.
**निष्ठुर**–(सं) वि० क्रूर, दुष्ट, निर्दय, कठोर.
**निष्णा–षणा**–(सं) पु० धार लावण्याचा दगड, सहाण.
**निष्णात**–(सं) वि०प्रवीण,पटु,कुशल,निपुण.
**निष्पन्न**–(सं) क्रि० झालेलें. २उत्पन्न,उपज.
**निष्पाप**–(सं) वि० निर्दोष, पापाशिवाय.
**निष्फळ–ल**–(सं) निर्फळ, व्यर्थ.
**निषाद**–(सं) पु० गायनांतील सातवा स्वर. २ कोळी. ३ ब्राह्मण व शूद्री यांपासून झालेला.
**निषिद्ध–षेधित**–(सं) वि० त्याज्य, वर्ज, त्यक्त, अविहित.
**निषेध**–(सं) पु० बंदी, मनाई, नकार.
**निस्**–( निर् पहा. )
**निस्तरणें**–उ० वि० संपविणें, खटपट करणें श्रम होणें, निपटणें, सोसणें, वाट लावणें.
**निस्ता**–वि० नुस्ता, फक्त,एकीएक एकाकी.
**निस्तेज**–(सं) वि० तेजरहित, फिका, तेज-हीन, मलूल.
**निस्पृह**–(सं) वि० निर्भीड, निरिच्छ.
**निस्संग**–(सं) वि०एकाकी,एकटा,अद्वितीय.
**निस्सत्व**–(सं) वि० सत्वाशिवाय, अशक्त.
**निस्सीम**–(सं) वि० अमर्याद, पुरा, नैष्टिक.
**निसटणें**–अ० सुटणें, निघणें, निसरणें.
**निसण**–(सं) स्त्री० शिडी, निसळणी.

**निसणें**–उ० वि० निवडणें, स्वच्छ करणें, वेंचणें, सोलणें.
**निसंतान**–(सं) न० निर्वंश, कुलक्षय.
**निसबत**–(आ) स्त्री० हवाला, मार्फत.
**निसवणें**–(सं) अ० निसंग अमर्याद होणें. २ कणीस बाहेर टाकणें. [बिलाशक.
**निःसंशय**–(सं) वि० निश्शंक, संशयहीन,
**निहाय**–(आ) प्रत्येकीं; जसें–जिल्हेनिहाय.
**निळा**–(सं) वि० अस्मानी.
**निळें**–न० हिरवें गवत.
**निंदक**–(सं) वि० दूषक, दोष ठेवणारा.
**निंदणें**–स० दोष देणें, निंदा करणें.
**निंदा**–(सं) स्त्री० उणेपणा सांगणें, दूषण.
**निंब**–(सं) पु० कडु लिंब.
**निंबू**–(सं) न० लिंबू. [ खालीं. ९ पु० खळ.
**नीच**–(सं) वि० हलकें. २ आखूड. ३ ठेंगू. ४
**नीज**–(सं) स्त्री० निद्रा, झोंप. [ थेट.
**नीट**–(सं) वि० समोर, सरळ, बराबर. २
**नीत**–(सं) वि० नित्य. २ नीति.
**नीति**–(सं) स्त्री० न्याय. २ सभ्य रीति.
**नीर**–(सं) न० पाणी, उदक. २ जाळें. ३ शेवट.
**नीरस**–(सं) वि० कोरडें. २ रसाशिवाय.
**नील–ळ**–(सं) पु० रत्नविशेष. २ वनस्पतिविशेष. ३ निळ्या रंगाचें एक द्रव्य. ४ रामायणप्रसिद्ध वानरविशेष.
**नीलकंठ**–(सं) पु० मोर, मयूर. २ महादेव.
**नुक्ता**–(आ) पु० शून्य. २ हिकमत. ३ क्रि० आतांच.
**नुकसान**–(अ) न० तोटा, खराबी.
**नुन्नी**–स्त्री० बुल्ली, चोटकुली, चोटली.
**नुन्नुबाळ**–न० अर्भक, लहान मूल.
**नूतन**–(सं) वि० नवें, अलीकडील.
**नूपुर**–(सं) न० घुंगरू, तोरड्या, पैंजण.
**नूर**–(आ) पु० तेज, टवटवी. २ रूप, आकार, चेहरा.
**नृत्य**–(सं) न० नाच, नर्तन, नाचणें.
**नृप**–(सं) पु० राजा, नृपाल, नृपति.
**नेक**–(फा) वि० प्रामाणिक, विश्वासू.
**नेकनामदार**–(फा) वि० श्रेष्ठ, विख्यात. २ पदवीविशेष.
**नेचा**–(फा) पु० हुक्याची नळी. २ ओढ.
**नेट**–पु० शक्ति, बळ, दम. २ निकड, तगादा.
**नेटका**–वि० नीट, यथास्थित.
**नेणणें**–अ० न जाणणें.
**नेणता**–वि० अजाण, अजाणता, अज्ञान.
**नेणें**–(सं) उ० वि० हालविणें, वेऊन जाणें.
**नेत्र**–(सं) पु० डोळा, नयन.
**नेत्रपल्लवी**–(सं) स्त्री० डोळ्यांची भाषा.
**नेत**–(आ) स्त्री० ( **नियत** पहा. )
**नेपथ्य**–(सं) पु० पडदा, आंतील भाग. २ पोषाक, वेष.
**नेपाळ**–वि० देशविशेष.
**नेफा**–(फा) पु० मोकळा पदर.
**नेभळा**–वि० मेंळ, ढिला.
**नेम**–(सं) पु० नियम. २ खूण, शिस्त. ३ व्रत.
**नेमणूक**–स्त्री० असामी. २ वर्षासन.
**नेमणें**–स० कायम करणें, कायम होणें.
**नेमस्त**–वि० बेताचा, नियमित, मित.
**नेमानेम**–पु० घडणारी गोष्ट, ब्रह्मलिखित.
**नेरा**–पु० ज्यांतून झारेकरी सोनें काढितो ती सोनाराच्या येथील झळ असलेली राख.
**नेवाळ–ळी**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**नेवेद्य**–(सं) पु० निवेद, नैवेद्य. [विटून घेणें.
**नेसणें**–न० नेसण्याचें वस्त्र. २ अ० गुंडाळणें.
**नेहमीं**–क्रि० सतत, सदा, सर्वदा.
**नें**–तृतीयेचा प्रत्यय.
**नैयायिक**–(सं) वि० न्यायशास्त्री. [ऱ्य दिशा.
**नैर्ऋत्य**–(सं) स्त्री० दक्षिण व पश्चिम यांमधी-
**नैसर्गिक**–(सं) वि० स्वाभाविक, मूळचा.
**नोक**–(फा) स्त्री० अग्र, टोंक, कोन. २ ऐट.

नोडगा–फु० मुसलमान, शिखानष्ट.
नोर–न० भांडें, हाशील.
नोवरा–री–( नवरा नवरी पहा. )
नोंद–स्त्री० नोंदणी, बार, लेख.
नौ–नऊ–(सं) वि० नव, ९.
नौका–(सं) स्त्री० नाव, तर, तरी, होडी.
नौबद–त–(आ) स्त्री० डंका, चौघडा.
नंगा–वि० नग्न, नागवा. २ फटिंग.
नंतर–(सं) क्रि० पुढें, मग, वर, पश्चात्.
नंद–(सं) पु० राजवंशविशेष. २ गोकुळा-च्या राजाचें नांव. [गेचें नांव.
नंदन–(सं) पु० मुलगा. २ स्वर्गांतल्या बा-
नंदादीप–(सं) पु० अहोरात्र राहणारा दिवा.
नंदी–(सं) पु० शिवाचें वाहन. २मूर्ख, बैल.

## प.

प–एकविसावें व्यंजन. ह्याचा प्रत्ययासारखा उपयोग होतो तेव्हां याचे अर्थ–पति, पाळणारा, मुख्य, पिणारा–असे होतात; जसें नृप, गोप, अधिप, पादप.
प्याजी–पु० रंगविशेष, थोडा गुलाबी रंग.
प्यादा–(फा) पु० शिपाई, पायदळ.
प्यादी–(फा) स्त्री० प्यादमात.
प्यार–रा–वि० आवडता, प्रिय.
प्याला–(फा) पु० पेला, आबकारा.
प्यास–स्त्री० तहान, तृषा.
प्याहा–(सं) पु० छीहा, पानथरी.
प्र–एक उपसर्ग–हा प्रकर्ष ह्मणजे अधिकत्व दाखवितो; जसें–प्रताप.
प्रक्षालन–(सं) न० धुणें, धावन.
प्रक्षालणें–ळणें–(सं) स० धुणें, विसळणें.
प्रकट–(सं) वि० उघड, स्पष्ट.
प्रकरण–(सं) न० अध्याय, भाग. २ काग-दपत्र. ३ गोष्ट. ४ ग्रंथ, खंड. [णूक.
प्रकार–(सं) पु० तऱ्हा, परी, जात. २ वर्त-
प्रकाश–(सं) पु० उजेड, प्रभा, तेज.
प्रकाशणें–अ० उजेड होणें–पडणें.
प्रकृत–(सं) वि० सध्यां, आतां, चालू. २ स्त्री० तबियत, प्रकृति. ३ स्वभाव.
प्रकृति–(सं) स्त्री० तब्यत. २ स्वभाव. ३ मूळरूप.
प्रकोप–(सं) पु० ज्यास्ती–अधिक क्षोभ.
प्रख्यात–(सं) वि० विख्यात, प्रसिद्ध.
प्रख्याति–(सं) स्त्री० प्रसिद्धि,नांव, कीर्ति, ख्याति, लौकिक. [तिखट, खर.
प्रखर–(सं) वि० अतिऊष्ण, तीक्ष्ण, उग्र,
प्रगट–(सं) वि० प्रकट, उघड, स्पष्ट.
प्रगटणें–(सं) अ० विख्यात होणें, उघडकी-स येणें, बाहेर येणें.
प्रगणा–( परगणा पहा. )
प्रघात–(सं) पु० रूढी, चाल, रीत.
प्रचंड–(सं) वि० मोठा, विशाळ, विस्तीर्ण.
प्रचार–(सं) पु० प्रघात, रूढी, चाल.
प्रचीत–ती–(सं) स्त्री० प्रतीति, दाखला, प-रिचय.
प्रज्ञ–(सं) पु० शहाणा मनुष्य.
प्रज्ञा–(सं) स्त्री० बुद्धि, मति.
प्रज्ञान–(सं) न० विज्ञान, विशेष ज्ञान.
प्रज्वलन–(सं) न० ज्वलन, पेटणें, जळणें.
प्रज्वलित–(सं) वि० पेटलेला.
प्रजा–(सं) स्त्री० रयत. २ संतान, संतति.
प्रजापति–(सं) पु०ब्रह्मदेव.२ राजा.३ शिश्न.
प्रणाम–(सं) पु० नमस्कार, वंदन, प्रणिपात.
प्रणीत–(सं) वि० विहित, सांगितलेलें,केलेलें.
प्रत्यंतर–(सं) न० उदाहरण, प्रमाण.
प्रत्यय–(सं) पु० प्रचीति, अनुभव. २ व्याक-रणसंज्ञाविशेष.

**प्रत्यवाय**-(सं) पु० दोष, अपवाद.
**प्रत्यहीं**-(सं) क्रि० रोज, नित्य.
**प्रत्यक्ष**-(सं) वि० दिसणारें, समक्ष. २ न० प्रमाणविशेष. [ त्तर, उत्तर.
**प्रत्युत्तर**-(सं) न० जाबास जाब, उत्तरास उ-
**प्रत्येक**-(सं) वि० एकेक.
**प्रत**-(सं) स्त्री० नक्कल. २ वर्ग. ३ स-ला-तें.
**प्रतबंदी**-स्त्री० जमिनीचें वर्गीकरण, अनुक्रम.
**प्रतवार**-क्रि० अनुक्रमें, दराप्रमाणें.
**प्रताप**-(सं) पु० पराक्रम, कीर्ति. २ अधिकार. ३ गुण. ४ अतिशय ताप-त्रास.
**प्रतारणा**-(सं) स्त्री० कृत्रिम, लबाडी.
**प्रतापवान्**-(सं) वि० प्रतापी, समर्थ.
**प्रति**-(सं) श० प्रत, कारणें. २ एक उपसर्ग: हा- प्रत्येक, प्रतिकूल, उलट-ह्या अर्थी येतो; जसें-प्रतिवर्ष, प्रतिस्पर्धी, प्रतिध्वनि.
**प्रतिकूल**-(सं) वि० विरुद्ध, उलट.
**प्रतिग्रह**-(सं) पु० दान घेणें.
**प्रतिज्ञा**-(सं) स्त्री० पण, वचन. २ सिद्धांत.
**प्रतिध्वनि**-(सं) पु० प्रतिनाद-शब्द.
**प्रतिनिधि**-(सं) पु० मुतालिक, मुनीम. २ कोणत्याही बाबींत मुख्य मनुष्याचें (किंवा पदार्थाचें) काम करणारा.
**प्रतिपदा**-(सं) स्त्री० पाडवा, पहिली तिथि.
**प्रतिपक्ष**-(सं) पु० उलट पक्ष-बाजू.[ वर्णन.
**प्रतिपादन**-(सं) न० अनुकूल व्याख्यान-
**प्रतिपादणें**-(सं) उ० वि० सिद्ध करणें.
**प्रतिपाल-ळ**-(सं) पु० सांभाळ, पाळण, पोषण.
**प्रतिबिंब**-(सं) न० छाया, पडच्छाया. [मूर्ति.
**प्रतिमा**-(सं) स्त्री० सारखेपणा, नक्कल. २
**प्रतिवादी**-(सं) पु० आरोपी.
**प्रतिशब्द**-(सं) पु० प्रतिध्वनि. २ त्याच अर्थाचा दुसरा शब्द.
**प्रतिष्ठा**-(सं) स्त्री० मान, योग्यता, अब्रू.
**प्रतिस्पर्धी**-(सं) वि० मत्सरी, द्वेषी.

**प्रतीची**-(सं) स्त्री० पश्चिम, मावळत.
**प्रतीत-ती**-(सं) स्त्री० अनुभव, प्रत्यय.
**प्रतीक्षा**-(सं) स्त्री० वाट पहाणें, थांबणें.
**प्रतोद**-(सं) पु० चाबूक, कोरडा.
**प्रथम**-(सं) वि० पहिला, आद्य.
**प्रथमतः**-(सं) क्रि० पहिल्यानें, आरंभीं. [ष.
**प्रथमपुरुष**-(सं) पु० व्याकरणांतील संज्ञाविशे-
**प्रथमा**-(सं) स्त्री० पहिली विभक्ति.
**प्रद**-(सं) वि० देणारें.
**प्रदक्षिणा**-(सं) स्त्री० आपल्या डाव्या हाताकडून घातलेली फेरी-चक्कर.
**प्रदर**-(सं) पु० धुपणी.
**प्रदर्शक**-(सं) वि० दाखविणारें.
**प्रदर्शन**-(सं) न० दाखविणें. २ अजब-अपूर्व-वस्तु पहाण्याकरितां मांडणें.
**प्रदान**-(सं) न० देणें, दान, देणगी.
**प्रदेश**-(सं) पु० प्रांत, जागा, जमीन.
**प्रदोष**-(सं) पु० संध्याकाळ, तिनीसांज. २ व्रतविशेष.
**प्रधान**-(सं) पु० दिवाण, मंत्री. २ वि० श्रेष्ठ.
**प्रपंच**-(सं) पु० जग, संसार. २ लोभ. ३ कपट.
**प्रपादन**-(सं) न० प्रतिपादन, पुरावा.
**प्रपादणी**-(सं) स्त्री० पुरावा, अपराधाबद्दल सबबी सांगणें. [ देणें.
**प्रपादणें**-(सं) उ० वि० सिद्ध करणें, पुरावा
**प्रपिता**-(सं) पु० आजा, बापाचा बाप. २ वनस्पतिविशेष. [ बाप.
**प्रपितामह**-(सं) पु० पणजा, बापाच्या बापाचा
**प्रपौत्र**-(सं) पु० पणतू, नातवाचा मुलगा.
**प्रपौत्री**-(सं) स्त्री० नातवाची मुलगी.
**प्रफुल्ल-ल्लित**-(सं) वि० फुललेलें, विकसित. २ आनंदित, हृष्ट.
**प्रबंध**-(सं) पु० कविताविशेष.
**प्रबल-ळ**-(सं) वि० समर्थ, शक्तिमान.
**प्रबुद्ध**-(सं) वि० प्रौढ, प्रगल्भ, ज्वान. २ हुशार.

**प्रबोध**–(सं) पु० जागृति. २ ज्ञान, मति.
**प्रभव**–(सं) पु० मोठी योग्यता. २ संवत्सर-विशेष. ३ उत्पत्ति, उगम.
**प्रभा**–(सं) स्त्री० कांति,तेज,उजेड.२ छाया.
**प्रभाकर**–(सं) पु० सूर्य, प्रभा करणारा.
**प्रभात**–(सं) स्त्री० सकाळ, प्रातःकाल.
**प्रभावळ**–(सं) स्त्री० मूर्तीच्या पाठीचें टेंकण.
**प्रभास**–(सं) न० क्षेत्रविशेष.
**प्रभु**–(सं) पु० धनी, मुकत्यार,राजा.२ईश्वर.
**प्रभृति**–(सं) क्रि० आदि, इतर,आणि दुसरे.
**प्रमत्त**–(सं)वि०उन्मत्त,माजलेला,धुंद झालेला.
**प्रमाण**–(सं) न० आधार, दाखला. २ माप. ३ विश्वास,भरंवसा. ४ प्रत्यक्ष–अनुमान–आप्तवाक्य ह्यांपैकीं प्रत्येक.
**प्रमाणें**–(सं) श० सारखें.
**प्रमाद**–(सं) पु० अपराध, चूक, दोष.
**प्रमुख**–(सं) वि० मुख्य, श्रेष्ठ, ह्योरक्या.
**प्रमेय**–(सं) पु० सिद्ध करण्यास योग्य,साध्य.
**प्रमेह**–(सं) पु० परमा, रोगविशेष.
**प्रयत्न**–(सं)पु० उद्योग, यत्न, कोशीस.
**प्रयाग**–(सं) पु० संगम. २ अलाहाबाद,क्षेत्रविशेष.
**प्रयाण**–(सं) न० गमन, जाणें.२ मरण.
**प्रयास**–(सं) पु० आयास, श्रम, कष्ट.
**प्रयोग**–(सं) पु० जुळणी,योजना, योग, करून पाहणें. २ नाटक करून दाखविणें.
**प्रयोजक**–(सं) वि० व्याकरणसंज्ञाविशेष.
**प्रयोजन**–(सं) न० कारण.२ जेवणावळ.
**प्रलय**–(सं) पु० नाश. २ अनर्थ. ३ कल्प.
**प्रलाप**–(सं) पु० बडबड, व्यर्थ भाषण.
**प्रवर्तक**–(सं) वि० प्रेरणा–प्रवृत्ति करणारा.
**प्रवर्तन**–(सं) न० वागणें, वागणूक. [ ऋषि.
**प्रवर**–(सं) वि० मुख्य. २ पु० पिढी, वंशकर्ते
**प्रवाल–ळ**–(सं) न० पोवळें.
**प्रवास**–(सं) पु० परदेशीं हिंडणें.
**प्रवासी**–(सं) वि० पांथस्थ,उतारू,मुशाफर.
**प्रवाह**–(सं) पु० गति, वहाणें, ओघ.
**प्रविष्ट**–(सं) वि० शिरलेला, गति झालेला.
**प्रवीण**–(सं) वि० निपुण, निष्णात. [चालू.
**प्रवृत्त**–(सं)वि०तयार,सिद्ध. २सुरू,वर्तमान,
**प्रवृत्ति**–(सं) स्त्री० सुरुवात, गति. २ वार्ता, बातमी. [ शिरकाव, रिघाव.
**प्रवेश**–(सं) पु० अंकाचा भाग. २ शिरणें.
**प्रश्न**–(सं) पु० जाब, सव्वाल.२कूट.३शकून.
**प्रश्नोत्तर**–(सं)न० जाबजबाब, सव्वालजबाब.
**प्रशंसणें**–(सं) उ० वि० स्तुति करणें,स्तवणें.
**प्रशंसा**–(सं) स्त्री० वडीजाव,प्रतिष्ठा, स्तुति.
**प्रशस्त**–(सं) वि० मोठा, अवाढव्य, नीट.
**प्रस्तार**–(सं) पु० प्रसार, विस्तार.
**प्रस्तावन**–(सं) न० प्रस्तावना, संदर्भ.
**प्रस्तावना**–(सं) स्त्री० उपोद्घात.२ प्रारंभ, सुरवात.
**प्रस्तुत**–(सं) वि० चालू.२क्रि०सध्यां, आतां.
**प्रस्थ**–(सं) न० बंड, ढोंग.२ परिमाणविशेष. ३ खंड, प्रकरण.
**प्रस्थान**–(सं) न० प्रवासाचा आरंभ व त्याबद्दल बाहेर ठेवलेली वस्तु. [ वादविवाद.
**प्रसंग**–(सं) पु० योग्य वेळ, समय.२गांठ.३
**प्रसंगवशात्**–(सं) क्रि०दैवयोगानें, कदाचित्.
**प्रसंगावधान**–(सं)न०योग्यवेळीं युक्ति सुचणें.
**प्रसन्न**–(सं) वि० खुष, आनंदी, हर्षयुक्त. २ प्रसाद–कृपा करण्यास तयार.
**प्रसन्नता**–(सं) स्त्री० प्रसाद, खुषी,आनंद.
**प्रसरण**–(सं) न० वाढणें, विस्तार, पसरणें.
**प्रसवणें–विणें**–(सं) उ० वि०उत्पन्न होणें–करणें, विणें, बाळंत होणें.
**प्रसाद**–(सं) पु० कृपा, देणगी, प्रसादाचें चिन्ह. २ साक्षात्कार. ३ खुषी, हर्ष.
**प्रसिद्ध**–(सं) वि० विख्यात, महशूर, प्रख्यात, जाहीर.

**प्रसिद्धि**–(सं) स्त्री० कीर्ति, ख्याति,लौकिक.
**प्रसूतिका**–(सं) स्त्री० बाळंतीण.
**प्रसृत**–(सं) वि० पसरलेलें, दीर्घ.
**प्रहर**–(सं) पु० घड्याळ. २ तीन तास.
**प्रहार**–(सं) पु० मारणें, मार, घाव.
**प्रळय**–(सं) पु० ( **प्रलय** पहा. )
**प्राक्**–(सं) क्रि० पूर्वी, अगोदर.
**प्राक्तन**–(सं) न० प्रारब्ध, नशीब, दैव.
**प्राकृत**–(सं) वि० स्वाभाविक, साधारण. २ मराठी, प्राचीन, बालभाषा.
**प्राची**–(सं) स्त्री० पूर्व दिशा, उगवत.
**प्राचीन**–(सं) वि० जुनें, पुराणें, मागचें.
**प्राज्ञा**–(सं) स्त्री० मगदूर, सामर्थ्य. [निर्मळ.
**प्रांजल–ळ**–(सं) वि० उघड, खुलें, स्वच्छ,
**प्राण**–(सं) पु० जीव. २ अति प्रिय पदार्थ.
**प्राणायाम**–(सं) पु० श्वासनिरोध.
**प्राणी**–(सं) पु० जीव, जंतु.
**प्रातःकाल**–(सं) पु० सकाळ, पहाट.
**प्रांत**–(सं) पु० देश, जिल्हा, प्रदेश. २ बाजू, कड.
**प्राथमिक**–(सं) वि० आरंभाचें, प्रथमचें.
**प्रादुर्भाव**–(सं) पु० उदय, आरंभ, उत्पत्ति.
**प्रादेश**–(सं) पु० टीच–टीच.
**प्राधान्य**–(सं) न० मुख्यत्व, विशेषत्व.
**प्राप्त**–(सं) वि० सिद्ध, तयार. २ भाग, अवश्य. ३ स्त्री० प्राप्ति, नफा.
**प्रापंचिक**–(सं) वि० संसारी, ऐहिक वस्तूचा विचार करणारा.
**प्राबल्य**–(सं) न० प्रमुखत्व, जोर.
**प्रामाण्य**–(सं) न० सत्यता, प्रमाण.
**प्राय**–(सं) पु० बाहुल्य, समृद्धि, चंगळ.
**प्रायः–यशः**–(सं) क्रि० बहुतकरून.
**प्रायश्चित्त**–(सं) न० पापमोचक विधिविशेष.
**प्रार्थणें**–(सं) उ० वि० विनवणें,स्तुति करणें.
**प्रार्थना**–(सं) स्त्री० स्तुति, धावा, विनंति.
**प्रारब्ध**–(सं) न० प्राक्तन, नशीब, दैव.
**प्रारंभ**–(सं) पु० आरंभ, सुरवात.
**प्रारंभणें**–(सं) उ० वि०सुरू करणें,आरंभणें.
**प्रावरण**–(सं) न० पांघरूण, पोपाख.
**प्राशन**–(सं) न० पिणें, घोट घेणें, पान.
**प्रास**–(सं) पु० शब्दालंकारविशेष, अनुप्रास, त्याच त्याच सार्थक किंवा निरर्थक अक्षरांची आवृत्ति. २ भाला.
**प्रासाद**–(सं) पु० देवालय, मंदिर,राजवाडा.
**प्रिय**–(सं) वि० आवडतें, इष्ट.२ पु०दोस्त, यार. ३ पति, नवरा.
**प्रिया**–(सं) स्त्री० बायको.
**प्रीत्यर्थ**–(सं) श० कारणें, करितां, साठीं.
**प्रीत–ति**–(सं) स्त्री० मर्जी, प्रेम, आवड.
**प्रेक्षक**–(सं) वि० पहाणारा.
**प्रेत**–(सं) न० मुडदा, निर्जीव देह, शव.
**प्रेम**–(सं) न० प्रेमा, प्रीति, स्नेह.
**प्रेरण–णा**–(सं) स्त्री० प्रवृत्ति, उत्तेजन.
**प्रोक्षण**–(सं) न० शिंचन, शिंपणें.
**प्रौढ**–(सं) वि० भव्य, तरुण, प्रगल्भ, वृद्ध.
**प्रौढि**–(सं) स्त्री० गर्व, अहंता. २ प्रतिष्ठा.
**प्लीहा**–(सं) स्त्री० पानथरी, बरल.
**पई**–स्त्री० पैशाचा तृतीयांश, पै.
**पक्का**–(सं) वि० पक्व, पिकलेला. २ भरपूर, पुरा. ३ वस्ताद, न फसणारा, हुशार.
**पक्काखरडा**–पु० पक्का–खरा हिशोब.
**पक्व**–(सं) वि० पिकलेला, पक्का. २ योग्य.
**पक्वान्न**–(सं) न० उंची अन्न, मिष्टान्न, आवडीचें खाद्य.
**पक्वाशय**–(सं) पु० कोठा, पोट, कोष्ठ.
**पक्ष**–(सं) पु० पीस, पंख. २ पंध्रवडा. ३ महालय श्राद्ध. ४ तट, बाजू, कड.
**पक्षकार**–पु० वादी किंवा प्रतिवादी, कूळ.
**पक्षघात**–(सं)पु० रोगविशेष, पक्षवात,अर्धांगवायु.

**पक्षपात**–(सं) पु० एक तर्फ, एक बाजू. २ एकतर्फी न्याय.
**पक्षी**–(सं) पु० पंखी, पांखरूं, पंखाचा प्राणी.
**पक्षीं**–क्रि० पक्षां. २ विकल्पें करून.
**पकड–कड**–स्त्री० पगड. २ चिमटा. ३ युक्ति. ४ डाव, पेंच.
**पकडणें**–उ० वि० धरणें, पछाडणें.
**पकवा**–पु० अव्यक्त शब्दविशेष.
**पखवाज**–पु० मृदंग, तबला.
**पखाल**–(सं) स्त्री० चर्मपात्र.
**पखालजी**–पु० भिस्ती, पाणी वाहणारा.
**पखालपार्वती**–स्त्री० लठ्ठ बायको–स्त्री.
**पग**–(सं) न० वर. २ पाऊल, पाय. ३ शोध. [तेज.
**पगडबंद**–पु० पागोटीं बांधणारा.
**पगडा**–पु० डाव, दानविशेप. २ छाप,
**पगडी**–स्त्री० शिवलेलें पागोटें.
**पगार**–पु० रोजमुरा, मुशाहिरा, दरमहा. २ एक प्रकारची होडी.
**पघळ**–वि० विस्तृत, मोठें, रुंद.
**पघळणें**–अ० मोठें होणें. २ वितळणें.
**पच्ची**–स्त्री० फजिती. २ वि० पक्कें.
**पचकन पचपच**–क्रि० पचदिनी, पचदिशी.
**पचकळ**–वि० चावट, अभद्र बोलणारा.
**पचंगी**–स्त्री० धोतराचा कवजासारखा केलेला आकार.
**पचणें**–(सं) अ० जिरणें, पचन होणें. २ उपडकीस न येणें.
**पचपचीत**–वि० चिंब, ओला, भिजलेला.
**पचंबा**–पु० श्रावणे सोमवारचें गाणें. २ हुर्यो, पच्ची.
**पछाडणें**–उ० वि० पाडणें, गांठणें.
**पट्टण–न**–(सं) न० शहर, मोठा गांव.
**पट्टराणी**–स्त्री० मुख्य राज्ञी–णी.
**पट्टा**–पु० शस्त्रविशेष. २ बाजू. ३ वादी, चर्म. ४ सरकारचें नांव खोदलेला पत्रा.
**पट्टी**–स्त्री० तुकडा. २ फळी. ३ वर्गणी. ४ कर. ५ सभा. ६ विडा.
**पट्टू**–पु० लोंकरीवस्त्रविशेष, पट्ट.
**पट्टें**–न० वस्त्राचा विभाग, फर्द.
**पट**–(सं) पु० वस्त्र. २ हिस्सा. ३ पालथा. ४ यादी. ५ ज्यावर कशिद्याचीं वगैरे घरें केलेलीं असतात असें बुद्धिबळें वगैरे खेळांचें साधनीभूत वस्त्र.
**पटई**–स्त्री० कडीपाट, तक्तपोशी.
**पटकणें**–अ० पाडणें, धरणें.
**पटकन–पटकर**–क्रि० झटकन्, लौकर.
**पटकूर**–न० बसकर, आसन.
**पटका**–(सं) पु० फेटा. २ निशाण, ध्वज.
**पटकी**–स्त्री० जरीमरी, वाखा.
**पटणी**–स्त्री० शक्तिविशेष.
**पटणें**–(सं) उ० वि० मिळणें, स्वाधीन होणें, कबूल होणें. [भाग.
**पटल**–(सं) न० पडदा. २ आच्छादन. ३
**पटवारी**–पु० कुळकर्णी, तलाठी, करण.
**पटवेकर–गार**–पु० गांठणारा मनुष्य, रेशमी माळा बनविणारा. [लेला वाघ.
**पटाईत**–वि० तरबेज, निपुण. २ पट्टे अस-
**पटाशी**–स्त्री० किकरें.
**पटु**–(सं) वि० कुशल, तरबेज, योग्य.
**पठ्ठा–पठ्या**–पु० ज्वान, लठ्ठ, उमेदवार.
**पठण–न**–(सं) न० पाठ, तोंडपाठ.
**पठाण**–(सं) न० कौलविशेप. २ पु० मुसलमानांत एक जात आहे.
**पठार**–(सं) पु० पर्वतावरचा सपाट प्रदेश. २ बैलाचा तंग. ३ नावेचा तळ.
**पड**–स्त्री० मागें घेणें. २ कप्पा. ३ वि० पडीक, दुसऱ्या प्रतीचें.
**पडगा**–पु० लांकडाची पातेली–वाडगा.
**पडगी–घी**–स्त्री० पेंदी, पेल्याची बैठक. २ चर्मवाद्यविशेष.

**पडघम**–न० चर्मवाद्यविशेष.
**पडछाया**–स्त्री० छाया, सावली, प्रतिबिंब.
**पडजीभ**–स्त्री० अवयवविशेष.
**पडणें**–(सं) अ० निजणें. २ कोसळणें, मोडणें. ३ बनणें. ४ असणें, होणें. ५ हरवणें.
**पडतपोशी**–स्त्री० पडदा, गौप्य, गुप्तपणा, एकांत.
**पडताळणें**–उ० वि० मेळ पहाणें–असणें.
**पडताळा**–पु० मेळ, जम, अनुभव.
**पडदा**–(फा) पु० आडोसा, आड केलेलें वस्त्र. २ भाग. ३ अळा, मर्यादा. ४ पापुद्रा, पटल.
**पडदी**–स्त्री० लहान भिंत, कूड, चांदई.
**पडम**–न० गोणताट–पाट.
**पडवळ**–(सं) न० फळविशेष. [ओसरी.
**पडवी**–स्त्री० ओटीच्या खालचा घराचा भाग,
**पडशी**–स्त्री० एक प्रकारची कंठाळ–गोणी.
**पडसें**–न० सर्दी, रोगविशेष.
**पडाव**–पु० नाव, होडी, नौका.
**पडोस**–पु० वस्ती, शेजार.
**पडोशी**–पु० शेजारी, जवळचा रहिवाशी.
**पढणें**–(सं) स० शिकणें, पाठ करणें. २ विद्या. ३ वेदपाठ–पठन.
**पढतमूर्ख**–सा० पढतपशु, तर्कहीन मनुष्य, विद्वान् असून मूर्ख.
**पंढरी**–स्त्री० पंढरपूर शहर. २ लाट.
**पण्यांगना**–(सं) स्त्री० वेश्या, रांड, कसबीण.
**पण**–(सं) पु० पैज, प्रतिज्ञा. २ पैजेचें द्रव्य. ३ ज्वानी, वय. ४ भाववाचक प्रत्ययविशेष. ५ उ० परंतु.
**पणजा**–पु० आजाचा बाप.
**पणजी**–स्त्री० पणज्याची बायको.
**पणती**–स्त्री० मातीची दिवली, पंती.
**पत्तन**–(सं) न० पट्टण, शहर, पूर.
**पत्ता**–(फा) पु० शोध, तपास, ठाव ठिकाण. २ तंबाकूचें–गंजिपाचें पान.
**पत्थर**–(सं) पु० धोंडा, दगड. २ मूर्ख.
**पत्नी**–(सं) स्त्री० बाइल, लग्नाची स्त्री.
**पत्र**–(सं) न० पान, पर्ण. २ कागद.
**पत्रा**–पु० धातूचा पातळ तुकडा.
**पत्राज–स**–स्त्री० मिजास, डौल.
**पत्री**–स्त्री० जायपत्री.
**पत**–स्त्री० आब्रू, नांव, लौकिक. २ विश्वास.
**पतकरणें**–उ० वि० कबूल करणें–होणें, स्वीकारणें.
**पतंग**–(सं) पु० प्राणीविशेष. २ वावडी, तुक्कल. ३ वनस्पतिविशेष.
**पतंगी**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**पतन**–(सं) न० पडणें.
**पतवंड**–न० नातवाचें मूल.
**पताका**–(सं) स्त्री० झेंडा, निशाण. २ हस्त. ३ टांग.
**पति**–(सं) पु० धनी, स्वामी. २ नवरा.
**पतिव्रता**–(सं) स्त्री० साध्वी, सती.
**पथ्य**–(सं) न० नियमित खाद्य. २ वर्ज. ३ वि० हितावह, हितकारक.
**पथ्यकर**–(सं) वि० हितावह, फायदेशीर.
**पथ**–(सं) पु० पंथ, मार्ग, रस्ता, वाट. २ पथ्य.
**पथारी**–स्त्री० आंथरूण, बिस्तारा.
**पथिक**–(सं) पु० पांथस्थ, वाटसरू, उतारू, मुशाफर.
**पद्धत–ति**–(सं) स्त्री० रीत, मार्ग, चाल.
**पद्म**–(सं) न० कमल. २ शतकोटि संख्या.
**पद्मकाष्ठ**–(सं) न० औषधविशेष.
**पद्मराग**–(सं) पु० रत्नविशेष.
**पद्मिनी**–(सं) स्त्री० उत्तम स्त्री, पद्मीण. २ कमलिनी.
**पद्य**–(सं) न० कविता, छंद, कवन.
**पद**–(सं) न० पाय, पाऊल. २ अधिकार. ३ रकम. ४ कविताविशेष. ५ वर्ग–घनमूळ. ६ शब्द.

पदक-(सं) पु० दागिनाविशेष. २ खाद्यविशेष. ३ टोळी, ताफा.
पदच्युत-(सं)वि०पदभ्रष्ट. २बेअब्रू झालेला.
पदर-(सं) पु० शेवट, कोर, जर. २ भाग. ३ आश्रय. ४ ऋतु. ५ स्वतः. ६ निःसंग होणें. ७ द्रव्य. ८ अंचल, आंचळी.
पदरमोड-स्त्री०जिन्नस मोडून निर्वाह करणें.
पदलालित्य-(सं) न० शब्दालंकारविशेष.
पदवी-(सं) स्त्री० योग्यता, अधिकार, पद. २ उपपद.
पदाति-(सं) पु० पायदळ, सैन्य.
पदार्थ-(सं) पु० वस्तु, द्रव्य, जिन्नस, चीज. २ माल.
पदोपदीं-क्रि० वारंवार, पुनः पुनः.
पन्नग-(सं) पु० साप, नाग.
पन्ना-पु० हिरवा मणि.
पन्नास-वि० संख्याविशेष, ५०. [नाला.
पन्हळ-पु० पाणी वहाण्याचा मार्ग, नळ,
पन्हा-(फा) पु० रुंदी.
पन्हें-(सं) न० आंब्याचें सरबत.
पपनस-न० फळविशेष.
पय-(सं) न० दुग्ध, दूध.२ उदक.
पर्जन्य-(सं) पु० पाऊस, पाणी.
पर्ण-(सं) न० पान, पत्र. [झोंपडी.
पर्णकुटी-(सं) स्त्री०पर्णशाला,पानांचें छपर,
पर्यंक-(सं) पु० पलंग,माचा, मंचक.
पर्यटन-ण-(सं) न० प्रवास,फेरी. [अखेर.
पर्यंत-(सं) श० पावेतों,पावत. २पु० शेवट,
पर्यवसान-(सं) न० शेवट, अंत, अखेर.
पर्याय-(सं)पु०भेद, रीत,चाल, तऱ्हा. २कारण, सबब. ३प्रतिशब्द,समानार्थकशब्द.
पर्व-(सं) न०पर्वणी, योग्य वेळ. २ पेर, पेरें. ३ भारताचा विभाग.
पर्वकाळ-(सं) पु० पर्व. २ विपुलता.
पर्वत-(सं) पु० डोंगर, नग.
पर-(सं) स्त्री० तऱ्हा, चाल. २ न० पीस, पंख. ३ वि० परकी, अन्य. ४श० वर, ची. ५ उ० पण, परंतु.
परकर-पु० घागरा, लहंगा.
परका-वि० परकी, अन्य, दुसरा.
परगणा-(फा)पु० देश, प्रांत.२ भानगड.
परचुरण-न० खुर्दा, मोड, किरकोळ.
परज-पु० रागविशेष. २ मूढ.
परटीण-स्त्री० पक्षिविशेष. २ धोबीण.
परडी-स्त्री० टोपली, करंडी. [परसूं.
परडें-न० पारडें, अर्धी तराजू. २ परूस,
परणाल-ळी-(सं) स्त्री०मोरी,गटार,पन्हळ.
परत्वें-(सं) श० मुळें, साठीं, अनुसरून.
परत-क्रि० उलट, फिरून, पुनः, माघारा.
परतणें-अ० उलटणें, फिरणें.
परतंत्र-(सं) वि० अधीन, परस्वाधीन.
परता-(सं) वि० दूर, पलीकडे. २ उ० तर. ३ श० पेक्षां.
परतिवणें-स० फिरविणें, उलटिवणें.
परंतु-(सं) उ० पण, तरी.
परदार-(सं) न० परदारा, परस्त्री.
परदेश-(सं) पु०अन्यदेश,परमुलूख.२प्रवास.
परदेशी-पु० पुरभय्या.
परंपरा-(सं) स्त्री० क्रम, पिढी, ओळ.
परभारां-क्रि० परस्पर, परोक्ष.
परभू-पु० जातिविशेष.
परम-(सं) वि०उत्कृष्ट,उत्तम,पुष्कळ,मोठा.
परमळ-रिमळ-पु० सुवास, सुगंध.
परमा-(सं) पु० प्रमेह, गर्मीविशेष.
परमाणगी-स्त्री० परवानगी. [क्ष्म कण.
परमाणु-(सं) पु० अणु, अवयव, अति सू-
परमार्थ-(सं) पु० मोक्ष, सद्गतीचें साधन.
परमित-न० परिमिति, मर्यादा, सीमा.
परमेश्वर-(सं) पु० ईश्वर, महादेव. [पुढें.)
परऱ्हां-क्रि० तिसरे दिवशीं (मागें किंवा

**परवड**–स्त्री० दुर्दशा. २ परवचा, थर.
**परवडणें**–अ० पुरवणें, फायदेशीर होणें.
**परवर**–न० फळविशेष व त्याचा वेल. २ हुकूम. ३ पालक, पोशिंदा.
**परवरदिगार**–(फा) पु० परमेश्वर.
**परवश**–(सं) वि० परतंत्र, परस्वाधीन.
**परवा–र्वा**–(फा) स्त्री० धाक, धास्ती.
**परवाचा–ता**–पु० संध्याकाळचा पाठ, वाचणी, उजळणीची आवृत्ति.
**परवां**–(सं) स्त्री० ( **परव्हां** पहा. )
**परवांचा**–वि० नवथर, नवा. २ तिसरे दिवशींचा. [ हुकूम.
**परवाना**–(फा) पु० परवानगी. २ सनद,
**परशु**–(सं) पु० कुऱ्हाड. २ शस्त्रविशेष.
**परस्त्री**–(सं) स्त्री० परदारा. [ रभारा.
**परस्पर**–(सं) वि० एकमेक. २ क्रि० प-
**परस**–न० परसूं. २ परीस. ३ पेक्षां. ४ पुरुष.
**परसा**–पु० आगटी, शेकोटी.
**परसाकडे–डणें**–न० हागणें, मलशुद्धि.
**परसूं**–न० आवार, अंगण. [ त्रविशेष.
**परळ**–न० वनस्पतिविशेष. २ मृत्तिकापा-
**पराई**–(सं) स्त्री० वयाची अवस्था–दशा. २ परकेपणा. [ लता.
**पराकाष्ठा**–(सं) स्त्री० सीमा,शेवट. २ विपु-
**पराक्रम**–(सं)पु०बहादुरी,सामर्थ्य,पुरुषार्थ.
**पराग**–(सं) पु० पुष्पांतील सुगंधी रजःकण.
**परागंदा**–(फा) वि० फरारी, परदेशांत गेलेला, विदेशी.
**परांची**–स्त्री० पहाड, एक तऱ्हेची शिडी.
**पराजय**–(सं) पु० अपजय, पराजय, मोड.
**परात**–स्त्री० पात्रविशेष, धातूची काथवट.
**पराधीन**–(सं) वि० परस्वाधीन. परतंत्र.
**परान्न**–(सं) न० दुसऱ्याचें अन्न, भोजन.
**पराभव**–(सं) पु० मोड, पराजय.
**परामर्श**–(सं) पु० विचारपूस, सत्कार.
**परायण**–(सं) वि० तत्पर, तल्लीन.
**परार्ध**–(सं) न० संख्याविशेष.
**परावा**–वि० परका. २ विदेशी.
**परि**–(सं) उपसर्गविशेषः याचा अर्थ सभोंवतीं असा होतो; जसें–परिवार, परिचर.
**परिग्रह**–(सं) पु० दान, बक्षीस.
**परिघ–रीघ**–(सं) पु० वर, वर्तुळाची बाहेरची कोर. २ आयुधविशेष. ३ योगविशेष.
**परिचर्या**–(सं) स्त्री० सेवा, पूजा.
**परिचर**–(सं) पु० सेवक, हुजऱ्या.
**परिचरण**–(सं) न० ( **परिचर्या** पहा. )
**परिचय**–(सं) पु० ओळख, स्नेह, सहवास, २ प्रत्यय, प्रतीति.
**परिणय**–(सं) पु० विवाह, लग्न. [गत्यंतर.
**परिणाम**–(सं) पु० शेवट, अखेर, अंत. २
**परिधान**–(सं) न० वस्त्र, पांघरूण.
**परिपाठ**–(सं) पु० नियम, शिरस्ता,मामूल.
**परिपूर्ण**–(सं) वि० संपूर्ण, भरलेलें,ओतप्रोत.
**परिभाषा**–(सं) स्त्री० शब्द संकेताचें नियमन.
**परिमाण**–(सं) न० माप, परिमिति.
**परिवार**–(सं) पु० कुटुंब, खटला.
**परिश्रम**–(सं) पु० मेहनत, श्रम.
**परिस**–पु० ( **परीस** पहा. )
**परिस्फोट**–(सं) पु० उघडकी, स्पष्टता, पटकर्णी होणें.
**परिसणें**–उ० वि० एकणें, लक्ष देणें.
**परिहार**–(सं) पु० दूरीकरण, नाहींसें करणें. २ निषेध. ३ समाधान.
**परी**–स्त्री० तऱ्हा, रीत. २ पंखांची स्त्री. सुंदरी. ३ उ० परंतु. ४ श० सारखें.
**परीक्षक**–(सं) वि० परीक्षा घेणारा,पारखी.
**परीक्षा**–(सं) स्त्री० पारख, ज्ञान, निदान.

**परीट**–पु० धोबी, रजक. २ पक्षिविशेष.
**परीस**–(सं) पु० स्पर्शानें लोहाचें सुवर्ण करणारा दगड. २ श० पेक्षां.
**परूस**–न० परसूं, अंगण, आवार.
**परोक्ष**–(सं) क्रि० परभारें, डोळ्याआड.
**परोपकार**–(सं) पु० दुसऱ्याचे कार्यासाठीं मनोवाक्कायद्रव्यदान.
**परोपकारी**–(सं) वि० उदार, उपकारी, झीज–श्रम, सोसणारा.
**परोपरीं**–क्रि० नानाप्रकारें.
**पल्लव**–(सं) पु०पालवी, पानें, फूट.
**पल्ला**–पु० तीस पायली, एकशेंवीस शेर. २ पल्लयाचें ओझें. ३ अंतर, अवकाश.
**पल्ली**–(सं) स्त्री० पाल.
**पल**–(सं) न० घटकेचा साठांश. २ चाळीस मासे वजन.
**पलक–ख**–(फा) न० लवमात्र, क्षण.
**पलंग**–पु० पर्यंक, मंचक.
**पलंगपोस**–पु०आस्त्रा, आच्छादन, चादर.
**पलट**–स्त्री० उलथ, कलथी, परतणें.
**पलटन–ण**–न० नियमित फौज–सैन्य.
**पलांडू**–(सं) पु० कांदा, प्याज.
**पलाण**–(सं) न० खोगीर, जीन.
**पलायन**–(सं) न० पळ, पळणें.
**पलाश**–(सं) पु० पळस, वृक्षविशेष.
**पलिता–दा**–(फा) पु० हिलाल, दीपविशेष.
**पलिकडे–लीकडे**–क्रि० दुसरे–विरुद्ध बाजूस, परता.
**पवन**–(सं) पु० वारा, हवा, वायु.
**पवबारा**–पु० फाश्यांतील दानविशेष, पगडे बारा. २ पलायन.
**पवाडा**–पु० कविताविशेष, गुणकीर्तन.
**पवित्र**–(सं) वि० शुद्ध, शुचिर्भूत, निर्मळ.
**पवित्रक**–(सं)न०दर्भाची–सोन्याची आंगठी.
**पवित्रा**–पु० दस्ती.
**पश्चात्**–(सं) क्रि० मागें, नंतर, मागून.
**पश्चात्ताप**–(सं) पु० पस्तावा, अनुताप, जिवास खाणें.
**पश्चिम**–(सं) स्त्री० मावळत, दिशाविशेष.
**पश्चिमद्वार**–(सं) न० मागील दार, परूसदार. २ गांड.
**पशम**–(फा) न० झांट, पसम, शप्प. [जाति.
**पशमी**–(फा) वि० लोंकरी, कुत्र्याची एक
**पशु**–(सं) पु० जनावर, चतुष्पाद. २ मूर्ख.
**पस्तावा**–पु० पश्चात्ताप, दिलगिरी.
**पस्तीस**–वि० ३५, तीस आणि पांच.
**पसंद–त**–(फा) वि० बिनखोड, मान्य केलेलें, मान्य, कबूल, मनास येणारें.
**पसंती**–स्त्री०मान्यता, कबूली.
**पसरणें**–(सं) उ० वि० हांतरणें, आंथरणें, निजणें. २ प्रसृत–विस्तृत–होणें.
**पसवणें**–(सं) उ० वि० बाहेर टाकणें.
**पसा**–(सं) पु० अर्धी ओंजळ.
**पसारा**–पु० गोंधळ, गडबड. २ वाणसवदा.
**पसारी**–पु० वाणी, गांधी, भुसारी.
**पसुरडी–सुडी**–स्त्री० पैसा.
**पहाट**–स्त्री० प्रातःकाल, उषःकाल.
**पहाड**–पु० डोंगर, टेंकडी. २ शिडीविशेष, परांची. ३ वि० मोठा. [प्रहर.
**पहार**–(सं) स्त्री० लोखंडी हत्यारविशेष. २
**पहारा**–पु० चौकी, रखवाली. २ वेळ. ३ पहारा करणारे शिपाई.
**पहारेकरी**–पु० रखवालदार, चौकीदार.
**पहिलटकर–रीण**–स्त्री० प्रथमच झालेली बाळंतीण. [ठी, मल्ल.
**पहिलवान–पैलवान**–पु० तालिमबाज, जे-
**पहिला**–वि० प्रथम, आदि.
**पहीपाहुणा–इपाहुणा**–पु० ओळखी–देखवी, अतीतअभ्यागत.
**पहुंची**–स्त्री० पोंची, दागिनाविशेष.

**पहुडणें**—अ० निजणें, पडणें.
**पळ**—(सं) न० पल. २ पलायन.
**पळणें**—(सं) अ० जाणें, निघणें. २ धांवणें.
**पळता**—वि० पळून जाणारा. २ चंचळ, अस्थिर.
**पळपटा—पुटा**—वि० पळून जाणारा.
**पळपळीत—पुळपुळीत**—वि० ढिला, अधीर.
**पळविणें**—उ० वि० चोरणें, लांबवणें, नेणें. २ धावविणें, दौड देणें.
**पळस**—(सं) पु० वृक्षविशेष.
**पळसुला**—पु० मौंज्यंगकर्मविशेष.
**पळा**—पु० मोठी पळी.
**पळी**—स्त्री० मोठी आचमनी, दर्वी.
**पळीवाढा**—वि० पळीनें वाढण्याजोगा.
**पाई**—(सं) स्त्री० चतकोर, चतुर्थांश.
**पाउंड**—न० पाऊल, पावंडा.
**पाउणकी**—स्त्री० पाउण गुणकाचे पाढे.
**पाउणकें**—न० पाऊण संख्येचा पाढा.
**पाउणेआठ—वणेआठ**—वि० गांडू, नपुंसक. २ ७॥.
**पाऊण**—वि० तीन चतुर्थांश.
**पाऊल**—न० पाय. २ दोन पावलांतलें अंतर. ३ पायाची उमटलेली खूण. ४ छाती, धैर्य. ५ कृत्य, कर्म.
**पाऊलवाट—पायवाट**—स्त्री० लहान मार्ग—[रस्ता.
**पाऊस**—(सं) पु० पर्जन्य, बरसात.
**पाक्षिक**—(सं) वि० पंध्रवड्याचें. २ एकतर्फी.
**पाक**—(सं) पु० पक्केपणा, स्वयंपाक. २ पक्वता. ३ चाचणी. ४ वि० शुद्ध, पवित्र.
**पाकनिष्पत्ति**—(सं) स्त्री० स्वयंपाक, जेवण.
**पाकशाला—ळा**—(सं) स्त्री० मुदपाकखाना, स्वयंपाकगृह.
**पाकड**—पु० धान्यविशेष.
**पाकळी—पांकळी**—स्त्री० पुष्पाचा अवयव.
**पाकोळी**—स्त्री० पक्षिविशेष.
**पाख—पांख**—(सं) पु० पक्ष, पीस. २ बाजू.
**पाखडणें**—उ० वि० सुपानें साफ करणें. २ झाडणें.
**पाखंड**—(सं) न० नास्तिक—नास्तिकमत.
**पाखंडी**—(सं) पु० नास्तिक, पाखांडी.
**पाखरूं**—न० पक्षी, पंखी.
**पाखाडी**—स्त्री० पाख्याच्या कडेचें लांकूड.
**पाखें**—न० घराच्या कौलाची बाजू, पाखाडी.
**पाग्या**—पु० पागदार, पागेवरील अधिकारी.
**पागनीस**—(आ) पु० पागेकडील कारकून, पागेकरी, पागदार, पाग्या.
**पागा**—स्त्री० अश्वशाला.
**पागोटें**—न० शिरस्त्राण, पगडी.
**पागोळी** स्त्री० पाण्याची धार व जेथून ती गळते तो घराचा प्रदेश.
**पाघळणें**—अ० वितळणें, पाझरणें. २ स्फोट होणें. ३ स्रवणें, झरणें.
**पाच्छाई**—वि० पादशाही, मोगलाई.
**पाच**—(सं) पु० रत्नविशेष. २ स्त्री० वनस्पतिविशेष.
**पाचक**—(सं) वि० पचन करणारें, पचविणारें.
**पाचकळ**—वि० पचकळ, चावट.
**पाचन**—(सं) न० पाक. २ पचविणें.
**पाचपेंच**—पु० धूर्तता, तर्क, डावपेंच, छक्केपंजे.
**पाचारण**—(सं) न० बोलावणें. २ आमंत्रण.
**पाचरणें**—स० बोलावणें.
**पाचुंदा**—पु० पंचकडी, पंचसंख्याक.
**पाचू**—पु० पाचरत्न.
**पाचोळा**—पु० कचरा, पानें, पातेरा.
**पाजणें**—(सं) स० पिवविणें. २ पाणी देणें, धार लावणें.
**पाजविणें—जिवणें**—स० धार लावणें.
**पाजळणें**—स० पाजिवणें, उजळणें. २ पेटिवणें, प्रज्वलित करणें.
**पाजी**—वि० हलकट, नीच, असंभावित.
**पाझर**— पु० झरा, द्रव. २ दया.

**पाझरणें**–अ० द्रवणें, झिरपणें.
**पाट**–(सं) पु० बसावयाची फळी, आसनविशेष. २ कालवा. ३ पट्टे. ४ हजामतीचा पट्टा. ५ पुनर्विवाह, निका.
**पाटणी**–स्त्री० कडीपाट, तक्तपोशी.
**पाटणें**–स० कडीपाट–तक्तपोशी करणें.
**पाटली**–स्त्री० भूषणविशेष.
**पाटवडी**–स्त्री० चण्याच्या पिठाच्या वड्या.
**पाटस्थळ**–न० कालव्याशेजारील जमीन.
**पाटा**–(सं) पु० वांटण्याचा धोंडा.
**पाटाव**–(सं) पु० रेशमीवस्त्रविशेष.
**पाटी**–(सं) स्त्री० टोपली, टोकरी. २ आट्यापाट्यांच्या खेळाकरितां क्रीडाभूमीच्या विभागांपैकीं प्रत्येक विभाग. ३ लिहिण्याची फळी किंवा दगडाची पातळ चीप.
**पाटील**–पु० पटेल, गांवचा अधिकारी.
**पाठ**–(सं) पु० धडा. २ नियम, परिपाठ. ३ वहिवाट. ४ वचना. ५ पार्श्वभाग. ६ बोलणें, पढणें, पुस्तकाशिवाय ह्मणणें.
**पाठकुळी**–क्रि० पाठुंगळी, पाठकोळी, पाठीवर.
**पाठकोरा**–वि० पाठकोरडा, न लिहिलेल्या पाठीचा.
**पाठचा**–वि० धाकटा व सख्खा.
**पाठपोट**–वि० सबंध, संपूर्ण.
**पाठबळ**–न० पाठपुरावा, पाठिंबा. [करून.
**पाठमोरा**–क्रि० पाठीकडून, समोर, पाठ
**पाठराखण**–स्त्री० सोबत, संगत.
**पाठलाग**–पु० तपास, शोध, पाठीस लागणें.
**पाठवणी**–स्त्री० बोळवण, धाडणें. २ बिदागी.
**पाठविणें**–स० धाडणें. [ जागा, विद्यालय.
**पाठशाला**–ळा(सं) स्त्री० शाळा, शिकण्याची
**पाठांतर**–न० पाठ, परिपाठ. २ दुसरा पाठ, पाठभेद.
**पाठिंबा**–पु० पाठबळ, पाठपुरावा.
**पाठीं**–पाठीस लागणें–अ० त्रास देणें. २ नादीं लागणें. ३ पिच्छा पुरविणें.
**पाठोपाठ**–क्रि० मागोमाग, पाठीमागून.
**पाड**–पु० हिम्मत. २ पक्कदशा.
**पाडणें**–स० खालीं आणणें–करणें, घालणें.
**पाडवा**–पु० प्रतिपदा, पहिली तिथि.
**पाडस**–न० लहान मूल. २ वासरूं.
**पाडा**–पु० बैल, गोऱ्हा.
**पाडी**–स्त्री० गोजी, कालवड.
**पाडाव**–पु० मोड, पराभव, जय.
**पाढा**–पु० दशक. २ पाठ.
**पाणउतारा**–पु० पच्ची, मर्मस्फोट.
**पाणक्या**–वि० पाणी भरणारा.
**पाणकणीस**–न० वनस्पतिविशेष.
**पाणकोंबडा**–पु० जलचर पक्षिविशेष.
**पाणपोई**–स्त्री० पोई, पाणी पाजण्याचें सत्र.
**पाणवठा**–पु० पाण्याची जागा.
**पाणि**–(सं) पु० हस्त, हात, कर.
**पाणिग्रह**–हण–(सं) न० विवाह, लग्न.
**पाणी**–(सं) न० जल, उदक. २ तेज. ३ दोष. ४ धार. ५ दम. [ ऐटदार.
**पाणीदार**–वि० तजेलदार, सतेज, तेजस्वी,
**पात्र**–(सं) न० भांडें. २ योग्य. ३ पान. ४ नदीची रुंदी. ५ वेश्या.
**पात**–पु० पतन. २ स्त्री० लांब पान. ३ पंक्ति, क्रम, शेज.
**पातक**–(सं) न० पाप, दोष.
**पातकी**–वि० दोषी, अपराधी, पापी.
**पातडें**–न० पंचांग, चोपडी–डें.
**पातळ**–वि० द्रवयुक्त. २ अरुंद, थोडें. ३ कमी. ४ किडकिडित. ५ विरळ. ६ झिरझिरीत वस्त्रविशेष.
**पातळी**–स्त्री० पातळपणा. २ सपाटी.
**पाताल**–ळ–(सं) न० रसातल. [ धर्म.
**पातिव्रत्य**–(सं) न० अव्यभिचार, पतिव्रता-

**पाती**–स्त्री० पत्र. २ पत्रा. ३ हिस्सा, भाग.
**पातीचा चहा**–पु० ओला चहा, गवती चहा.
**पातीदार**–पु० भागीदार.
**पातें**–न० पान. २ डोळ्याची पापणी.
**पातेरा**–पु० कचरा, पानें, पाचोळा.
**पातेली**–स्त्री० लहान पातेलें, बोघणी.
**पातेलें**–न० पात्रविशेष, बोघणें.
**पातोळा**–पु० पक्वान्नविशेष.
**पाथरणें**–स० हांतरणें, पसरणें.
**पाथरवट**–पु० धोंडफोड्या. २ पक्षिविशेष.
**पाथरी**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**पाद्य**–(सं) न० पाय धुण्याचें पाणी.
**पाद्यपूजा**–स्त्री० लाथा मारणें. [ अपानवायु
**पाद**–(सं) पु० चरण. २ चौथा हिस्सा. ३
**पादणें**–अ० अपानवायु सोडणें.
**पादरक्षा**–(सं) स्त्री० जोडा, वहाणा, पादरक्षण, पादत्राण.
**पादरा**–पु० पिंगूळ. २ वि० पादणारा.
**पादशहा–शाहा**–(फा) पु० राजा, राजाधिराज, बादशाहा.
**पादाक्रांत**–(सं) वि० खालसा, लीन.
**पादुका**–(सं) स्त्री० जोडा, खडावा. २ पाय. ३ पादप्रतिमा.
**पादेलोण**–न० क्षारविशेष.
**पान्हवण**–न० आंबोण. [ णणें–फुटणें.
**पान्हवणें**–उ० वि० पान्हा येणें–आ-
**पान्हा**–पु० दूध येणें. २ माया.
**पान**–(सं) न० पत्र, पर्ण. २ प्राशन. ३ पातें. ४ कागद. ५ भूषणविशेष. ६ वस्त्रभाग, उपरणें. ७ जेवणाचें पात्र. ८ पत्ता. ९ घराच्या पागोळीचें लांकूड.
**पानगी**–स्त्री० एक प्रकारची पोळी.
**पानडी**–स्त्री० पदक. [ पात्र, पानपूड.
**पानदान**–न० तांबूलपात्र, पानें ठेवण्याचें
**पानपट्टी**–स्त्री० विडा, तांबूल.
**पानबुड्या**–पु० पाण्यांत बुड्या मारणारा.
**पानसळ**–स्त्री० सपाटी पहाण्याचें साधन.
**पानसुपारी**–स्त्री० पानतंबाखू.
**पाप्याचें पितर**–न० निश्शक्त–रोड मनुष्य.
**पाप**–(सं) न० दोष, अपराध, पातक.
**पापड**–(सं) पु० उडीद वगैरेच्या पिठाची अति पातळ पोळी. २ आग, जाळ.
**पापडखार**–पु० क्षारविशेष.
**पापडी**–स्त्री० पापडविशेष. २ धापुद्रा.
**पापणी**–(सं) स्त्री० डोळ्याचे केस. २ डोळ्याच्या वरचें कातडें.
**पापा**–पु० लहान मुलाचा मुका.
**पापुदरा–द्रा**–पु० पापोद्रा–दरा, पापदरा, त्वचा, पापडी. [ आऊत.
**पाभर–भार–भारी**–स्त्री० बीं पेरण्याचें
**पामर**–(सं) पु० गरीब, दुर्बल मनुष्य.
**पामरी–पांबरी**–स्त्री० रेशमीवस्त्रविशेष.
**पाय**–(सं) पु० चरण. २ भाग, अवयव.
**पायखाना**–(फा) पु० शेतखाना, तट्टी, शौचकूप.
**पायगुण**–पु० प्रभाव, प्रालब्ध.
**पायघड्या**–स्त्री० पायाखालीं चालण्याचीं वस्त्रें. २ लग्नांग समारंभविशेष.
**पायघोळ**–वि० पायापर्यंत येईसें. [ ळणा.
**पायजमा–जामा**–(फा) पु० विजार, चो-
**पायतण–न**–(सं) न० जोडा, वहाणा.
**पायथा**–पु० खालचा भाग, पायाकडची बाजू.
**पायदळ**–न० प्यादा, शिपाई. [ ळवणें.
**पायधरणी**–स्त्री० पाया पडणें, मन व-
**पायपोस**–(फा) पु० जोडा, पैजार. २ मेळ.
**पायबंद**–(फा) पु० घोड्याचे मागचे पाय बांधण्याची दोरी, पिछाडी.
**पायमल्ली**–(फा) स्त्री० अवगणना, हेळणा.
**पायमार्ग**–पु० पायवाट, पायरस्ता. [ विशेष.
**पायरी**–स्त्री० योग्यता. २ पायंडा. ३ वृक्ष-

**पायली**–स्त्री० दोन अधोल्या, प्रमाणविशेष.
**पायस**–(सं) न० दुधाचा पदार्थ. २ ताक.
**पाया**–(फा) पु० पायथा. २ आरंभ.
**पायाळू**–वि० पायाकडून जन्मलेला.
**पार्थिव**–(सं) पु० राजा. २ न० मातीची प्रतिमा. ३ वि० मातीचें, पृथ्वीसंबंधी.
**पार्श्व**–(सं) न० पाठ, पाठीमागचा भाग.
**पार्श्वक**–(सं) पु० अनुचर, सेवक.
**पार**–(सं) पु० शेवट. २ क्रि० पलीकडे. ३ प्रहर. ४ वृक्षाचा ओटा.
**पारख**–(सं) स्त्री० परीक्षा, ज्ञान.
**पारखी**–पु० परीक्षा करणारा.
**पारंगत**–(सं) वि० निपुण, निष्णात.
**पारडी**–स्त्री० म्हशीचें रेडकूं, रेडी.
**पारडें**–न० तराजूची एक बाजू.
**पारणा**–(सं) स्त्री० पारणें, उपोषण सोडण्याचें भोजन. [ न.
**पारणें**–(सं) न० उपोषण सोडण्याचें भोज-
**पारद**–(सं) पु० पारा.
**पारध**–स्त्री० शिकार, सावज. २ मृगया.
**पारधी**–पु० शिकारी.
**पारंबी**–स्त्री० वटादि वृक्षांच्या जटा.
**पारवा**–पु० पारावत, कबूतर. २ रंग विशेष. ३ वि० पारव्याच्या रंगाच्या.
**पारशी**–पु० इराणी. २ पारशी भाषा–लिपि.
**पारायण**–(सं) न० अथपासून इतिपर्यंत पठन–पाठ. [ द्र.
**पारावार**–(सं) पु० अंत, मर्यादा. २ समु-
**पारिजातक**–(सं) पु० प्राजक्त, वृक्षविशेष.
**पारिपत्य**–न० शिक्षा, दंड, खोड मोडणें.
**पारोशी घोसाळी**–स्त्री० एक प्रकारची घोसाळी.
**पारोसा**–(सं) वि० स्नान न केलेला.
**पारोसें**–न० पारोसें घोसाळें, घोसाळें.
**पाल्हाळ**–पु० लांबच लांब गोष्ट, चऱ्हाट.
**पाल**–(सं) स्त्री० पल्ली, जीवविशेष. २ मंडपाचें आच्छादन. ३ प्रत्ययविशेषः याचा अर्थ–पालक–असा होतो; जसें–भूपाल. [ २ पु० वनस्पतिविशेष.
**पालक**–(सं) वि० पोषण–संरक्षण करणारा.
**पालखी**–स्त्री० वाहनविशेष, शिबिका.
**पालट**–पु० बदल, फेरफार. २ रतीब.
**पालटणें**–उ० वि० बदलणें, फेरफार होणें–करणें.
**पालथा**–वि० खालीं तोंड केलेला.
**पालन**–(सं) न० पाळणें, संरक्षण, पोषण.
**पालवणें**–(सं) उ० वि० पालवी फुटणें. २ खुणावणें. ३ मालवणें.
**पालवी**–स्त्री० ( पल्लव पहा. )
**पाला**–पु० पाचोळा, पानें.
**पालुपद**–न० प्रथमपद, ध्रुपद, ध्रुवपद, पालोपद, अखंड कडवें. [ शाकभाजी.
**पालेभाजी**–स्त्री० पत्रांची–पानांची भाजी,
**पाव्हणा**–पु० पाहुणा, अतिथि. [ विशेष.
**पाव**–(सं) पु० पाय. २ चतुर्थांश. ३ भाकरी-
**पावका**–पु० पायरी, पायंडा, पाय.
**पावटा**–पु० धान्यविशेष. [ ऊत
**पावडें**–न० खोरें, माती ओढण्याचें अ-
**पावणें**–(सं) उ० वि० पोंचणें, दाखल होणें मिळणें.
**पावती**–स्त्री० पोंच, मिळाल्याबद्दलचा लेख
**पावला**–पु० चार आणे, पावली.
**पावसाळा**–पु० चातुर्मास्य, पाऊसकाळ.
**पावा–पांवा**–पु० अलगुज, वाद्यविशेष.
**पावेतों**–क्रि० पर्यंत.
**पाश**–(सं) पु० फांस. २ जाळें. ३ फासा.
**पाशीं**–श० जवळ, पास.
**पाषाण**–(सं) पु० धोंडा, दगड, पथ्थर.
**पास**–स्त्री० शेतीचें आऊतविशेष.
**पासंग**–(फा) पु० तोल, तराजूचा फरक.

**पासरी**–स्त्री० पांच शेरी.
**पासलणें**–अ० निजणें, आराम घेणें, पडणें.
**पासष्ट**–वि० ६५, साठ आणि पांच.
**पासून**–श० नंतर,पुढें,हातून,कडून, जवळून.
**पासोडा**–पु० मोठी पासोडी, सुतडा. २ खेळविशेष. [ री जाड वस्त्र.
**पासोडी**–स्त्री० लहान पासोडा, जोट, दुहे-
**पाहणी**–स्त्री० परीक्षा. २ उत्पन्नाचा आद-मास, देखरेख.
**पाहणें**–उ०वि०अवलोकणें, बघणें, तपासणें.
**पाहिजे**–स० हवें, जरूर आहे.
**पाहुणचार**–पु० आदरातिथ्य, मानमरातब.
**पाहुणा**–(सं) पु० अभ्यागत,अतिथि,पाहुणा.
**पाळ**–न० प्रदेश. २ पाळें. ३ बंधारा. ४ मूळ. ५ जात्याचें टवळें. ६ टोंक. ७ प्रणालिका.
**पालग्रहण**–(सं)न० पाळण, पोषण.
**पाळणा**–पु० एक प्रकारचा झोंपाळा. २ कविताविशेष.
**पाळणें**–(सं) उ० वि० राखणें, बाळगणें, मानणें, सोसणें.
**पाळत–थ–द**–स्त्री० पहारा, शोध.
**पाळी**–स्त्री० क्रम, बारी. २ पाळ, प्रणा-लिका. ३ तास.
**पाळीव**–(सं) वि० पाळलेला. [ डगा.
**पाळें**–न० खण, घर, कप्पा. २ लहान प-
**पाळेगार**–पु० बंडवाला, दरोडेखोर.
**पांग्या**–(सं) पु० पांगळा–पंगु मनुष्य.
**पांग**–पु० श्रम, कष्ट. [ कटणें, पसरणें.
**पांगणें**–अ० निरनिराळें होणें–करणें,फिस-
**पांगळा**–वि० पंगु, निरुपयोगी पायाचा. २ पु० पांगळ, जातिविशेष.
**पांगापांग**–स्त्री० दाणादाण, ताडातोड.
**पांगारा–गेरा**–पु० वृक्षविशेष.
**पांगुळ**–पु० जातिविशेष.
**पांगूळगाडा**–चालतां येण्याचा योग्य काळ होऊन गेला तरी ज्याला चालतां येत ना-हीं अशा मुलाला चालतां येण्यासाठीं क-रितात तो तीन चाकी गाडा. [ करणें.
**पांघरणें**–स० वापरणें, नेसणें, आच्छादन
**पांघरूण**–(सं) न० प्रावरण,वस्त्र,आच्छादन.
**पांच**–(सं) वि० पंच, संख्याविशेष.
**पांचजन्य**–(सं) पु० शंखविशेष, विष्णूच्या शंखाचें नांव. २ बांच.
**पांजण**–न० पांजरण, आमण. २ मागावर असलेल्या वस्त्रास लावण्याची तांदुळाच्या पिठाची किंवा चिंचोक्यांची खळ.
**पांजणी**–स्त्री० ( **पांजण** २ पहा. )
**पांजी**–स्त्री० पच्ची, घोटाळा. २ प्रमाद.
**पांड**–पु० वीस काठ्या, जमिनीचें माप.
**पांडु–पांडुर**–(सं) वि० पांढरें, शुभ्र.
**पांडुरोग**–(सं) पु० रोगविशेष.
**पांढरा**–(सं) वि० सफेत, गोरा.
**पांढरा भोपळा**–पु० दुध्या,कद्दु,दुधभोपळा.
**पांथरी**–स्त्री० बरेल,प्लीहा, तापतिल्ली.
**पांथ**–(सं) पु० प्रवासी, वाटसरू.
**पांथस्त–तस्थ**–पु०वाटसरू,उतारू,अतिथि.
**पांद**–स्त्री० लहान ओढा, नाला.
**पिक**–(सं) पु० कोकिल–ळ.
**पिकणें**–उ० वि० उत्पन्न होणें. २ पक्क होणें. ३ बनणें.४ पांढरें होणें.
**पिकदानी–णी**–स्त्री० थुंकण्याचें पात्र,तस्त.
**पिकविणें**–स० पक्क करणें.
**पिकाऊ**–वि० उत्पन्नाची, सुपीक.
**पिकाव**–पु० पिकेंदर, टिकाव, कुद्दाली.
**पिकुटणें**–अ० पांढरें होणें.
**पिगळणें–घळणें**–अ० पघळणें, वितळणें.
**पिच्छ**–(सं) न० पीस, पंख, पक्ष.
**पिच्छा**–पु० पाठ, मागचा भाग.
**पिचकारी**–स्त्री० पिचनळी.

पिचणें-अ० मोडणें, भंगणें, चीर जाणें.
पिचपिचणें अ० उपदझांप होणें. [रीक.
पिचपिचित वि० लुकलुकें, चिपडलेलें व बा-
पिच्छाडा-पु० मागचा भाग, पिच्छाडी.
पिच्छाडी-स्त्री० मागची बाजू.२ पायबंद.
पिटकें-न० अत्पाव.२उंदराचें पिलूं,पिटुकलें.
पिटणें-(सं) उ० वि० मारणें. २ हकलणें, हकणें.
पिटपिट-स्त्री० त्रास, कटकट.
पिटाळणें-उ० वि०हकलणें,घालवणें,पळविणें.
पिठडा-पु०पिठार,पिठाड,पिष्टा,त्रघा,आग्रह.
पिठलें-न० आळण, बेसन, झुणका.
पिठा-पु० गुत्ता, दारूचें दुकान, रेंद. २ भरडा, जाड पीठ.
पिठाड-न० ( पिठडा पहा. )
पिठी-स्त्री० बारीक पीठ (प्रायः तांदुळांचें.) २ बारीक रवा.
पिठीसाखर-स्त्री० बारीक साखर.
पिठूक-वि० पिठाळ, भुसभुशीत.
पिठुळणें-अ० गाभुळणें, पाडास येणें.
पिठुळलेलें-वि० गाभुळलेलें, पाड लागलेलें.
पिठोरा-पु० व्रतविशेष.
पिडणें-उ० वि० त्रास देणें-होणें.
पिडा-(सं) स्त्री० त्रास, दुःख, इजा, लचांड.
पिढी-स्त्री० वाडवडील, कुळी, कुलपीठिका.
पिढीजाद-वि० पूर्वजांपासून.
पिढें-न० पाट, खुर्ची,चौकी,उथळी,आधार.
पिणें-(सं) उ० वि० ओढणें. २ गिळणें,प्राशन करणें.
पित्त-(सं) न० दोषविशेष.
पित्तशामक-(सं) वि० पित्तनाशक.
पितर-(सं) पु० वाडवडील,पूर्वज. २ श्राद्ध.
पितळ-(सं) न० धातुविशेष, पित्तल.
पितळी-स्त्री० लहान परात. २ वि०पितळेचें.
पिता-(सं) पु० बाप, वडील.
पितांबर-(सं) पु०उंची-बहुमोल रेशमीवस्त्र.
पितामह-(सं) पु० बापाचा बाप, आजा. २ ब्रह्मदेव.
पितामही-(सं) स्त्री० बापाची आई, आजी.
पितृकर्म-(सं) न० श्राद्धविशेष. [ द्वयपक्ष.
पितृपक्ष-(सं) पु० श्राद्धाचा पंधरवडा, भाद्रप-
पिनस-(सं) पु० नाक जाणारा एक रोग.
पिपाणी-स्त्री० पानाची नळी, पुंगी.
पिपासा-(सं) स्त्री० तहान, तृषा.
पिपीलिका-(सं) स्त्री० मुंगी, जंतुविशेष.
पिरगळणें-स० मुरडणें, पीळ भरणें. [टकट.
पिरपिर-स्त्री० व्यर्थ भाषण, लांब गोष्ट, क-
पिलूं-लू-न० बच्चा, पाठ.
पिवडी-स्त्री० पिवळ्या रंगाची माती.
पिवळा-वि० पीत. पु० रंगविशेष.
पिशवी-स्त्री० थैली, बटवी, कोथळी.
पिशाच-(सं) न० सैतान, भूत.
पिशाचबाधा-स्त्री० झपाटा, भूतबाधा.
पिस्ता-(फा) पु० वृक्ष व फळविशेष.
पिसणें-अ० दळणें, वाटणें.
पिसा-वि० वेडा. २ वृक्षविशेष.
पिसाई-स्त्री० पिसणावळ, दळणावळ.
पिसाब-(फा) पु० मूत, मुतणें, मूत्र.
पिसारा-पु० पिसें, पंख.
पिसाळणें-अ० वेडा होणें, वेड लागणें.
पिसू-स्त्री० पीस, जीवविशेष.
पिसें न० वेड, भ्रम.
पिहा-(सं) पु० पांथरी, प्लीहा.
पिहू-न० मोराचें ओरडणें, केका.
पिळणें-उ० वि० पीळ घालणें-येणें-पडणें. २ दाबणें, चुरडणें. ३ दूध काढणें.
पिळा-पु० पीळ घातलेला पदार्थ.
पिंक-की-स्त्री० थुंकी, चूळ.
पिंगट-(सं)वि०पिवळट, पिवळसर. [जोशी.
पिंगळा-(सं) पु० पक्षिविशेष. २ कुडमुड्या

पिंगा–पु० खेळविशेष.
पिंगूळ–पु० कीटकविशेष, पादरा.
पिंजणें–(सं) उ० वि० फाडणें, मोडणें. २ विंचरणें, मोकळा करणें. [ गट.
पिंजर–स्त्री० रव्याची पूड,कुंकू. २ वि०पिं-
पिंजरा–(सं) पु० पांजरा, पंजर.
पिंजारणें–उ० वि० उभें होणें–करणें, विंचरणें, अस्ताव्यस्त करणें.
पिंजारी–पु० पिंजणारा, विंचरणारा.
पिंड–(सं) पु० गोळा. २ देह. ३ जाडी.
पिंडदान–(सं) न० पिंड देणें, पिंडप्रदान.
पिंडरी–स्त्री० पोटरी.
पिंडा–पु० बिंडा, दोरीची गुंडाळी.
पिंडी–स्त्री० बाण, लिंग.
पिंपरणी–पिंपरी–स्त्री० वृक्षविशेष.
पिंपरें–रूं–न० पिंपळाचें फळ.
पिंपळ–(सं) पु० वृक्षविशेष, अश्वत्थ.
पिंपळी–(सं) स्त्री० वनस्पतिविशेष.
पिंपाणी–स्त्री० पिपाणी, पिंपोणी, पुंगी.
पीक–(सं) स्त्री०पिक,चूळ. २उत्पन्न, धान्य.
पीठ–(सं) न० पिष्ट, दळलेलें धान्य, चूर. २ बैठक, स्थान. [ परंपरा.
पीठिका–(सं) स्त्री० पिढी, ओघ, कुळी,
पीडणें–(सं) उ० वि० त्रासणें, त्रासवणें.
पीडन–(सं) न० पिडणें, त्रास, इजा.
पीडा–(सं) स्त्री० त्रास, इजा, दुःख.
पीत–(सं) वि०पिवळा. २ प्यालेला. [टीप.
पीप–न० लांकडाचें पात्र, काष्ठपात्रविशेष,
पीर–(फा) पु० मेलेला साधु. [ पिसू.
पीस–(सं) न० पक्ष, पंख. २ स्त्री० पुशी,
पीळ–पु० मुरड, पिळण्याची क्रिया. २ ताठा, मगरूरी. [ द्धि.
पुकार–रा–पु० गवगवा, हाकाटी, प्रसि-
पुकारणें–स० आवाज देणें, हाक मारणें, बोलावणें.
पुरुखा–पु० चमचमीत भोजन.
पुच्ची–स्त्री० योनि, स्त्रीचें जननेंद्रिय.
पुच्छ–(सं) न० शेपूट, शेप, दूम.
पुचकणें–अ० मरणें,मोडणें, नाहींसा होणें.
पुचाट–वि० पोचट, हलका, पोरकट.२ अशक्त, दुर्बळ. ३ तृतीयाप्रकृति, षंढ.
पुजणें–(सं)उ० वि० पूजन करणें,आराधणें.
पुजारी–रा–पु० पूजा करणारा.
पुट–(सं) न० संपुट, संपुष्ट. २ भावना.
पुटकळी–कुळी–(सं) स्त्री० बारीक फोड, रोगविशेष.
पुटपूट–स्त्री० अस्पष्ट भाषण, कुरकूर.
पुटपुटणें–अ० बडबडणें, अस्पष्ट बोलणें.
पुट्ठा–ठा–(सं) पु० कुले. २ मलपृष्ठ. ३ मंडळी, ताफा, टोळी.
पुडका–पुडकें–(सं) पु० पुडा, मोठी पुडी.
पुडा–पु० पुडकें.[न पुडा. २ भिक्षा, जेवण.
पुडी–स्त्री० न०कागद पानें इत्यादींचा लहा-
पुढचा–वि० पुढला, पुढील.
पुढतीं–क्रि० पुढें, सन्मुख, संमुख.
पुढाईत–पु० पुढारी, पुढाकारी, म्होरक्या.
पुढें–श० समोर, नंतर.
पुण्य–(सं) न० उत्तम आचरणाचें फळ. २ परोपकार, सुकृत. ३ वि० चांगलें, पावन, मंगल. [तो दिवस.
पुण्यतिथि–(सं) स्त्री० संन्याशाचें श्राद्ध व
पुण्यवान्–(सं) वि० पुण्यवंत.
पुण्याई–स्त्री० पुण्यसामग्री. [चालीचा.
पुणेरी–वि० पुणेशाई, पुणेंशहरसंबंधीं, पुणें-
पुत्र–(सं) पु० मुलगा, बेटा, पूत.
पुत्रवंती–(सं) स्त्री० वृक्षविशेष. २ पुत्रिणी, जिला पुत्र झाला आहे अशी स्त्री.
पुत्रसंतान–(सं) न० पुत्रसंतति, पुरुषवंश.
पुतण्या–पु० भावाचा मुलगा.
पुतणी–स्त्री० भावाची मुलगी, ध्वाडी.

**पुतळा**–(सं) पु० प्रतिमा, बाहुलें.
**पुतळी**–(सं) स्त्री० बाहुली, लहान प्रतिमा. २ नाणेंविशेष. [ परणें, गुधडणें.
**पुदडणें**–उ० वि० मळविणें, नासणें, वा-
**पुदिना–दाणा**–(फा) पु० वनस्पतिविशेष.
**पुनः**–(सं)क्रि०फिरून, दुसऱ्यानें, माल्कयान.
**पुनःपुनः**–(सं) क्रि०वारंवार, नेहमीं नेहमीं.
**पुनर्नवा**–(सं) स्त्री० वनस्पतिविशेष, घेटोळी,
**पुनरपि**–(सं) क्रि० पुनः, पुनश्च, फिरून.
**पुनव**–स्त्री० पूर्णिमा, पूर्णमासी.
**पुर**–(सं) न० शहर, नगर.
**पुरचुंडी**–स्त्री० मोटळी, गांठोडी.
**पुरजा**–(फा) पु० चिठोरा,कागदाचा तुकडा.
**पुरण**–(सं) न० पक्वान्नविशेष. २ भर.
**पुरणी**–स्त्री० भर.२ लहान जरीचें पागोटें.
**पुरणें**–(सं) न० पुरें होणें. २ स० गाडणें.
**पुरता**–वि० पुरेसा,बस्स,योग्य. २ पक्का,पूर्ण.
**पुरभय्या**–पु० परदेशी.
**पुरवठा**–पु० पाठबळ, भर, पुरवणी. २पुरेसा संचय, पुरे इतकें देणें.
**पुरवणी**–स्त्री० भर, पुरवठा. २ जागा पुरेना ह्मणून लावलेला जोड.
**पुरवणें–विणें**–उ० वि० मान्य होणें, भरती करणें. २ पतकरणें. ३ तोटा येईनासें करणें.
**पुरवून पुरवून**–क्रि० बेताबेतानें.
**पुरशीस**–(फा) स्त्री० फेरजबानी.
**पुरस्कर्ता**–(सं) वि० उत्तेजन देणारा,पुढारी.
**पुरळ**–पु० बारिक पुळ्या.
**पुरा**–(सं) वि० पूर्ण, सबंध, सर्व. २ क्रि० पुरतेपणीं. ३ पु० मोहल्ला, पेठ, आळी.
**पुराण**–(सं) न० लांबचलांब गोष्ट, कथा. २ वि० पुरातन, पुराणा. [णिक.
**पुराणिक**–(सं) पु० पुराण सांगणारा, पौरा-
**पुरातन**–(सं) वि० जुनें, पुराणें.
**पुरावा**–पु० आधार, आश्रा, पाठबळ, प्रमाण. २ पुरवठा.
**पुरी**–(सं) स्त्री० लहान शहर, मोठें गांव, पुर. २ पक्वान्नविशेष. ३ गोसाव्यांतील एक भेद.
**पुरुष**–(सं) पु० मनुष्य ( नर ). २ साडेतीन हात लांबी. ३ व्याकरणसंज्ञाविशेष.
**पुरुषत्व**–(सं) न० सामर्थ्य, शक्ति, पौरुष.
**पुरुषोत्तम**–(सं) पु० पुरुषांत श्रेष्ठ. २ विष्णूचें एक नांव.
**पुरुषोत्तममास**–(सं) पु० धोंडा, धोंड्याचा महिना, अधिकमास.
**पुरूळ**–पु० पुळया, खरूज.
**पुरे**–क्रि० बस्स नको, पूर्ण.
**पुरेसा**–वि० पर्याप्त, पाहिजे इतका.
**पुरोहित**–(सं) पु० कुलोपाध्याय, उपाध्या.
**पुला**–पु० पेंढी.
**पुलावा**–(फा) पु० मुसलमानी पक्वान्नविशेष.
**पुशी**–स्त्री० पीस, पिसूं.
**पुष्कर**–(सं) न० तीर्थविशेष. २ सोंडेचा अग्रभाग. ३ वनस्पतिविशेष. ४ कमल.
**पुष्कराज**–(सं) पु० रत्नविशेष, पुष्पराग.
**पुष्करिणी**–(सं) स्त्री० लहान सरोवर.
**पुष्कळ**–(सं) वि० बहुत, फार, अति.
**पुष्ट**–(सं) वि० लठ्ठ, धडधाकट, खंबीर.
**पुष्टि**–(सं) स्त्री० पुष्टाई, लठ्ठपणा, चरबी. २ पोषण.
**पुष्टिपत्र**–(सं) न० पुठ्ठा, आधारपत्र.
**पुष्प**–(सं) न० फूल, सुमन. [ उपवन.
**पुष्पवाटिका**–(सं) स्त्री० फुलबाग, बगीचा,
**पुष्य**–(सं) न० नक्षत्रविशेष.
**पुस्त**–(सं) न० पृष्ठ, पाठ, पार्श्वभाग.
**पुस्तक**–(सं) न० पोथी, चोपडी, ग्रंथ.
**पुस्ती**–(फा) स्त्री० जोड्याचें ठिगळ. २ अक्षरांचा नमुना.

**पुसणें**–उ० क्रि० विचारणें, चोकशी करणें, कोरडें करणें. २ स्वच्छ करणें. ३ न० वस्त्र, सोधणें. [शौचास होणें.

**पुळकणें**–अ० थोडें व पातळ अनावर

**पुळी**–(सं) स्त्री० लहान फोड.

**पुंगट**–वि० पुंगळीच्या वासाचें.

**पुंगळ**–पु० पिंगळ, कीटविशेष.

**पुंगळी**–स्त्री० लताविशेष.

**पुंगी**–स्त्री० पिपाणी, तोंड. २ वडवड.

**पुंज**–(सं) पु० पुंजका, ढीग, रास.

**पुंजी**–(सं) स्त्री० पैशाचा ढीग, द्रव्य.

**पुंड**–वि० धश्चोट, दांडगा, गांवगुंड. २ पु० पुंड्र, त्रिपुंड्र.

**पू**–(सं) पु० डोळ्याचा गू, परु, रक्तदोष. २ कोणताही सत्वहीन पदार्थ.

**पूग**–(सं) पु० सुपारीचें झाड. २न० सुपारी.

**पूगीफल**–(सं) न० सुपारी,पोफळ. [शून्य.

**पूज्य**–(सं) वि० पूजा करण्यास योग्य. २ न०

**पूजन**–(सं) न० ⎫ पूजा, अर्चा. २ पाद्य-

**पूजा**–(सं) स्त्री० ⎭ पूजा, बोडंती,खरडपट्टी.

**पूजापात्र**–(सं) न० पूजासाहित्य ठेवण्याचें पात्र.

**पूट**–न० लेप, भावना. [मृदंगाचें तोंड.

**पूड**–स्त्री० भुकटी, चूर्ण. २ खण, खाना. ३

**पूत**–(सं) पु० पुत्र, मुलगा. २ पवित्र.

**पूर्ण**–(सं) वि० पुरतें, शेवटास गेलेलें,भरलेलें.

**पूर्णिमा**–(सं) स्त्री० पुनव, पौर्णिमा.

**पूर्व**–(सं) स्त्री० उगवत, प्राची. २ वि० प्रथमचें, अगोदरचें.

**पूर्वज**–(सं) पु० वाडवडील, वापदादा.

**पूर्वधान्य**–(सं) न० अग्रधान्य, खरीप.

**पूर्वपक्ष**–(सं) पु० वादविषय, विषयोपन्यास. २ पहिला पक्ष.

**पूर्वपद**–(सं) न० प्रथमचें पद, मूळ.

**पूर्वस्थिति**–(सं) स्त्री० मागील स्थिति.

**पूर्वा**–(सं) न० नक्षत्रविशेष.

**पूर्वापार**–(सं) वि० मागचा पुढचा. २ फार दिवसांपासून चालत आलेला.

**पूर्वी**–(सं) स्त्री० रागिणीविशेष.

**पूर्वी**–क्रि० अगोदर, मागें, आधीं.

**पूर**–(सं) पु० लोंढा,पाणी.२शहर.३वि०पूर्ण.

**पूरण**–(सं) न० भर–भरती, खाद्यविशेष.

**पूल**–(फा) पु० सेतु, नदी इत्यादि जलाशय उल्लंघून जाण्याचा मार्ग.

**पृच्छक**–(सं) पु० पुसणारा, प्रश्न करणारा.

**पृच्छा**–(सं) स्त्री० प्रश्न, शंका.

**पृथक्**–(सं) क्रि० निरनिराळें, अलग.

**पृथक्करण**–(सं) न० निरनिराळें करणें.

**पृथिवी–थ्वी**–(सं) स्त्री० धरा, धरित्री, दुनिया, जग.

**पृथु**–(सं) वि० मोठें, स्थूल.

**पृथुक**–(सं) पु०पोहे, पहे.

**पृष्ठ**–(सं) न० पाठ, पार्श्वभाग. [२ सपाटी.

**पृष्ठभाग**–(सं) पु० पाठ, पाठीमागचा भाग.

**पैशां**–(सं) उ० पासून, पशीं, परिस.

**पेकट–पेंकट**–न० कमरेचा सांधा. [वशीला.

**पेगम**–(फा) पु० निरोप. २ प्रयत्न, संधान,

**पेगंबर**–(फा) पु० धर्मसंस्थापणारा, साधु.

**पेच–पेंच**–(फा) पु० युक्ति, २ संकट.३ तर्क.४ पीळ, डाव. ५ मळमूत्राचें दोरे.६ अडचण, संकट.

**पेचपाच**–पु० पांचपेच, छक्कपंजे.

**पेचाटी–पेंचाटी**–स्त्री० कचाटी, अडचण.

**पेज**–(सं) स्त्री० कांजी, कण्हेरी.

**पेट**–स्त्री०आग. २ वार.३ पेटी. ४ पोट.

**पेटका**–पु० रोगविशेष.

**पेटणें**–अ० आग येणें, भडका होणें, चेतणें.

**पेटवण**–न० पेटविण्याचा पदार्थ, धलप्याकाटक्या इत्यादि.

**पेटविणें**–स० आग लावणें–देणें, चेतवणें.

**पेटा**—(सं) पु० पोटभाग. २ तालुका, परगणा. ३ सिंहाचा बच्चा. ४ सांगड.
**पेटारा**—(सं) पु० मोठी पेटी, बुरडी कातड्यांनें मढविलेली पेटी.
**पेटिया**—पु० पोटावारी राहिलेला चाकर.
**पेटी**—(सं) स्त्री० पेटिका, लहान पेटारा, डबी. २ फटाक्यांचे समुदाय. ३ भूषणविशेष.
**पेटें**—न० सांगड, तरून नेण्याचें साधन. २ खोका. [मोहल्ला.
**पेठ-पेंठ**—स्त्री० खबर. २ बाजार. ३ आळी,
**पेठा**—पु० कोहोळे पाक. २ सांगड.
**पेड-ठ**—न० झाड, वृक्ष. २ वळ, पद, भाग.
**पेडका**—पु० पोटऱ्यांतले गोळे दुखणें.
**पेढा**—पु० साखरमिश्रित खवा.
**पेढी**—स्त्री० दुकान, सराफी दुकान.
**पेय**—(सं) वि० पिण्यासारखें-योग्य.
**पेर**—(सं) न० बोरू. २ कांडें. ३ पेरणी.
**पेरण**—न० सद्रा, पेहरण.
**पेरणी**—स्त्री० पेरा, पेर, बीजारोपण.
**पेरणें**—स० पसरणें. २ लावणें. ३ व्यवस्थेनें टाकणें. ४ ( पैसे वगैरे ) अनेक लोकांस देणें.
**पेरू**०पु० वृक्षविशेष व त्याचें फळ, जांब.
**पेलणें**—स० तोलणें, करणें, उचलणें. २ अ० झेपणें.
**पेव-पेंव**—न० तळघर.२ जमाव. ३ धान्याचा सांठा, अंबार.
**पेशजी**—(फा) क्रि० मागें, नुक्तें.
**पेशवा**—(फा) पु० मुख्य प्रधान.
**पेशवाई**—स्त्री० पेशव्यांचें राज्य-कारकीर्द.
**पेशवाज**—(फा) पु० झगा, नाचणारणीचा परकर-झगा.
**पेशा**—(फा) पु० धंदा, उद्योग, रोजगार.
**पेस्तर**—(फा) वि० पुढें येणारें.
**पेहरण**—(फा) न० पेरण, सद्रा, कुडतें.
**पेहराव**—पु० पोषाख, आंगरखापागोटें.
**पेंग**—स्त्री० डुलकी, डुकली.
**पेंगणें**—अ० झोंप येणें, डुकली लागणें.
**पेंगुळणें**—अ० नाउमेद होणें, आळस येणें.
**पेंड**—स्त्री० खोळ, ढेप, पेण, खल्ली.२बिगार.
**पेंडें**—न० बिरडें. २ मोत्यांची माळ.
**पेंढा**—पु० भाताच्या काड्या, भात्याण.
**पेंढार**—न० लुटारू लोक.
**पेंढी**—स्त्री० पुला, पुली.
**पेंदी-धी**—स्त्री० पडगी, बैठक.
**पेंपरें**—न० पिपाणी, पिपाणी.
**पेंवणें**—अ० पोहणें, तरणें.
**पै**—स्त्री० पैशाचा तृतीयांश, नाणेंविशेष.
**पैका**—पु० रुक्याचा चतुर्थांश. २ द्रव्य, दौलत, दोन पैसे.
**पैकीं**—श० मधील, मधलें, आंतलें.
**पैज**—स्त्री० शर्त, पण, करार.
**पैजार**—(फा) स्त्री० पायपोस, खेटर, जोडा.
**पैजारखाऊ**—सा० जोडेखाऊ, खेटरखाऊ.
**पैठणी**—स्त्री० रेशमी लुगडें.२ वि० पैठणचें.
**पैठणीआदर**—पु० वरकणी सन्मान.
**पैण**—स्त्री० रोगविशेष. [त्पन्न झालेला.
**पैदा**—(फा) वि० मिळविलेला, हस्तगत, उ-
**पैदास्त-स**—(फा) स्त्री० उत्पन्न, उपज.
**पैमाशि-षि-ष**—(फा) स्त्री० मोजणी.
**पैरव**—(फा) पु० दळणवळण, संबंध.
**पैल**—वि० दुसरें, पलीकडचें.
**पैलवान**—पु० ( **पहिलवान** पहा. )
**पैलू**—(फा) पु० बाजू, कड.
**पैशाच**—(सं) वि० पिशाचासंबंधी.
**पैशाची**—(सं) वि० पिशाचांची. २ स्त्री. भाषाविशेष.
**पैस**—स्त्री० प्रशस्त जागा. २वि०मोठी, प्रशस्त.
**पैसा**—पु० पाव आणा, तीन पै. २ द्रव्य, धन, पैका.

**पैं**–श० खचितार्थ दाखविणारें अक्षर, च.
**पैंजण**–पु० नूपुर, तोरडी.
**पोक्त**–(फा) वि० प्रौढ, पोक्ता. २ बाप्या, सज्ञान, विचारी. ३मजबुत,मोठा पुष्कळ.
**पोकळ**–वि० सईल, शिथिल.२ रिकामा. ३ सोपें, पोल.
**पोकळा**–पु० वनस्पतिविशेष.[पोकळ जागा.
**पोकळी**–स्त्री० ढिलेपणा, माया, अवकाश,
**पोखर**–न० पुष्कर. २ ढोल–ली.
**पोखरणें**–उ० वि० पोकळ करणें, रिकामें करणें, उकरणें. [ हत्यार.
**पोगिरा–गर**–पु० भोंक पाडण्याचें एक
**पोंचट**–वि० खळगा पडलेला.
**पोचा–पोंचा**–पु० धातुपात्राचा खळगा.
**पोट**–(सं) न० उदर,कोठा,अंतरंग.२ भाग.
**पोटकुळी**–स्त्री० कनवटी, कडोसी.
**पोटखर्च**–पु० अन्नखर्च, खाणावळ.
**पोटगी**–स्त्री० भोजनखर्च, अन्नसामग्री.
**पोटचा**–वि० स्वतःचा,स्वतःपासून झालेला, औरस. [ ण्याचें लुगडें.
**पोटझाकणें**–न० मानविशेष, त्याकरितां दे-
**पोटदुखी**–स्त्री० रोगविशेष, पोटशूळ.
**पोटपाणी**–न० पोटपुजा,पोटोबा, भोजन.
**पोटपूजा**–स्त्री० पोटोबा, जेवण. [राव.
**पोटबाबू**–पु० पोटभरू, पुखानंद, खाऊनख-
**पोटरी**–स्त्री० पिंडरी, गुडघ्याखालचा पायाचा भाग.
**पोटशूळ**–पु० रोगविशेष, पोटदुखी.
**पोटळी**–स्त्री० गांठोडी, मोटळी.
**पोटाच्या**–वि० मोठ्या पोटाचा.
**पोटांतलें**–न० रोगविशेष. २ वि० पोटांत असलेलें. ३ पोटाहिस्सेदार.
**पोत**–(फा) पु० मशाल. २ काचेचे बारिक मणि. ३ विणकर.
**पोतडी**–स्त्री० लहान पोतें, तोब्री.
**पोतंडी**–स्त्री० पुरचुंडी, लिंबुटी.
**पोतदार**–(फा) पु० सराफ, पारखी.
**पोतनीस**–(फा) पु० खजिनदार, जमादार, खजानजी.
**पोतें**–(फा) न० कोथळा, थैला, बोरा.
**पोतेरें**–न०सारवण्याचा बोळा–फडका.२ तुच्छ पदार्थ.
**पोथी**–स्त्री० पुस्तक, चोपडी, वही.
**पोपट**–पु० राघू, तोता, कीर.
**पोपटी**–वि० रंगविशेषाचें. [ जी.
**पोपटीविद्या**–स्त्री० शब्दज्ञान, पोपटपंची–
**पोपडा**–पु० उखिरवळी, जमिनीचा पापोद्रा.
**पोपय–या**–पु० फळविशेष व त्याचें झाड.
**पोपली–पोपी**–स्त्री० एक प्रकारची लहान पोळी. [ सुपारीचें झाड.
**पोफळ**–(सं) न० पूगीफळ,कच्ची सुपारी.२
**पोफळी**–स्त्री० सुपारी, पोफळाचें झाड. २ वि० रंगविशेषाचें.
**पोबारा–पौबारा**–पु० फाशांतील दानविशेष, पगडे बारा. २ पलायन, फरारी होणें. [ नारळ येण्याचा अंकुर.
**पोय**–स्त्री० पोंगी. २ धर्मगृह, पाणपोई. ३
**पोऱ्या**–पु० पोर. २ नाच्या. ३ लहान गडी चाकर.
**पोर**–न० मूल, संतान, बच्चा.
**पोरका**–वि० मेलेल्या आईबापांचा.
**पोराकडा–पोरा**–पु० धान्यांत होणारा एक जीव, टोका.
**पोरखेळ**–पु० मुलांचा खेळ, गम्मत.
**पोरगा**–पु० मुलगा, पुत्र.
**पोरगी**–स्त्री० मुलगी, कन्या.
**पोरचेष्टा**–स्त्री० पोरखेळ.
**पोरटा**–पु० कारटा, द्वाड मुलगा.
**पोरवडा**–पु० पोरवसा, पोरोडा, पोरक्या मुलांचा समुदाय.

**पोरसौदा**–पु० पोरवय, लहान वय.
**पोल**–वि० पोकळ, शिथिल, सैल. २ न० फोल, भूस.
**पोलाद**–(फा) न० तिखें.
**पोव**–पु० पोहो, लहान ढीग.
**पोवलें–पोवळें**–न० मणिविशेष.
**पोशा**–(सं) वि० पोसलेला, पुष्ट, खाऊन खराब, खाऊन स्वस्थ बसणारा.
**पोशाक–ख–ग**–(फा) पु० पेहराव.
**पोशाखी**–वि० पोशा, दिखाऊ.
**पोशिंदा**–(फा) पु० पालक,उत्तेजन देणारा.
**पोष्य**–(सं) वि० पोसलेला, पोसण्यायोग्य.
**पोषण**–(सं) न० पोसणें, संभाळ, पालन.
**पोषणें**–(सं) उ० वि० पोसणें, संभाळ करणें, पाळणें. [ पूस.
**पोस्त**–(सं) न०चिरिमिरी.२ दौतींतला का-
**पोसणें**–उ० वि० पोषणें.
**पोहणें**–अ० पेंवणें, तिरणें, तरणें, पोहोणें.
**पोहरा**–पु० डोल, पात्रविशेष.
**पोहा**–(सं) पु० पृथुक, पहूं.
**पोहो**–पु०पोह,शेणाचा लहान ढीग. [दृष्टि.
**पोहोंच**–स्त्री० पोंच–पोच, पावती. २ दूर-
**पोहोंचणें**–अ० पोंचणें, दाखल होणें.
**पोहोंची**–स्त्री० पोंची, भूषणविशेष.
**पोळ**–पु० वसु, खोंड, अंडील बैल, पोठिया. २ आळी, बोळ.
**पोळणें**–अ० भाजणें, जळणें, पेटणें.
**पोळपाट**–पु० चकला, पोळी ज्यावर लाट-तात तो पाट.
**पोळा**–पु० सणविशेष. [ ती. २ अन्न.
**पोळी**–स्त्री० गव्हांची भाकरी, रोटी, चपा-
**पोळी पिकणें**–अ० चैन–चंगळ होणें.
**पोळें**–न० मधमाशांचें घर. २ मणिविशेष, पोंवळें.
**पोंक–ग**–न० कुबड.
**पोंच**–स्त्री० पावती, पोहोंच. २ दूरदृष्टि.
**पोंची**–स्त्री० भूषणविशेष, पोहोंची.
**पोंढी**–स्त्री० खळगा, खड्डा.
**पोंवा**–पु० पावा, पांवा, बासरी.
**पौत्र**–(सं) पु० मुलाचा मुलगा, नातू. [मा.
**पौर्णमासी–पौर्णिमा**–(सं) स्त्री०पुनव,पूर्णि-
**पौर**–(सं) पु० नागरिक, शहरवासी. [रा.
**पौराणिक**–(सं)पु०पुराणिक,पुराण सांगणा-
**पौष्टिक**–(सं) वि० पुष्टि देणारें.
**पौष**–(सं) पु० मासविशेष.
**पंक्ति**–(सं) स्त्री० ओळ,रेषा, रेप. २ संगत.
**पंक्तिपठाण**–पु० पंक्तिबारगीर, भोजनभाऊ.
**पंक्तिप्रपंच**–(सं) पु० पंक्तिभेद, एकास एक दुसऱ्यास दुसरें–चांगलेंवाईट–थोडेंफार वाढणें.
**पंक**–(सं) पु० चिखल, कर्दम.
**पंख**–(सं) पु० पक्ष, पीस.
**पंखा**–पु० विझणा, वारा घेण्याचें साधन.
**पंखी**–पु० पक्षी, पंखेरू, पांखरू.
**पंगत**–(सं) स्त्री० पंक्ति,ओळ, रेषा.२भोजन.
**पंगु**–(सं) वि० पांगळा, लंगडा. २ असमर्थ.
**पंच**–(सं) वि० पांच, पांच असामी, पंचक.
**पंचकडी**–स्त्री० पांच संख्या,पंचक, पाचुंदा.
**पंचकल्याणी**–(सं) वि० ज्याच्या पांच अवयवांवर पांढरें आहे असा.
**पंचगव्य**–(सं) न० गाईचें दूध–दहीं–तूप–शेण व मूत ह्यांचें मिश्रण.
**पंचपात्री–त्र**–(सं) स्त्री० पात्रविशेष.
**पंचभूतें**–(सं) न० पंचतत्वें, पृथिवि–आप–तेज–वायु–आकाश.[अधिकांचें) मिश्रण.
**पंचभेळ**–पु० पंचमिसळ, पांचांचें (किंवा
**पंचम**–(सं) वि० पांचवा. २ पु० गाण्यांतील स्वरविशेष. ३ तंबाकू, जर्दा.
**पंचमी**–(सं) स्त्री० पांचवी तिथी व विभक्ति.
**पंचविशी**–(सं) स्त्री० पंचवीस वर्षांची उमर.

**पंचवीस**–(सं) वि० संख्याविशेष, २५.
**पंचा**–पु० लहान धोतर.
**पंचाईत**–स्त्री० भानगड. २ अडचण. ३ पांच मनुष्यांचीं मतें, पंचनामा. [ मंत्री.
**पंचाक्षरी**–(सं) वि० पांच अक्षरांचा. २ पु०
**पंचांग**–(सं) न०तिथि, वार, नक्षत्र, योग व करण यांचें कोष्टक.
**पंचानन**–(सं) पु० महादेव. २ सिंह. [वर्णे.
**पंचामृत**–(सं) न० एक प्रकारचें तोंडी ला-
**पंचावन्न**–(सं) वि० संख्याविशेष, ५५
**पंजर**–(सं) पु० सांगाडा, सांपळा. २पिंजरा.
**पंजा**–(फा)पु०तळहात.२पंचमी, पांच काणे-दाणे.३ मोहरमांतील खूण. ४ पणजा.
**पंजाब**–(फा) पु० देशविशेष.
**पंजी**–स्त्री० पणज्याची बायको.२पु० पक्षी.
**पंडित**–(सं) वि० विद्वान, शाहणा, हुपार.
**पंत**–पु० एक पदवी.
**पंतोजी**.पु० शिक्षक, गुरु.
**पंथ**–(सं) पु० पथ, मार्ग, रस्ता.२धर्ममार्ग.
**पंध्रा–पंधरा**–वि० संख्याविशेष, १५.
**पंध्रवडा–पंधरवडा**–पु० दोन आठवडे, पंधरा दिवस.
**पंपा**–(सं) स्त्री० सरोवरविशेष.

## फ.

**फ**–बाविसावें व्यंजनः फजीती, हुर्यो, पच्ची.
**फक्कड**–(सं) वि० छान, चांगलें.२ पु० चैनी.
**फक्किका–फकिका**(सं) स्त्री० प्रमाणवाक्य.
**फकी–की**–स्त्री० वस्तूच्या चूर्णाचा वास,फकांडी. २ चूर्ण, पूड. [ केवळ.
**फक्त**–(आ) क्रि० नुस्ता,मात्र,फखत,फकस्त,
**फका–क्का–काणा–कांदा**–पु० मोठी फकी.
**फकांडी**–स्त्री०( **फकी** पहा. )
**फकीर**–(आ) पु० विरक्त, जोगी. २ सोंटभैरव. [३ वैराग्य.
**फकिरी**–(आ) स्त्री० काम, धंदा.२ भिक्षा.
**फजर**–(आ) क्रि० उद्यां सकाळीं.
**फजित्या**–वि० फजित,फजिती झालेला.
**फजिता**–(आ) पु० फजिती, पचडा. २ सारविशेष.
**फजित**–(आ) वि० फजिता झालेला.
**फजीतखोर**–वि० फजित्या, फजीत.
**फट्टा**–पु० मोठी रेघ.
**फट**–(सं) स्त्री० भेग, चीर. २ वि० फार.
**फटकडी**–स्त्री०तुरटी, फटकी.
**फटकणें**–अ० निराळें होणें. २ स० झाडणें, झटकणें. [ स्पष्टवक्ता.
**फटकळ**–वि० बीभत्स भाषण करणारा. २
**फटका**–पु० कोरडा, चाबूक. २ लहान वेस. ३ फटकारा, मार.
**फटकारा**–पु० फटका, कोरडा.
**फटकी**–(सं) स्त्री० फटकडी, तुरटी.
**फटफजिती**–स्त्री० हुर्यो, बोऱ्या.
**फटफटणें**–अ० उजाडणें, सूर्योदय होणें.
**फटरांड**–स्त्री० हलकी रांड, यःकश्चित् रांड, फटलंडी.
**फटलंडी**–( **फटरांड** पहा. )
**फटवणूक**–स्त्री० फसवणें, फसवणूक.
**फटाविणें**–अ० फसविणें.
**फटाका–कडा**–पु० आवाज, बार व त्याचें साधन.२ वि० फक्कड, छानदार.
**फटिंग**–पु० झोटिंग. २ वि० एकटा.
**फड्डी**–वि० गोट्यांच्या खेळांतील एक पारिभाषिक शब्दः याचा अर्थ–शेवटचा ( खेळणारा. )
**फड**–पु० जागा, स्थान. २ ताफा, फळी.
**फडकणें**–अ० लोंबणें.२ छानछोकीच्या पोषाकानें बाहेर पडणें.

**फडका**–पु० लहान वस्त्र, फडकें.
**फडकी**–स्त्री० वस्त्रविशेष.
**फडताळ–तार**–न० भिंतीला असलेली पेटी.
**फडनीस–नवीस**–पु० फडाचा अधिकारी, दुय्यम अधिकारी. [ खांचा आवाज.
**फडफड**–क्रि० खडखड, धडधड. २स्त्री० पं-
**फडफडणें**–अ० पंख वाजविणें. [ करणें.
**फडफडावणें**–स० ( पंखांचा ) आवाज
**फडफडीत**–वि० मोकळें, निरनिराळें.
**फडशा**–पु० नाश, खराब.
**फडा–फडी**–(सं) स्त्री० फणी, फणा.
**फणकारा**–पु० रागाचा झटका, झणकारा. २ नांगीचा प्रहार.
**फणफणीत**–वि० उन्हून, आधणाचें.
**फणशी**–स्त्री० फणसाचें झाड.
**फणस**–(सं) पु० पनस, फळविशेष.
**फणसपोळी**–स्त्री० फणसाचें साठ.
**फणा–फणी**–स्त्री० फडा, फडी.
**फणी**–स्त्री० विंचरी, कंगवा, दंतिया. २ फ-णा. ३ सर्प.
**फणेरें**–न० फणीकरंड्याचा झोळणा–पिशवी.
**फत्तर**–पु० धोंडा, दगड, पाषाण.
**फतकल–ण**–न० पाय पसरून बसणें.
**फताडा**–वि० विस्तीर्ण, मोठा, रुंद.
**फतेमारी**–स्त्री० जहाज, गलबत.
**फद्या**–वि० दिडकी, इंग्रजी पैसा.
**फदफदणें**–अ० बुडबुडे येणें, आंबणें, पू होणें.
**फन्ना–ण्णा**–(आ) पु० सत्यानास, समूळनाश.
**फर्जी**–(फा) पु० वजीर.
**फर्जीत**–सोंगट्याच्या ( कवड्याच्या ) खेळांत दानांत न गणलेला दहा किंवा पंचवीस या दानाचा पगडा.
**फरक**–(आ) पु० फेर, अंतर, भेद, भिन्नता.
**फरडा**–वि० वाकबगार, कसबी.
**फरद**–(आ) पु० एकेरी वस्त्र, उपरणें, दुपेटा.
**फरपटणें–फरणें**–अ० लोळत चालणें–जा-णें, पाय काढीत चालणें.
**फरपटा**–न० खूण, गाडीची चकारी, रेघ.
**फरमाविणें**–स० हुकूम करणें–सांगणें.
**फरमाश–स**–(फा) पु० सूचना, समजूत, न-मुना. २ गुणाधिक्य. [ लायक.
**फरमाशी**–वि० बेदम, सडकून. २ नमुन्या
**फरशी**–(सं) स्त्री० परशु, कुऱ्हाड. २ जो-तें, चिरेबंदी.
**फरस**–(आ) पु० दगड, धोंडा.
**फरसबंदी**–(फा) स्त्री० चिरेबंदी.
**फरा**–(सं) पु० कुला व त्याची बाजू. २ परिमाणविशेष.
**फरारी**–(आ) वि० परागंदा, पलायन केलेला.
**फरास–शी**–(आ) पु० गडी, चाकर, बि-छाने झाडणारा.
**फरासखाना**–पु० तंबू डेरे सत्रंज्या ठेवण्या-ची जागा. २ चौकी. [ल्पाशन.
**फराळ**–(सं) पु० फलाहार, उपाहार, अ-
**फरीद**–(आ) पु० फटिंग.
**फरोक्त**–(फा) वि० विकलेलें. [रिणाम.
**फल**–(सं) न० फळ. २ शेवट, अखेर, प-
**फलकट**–न० फोलपट, फोलकट.
**फलकावणें**–स० दोहों बाजूंला हलवणें.
**फलज्योतिष**–(सं) न० अमुक ग्रहस्थिति असतां अमुक होईल असें ज्यांत सांगि-तलें असतें तो ज्योतिषग्रंथ.
**फलद–द्रूप–प्रद**–(सं) वि० फळ देणारा, फायदेशीर. [कापशें.
**फलाणा**–सर्व० अमका, तमका, गोमाजी
**फलाहार**–(सं) पु० फराळ, उपाहार.
**फ़वारा**–(आ) पु० फुवारा, हजारी कारंजें.
**फशीं पडणें**–अ० फसणें, गुंतणें, पाशांत पडणें.
**फस्त**–क्रि० ओसाड, खालसा, फन्ना.

**फसकटणें**–अ० विसकटणें, फसणें, फिसकणें.
**फसकन–कर–दिनी–दिशी**–क्रि० भसकन–दिशी–दिनी.
**फसकी**–स्त्री० जकात. २ अडतीबद्दलचें दाणे. ३ प्रत्येक श्रावण्या सोमवारीं महादेवास वाहिलेलें गहूं इत्यादि धान्य.
**फसगत**–स्त्री० चूक, फजिती, गफलत.
**फसणें**–अ० गुंतणें, रुतणें. २फसविलें जाणें.
**फसफशीत–सीत**–वि० भसभशीत, ढिला.
**फसफसणें**–अ० बुडबुडे येणें, आंबणें, फेंस येणें.
**फसविणें**–स० चुकवणें, गुंतविणें, बुडविणें.
**फळ**–(सं)न०(**फल** पहा.) फाळ, कोणत्याही हत्याराचें धारीचें लोखंड पोलाद इत्यादि.
**फळणें**–अ० गाभण होणें. २ फलप्रद होणें. ३ लावणें, बंद करणें.
**फळफळावळ**–स्त्री० पुष्कळ जातींचीं फळें.
**फळफळीत**–वि० फार पातळ.
**फळभाजी**–स्त्री० भाजी होण्याजोगतीं फळें.
**फळश्रुती**–स्त्री० अखेर, शेवट. २ फल, परिणाम. ३ ज्यांत त्याच्या पठनादिकाचें फल सांगितलें असतें तो ग्रंथाचा भाग.
**फळा**–पु० मोठा तक्ता.
**फळी**–स्त्री० तक्ता, लहान फळा. [आणा.
**फाक–फांक**–स्त्री० फोड, तुकडा.२उत्ताणा,
**फाकटणें–फांकटणें**–स० पसरणें, लांब करणें, तणणें.
**फाकणें–फांकणें**–स० ( **फाकटणें** पहा. )
**फाकळी**–स्त्री० फाक, फोड, फाकून झालेला विभाग. [अतिप्रसंगी.
**फाजील**–(आ) वि० अधिक, जास्ती. २
**फाटक**–न० कवाड, झापा. २ जुनेर.
**फाटका**–वि० फाटलेला.
**फाटका तुटका**–वि० फाटलेला, तुटलेला.
**फाटणें**–अ० चिरणें, भेगाळणें.
**फाटा–फांटा**–पु० खांदी, फांदी, शाखा. २ रजा, दूरीकरण. ३ रेघ.
**फाटाफूट**–स्त्री० वाताहत, तांडातोड.
**फाटी**–स्त्री० सर्पण, लांकडें.
**फाड**–स्त्री० भेग, चीर. २ पांच किंवा सहा फळांचें एक माप. [ड अशा आवाजानें.
**फाडकन–कर–दिशी**–क्रि० ताडकन, फा.
**फाडणें**–स० चिरणें. २ वटारणें. ३फाळणें.
**फाडा**–पु० पाढा, हकीकत. २ वाफा.
**फाणस**–(फा) पु० कंदील, चिराख.
**फात्या**–(आ) स्त्री० उपवास, उपोषण.
**फानकल**–स्त्री० ( **फतकल** पहा. )
**फानमाय**–स्त्री०अति लट्ठ स्त्री,पखाल पार्वती.
**फाफा**–पु० व्यर्थ प्रयत्न.
**फाफाजी**–पु० पोकळ डौली, सोकाजी.
**फायदा**–(आ) पु० नफा. किफायत, लभ्यांश, अर्थ.
**फार**–वि० पुष्कळ, बहु, जास्ती.
**फारखत–कत**–(आ) स्त्री० वांटणीपत्र. २ सोडचिट्ठी. [इराणी मनुष्य.
**फारशी–सी**–(सं) स्त्री० इराणी भाषा. २
**फाल्गुन**–(सं) पु० शिमगा. २ अर्जुनाचें नांव.
**फालतू**–वि० जास्ती,शिल्लक,बाकी, उरलेलें.
**फावडें**–न० खोरें, मोठी फावडी. [ पडणें.
**फावणें**–अ० सवड–रिकामपण–फुरसत सां-
**फास**–(सं) पु० पाश. २ सरफास, ग्रंथिविशेष.
**फासणी**–स्त्री० वस्त्राऱ्यानें हलके घाव घेणें.
**फासणें**–उ०वि०घाव देणें. २लावणें,चोळणें.
**फासफूस**–स्त्री० कुरकूर, रड. [अक्ष.
**फासा**–(सं) पु० पाश. २ दान. ३ पाशक,
**फासेपारधी**–पु० जाळ्यांत पक्षी धरणारा. २ फसव्या.
**फाळ**–पु० वर्गणी, वांटणी. २फेंक, फोड.
**फाळणें**–अ० वर्गणी करणें, वांटणें.

**फाळा**—पु॰ वर्गणी, कर. [फकड.
**फांकडा**—पु॰ फकडा, मोठी पक्षी. २ वि॰
**फांका—फाका**—पु॰ उपवास, निराहार.
**फांकाफाक**—स्त्री॰ वाताहत, ताडातोड.
**फांदा**—पु॰ अडचण, अडथळा,
**फांदी—द**—स्त्री॰ फांटी, खांद,खांदी,शाखा.
**फांपरा—र**—न॰ मोठी जखम, क्षत. [शिक्षा.
**फांशी—फाशी**—स्त्री॰ फांस घालून मारण्याची
**फांसळी**—स्त्री॰ बरगडी.
**फिक्कट—कट—फिक्का—का**—वि॰ पिकुटलेला.
**फिकीर—कर**—स्त्री॰ चिंता, काळजी
**फिटणें**—अ॰ सुटणें.२ आदा होणें,दिलें जाणें.
**फिटंफाट**—स्त्री॰ देणें घेणें बरोबर.
**फितणें**—अ॰ अनुकूल होणें.
**फितविणें**—स॰ अनुकूल करून घेणें.
**फितूर**—पु॰ प्रतिपक्षाचे लोकांस अनुकूल करण्याची क्रिया, फंद.
**फिदा**—(आ) वि॰ आशक, अनुरक्त.
**फिर्याद**—(फा) स्त्री॰ दावा, तकरार, अर्ज.
**फिर्यादी**—पु॰ वादी, अर्जदार.
**फिरकणें**—अ॰ फिरणें, हलणें, जाणें.
**फिरकी**—वि॰ फिरणारी. २ अटकळ, चक्री, मळसूत्र. २ गरकी.
**फिरंग**—स्त्री॰ तरवार. [मनुष्य.
**फिरंगी**—(फा) पु॰ युरोपांतले राष्ट्रांतला
**फिरणें**—अ॰ हिंडणें, चालणें. २ सरकणें, वर्तुलाकार जाणें. ३ परतणें. [फार करणें.
**फिरविणें**—स॰ चाळवणें.२ हिंडवणें.३ फेर-
**फिरस्त—स्ता—रिस्ता**—(फा) पु॰ प्रवाशी, पांतस्थ, उतारू. २ देवदूत.
**फिरून**—क्रि॰ पुनः, मालयान.
**फिसकटणें**—अ॰ विसकटणें, मोडणें.
**फिसाद**—(आ)स्त्री॰दंगाधोपा,गडबड,फितूर.
**फीट**—स्त्री॰ मुक्ति. २ गाबडी. २ तीन चवर्याचें प्रमाण.
**फीत**—स्त्री॰ रेशमी अगर सुती दाल, मगजी.
**फुई**—स्त्री॰ आत, आत्या, बापाची बहीण.
**फुकट्या**—वि॰ मुफत घेणारा,लाव्या गंगाजी.
**फुकट**—वि॰ बिनमोल, वृथा, व्यर्थ,मुफत.
**फुकटखाऊ**—पु॰ भोजनभाऊ,मुफत खाणारा.
**फुका—कां**—क्रि॰ मुफत, फुकट. [ कामें.
**फुकी—की**—स्त्री॰ फुंक, फुंकी, वारा. २ रि-
**फुगडी**—स्त्री॰ खेळविशेष. [ व्व होणें.
**फुगणें**—अ॰ वात शिरणें, स्थूल होणें, ड-
**फुगवटी**—स्त्री॰ सूज, फुगारा. [ करणें.
**फुगविणें**—स॰ जास्ती बनविणें. २ मोठें
**फुगा**—पु॰ बुडबुडा, फोड.
**फुगीर**—वि॰ सुजलेला, फुगलेला, लठ्ठ.
**फुटका**—वि॰ फुटलेला.
**फुटकळ**—वि॰ निराळें, तुटकतुटक.
**फुटकुळी**—स्त्री॰ लहान फोड, पुळी.
**फुटणें**—अ॰ बाहेर येणें, उमटणें. २ तुटणें, मोडणें. ३ जाणें. ४ भिन्न—पृथक् होणें.
**फुटाणा**—पु॰ भाजलेला हरबरा—चणा. २ वि॰ चलाख.
**फुटाफूट—फाट**—स्त्री॰ भेद, ताडातोड.
**फुणफुण**—स्त्री॰ चुरचूर, आग.
**फुन्ना**—पु॰ अग्रभाग, गोंडा, शेंडा.
**फुपाटा फुंफाटा**—पु॰ निखारे, आहार. २ गरम राख किंवा धूळ.
**फुफ्फुस**—(सं) न॰ उदरगत अवयवविशेष.
**फुरफुरणें**—(सं) अ॰ स्फुरणें, स्फुरण पावणें, फुरारणें.
**फुरसत**—(आ) स्त्री॰ रिकामपण, वेळ.
**फुरसें**—न॰ सर्पविशेष.
**फुलकोबी**—स्त्री॰ वनस्पतिविशेष.
**फुलझाड**—न॰ फुलांचें झाड.
**फुलणें**—अ॰ फुलें येणें, बार येणें.
**फुलपात्र**—न॰ रामपात्र.
**फुलबाजी**—स्त्री॰ अग्निकौतुकविशेष.

**फुलमाळी**–पु० फुलें विकणारा. [संचय.
**फुलवरा**–पु० फुलकारी, गालिच्या. २ पुष्प-
**फुलविणें**–स० वि० फुलें लावणें, खुलविणें, चढवणें. २ पक्का–न निवेसा करणें.
**फुलारी**–पु० माळी, बागवान.
**फुली**–स्त्री० खूणविशेष.
**फुशारकी**–स्त्री० प्रौढी, मोठेपणा.
**फुशारणें**–अ० शेफारणें, बडिजाव करणें.
**फुसकट**–वि० फुसका, हलका.
**फुसकारणें**–अ० फूत्कार करणें. [भाषण.
**फुसकुली**–स्त्री० हलके पादणें. २ कुत्सित
**फुसफुशीत**–वि० मऊ, नरम. [लालचावणें.
**फुसलाविणें–वणें**–स० लालूच दाखविणें,
**फूंक**–स्त्री० फूक, फुंकर.
**फुंकणी**–स्त्री० फुकण्याची नळी.
**फुंकणें**–उ० वि० फुंकर घालणें, तोंडानें वारा घालणें. २ सांगणें, भरणें. ३ ( सुषिरवाद्य ) वाजवणें.
**फुंकर–फुंका**–पु० फुंक, फूक.
**फुंदणें**–(स) अ० स्फुंदणें, थांबून थांबून रडणें.
**फूं–फूं**–स्त्री० फूत्कार.
**फूग**–स्त्री० सूज, फुगावा.
**फूट**–स्त्री० चीर, भेग, ठणका. २ अंकुर.
**फूटतूट**–स्त्री० मोडतोड, डागडुजी.
**फूत्कार**–(सं) पु० सर्पाचा श्वासोच्छ्वास.
**फूल**–(सं) न० पुष्प. २ वि० हलका, थोड्या वजनाचा. [ सवड.
**फूस**–स्त्री० मदत, आंतून सांगणी. २ संधी,
**फेकणें–फेंकणें**–सं० दवडणें, झुगारणें, टाकणें.
**फेटा**–पु० लहान पागोटें, पटका.
**फेड**–स्त्री० फिटणें, देणें, परत करणें.
**फेडणें**–स० सोडणें. २ देणें.
**फेणी**–स्त्री० तारफेणी. २ एक प्रकारचें तोंडी लावणें, पापडी.
**फेन–ण**–(सं) पु० फेस, फेंस.
**फेपरी**–स्त्री० तोंड, जीभ, बोलणें.
**फेपरें**–न० अपस्मार, रोगविशेष.
**फेर**–पु० फरक, अंतर, छट्टा. २ चक्र, घेर. ३ क्रि० फिरून, पुनः.
**फेरफटका**–पु० चक्कर, फिरणें.
**फेरफार**–पु० अंतर, कमजास्ती फरक. दुरुस्ती, फेरबदल.
**फेरा**–पु० चक्कर, आगमन, प्रदक्षणा.
**फेरिस्त**–(फा) न० अनुक्रमणिका, यादी.
**फेरी**–स्त्री० फेरा, प्रदक्षिणा.
**फेरीवाला**–पु० फेरेकरी, घरोघरीं जाऊन जिन्नस विकणारा.
**फेल**–न० पोचट दाणा. [ णणें.
**फेसणें–फेंसणें**–स० फेसाळणें, फेस आ-
**फेंगडा**–वि० पाय फांकून चालणारा.
**फेंदरा**–वि० रुंद नाकपुड्याचा.
**फेंपरें**–न० अपस्मार.
**फेंफें**–स्त्री० तोंडानें शब्द न निघण्याची स्थिति, पच्ची, फजिती, हुर्यो.
**फेंस**–(सं) पु० फेन, फेण. २ घाम.
**फेंसाळ**–वि० फेस आलेला.
**फैल**–(आ) पु० काम, कृत्य.
**फैलजामीन**–(आ) पु० अकृत्य करणार नाहीं अशाबद्दल खातरी.
**फैलावणें**–अ० दूर जाणें. २ पसरणें.
**फैलावा–व**–पु० विस्तार, पसरणें, प्रसार.
**फैसल–ला**–(आ) पु० निकाल, न्याय, निवाडा.
**फैसलनामा**–(फा) पु० निवाडापत्र, ठराव.
**फोक**–पु० सरळ ओली खांदी, चमकी. २ ढाळ, पातळ हगणें. ३ बांड–ज्वान मनुष्य, कोंब. [ ढेंढाळणें.
**फोकलणें**–उ० वि० फोकानें मारणें. २
**फोकाटी**–स्त्री० लहान फोक, शिंपटी, शिरपुटी.
**फोगी–की**–स्त्री० त्रिकोणी शीड.

**फोड**–(सं) पु० मोठी पुटकी–फुळी, पुळी, पुरळ. २ स्त्री० फाक, चीर. ३ परिस्फुटता.

**फोडणी**–स्त्री० स्वाद लागण्याकरितां केलेला संस्कार, अवघार. २ लवंग वेलदोडा इत्यादि विड्याचा मसाला.

**फोडणें**–स० चिरणें, तुकडे करणें. २ परिस्फुटता करणें.

**फोडी**–स्त्री० फोड. २ फोडकी.

**फोदरी**–स्त्री० योनि, उपस्थ.

**फोफशा**–वि० ढब्बू, लठ्ठ, पोकळ.

**फोपाटा**–**फोपाटा**–पु० आहार, निखार, गरम राख. [ २ जोरानें वाढणें.

**फोफावणें**–अ० धापा लागणें, रागावणें.

**फोल**–न० सालपट, टरफल, पोचट दाणा, पोल. २ वि० पोकळ, व्यर्थ.

**फोलणें**–उ० वि० सोलणें.२निःसत्व करणें.

**फौज**–(आ) स्त्री० सैन्य, बल, सेना, शिबंदी.

**फौजदार**–(फा) पु० सेनापति, पदवीविशेष. २ चोरीचपाटीची चौकशी करणारा अधिकारी.

**फौजफांटा**–पु० सेनाशिबंदी.

**फंद**–पु० फितूर. २ नाद, छंद.

**फंदी**–वि० नादी, नादिष्ट.

---

## ब.

**ब्याण्णव**–वि० संख्याविशेष, ९२.

**ब्याद**–**ध**–स्त्री० पीडा, अचरट. २ व्याधि. ३ व्रात्य मनुष्य.

**ब्यायशीं**–वि० ८२, आयशीं आणि दोन.

**ब्र**–पु० चकारशब्द, अवाक्षर.

**ब्रह्म**–(सं) न० ईश्वराचें निर्गुण स्वरूप. २ ब्राह्मण. ३वेद. ४घोटाळा, अवाच्य स्थिति.

**ब्रह्मकर्म**–(सं) न० ब्राह्मणाचें कृत्य.

**ब्रह्मगांठ**–(सं)स्त्री० नेमानेम, ब्रह्मलिखित.

**ब्रह्मघोळ**–पु० मोठा घोंटाळा, गोंधळ.

**ब्रह्मचारी**–(सं) पु० अविवाहित ब्राह्मण.

**ब्रह्मचोंटली**– स्त्री० अति लहान पात्र.

**ब्रह्मझ्यांट**–न० शप्प, कांहींएक.

**ब्रह्मद्वेष**–(सं) पु० ब्राह्मणांचा मत्सर.

**ब्रह्मदेव**–(सं) पु० जगाची उत्पत्ति करणारा. २ ब्राह्मण.

**ब्रह्मनिष्ठ**–(सं) वि० ब्रह्मावर निष्ठा ठेवणारा, वेदांती.

**ब्रह्मयज्ञ**–(सं)पु० ब्राह्मणांचें आन्हिकविशेष.

**ब्रह्मरस**–(सं) पु० ब्रह्मज्ञानानंद. [शेष.

**ब्रह्मराक्षस**–(सं) पु० ब्रह्मपुरुष, पिशाचवि-

**ब्रह्मरेषा**–(सं) स्त्री० ब्रह्मलेख, नेमानेम.

**ब्रह्मसूत्र**–(सं) न० नेमानेम, ब्रह्मलिखित. २ वेदांत.

**ब्रह्मस्व**–(सं) न० ब्राह्मणाची जिनगी. २ देणें, कर्ज. [ ह्मघात.

**ब्रह्महत्या**–(सं) स्त्री० ब्राह्मण मारणें, ब्र-

**ब्रह्मज्ञान**–(सं) न० ईश्वरज्ञान, देवाविषयीं माहिती. [ सामता. ४ऋत्विग्विशेष.

**ब्रह्मा**–(सं) पु० ब्रह्मदेव. २ योगविशेष. ३

**ब्रह्मांड**–(सं) न० दुनिया, जग.

**ब्रह्मानंद**–(सं) पु० अत्यानंद.

**ब्राह्मण**–(सं) पु० द्विज, विप्र. २ स्वैपाकी, पाणक्या. ३ देवपूजा करणारा.

**ब्राह्मणभोजन**–(सं) न० ब्राह्मणसंतर्पण.

**ब्रीद**–(सं) न० प्रतिज्ञा, पण, बिरुद.

**ब**–**बई**–स्त्री० आई, माता. २ व्यंजनविशेष.

**बक्षी**–(फा) पु० सेनापति, मुख्य. २ गव्हांची एक जात.

**बक्षीस**–(फा) न० बक्षिशी, नजर, फुकट दान. २ मारणें, चोप, शिक्षा.

**बक**–(सं) पु० बगळा.

**बकणें**–अ० तोंडास येईल तें बोलणें.
**बकध्यान**–(सं) न० टपून बसणें. २ बकध्यानी मनुष्य.
**बकबकणें**–अ० बडबडणें, फार बोलणें.
**बकरा**–(सं) पु० बोकड, अज.
**बकरी**–स्त्री० शेळी, अजा.
**बकरूं**–(सं) न० शेळी–बोकड.
**बकवा**–पु० बडबड, गलबा.
**बकाण**–पु० लिंबवृक्षविशेष. [चा घास.
**बकाणा**–पु० तोंडांत मावेनासा होईपर्यंत-
**बकाबक**–क्रि० भराभर, एकावर एक, तृं जा मी येतों.
**बकाल**–(आ)पु०व्यापारी,उदमी,दुकानदार.
**बकाली**–(फा) वि० व्यापाऱ्यांची. २ गचाळ, वेडीवांकडी, अव्यवस्थित.
**बकुल–ळ**–(सं)पु०वृक्षविशेष. न०त्याचें फल.
**बखतर**–(फा) न० बक्तर, चिलखत.
**बखर**–स्त्री० इतिहास, चरित्र.
**बखळ**–स्त्री० रिकामी जागा, इमारतीशिवाय जागा. २ वि० पुष्कळ. [कथा.
**बखा**–(आ) स्त्री० किंमत, वजन, महत्त्व. २
**बखेडखोर**–वि० कज्जेदलाल, भांडखोर.
**बखेडा**–पु० कज्जा, तंटा, तकरार. [तांदुळ.
**बगड**–स्त्री० भाताचा कोंडा. २करड, असडी
**बगणें**–स० बघणें, पाहणें,
**बगल्या**–(फा) वि० हाताखालचा.
**बगल**–(फा) स्त्री० खांक, कक्षा.
**बगलभिस्ती**–(फा)पु० खांदपखाली. [हात.
**बगली**–(फा) स्त्री० जोडीचा एक तऱ्हेचा
**बगळा**–(सं) पु० बक.
**बगीचा**–(फा) पु० लहान बाग, उपवन.
**बघणें**–स० पहाणें, लक्ष देणें.
**बघार–रणी**–स्त्री० फोडणी.
**बच्चा–च्या**–(फा) पु० मूल, पिल्लूं, बछडा. २ गाबडी.३ जोड.
**बचक**–स्त्री० मूठ.२ बेचकळी, बोटांच्या मधील सांधा.
**बच्चाजी**– के० बच्चाराम.
**बचकणी**–स्त्री० लहान धोतरजोडा.
**बचडा–छडा**–(फा) पु० बच्चा, पिल्लूं.
**बचणें**–अ० निभावणें, निभणें.
**बचनाग**–पु० वनस्पतिविशेष.
**बचबचपुरी**–स्त्री० अव्यवस्था, गोंधळ, बाराभाईची खेती.
**बचाव**–पु० निभाव, सुटका, राखण, रक्षण.
**बचावणें**–स० आश्रा देणें, राखणें, निभावकरणें. २ अ० निभणें, दुखापत न होणें.
**बचेरी**–स्त्री० पच्ची, हुर्यो. [उपहास.
**बच्छान**–(फा) स्त्री० नाचक्की, फजेती, दैना,
**बजरबट्टू**–पु० वृक्षविशेष व त्याचें फल.
**बजवय्या**–पु० वाजवणारा, पखवाज्या.
**बजावणें**–स० वर्तणें, करणें. २ हुकूमा प्रमाणें करणें. ३ हडसून खडसून सांगणें.
**बट्टा**–पु० बटाव, वरतावळा, बटणावळ. २ कलंक, डाग, [३ स्त्री० थोडे केस.
**बट**–पु० लहान घोडा,तट्टू. २न०लोहविशेष.
**बटमोगरा**–पु० मोगऱ्याची एक जात.
**बटवडा**–पु० वांटणी, व्यवस्था.
**बटवा**–पु० एक प्रकारची अनेक पुडांची पिशवी, बाटवा.
**बटाटा**–पु० कंदविशेष. २ आलू.
**बटीक**–स्त्री० कुणबीण, दासी. [ह्मचारी.
**बटु–बटुक**–(सं) पु० लहान मुलगा. २ ब्र-
**बठा**–पु० कांहींनाहीं, इच्छा, वांस.
**बडका**–पु० खाकरा, शेंबूड.
**बडगा**–पु० टोणपा, सोटा, काठी.
**बडबड**–स्त्री० व्यर्थ भाषण, रिकामें बोलणें.
**बडबडणें**–अ० व्यर्थ भाषण करणें.
**बडवा**–पु० पंढरपुरचा उपाध्या. [टणें.
**बडविणें**–स० मारणें, चोपणें. २ हाप-

**बडा**–वि० मोठा, मुख्य. २ श्रीमंत.
**बडिवार**–पु० बडेजाव, प्रौढी, मिजास.
**बडीशेप–शोप**–स्त्री० औषधिविशेष.
**बडेजाव**–स्त्री० चोपदाराची ललकारी. २ प्रौढी. ३ मान.
**बढई**–पु० जातिविशेष.
**बढती**–स्त्री० प्रतिष्ठा.२ बढतीकळा, उदय. ३ उच्चपद, उच्च अधिकार. ४ पगाराची वृद्धि.
**बढाई**–स्त्री० प्रौढी, मिजास, बडिवार.
**बढाईखोर**–पु० लब्धप्रतिष्ठ, गप्पाड्या.
**बडेल**–न० तळलेलें तेल.
**बत्ता–बत्त्या**–पु० मोठें तपेलें. २ दस्ता. ३ कुटण्याचें हत्यार. [ डबुडा.
**बत्तासा–तासा**–(फा)पु०साखरेचा फुगा–बु-
**बत्तिशी**–स्त्री० बत्तीस वस्तु. २ दांत. ३ वाचा. ४ तोंड. [ ४ मार.
**बत्ती**–स्त्री० अरुंद पागोटें.२ वात. ३ आग.
**बत्तीस**–वि० ३२, तीस आणि दोन.
**बत्तीसगुणी–लक्षणी**–वि० सर्वगुणसंपन्न.
**बनाणा**–पु० पागोट्याचें जोड फडकें–वस्त्र.
**बतावणी**–स्त्री० नक्कल. २ वर्तन. ३ अंग. ४ थाप. ३ अनुकूल भाषण, संवाद.
**बतावणें**–स० दाखवणें, सांगणें.
**बतेला**–पु० जहाज, गलबत.
**बथवा–टवा**–पु० वनस्पतिविशेष.
**बद**–(फा) वि० वाईट. २ रोगविशेष.
**बद्द–बद**–(सं) वि० भरलेला, पूर्ण. २ न वाजणारा, वाईट, बोद.
**बद्दल–बदल**–(आ) श० ठिकाणीं, करितां, साठीं, ऐवजीं.
**बद्ध**–(सं) वि० बांधलेला, अडकलेला.
**बद**–न० उपदंशविकारविशेष. [ बदकर्म.
**बदअम्मल**–(फा) पु० वाईट वागणूक,
**बदक**–(आ) न० जल–स्थलचर प्राणिविशेष.
**बदकन–दिशी**–क्रि० धब्‌दिशी–कन–दिशी.
**बदकर्म**–न० वाईट काम. २ शिनळकी.
**बदख्याली**–स्त्री० दुष्कर्म.
**बदचाल**–स्त्री० गैरवर्तन.
**बदनाम**–(फा) न० अपकीर्ति, दुर्लौकिक.
**बदफैल**–(फा) वि० अनीतीचें दुराचरणसंबंधी. बदख्याल.
**बदफैली**–(फा) स्त्री० गैरवर्तन, दुर्वर्तन.
**बदबदणें**–अ० बद्दवाजणें. २ पुवानें–कफानें भरणें–वाजणें. [ रूरी.
**बदमस्ती**–(फा) स्त्री० उन्मत्तपणा, मग-
**बदमाष**–(फा) वि० लुच्चा, लबाड, खळ.
**बदल**–पु० फेर, फरक, तफावत, अंतर.
**बदलणें**–उ० वि० फेर होणें–करणें, उलटणें, फिरवणें, फिरणें.२ स्थलांतर करणें.
**बदलमुशारा**–(आ) पु० संस्थानच्या चाकरीचा पगार.
**बदली**–पु० मोबदला, बदल, ऐवज. २ स्थलांतरीं नेमणूक. ३ आपल्याबद्दल दिलेला मनुष्य.
**बदसूर**–पु० बेसूर.
**बदसूरत**–(फा) वि० कुरूप.
**बदाबदी**–स्त्री० चेंडूचा एक प्रकारचा खेळ.
**बधणें**–अ० वश होणें, अनुकूल होणें.
**बधविणें**–स० वश करणें, फितवणें,मथिवणें.
**बधिर**–(सं) वि० बहिरा. [२ झाडी, राई.
**बन**–(सं) न० वन, विपिन, जंगल, अटवी.
**बनणें**–अ० होणें, बांधणें, तयार होणें. ३ पटणें. ३ वेळ सांपडणें. ४ ( कज्जा ) जुंपणें. [ रणें.
**बनविणें**–स० करविणें. २ तयार क-
**बनात**–स्त्री० लोकरी वस्त्र, ऊर्णावस्त्र.
**बनाव**–पु० बनणें. २ उपयोग.
**बनावट**–वि० बनवलेलें, कृत्रिम.
**बनावणें**–स० बनविणें, करविणें, करणें.

**बबब**–के० अलब, अलल.
**बभ्रा**–पु० प्रसिद्धि, स्फोट.
**बया**–स्त्री० पक्षिविशेष. २ बाई, स्त्री. ३ मोठी स्त्री. ४ कृत्या, आकाबाई.
**बयाणा**–(आ) पु० विसार. २ गप्प. ३ हिशेब. ४ बडजाव, चोपदाराची ललकारी.
**बयाद–ज**–(आ) स्त्री० तपशील, कच्ची हकीकत. २ होरेवारे, कांकू, नानू.
**बयादखोर**–वि० व्यर्थ गोष्टी सांगणारा. २ शंका घेणारा.
**बर्फ**–न० पु० गोठलेलें पाणी. [ यश.
**बरकत**–(आ) स्त्री० कमाई, नफा, लाभ, २
**बरका**–वि० मऊ, गिळगिळीत. २ फणसविशेष.
**बरखास्त–स**–(फा) वि० विसर्जित, बंद.
**बरगडी**–स्त्री० फांसळी.
**बरची**–स्त्री० शस्त्रविशेष.
**बरडा**–पु० जुन पोफळाची वाळवलेली सुपारी, बरडी सुपारी.
**बरणी**–स्त्री० मृत्तिकापात्रविशेष.
**बरतरफी–बडतर्फी**–(फा) स्त्री० काढून टाकणें, हाकलणें. [ त्कार.
**बरदास्त** (फा) स्त्री० पाहुणचार, आदरस
**बरफी–बर्फी**–(फा) स्त्री० मिठाईविशेष.
**बरबट**–न० रायतें. २ मांसाचा रस्सा.
**बरबात**–(फा) वि० समूळ नाश झालेला, भयाभंगास गेलेला.
**बरमा–म्हा**–पु० सामता.
**बरवा**–वि० चांगला, बरा, नीट, सुधा. २ रागविशेष. [जन्यकाळ.
**बरसात**–स्त्री० घोड्याचा रोगविशेष. २ प-
**बरहुकूम**–(फा) क्रि० प्रमाणें, सारखें.
**बरळणें**–अ० निद्रेंत बडबडणें. २ बकणें.
**बरा**–(सं) वि० चांगला. २ पुष्कळ. ३ योग्य, भला. ४ रोगमुक्त.
**बराबर**–(फा) वि० एकसारखें. २ योग्य. ३ श० बरोबर, सह.
**बराबरी**–(फा) स्त्री० तुलना, बरोबरी, सर.
**बरीक**–के० की नाहीं, कनई. २ तवढा.
**बरीगत**–स्त्री० धडगत, शेवट, चांगला अंत.
**बरू**–पु० बोरु, पेर. [ असो. ३ प्र. अव्यय.
**बरें**–न० कल्याण, चांगली स्थिति. २ के०
**बल**–(सं) न० बळ, शक्ति, सामर्थ्य. २ सैन्य.
**बलक**–पु० गीर, मगज. २ कुकळ, कोळ.
**बलखांब**–(सं) पु० मलखांब.
**बलबलपुरी**–स्त्री० तोंडपाटिलकी.
**बलवंत–वान**–(सं) वि० समर्थ, बळकट.
**बलाई–य**–(फा) स्त्री० उंची. २ मोठेपणा. ३ गोष्ट.
**बलाढ्य**–(सं) वि० मजबूत, शक्तिवान्, बळकट.
**बलात्कार**–(सं) पु० जुलम, जबरदस्ती.
**बलाय**–(फा) स्त्री० दुर्दैव, वाईटस्थिति.
**बलि**–(सं) पु० बळी, देवतांस दिलेलें खाद्य. २ नृपविशेष.
**बलिदान–प्रदान**–(सं) पु० पुजेची सामग्री.
**बलिष्ठ**–(सं) वि० बलाढ्य, सामर्थ्यवान.
**बली**–(सं) वि० बळवंत, बळकट.
**बलुत्या–बलुतेदार**–पु० गांवचा वतनदार.
**बलुतें**–न० गांवच्या वतनदारास दिलेली पोटगी.
**बशर्त**–(फा) स्त्री० अति प्रयत्न, महा प्रयत्न.
**बशा**–वि० बसणारा, आळशी, निरुद्योगी.
**बशी**–स्त्री० चिनी मातीची ताटली.
**बस्तान**–(फा) पु० ठाण, कापडाचा गठ्ठा–दिंड.
**बस्तान**–(फा) न० बंदोबस्त, बस, जम, मळ. [ २ पिचकारी.
**बस्ति**–(सं) पु० बेंबीखालचा शरीराचा भाग.
**बस्ती**–स्त्री० जैनांचें देऊळ. [स्तान.
**बस**–(फा) क्रि० पुरे, नको, २ पु० जम, ब-
**बसक–का**–स्त्री० बैठक, आडणी, पडवी.
**बसकर**–न० बसायाचें वस्त्र, बैठक.

**बसकी**–वि० बैठी, आडव्या वाटाची, बसकट.
**बसकें**–वि० चापट, बैसकट.
**बसणें**–(सं) अ० स्थित होणें, रहाणें, थांबवणें. २ उबवणें. ३ पडणें. ४ मिळणें, लागणें. ५ उद्योग नसणें.
**बसंती**–पु० रंगविशेष.
**बसविणें**–स० थांबवणें. २ मिळणें, देववणें, ३ स्थापणें.
**बसी–शी**–स्त्री० मृत्तिकापात्रविशेष.
**बहकणें**–अ० बरळणें, भकणें.
**बहर–बहार**–(फा) पु० पूर्णता. २ मजा, मौज, गम्मत. ३ रागविशेष.
**बहाणा**–(फा) पु० मिष, ढोंग, खोटें कारण.
**बहात्तर**–वि० ७२, सत्तर आणि दोन.
**बहादर–दूर**–(फा) वि० शूर. २ प्रवीण, धीट.
**बहादरी**–(फा) स्त्री० पराक्रम, शौर्य.
**बहादुरी**–(फा) स्त्री० पराक्रम, शौर्य. २ कर्णभूषणविशेष.
**बहाल**–(फा) वि० खुप, मेहेर. २ न० तुळई.
**बहिर्द्वार**–(सं) न० तोरण बाहेरचें दार. २ गुद.
**बहिर्मुख**–(सं) वि० बाहेरल्या मुखाचा. २ संसारी. ३ दृश्य तेवढें खरें मानणारा.
**बहिर**–(सं) वि० बधिर, बहिरा.
**बहिरी**–स्त्री० सुनबहिरी, रागविशेष. [णा.
**बहिरीससाणा**–पु० पक्षिविशेष, श्येन, ससा-
**बहिष्कार**–(सं) पु० बाहेर काढणें, ग्रामण्य, वाळ.
**बहीण**–(सं) स्त्री० भगिनी, बेहेन.
**बहीणभावंड**–न० बहीणभाऊ.
**बहु**–(सं) वि० बहुत, पुष्कळ. [वणें.
**बहुगुणी**–वि० पुष्कळ गुणांचें. २ पातली, बो-
**बहुत**–(सं) वि० बहु, पुष्कळ.
**बहुतेक**–क्रि० बहुतकरून, पुष्कळ अंशीं.
**बहुधा**–(सं) क्रि० बहुतक, बहुतकरून. २ अनेक प्रकारांनीं.

**बहुभाष–षी**–(सं) वि० बोलका, फार बोलणारा. २ बहुत भाषा जाणणारा.
**बहुमत**–(सं) न० पुष्कळांचें मत.
**बहुमान**–(सं) पु० सत्कार, मान, सन्मान.
**बहुमूल्य–मोली**–वि० किंमतवान, महाग.
**बहुरूपी**–पु० जातिविशिष्ट लोक, निरनिराळीं सोंगें घेणारा.
**बहुलें**–न० बोहोलें, वेदीविशेष.
**बहुव्रीही**–(सं) पु० समासविशेष.
**बहुवचन**–(सं) न० अनेकवचन. [गार.
**बहुश्रुत**–(सं) वि० पुष्कळ ऐकिलेला, माहित-
**बहुशः–शा**–क्रि० बहुधा, बहुतकरून. २ अनेक प्रकारांनीं.
**बहुसाल**–क्रि० पुष्कळ रीतींनीं.
**बळ**–(सं) न० ( बल पहा. )
**बळकट**–वि० मजबूत, जंगी, ताकतवान.
**बळकटी**–स्त्री० शक्ति, सामर्थ्य, जोर.
**बळकावणें**–स० हस्तगत करणें, मिळविणें, उपटणें, बलात्कारानें घेणें. [दस्ती.
**बळजबरी–बळजोरी**–स्त्री० जुलूम, जबर-
**बळभद्र**–(सं) पु० बलराम. २ वि० दळभद्या, दळभंजन, रांड्या.
**बळमोड**–पु० शक्ति नाहींशी करणें.
**बळावणें**–अ० बलिष्ठ होणें.
**बळी**–(सं) पु० बलि. २ बुद्धिबळांच्या खेळाचा एक प्रकार. ३ वि० मजबूत, जंगी.
**बळें**–क्रि० मुद्दाम, जाणूनबुजून, बुद्ध्या, जबरीनें.
**बा**–पु० बाप, पिता. २ के० बाबा, रे, बारे.
**बाई**–स्त्री० मोठी बायको.
**बाईल**–स्त्री० लग्नाची बायको, कुटुंब.
**बाईलबुद्धि–बाईलबुद्ध्या**–वि० स्त्रीच्या मतानें चालणारा. [लबावा.
**बाऊ**–पु० भय वाटण्याजोगी वस्तु, बागु-
**बाक**–(फा) भय, भीति. २ आसनविशेष.

**बाकी**-(आ) स्त्री० शिलक, अवकाश, शेष.
**बाकून**-(फा) अ० भिऊन, सावधपणें.
**बाग**-(फा) पु० बगीचा, उपवन. [ मारणें.
**बागडणें**-अ० आनंदानें नाचणें, उड्या
**बागवान**-(फा) पु० माळी. २ बागेचा मालक.
**बागशाई**-स्त्री० बगीचा.
**बागाईत**-(फा) न० पाटस्थळ, पाण्यावर केलेला उदीम व त्याची जमीन.
**बागुरडा**-पु० प्राणिविशेष.
**बागुल**-पु० बाऊ, बागुलबोवा.
**बागेसरी**-स्त्री० रागविशेष. २ शेगडी.
**बाचकणें**-अ० बावरणें, बिचकणें.
**बाचाबाच-ची**-स्त्री० बोलाचाली, भांडण.
**बाज**-स्त्री० खाट, माचा, बाजलें.
**बाजत-द**-(फा) वि० खेरीज, शिवाय.
**बाजरी**-स्त्री० धान्यविशेष, बाजरा, सजगुरे.
**बाजा**-पु० शंख. २ वाद्य. [स्था.
**बाजार**-(फा) पु० हाट, मंडई. २ अव्यव-
**बाजारबसवी**-स्त्री० कसबीण, रांड. [वा.
**बाजारबातमी**-स्त्री० गप्प, आवई, आफ-
**बाजारबुणगे**-(फा) न० खोगिरभरती, फौजेंतील व्यर्थ मनुष्यें.
**बाजारभाव**-पु० बाजारनिरख.
**बाजारमहशूर**-(फा) वि० सुप्रसिद्ध.
**बाजारी**-वि० हलका, चलाऊ, तकलादी.
**बाजी**-(फा) स्त्री० खेळ, कर्मणूक.
**बाजीगर**-(फा) पु० जुगारी, द्यूतकार.
**बाजू**-(फा) स्त्री० कड, तर्फ, पक्ष. २बाहु, भुज.
**बाजूबंद**-(फा) पु० भूषणविशेष.
**बाट्या**-वि० बाटलेला, भ्रष्ट, बाटगा.
**बाटगा-बाडगा**-वि० बाटलेला, भ्रष्ट.
**बाटणें**-अ० भ्रष्ट होणें, अन्यधर्म स्वीकारणें.
**बाठ-ठा**-स्त्री० कोय, आंब्याची बी.
**बाड**-न० लिहिलेली वही. २ गप्प, खोटी गोष्ट.
**बाडबिशाद-च्छाईत**-स्त्री० सामानसुमान.
**बाडी**-स्त्री० खर्बुजें वगैरे लावलेली जागा.
**बाण**-(सं) पु० तीर. २ अग्निकौतुकविशेष. ३ नर्मदा नदींतील गोटा, पिंडी.
**बाणणें**-अ० लागणें, मन वेधणें, बिंबणें.
**बाणा**-पु० थाट, अभिमान. २ पण, प्रतिज्ञा. ३ आयुधविशेष.
**बाणी**-स्त्री० चाल, रीत. २ निकर, प्रसंग.
**बाणेदार**-वि० अभिमानी. [ बातमी.
**बात**-(सं) स्त्री० गोष्ट. २ गप्प, चकाटी,
**बातमी**-स्त्री० खबर, हकीकत, वार्ता.
**बातमीदार**-पु० खबर देणारा.
**बातल**-(फा) वि० रिकामें, व्यर्थ.
**बाद**-(आ) क्रि० वजा, कमी.
**बादबाकी**-(आ) वजाबाकी.
**बादशाहा**-(फा) पु० पादशाहा, राजा.
**बादशाही**-(फा) वि० बादशहासंबंधी.
**बादाम-बदाम**-(सं) पु० बाताम, फळविशेष.
**बाध**-(सं) पु० अडचण, अडथळा, हरकत.
**बाधक**-(सं) वि० बाधणारें, हरकतीचें, जाचणारें. [ न पचणें.
**बाधणें**-अ० अडचण होणें, दुःख होणें. २
**बाधा**-(सं) स्त्री० पीडा, दुःख, रोग, पथ्य. २ भूतपिशाचादिकांची पीडा.
**बाप्या**-पु० जाणता मुलगा, सज्ञान.
**बाप**-पु० पिता, वडील, बाबा, तीर्थरूप.
**बापडा**-वि० बापुडा, बिचारा, गरीब, दीन.
**बापा**-पु० पिता, बाप. [ ३ कर.
**बाब**-(आ) स्त्री० भाग, रकम. २काम, काज.
**बाबत-द**-(फा) स्त्री० विषय, काम.
**बाबा**-पु० बाप, पिता, बापा. २ के० बा, अरे.
**बाभळ-भूळ**-(सं) स्त्री० वृक्षविशेष.
**बायक्या**-वि० बायल्या, गांडू, पुळपुळीत. २ बायकांत बसणारा.
**बायको**-स्त्री० स्त्री, औरत, आऊ, भार्या, जाया.
**बायल्या**-वि० बायक्या, जनानी.

**बाया—ह्या**—पु० कणीक लावण्याचा तबल्यांतील भाग.
**बार**—पु० बंदुक इत्यादिकांचा ध्वनि, आवाज.
**बारकाई**—(फा) स्त्री० बारकावा, सूक्ष्मता.
**बारगळणें**—अ० भ्रष्ट होणें, निकामा होणें.
**बारगीर**—(फा) पु० स्वार, घोडेस्वार.
**बारदान**—(फा) न० भांडवल. २ पोतें—पेटी इत्यादि माल भरण्याचें साधन.
**बारनिशी**—(फा) स्त्री० टांचण, टिपण, लेख.
**बारभाई**—स्त्री० बचबचपुरी. [त्य, नेहमीं.
**बारमाहां—ही**—क्रि० बारामास—महिने, नि-
**बारव**—स्त्री० पायऱ्यांची विहीर, मोठा कूप.
**बारस**—स्त्री० द्वादशी, पाऊस.
**बारसें**—न० जन्मलेल्या मुलाचा बाराव्या दिवसाचा संस्कार, नामकरण.
**बारा**—वि० द्वादश, १२.
**बाराखडी**—स्त्री० बारसखडी, बाराक्षरी.
**बारामाशी**—स्त्री० कविताविशेष. २ फलविशेष. ३ बारमाही. [वि० बारा संख्येचा.
**बारावा**—पु० बाराव्या दिवसाचें श्राद्ध. २
**बारी**—स्त्री० पाळी, क्रम. २ खिडकी, झरोका.
**बारीक**—वि० लहान, आंखुड. २ सडपातळ.
**बारीकदृष्टि—नजर**—स्त्री० चोर नजर, सूक्ष्मदृष्टि.
**बारोळी**—वि० बारा पायलींचें.
**बाल्य**—(सं) न० } लहानपणा, अ-
**बाल्यावस्था**—(सं) स्त्री० } ज्ञानदशा, पोरपणा.
**बाल**—(सं) पु० मुलगा, मूल. २ केस.
**बालक्रीडा**—(सं) स्त्री० बाळपणचें खेळणें, बाललीला.
**बालपेंच**—पु० अक्कडबाज लपेटा—पीळ.
**बालक**—(सं) न० मूल, पोर, अज्ञान.
**बालब्रह्मचारी**—(सं) पु० बाळपणापासून ब्रह्मचर्य व्रत केलेला.
**बालबुद्धि**—(सं) स्त्री० अप्रौढबुद्धि.
**बालबोध**—पु० मुलांना उपदेश. २ स्त्री० देवनागरी (लिपि).
**बालभाषा**—(सं) स्त्री० मुलांची भाषा. २ प्राकृत.
**बालमित्र**—(सं) पु० लहानपणचा सोबती, लंगोटीयार. [मेलेली बायको, बालरंडा.
**बालविधवा**—(सं) स्त्री० लहानपणीं पति-
**बालहत्या**—(सं) स्त्री० मूल मारणें व त्याचा गुन्हा.
**बाला**—(सं) स्त्री० स्त्री, बायको.
**बालांट—लंट**—न० तुफान, आरोप.
**बावचळणें**—अ० धांदल होणें, घाबरणें.
**बावटा**—पु० झेंडा, निशाण.
**बावडी**—स्त्री० बाव, विहीर.
**बावन—न्न**—वि० पन्नास आणि दोन, ५२.
**बावनकशी**—वि० उत्तम, अतिशुद्ध.
**बावरणें**—अ० घाबरणें, घुटमळणें.
**बावळा**—वि० वेडसर, वेडगळ.
**बावा**—पु० बोवा, जोगी, अवलिया.
**बावीस**—(सं) वि० २२, वीस आणि दोन.
**बाशिंग**—न० विवाहकालचें भूषणविशेष.
**बाष्कळ**—वि० चावट, अभद्र.
**बाष्कळणें**—अ० चावट होणें.
**बाष्प**—(सं) न० वाफ. २ अश्रु.
**बासट—ष्ट**—वि० ६२, साठ आणि दोन.
**बासन**—(सं) न० पात्र, भांडें. २ गांठोडें बांधण्याचें वस्त्र. ३ गांठोडें.
**बासा**—वि० शिळा, पर्युषित.
**बासुंदी**—स्त्री० आटीव दूध.
**बाह्य**—(सं) वि० बाहेरचा, बाहेरला.
**बाह्यात्कारी**—क्रि० बाहेरून, वरवर.
**बाह्योपचार**—(सं) पु० बाहेरचे उपचार.
**बाहणें**—अ० हांका मारणें, बोलावणें.
**बाहत्तर**—वि० ७२, सत्तर आणि दोन. [बाहु.
**बाही**—(सं) स्त्री० अस्तनी, अंगरख्याचा हात. २

**बाहु**-(सं) पु॰ भुज, दंड.
**बाहुटा**-पु॰ निशाण, झेंडा.
**बाहुयुद्ध**-न॰ कुस्ती, मल्लयुद्ध.
**बाहुलें**-न॰ बाहुली, पुतळी.
**बाहुस्फुरण**-(सं) न॰ दंडाचें फुरफुरणें.
**बाहेर**-(सं) क्रि॰ दूर, इतर प्रदेशीं. २ विरहित. ३ श॰ शिवाय, वेगळा. [दिल.
**बाहेरख्याली**-वि॰ छिनाल, रंडीबाज, शि-
**बाहेरला**-वि॰ बाहेरचा, बाह्य.
**बाळकडु**-न॰ मुलांस घालण्याचें अनेक औषधाचें मिश्रण.
**बाळगणें**-स॰ राखणें, ठेवणें, पोसणें.
**बाळगोपाळ**-पु॰सर्व लहानथोर,आबालवृद्ध.
**बाळंत-बाळंतीण**-स्त्री॰ प्रसूतिका, प्रसूत झालेली स्त्री.
**बाळंतकाढा**-पु॰ कषायविशेष.
**बाळंतखोली**-स्त्री॰ बाळंतिणीची खोली, सूतिकागृह.
**बाळंतपण**-न॰ प्रसूति. २ बाळबाळंतिणीची चाकरी.
**बाळंतरोग**-पु॰ स्त्रीरोगविशेष.
**बाळंतशेप-शोप**-स्त्री॰ औषधिविशेष.
**बाळंतें-बाळवतें**-न॰ बाळंतिणीचें फडकें.
**बाळबोध**-(सं) वि॰ साधा. २ बाळबध-द, देवनागरी.
**बाळभूक**-स्त्री॰ लहानपणची क्षुधा.
**बाळलेणें**-न॰ लहान मुलाचे दागिने.
**बाळसें**-न॰ लहानपणची पुष्टता-पुष्टाई.
**बाळहरडा**-पु॰लहान हिरडा, बाळहरीतकी.
**बाळी**-स्त्री॰ कानांत घालण्याचा दागिना.
**बांक**-पु॰ वांकडेपणा, वांक. २ शस्त्रविशेष.
**बाकणें**-अ॰ फटकणें, निराळें होणें.
**बांकदार**-वि॰ कमानदार.
**बांग**-(फा)स्त्री॰निमाजाकारितां मशिदींत बोलावण्याचा पुकार. २ कोंबड्याचा शब्द.
**बांगडी**-स्त्री॰ चुडा, काचेचें अगर सोन्याचें वलय.
**बांगर**-पु॰ आंडिल प्राणी, अविद्वान् पुरुष.
**बांड**-पु॰ तरुण. २ दणगट लुगडें. ३ न निसवलेल्या शाळूचा कडबा. ४ वाटोळे जळाऊ लांकडाचे तुकडे.
**बांडगूळ**-न॰ बांदें,झाडावर उगवणारें क्षुद्रूप.
**बांडा**-वि॰ निरनिराळ्या रंगाचा.
**बांदी**-स्त्री॰ दासी, कुणबीण, बटीक.
**बांध**-(सं) पु॰ बंधारा, आळें. [जखडणें.
**बांधणें**-(सं) अ॰तयार करणें. २ आंवळणें,
**बांधव**-(सं) पु॰ भाऊ, भाई, भैया.
**बांधा**-(सं) पु॰ ठेवण, अंगवळण, अंगलोट.
**बांधाबांध-धी**-स्त्री॰ आवराआवर.
**बांबू**-पु॰ वंश, वेळू.
**बांबोट**-स्त्री॰ नौकाविशेष.
**बिकट**-वि॰ कठिण, अडचणीचें.
**बिगर**-(फा) श॰ खरीज, शिवाय, बगर.
**बिगार**-स्त्री॰ वेठ, जुलुमाची मजुरी.
**बिगारी**-पु॰ मजूर, मोलकरी.
**बिघड-बिघाड**-पु॰ खराबा, नास. २ बेबनाव, शत्रुत्व. [बेबनाव होणें.
**बिघडणें**-(सं) अ॰ नासणें, खराब होणें. २
**बिघा**-(सं) पु॰ वीस पांड,जमिनीचें प्रमाणविशेष.
**बिचकणें**-अ॰ भिणें, घाबरणें, दचकणें.
**बिचकावणें**-स॰ भिवविणें, घाबरवणें.
**बिचवा**-पु॰ लहान डेरा. २ शस्त्रविशेष. ३ वि॰ चलाख, चपळ.
**बिचारा**-(फा) वि॰ बापडा, गरीब.
**बिछाईत-यत**-(आ) स्त्री॰ बैठक, बसावयाचें वस्त्र. २ पु॰माल आडतीवर आणून विकणारे लोक.
**बिछाना**-पु॰ आंथरूण, पथारी, शय्या.
**बिछावणें**-स॰ पसरणें, हांतरणें.

**बिजली**—स्त्री० वीज, विद्युत्, चपला.
**बिजवर**—पु० ज्याचें लग्न दुसऱ्यानें व्हावयाचें असा वर—नवरा.
**बिजवरा**—पु० भूषणविशेष.
**बिजागरी**—स्त्री०सांधा फिरविण्याची युक्ति.
**बिडी**—स्त्री० शृंखळा. २ विडी, बेडी. [वार.
**बित्तीम—त्तम**—(आ) वि०पूर्ण, खरी,तपशील-
**बितणें**—अ० गुदरणें, येणें, बेतणें.
**बिथरणें**—अ० उलटणें, बिघडणें.
**बिदाई—गी**—(आ) स्त्री० देणगी, पाठवणी.
**बिन**—(सं) श० विना, शिवाय, खेरीज. २ (फा) पु० वल्लद.
**बिनधोक**—क्रि० धास्तीखेरीज, बिनदिक्कत.
**बिनभाड्याचें घर**—न० तुरुंग, कैदखाना.
**बिनवारस—वारीस**—वि० निर्वंश, वारसाखेरीज. [ २ वितुष्ट येणें.
**बिनसणें**—उ० वि० बिघडणें, खराब होणें.
**बिनाखी**—(फा) स्त्री० चौकशी, तपासणी.
**बिनी**—(फा) स्त्री० नाक, अग्रभाग, कोकी, केळें.
**बिबा—बिबवा**—(सं) पु० भिलावा, भल्लातक.
**बिबळ्या वाघ**—पु० लहान वाघ, चित्ता.
**बिबी**—स्त्री० बिब्याचें झाड. २ थोर मुसलमानाची स्त्री. [भूति.
**बिभूत**—(सं) स्त्री० राख, भस्म, खाक, वि-
**बियाणें**—न० बीज, बीं. [करी—रू.
**बिऱ्हाड**—न० भाड्यानें रहाणें. २ बिऱ्हाड-
**बिऱ्हाडकरू**—पु० जागेचें भाडें देऊन राहणारा.
**बिरखडणें**—स० पसरणें, फिस्कारणें.
**बिरडी**—स्त्री० सोलीव पावटा—डाळ.
**बिरडें—ढें**—न० गुंडी मावण्याकरितां केलेलें भोंक, काज्या, गुंडी.
**बिरादर**—(फा) पु० भाऊ, बंधु.
**बिलयाण**—पु० हिराविशेष.
**बिल्ला**—पु० चपरास, पट्टा, हुकूम.
**बिल**—(सं) न० बीळ, विवर, भोंक.
**बिलकूल**—(आ) क्रि० काडीमात्र, अगदीं, मुळींच.
**बिलगणें**—अ० ठेपणें, मिळणें, चिकटणें.
**बिलंदर**—(फा) वि० अट्टल, पक्का.
**बिलबिलणें**—अ० नरम होणें, मऊ होणें.
**बिलबिलित**—वि० नरम, मऊ.
**बिलोर—बिलवर**—(फा) पु० विशिष्ट काच. २ बांगडी.
**बिशात—द**—स्त्री० प्राज्ञा, शहामत, किंमत.
**बिशी**—स्त्री० भातुकली, खाणावळ.
**बिसनी**—(सं) पु० व्यसनी, रंडीबाज.
**बिहाग**—पु० रागविशेष.
**बिहि—ही**—न० फळविशेष.
**बिंग**—न० बंड, लुच्चेगिरी, कपट, दोष,व्यंग.
**बिंडा**—पु० बिंडें, वेटोळें—टाळें.
**बिंदगी**—स्त्री० कळशी, घागर.
**बिंदी**—स्त्री० दागिनाविशेष.
**बिंदलें**—न० लहान पाटली, बिंदली.
**बिंदु**—(सं) पु० थेंब, टिपका—ठिपका. २ पूज्य, शून्य, टिंब.
**बिंब**—(सं) न० छायेचें—प्रतिबिंबाचें मूळ. २ फळविशेष. [ पडणें.
**बिंबणें**—अ० मनांत ठसणें—उतरणें, उमज
**बी**—(सं) न० बीज, मूळ, बियाणें. २ क्रि० देखील, ही.
**बीज**—(सं) न० बी, बीं. २ कारण. ३ मंत्रांगविशेष. ४ स्त्री० द्वितीया.
**बीजगणित**—(सं) न० अक्षरांचें गणित.
**बीजारोप**—(सं) पु० बीज पेरणें—णी.
**बीजाक्षर**—(सं) न० मूळाक्षर, २ मंत्राक्षर.
**बीड**—न० ओतीव लोखंड.
**बीन**—(सं) न० वाद्यविशेष.
**बीभत्स**—(सं) वि० अभद्र, अद्वातद्वा.

**बीर**–(सं) पु० पिशाचविशेष.
**बीरमंत्र**–पु० बीर साहाय्य होण्याचे मंत्र.
**बीरमंत्री**–पु० बीरमंत्रवेत्ता.
**बीळ**–(सं) न० ( **बिल** पहा. )
**बीं**–(**बीज** पहा. )
**बुक्का**–पु० गुद्दा, बुकुंदा. २ बुका, सुगंधि द्रव्यविशेष.
**बुकटी–णी**–स्त्री० पूड, चूर्ण.
**बुका**–पु० सुवासिक चूर्णविशेष.
**बुकी**–स्त्री० पूड, बुकणी. २ ठोसा, गुद्दा.
**बुकुंदा**–पु० गुद्दा, ठुस्सा.
**बुगडी**–स्त्री० भूषणविशेष.
**बुचकणें**–अ० बिचकणें.
**बुचकळी**–स्त्री० बुडी. [ बुडविणें.
**बुचकळणें**–अ० भ्रम होणें–येणें. २ स०
**बुचकळा**–पु० गोंधळ, अडचण.
**बुचका–बुचकुली**–स्त्री० मूठ, लहान पसा, पांच बोटांची चिमूट. २ वि० चहाड.
**बुचडा**–पु० खोपा.
**बुचाडणें**–अ० लुबाडणें, लुटणें.
**बुजट**–वि० बुजणारा.
**बुजणें**–अ० भिणें, घाबरणें, बिचकणें.
**बुजविणें**–स० भिवविणें, घाबरविणें.
**बुझणें**–अ० घाबरणें, भिणें.
**बुझावणें**–स० समाधान करणें.
**बुटका**–वि० ठेंगू, बुणगा, बुटबैंगण.
**बुटकुली**–स्त्री० तामली, लहान तपेली.
**बुटकुळी**–स्त्री० बुडी, डुबकी.
**बुटणें**–न० बूच, झांकण.
**बुटबुटणें**–अ० बुडबुडे येणें.
**बुटबैंगण**–वि० खुजा, लहान, ठेंगू.
**बुटी–बुट्टी**–स्त्री० दवा, औषध. २ भांग, घोटा. ३ वेलबुटी. [ शिंदा काढलेला.
**बुटीदार–ट्टीदार**–वि० वेल काढलेला, क-
**बुडकुल–लें**–न० लहान तपेली, तामलें.
**बुडणें**–अ० बुडी मारणें, पाण्यांत जाणें. २ तोटा येणें.
**बुडता**–वि० बुडणारा. २ उतरता, र्‍हासाचा.
**बुडता पाया**–पु० आकाबाईचा पाया.
**बुडबुड**–स्त्री० अस्पष्ट भाषण, पुटपुट.
**बुडबुडणें**–अ० अस्पष्ट भाषण करणें, पुटपुटणें.
**बुडबुडा**–पु० पाण्याचा फुगा, परपोटा.
**बुडव्या**–वि० बुडविणारा.
**बुडविणें**–स० पाण्याच्या खालीं, जाईसा करणें. २ नास करणें, फसविणें. ३ न देणें.
**बुडी**–स्त्री० बुटकुळी, पाण्याच्याखालीं जाणें.
**बुडीत**–वि० बुडलेलें, बुडणारें.
**बुडूख–डखा**–न० मूळखंड, बुंधा.
**बुणगें**–वि० ठेंगू, खुजें. २ किरकोळ मनुष्यें.
**बुता–री**–स्त्री० केरसुणी, झाडु. [ णाशक्ति.
**बुद्धि**–(सं) स्त्री० मति, अंतःकरणवृत्ति, धार-
**बुद्धिकौशल्य**–(सं) न० तर्कशक्ति.
**बुद्धिपुरःसर–पूर्वक**–(सं) क्रि० मुद्दाम, जाणूनबुजून.
**बुद्धिभेद–बुद्धिभ्रंश**–(सं) पु० दुर्बुद्धि, भ्रम, बुद्धिनाश, विपरीत बुद्धि.
**बुद्धिमंत–वंत**–(सं) वि० बुद्धिमान, ज्ञानी.
**बुद्धिमांद्य**–(सं) न० बुद्धीचा मंदपणा.
**बुद्धिवाद**–(सं) पु० उपदेश, सल्ला, मसलत.
**बुद्धीचा खंदक**–वि० मूर्ख अविद्वान्, अप्रबुद्ध.
**बुद्धीचा जड**–वि० मंद, बुद्धिमंद.
**बुद्ध्या**–क्रि० मुद्दाम, जाणूनबुजून.
**बुदकणें**–अ० चोपणें, मारणें.
**बुदका**–पु० गुद्दा, गुच्या, ठोसा.
**बुदबळ–द्धिबळ**–न० खेळविशेष, सेतरंज. २ त्यांतील मोहरें.
**बुदला**–( **बुधला** पहा. )
**बुध**–(सं) वि० शहाणा. २ ग्रहविशेष.
**बुधला**–पु० कुप्पा, चर्मपात्रविशेष.
**बुधली–बुदली**–स्त्री० लहान बुधला.

**बुधवार**–पु० सौम्यवार.
**बुबळ–बुबूळ**–थ० नेत्रांतील काळा भाग.
**बुभुक्षा**–(सं) स्त्री० भूक, इच्छा, क्षुधा.
**बुभुक्षित**–(सं) वि० भुकेला, क्षुधित. २ गरजू. ३ धाधावलेला, हापापलेला.
**बुरखा–का**–(आ) पु० पडदा, पदर, आच्छादन, वस्त्र.
**बुरगुंडें**–न० मूल, संतान.
**बुरंगट**–न० बारीक पर्जन्य.
**बुरजी**–स्त्री० बुद्धिबळांचे खेळांतील एक डाव.
**बुरडी**–वि० बुरुडानें केलेलें.
**बुरणूस**–न० ऊर्णावस्त्रविशेष.
**बुरशी**–स्त्री० बुरा.
**बुरा**–पु० बुरशी. २ वि० वाईट.
**बुराख**–(फा) न० लहान भोंक–छिद्र.
**बुरूज**–(फा) पु० कोटाच्या तटाचा वर्तुलाकार भाग.
**बुरूड**–पु० जातिविशेष, सुपें–टोपल्या विणणारा.
**बुरेहाल**–न० वाईट अवस्था.
**बुली**–स्त्री० चोमणी, चोटली.
**बुलबुल**–(फा) पु० पक्षिविशेष.
**बुवा**–पु० बावा, गोसांवी. २ पुरुष.
**बुळक–कंडी**–स्त्री० हगवण.
**बुळकणें**–अ० पातळ हगणें.
**बुळबुळीत**–वि० चिकट, चिकण.
**बुळा**–वि० तृतीयाप्रकृति, षंढ.
**बुंद**–न० वनस्पतिविशेष, तिचें फळ. २ थेंब.
**बुंदी**–स्त्री० पक्वान्नविशेष.
**बुंध–धा**–पु० मूळ, बुडूख.
**बूच**–अ० दाट, झांकण, बुटणें.
**बूज**–स्त्री० मान्यता. २ गंजिफाच्या खेळांत लागलेलीं पानें.
**बूट**–पु० भांगेचा पुष्पगुच्छ. २ नकशी, वेल. ३ कापडावरील जरीचे बुंद. ४ कोटी, कल्पनाविशेष.
**बूड**–स्त्री० नुकसान, तोटा. २ न० तळ, खालचा भाग, बैठक, ढुंगण.
**बृहत्**–(सं) वि० मोठें, भव्य.
**बृहती**–स्त्री० रिंगणी, डोरली. २ गांड.
**बृहस्पतवार**–पु० गुरुवार.
**बृहस्पति**–(सं) पु० तारकाविशेष, गुरु. २ हुषार मनुष्य. ३ ( व्याजोक्तीनें ) मूर्ख.
**बे**–वि० दोन. २ नकार, बिन, विना.
**बेअदबी**–(फा) स्त्री० अपमान.
**बेआबरू**–(फा) स्त्री० दुर्लौकिक, अपकीर्ति.
**बेइमान–नी**–(फा) वि० कृतघ्न, अविश्वास्य.
**बेइलाज**–(फा) वि० नाईलाज, निरुपाय.
**बेकायदा**–वि० बेकानू.
**बेकार**–(फा) वि० रिकामा, उद्योगाशिवाय.
**बेकी**–स्त्री० दोन.
**बेकूब–बेवकूब**–वि० पाजी, अप्रयोजक, अक्कलशून्य.
**बेगड**–स्त्री० वर्ख.
**बेगम**–(फा) स्त्री० अविवाहित उपवर मुलगी. २ थोर मुसलमानाची बायको.
**बेगमी**–स्त्री० पुरवठा, सामुग्री, बेजमी.
**बेगी**–क्रि० लवकर, जलदी.
**बेचकी–बेचकळी**–स्त्री० बेळकी, दोन अंगुलींच्या मधील अंतर.
**बेचन**–न० विक्री, विकणें.
**बेचव**–स्त्री० रुचिहीन, स्वादरहित.
**बेचाळ–ळीस**–वि० ४२, चाळीस आणि दोन.
**बेजबाब**–(फा) न० अमर्याद भाषण.
**बेजमी**–स्त्री० ( **बेगमी** पहा. )
**बेजरब**–(फा) क्रि० बेदम.
**बेजार**–(फा) वि० हैराण, दुखाणाईत, आजारी.
**बेट्या**–के० गुलामा, मुला.
**बेट**–न० द्वीप. २ एकेजागीं पुष्कळ झाडांचा समुदाय.
**बेटकी–बेडकी**–स्त्री० बेडकुळी. २ आघातानें शरीरावर आलेला उंचवटा.
**बेटकुळी**–स्त्री० बेडकी.

**बेटा**–पु० पुत्र,मुलगा.२के० बाळा, मुला.
**बेटी**–स्त्री० मुलगी, कन्या.
**बेडका**–पु० कफयुक्त थुंकी, खाकरा.
**बेडी**–स्त्री० शृंखळा, बिडी.
**बेडूक**–(सं) पु० मंडूक, बेडका.
**बेडौल**–वि० बेढब, विद्रूप, वेडावांकडा.
**बेढंग**–वि० सोंदेगिरी, ढंग.
**बेढब**–वि० बेडौल, बेरंग, विद्रूप.
**बेणणी**–स्त्री० गवत काढण्याचें काम.
**बेणणें**–उ० वि० गवत काढून शेत साफ करणें.
**बेणें**–न०( **बियाणें** पहा. )
**बेत**–(सं) पु० व्यवस्था.२ हेतु. ३ मसलत.
**बेतणें**–उ० वि० प्रसंग येणें. २ मापणें. ३ भांडण लागणें.
**बेतवार**–क्रि० नियमितपणें, व्यवस्थितपणें.
**बेताविणें**–स० मोजविणें, मापविणें.
**बेदम**–क्रि० बेजरब. २ वि० बेजार.
**बेदाणा–ना**–(फा) पु० खिसमिस, किशमिश, द्राक्ष.
**बेदाद**–(फा) स्त्री० अव्यवस्था, मोगलाई,
**बेदिकत–बेधडक**–क्रि० बिनधोक, निर्धास्तपणें.
**बेपरवा**–वि० उद्धट, अमर्यादित, माजलेला.
**बेपार**–(सं) पु० व्यापार, उदीम, उद्यम.
**बेफाम**–(फा) वि० तुफान.२गैरसावध.
**बेफिकीर**–स्त्री० निष्काळजी, निश्चिंत.
**बेमार**–(फा) वि० आजारी, दुखणाईत.
**बेमालूम**–(आ) वि० माहीत न होण्याजोगें.
**बेमुरवत**–(फा) क्रि० निर्भीडपणें. २ वि० निर्भीड.
**बेरंग**–(फा)पु०खराबी, मौज नाहींशी होणें.
**बेरड**–पु० जातिविशिष्ट लोक, रामोशी.
**बेरी**–स्त्री०बेरकट, बेरकी, तेलातुपाची मळी.
**बेरीज**–स्त्री० मिळवणी. २ एकंदर रकम, एकूण.
**बेल**–(सं) पु० बिल्ववृक्ष व त्याचीं पानें व फळें.
**बेलदार**–(फा) पु० धोंडफोड्या, पाथरवट.
**बेलभंडार**–पु० शपथ. २ बेलाचीं पानें व हळद.
**बेलवांगें**–स्त्री० फळविशेष.
**बेलाशक**–(आ) क्रि० बेशक, निःसंशय,
**बेवकूब–फ**–(फा) वि० अक्कलशून्य,अप्रबुद्ध.
**बेवारशी**–(फा) वि० निर्वंश, निसंतान, बिनवारशी.
**बेवीस**–वि० बावीस, २२.
**बेश–ष**–(फा) वि० फार चांगलें, ठीक.
**बेशक**–(फा) क्रि० बेलाशक, निःसंशय.
**बेशरम**–(फा) वि०निर्लज्ज, बेश्रम,निलाजरा,
**बेशर्मी**–(फा) क्रि० नामें, नामेंकरून.
**बेशिस्त**–(फा) वि० अव्यवस्थित, गैरशिस्त.
**बेसन**–न० झुणका, पिठलें.२ पक्कान्नविशेष. हरभऱ्याचें पीठ.
**बेसावध**–वि० गैरसावध. २ बेशुद्ध.
**बेसुमार**–(फा) वि० अमर्याद, अतिरिक्त, अतिशय, फार.
**बेसूर**–पु० बदसूर.
**बेहडा**–(सं) पु० वनस्पतिविशेष.
**बेहोश–ष**–(फा) वि० बेदम, बेशुद्ध. २गुंग.
**बें–बेंबें**–न० शेळीचें ओरडणें.
**बेंड**–न० गळूं, उठाणूं. २ गुप्त गोष्ट.
**बेंबट**–न० खोल बेंबी.
**बेंबटणें**–अ० बेंबें करणें.
**बेंबी**–स्त्री० नाभी, बेंबट.
**बैठक**–स्त्री० उठबशी. २ बिछाईत–यत. ३ कलावंतिणीचें बसून गाणें.
**बैठापगार**–पु० चाकरीशिवायचा पगार.
**बैठे घडीचा**–वि० बसल्या घडीचा.
**बैदुल**–पु० खेळण्याची गोटी.
**बैरागी**–(सं) पु० विरक्त, गोंसावी, फकीर.

**बैल**–(सं) पुं० वृषभ, खोंड. २ गाईचा बाप, नंदी, वसू.
**बैलभिस्ती**–पु० पखालजी.
**बैसणें**–( **बसणें** पहा. )
**बैंगणी–नी**–वि० वांग्यासारख्या रंगाचें.
**बोकड**–पु० बकरा, अज.
**बोका**–पु० मार्जार (नर).
**बोकाणा**–पु० फक्का, बकाणा.
**बोकांडी**–स्त्री० मानगुटी.
**बोकेसंन्यास**–पु० संन्यासाचें ढोंग.
**बोगदा**–(फा) पु० भोंक, छिद्र.
**बोचकरणें–कारणें**–स० ओरखडणें.
**बोचकें**–न० गांठोडें.
**बोचणें**–अ० ( **टोंचणें** पहा. )
**बोचा**–पु० गांड, ढुंगण.
**बोचू**–पु० गांडू, तृतीयाप्रकृति.
**बोजड**–वि० अवजड.
**बोज**–पु० महत्त्व, मोठेपणा.
**बोजवार**–पु० अव्यवस्था, घोंटाळा. २ बेस्वार, लोणच्याचा मसाला.
**बोजा**–पु० ओझें.
**बोट**–न० अंगुली, अंगुळ.
**बोटवा**–पु० गव्हला.
**बोटुक**–न० चिंचेचा एक सांधा.
**बोडका**–वि० शिरोवेष्टण नसलेला, उघड्या डोक्याचा.
**बोडकी**–स्त्री० विधवा, रंडकी.
**बोडकें**–न० डोकें, मस्तक. [मोटण.
**बोडण**–(सं)न०देवताप्रीत्यर्थ अन्नाचें मिश्रण,
**बोडणें**–स० हजामत करणें.
**बोडंती**–स्त्री० हजामत, फजिती.
**बोडा**–पु० शिश्न.
**बोथटणें–बोथणें**–अ० धार जाणें. [ळगा.
**बोथरखिंड**–स्त्री० दांत पडल्या जागचा ख-
**बोथाटी**–स्त्री० खेळविशेष, त्याचें उपकरण.
**बोद**–वि० बद, छन्नदिशीं न वाजणारा.
**बोध**–(सं)पु० उपदेश, ज्ञानाच्या गोष्टी.
**बोधणें**–उ० वि० उपदेशणें, ज्ञान सांगणें.
**बोबडकांदा–बोबडा**–वि० अस्पष्ट उच्चार करणारा.
**बोबडी**–स्त्री० अस्पष्ट वाणी.
**बोबडी वळणें**–अ० तोंडांतून शब्द न निघणें, जीभ लटकी पडणें.
**बोभाटा**–पु० गवगवा, बोंब. [त्वचा, टरफल.
**बोय**–(फा) स्त्री० वास, गंध. २ लिंबाची
**बोऱ्या**–(फा)पु० हुर्यो, पच्ची. अपकीर्ति, बेआबरू. २ चटई.
**बोर**–(सं) न० बदर, बेर. २ स्त्री० बदरी.
**बोरू**–पु० पेर व त्याचें ताट, बरू.
**बोल**–(सं) पु०वाणी, वाचा, बोलणें.
**बोलका**–वि०वाचाळ. [भाषण. ३रागें भरणें.
**बोलणें**–(सं) उ० वि० भाषण करणें. २न०
**बोलविणें–लाविणें**–स० हाका मारणें. २ न० आमंत्रण. [करणारा, कोतवाल.
**बोलावणेंकरी**–पु० बोलावणारा, आमंत्रण
**बोलाचाल–ली**–स्त्री० बाचाबाची, कलह.
**बोलीचाली**–स्त्री० ठराव.
**बोलूनचालून**–क्रि० उघड. २ मुद्दाम.
**बोहणी**–स्त्री० भवानी, विक्रीचा आरंभ.
**बोहोचक**-(सं) वि० बहुवाचक. २भोचक, लुबरी.
**बोळ**–पु० गल्ली, आळी.२ औषधविशेष.
**बोळकें**–न० लहान मृत्तिकापात्र. २ दांत पडलेलें तोंड.
**बोळवण**–स्त्री० पाठवणी, बिदा, बिदागी.
**बोळविणें**–उ० वि०पाठविणें, नाहींसें करणें २ बोळा फिरविणें.
**बोळा**–पु० फडक्याचा चोथा, ओलें फडकें.
**बोंगा**–पु० निऱ्यांचा उंचवटा.
**बोंच**–स्त्री० कांटा घुसलेली जागा.

**बोंड**—न० मखें. २ कळी. ३ अग्रभाग.
**बोंडी**—स्त्री० अग्रभाग.
**बोंथट**—वि० धार बसलेला.
**बोंथणें**—अ० धार जाणें, अग्र नाहींसें होणें.
**बोंथरा**—वि० दांत नसलेला. [ध्वनि.
**बोंब**—स्त्री० ओरड, गलबा, कल्ला. २ शंख-
**बोंबलणें**—अ० हाका मारणें, शंख करणें, बोंबा मारणें.
**बोंबाबोंब**—स्त्री० कल्ला, कल्होळ.
**बोंबील**—न० मत्स्यविशेष, वाळविलेले मासे.
**बौद्ध**—(सं) पु० नववा अवतार. २ धर्मविशेष.
**बंगला**—पु० घर, महाल.
**बंगी**—स्त्री० कावड, रवाना करण्याचें गांठोडें.
**बंड**—(फा) न० दंगा. २ बलवान. ३ दंभ, डंब.
**बंडखोर-वाला**—पु० दंगेखोर. २ दांभिक.
**बंडाई-बंडाळी**—स्त्री० बंडाळी, दांडगाई, पुंडाई.
**बंडी**—स्त्री० लहान आंगरखा. २ मोठी गाडी.
**बंद**—(फा) वि० चालत नाहींसें. २ पु० कसा, बांधण्याची दोरी. ३ नियम, कागद, ताव.
**बंदखाना**—(फा) पु० तुरुंग, बंदिशाळा.
**बंदर**—(फा) न० जहाजें उतरण्याचें समुद्रकाठचें ठिकाण. २ वानर. ३ वि० तीक्ष्ण.
**बंदरकांठ-किनारा**—पु० समुद्रकांठ.
**बंदा**—(फा) पु० गुलाम. २ वि० संबंध. ३ उपकारी झालेला. [ब्रह्मचर्यानें राहिलेला.
**बंदिस्त**—(फा) वि० बांधलेलें, नियमित. २
**बंदी**—(फा) स्त्री० अटक, अटकाव, मनाई. २ (सं) पु० स्तुतिपाठक. ३ राजकैदी.
**बंदीखाना**—(फा) पु० कैदखाना, तुरुंग.
**बंदीवान**—पु० कैदी, बेड्या घातलेला मनुष्य.
**बंदूक**—स्त्री० दारूनें बार करण्याची नळी.
**बंदोबस्त**—(फा) पु० व्यवस्था, नियमितपणा.
**बंध**—(सं) पु० कायदा, शास्त्र, नियम. २ बंद, बंधन.
**बंधन**—(सं) न० बांधणें, बंधारण.
**बंधारण**—न० नियम, मर्यादा.
**बंधारा**—पु० बांध, आळें, धरण.
**बंधु**—(सं) पु० भाऊ, बिरादर, बांधव.
**बंधुजन**—(सं) पु० भाऊबंद, आप्त, नातेवाईक.
**बंधुत्व**—(सं) न० भाऊपणा.
**बंधुवर्ग**—(सं) पु० नातेवाईक, भाऊबंद.
**बंब्या**—पु० पुष्ट व विद्याहीन, बंबू. २ टोंच्या, परखी.
**बंब**—पु० नळ, पाणी उंच उडविण्याचें यंत्र.
**बंबाळ**—वि० जिकडे तिकडे रक्त झालेलें, रक्ताळलेलें.

## भ.

**भ**—चोविसावें व्यंजन.
**भ्याड**—वि० भित्रा, भागुबाई.
**भ्रतार**—(सं) पु० नवरा, पति, दादला.
**भ्रम**—(सं) पु० संशय, शंका. २ वेड.
**भ्रमण**—(सं) न० फिरणें, मंडलाकार चलन.
**भ्रमर**—(सं) पु० भुंगा, जंतुविशेष.
**भ्रमिष्ट**—(सं) वि० वेडा, खुळा.
**भ्रमी**—(सं) वि० फिरणारा. २ भ्रमिष्ट.
**भ्रंश**—(सं) पु० चळ, वेड, खूळ. २ च्युति, पडणें.
**भ्रष्ट**—(सं) वि० अपवित्र. २ सुटलेला.
**भ्रष्टविणें**—स० बाटविणें.
**भ्रष्टाकार**—(सं) पु० अपवित्रता, भ्रष्टाचार.
**भ्रष्टाचार**—(सं) पु० अनाचार, अपवित्रता.
**भ्रांत**—(सं) वि० भ्रांतिष्ट, भ्रमिष्ट.
**भ्रांति**—(सं) स्त्री० संशय, भ्रम.
**भ्रांतिकर**—वि० संशयी, भ्रांतिष्ट.
**भ्रांतिखोर**—वि० भ्रांतिष्ट, वेडगळ.
**भ्रांतिष्ट**—(सं) वि० भ्रांत, भ्रमिष्ट.

भ्रुकुटी–(सं) स्त्री० भिवई, भोंवई.
भ्रू–(सं) स्त्री० भ्रुकुटी, भिवई.
भ्रूसंकेत–(सं) पु० नेत्रसंकेत. [सा.
भ्रूणहत्या–(सं) स्त्री० गर्भपात, गर्भाची हिं-
भ–(सं) न० नक्षत्र.
भक्कम–वि० जंगी, मजबूत.
भक्त–(सं) पु० पूजन करणारा, आराधी.
भक्तवत्सल–(सं) पु० ईश्वर.
भक्ति–(सं) स्त्री० भाव, श्रद्धा.
भक्तिभाव–पु० मनोभाव, श्रद्धा, भाव.
भक्तिमार्ग–(सं) पु० उपासनेचा रस्ता.
भक्तिहीन–(सं) वि० भावहीन, अश्रद्धाळू.
भक्तीण–स्त्री० भक्ति करणारी. २ वेश्या.
भक्त्या–पु० देवास गाऱ्हाणें सांगणारा.
भक्ष्य–(सं) वि० खाद्य, खाण्याचे पदार्थ.
भक्ष–(सं) पु० खाद्य, अन्न.
भक्षण–(सं) न० खाणें.
भक्षणें–स० खाणें, गिळणें.
भक–(सं) न० भक्ष, अन्न. [बोलणें.
भकणें–अ० बहकणें, वेडा होणें, भलभलतें
भकभक–स्त्री० भूक. २ आग, वखवख. ३ त्रास, पीडा.
भकाट–न० पोटाची खळगी, खपाट–टी.
भकाविणें–स० वेड लावणें, चिडविणें.
भकास–वि० भगास, उदास, ओसाड.
भग्न–(सं) वि० मोडलेला. [स्थ, ३ ऐश्वर्य.
भग–(सं) न० भेग, चीर. २ स्त्रियांचें उप-
भगत–(सं) पु० भक्त, आराधी.
भगंदर–(सं) न० रोगविशेष, भगेंद्र.
भगदाड–पु० खळगा, भोंकसा.
भगर–स्त्री० भुगा, चुरा.
भगल–स्त्री० उपहास, थट्टा, चेष्टा.
भगलभावार्थी–पु० ढोंगी, दांभिक.
भगवत्कृपा–(सं) स्त्री० ईश्वरप्रसाद.
भगवत्सत्ता–(सं) स्त्री० ईशशक्ति.
भगवंत–वान–(सं) पु० ईश्वर, परमेश्वर.
भगवती–(सं) स्त्री० देवी, पार्वती. २ कुट-लेल्या नुसत्या मिरच्या.
भगवदिच्छा–(सं) स्त्री० ईश्वरेच्छा.
भगवा–वि० तांबडसर, तांबूस.
भगिनी–(सं) स्त्री० बहीण.
भगीरथप्रयत्न–पु० यत्नाची पराकाष्ठा.
भगेंद्र–(सं) न० भगंदर, रोगविशेष.
भचक्र–(सं) न० नक्षत्रमंडल.
भजक–(सं) सा० भगत, भक्त.
भजणें–अ० अति प्रीति करणें, भक्ति करणें.
भजन–(सं) न० भक्ति. २ नामस्मरण.
भजनपूजन–न० अर्चन, देवदेव, आराधन.
भजनी–(सं) वि० भजनोपयुक्त. २ भजन करणारा. ३ भजनयुक्त.
भजें–न० एक प्रकारचें बोंड.
भट्ट–(सं) पु० भिक्षुक, भटजी.
भट्टी–टी–स्त्री० आंच, विस्तव. २ विस्तवाची जागा. ३ युक्ति.
भट–(सं) पु० योद्धा, वीर. २ भट्ट, भटजी, उपाध्याय. [रिकामा फिरणारा.
भटक्या–स्त्री० चक्कर, रिकामी फेरी. २ वि०
भटकणें–अ० रिकामें फिरणें–हिंडणें.
भटजी–पु० ब्राह्मण, उपाध्या.
भटारखाना–पु० सैंपाकघर, खिचडा.
भटारी–पु० आचारी, स्वयंपाक करणारा.
भडक–वि० फार लाल. २ तेजस्वी.
भडक आग–स्त्री० अंगाची आग–लाही.
भडकणें–अ० पेटणें, चेतणें, आग घेणें.
भडका–पु० आगीचा लोळ. २ अति संताप.
भडकावणें–विणें–अ० मारणें, लगावणें.
भडभडणें–अ० सांगणें, भकणें.
भडभडाट–पु० मोठा आवाज.
भडभडा–ड्या–वि० व्यर्थ भाषण करणारा.
भडभुंज्या–पु० चिवडा बनविणारा.

**भडमार**—पु० भडिमार, एकसारखा हल्ला.
**भडवा**—पु० भाडू, कुटण्या.
**भडाका**—पु० आगीचा लोळ. [दिलेला अग्नि.
**भडाग्न-ग्नि**—(सं) पु० मंत्रविरहित प्रेतास
**भणभण**—स्त्री० वाऱ्याचा सोसाटा, भरभर.
**भणभणणें**—अ० भणभण असा शब्द होणें. २ कपाळ उठणें.
**भणभणाट**—पु० माश्यांचें ओरडणें.
**भणभणीत**—वि० ओकें, बुच्चें, रिकामें, ओसाड. [मिळतात ते.
**भत्ता**—पु० पगाराखेरीज जे रोजंदारी पैसे
**भद्र**—(सं) वि० शुभ, चांगलें. २ स्त्री० चलती. ३ देवळाचा सभामंडप.
**भद्रासन**—(सं) न० सिंहासन, गादी.
**भद्राक्ष**—(सं) पु० फळविशेष, त्याचा वृक्ष.
**भद्या-भद्या कपाळाचा**—वि० दम्र्या, कमनशिबी.
**भदाड**—न० भोगदा, भगदाड.
**भप-प्प**—क्रि० मोठा, फार. २ एकदम.
**भपका**—पु० भबकारा, डौल, थाटमाट. २ वास.
**भय्या**—(सं) पु० भाई-बंधु. २ पुरभय्या.
**भय**—(सं) न० भीति, धास्ती, डर.
**भयंकर**—(सं) वि० भीतिप्रद, घोर.
**भयचकित**—(सं) वि० भयानें घाबरलेला.
**भयप्रदर्शन**—(सं) न० भय दाखविणें.
**भयभीत**—वि० भ्यालेला, भयाभीत. [भयंकर.
**भयाण-न**—वि० भीतिप्रद, ओसाड, घोर,
**भयाभंग होणें**—अ० समूळ नाश होणें.
**भयांभयां**—क्रि० दारोदारीं.
**भर्जन**—(सं) स० भाजण्याची क्रिया, भाजणें.
**भर्त्ता**—(सं) पु० पति, दादला, नवरा.
**भर्रदिशीं**—क्रि० चटकन्, लवकर. [जसें-पोटभर.
**भर**—स्त्री० चेतवणी. २ बहर. ३ भरण. ४ कल. ५ पूर्णता. ६ प्रत्ययासारखा उपयोग केला असतां याचा—भरून—असा अर्थ होतो:

**भरकटणें**—उ० वि० खरडणें, भरभर लिहिणें.
**भरकन्**—क्रि० चटकन्, पटदिशी.
**भरगच्ची**—वि० कलाबतूचें वस्त्र. २ खूप, बहुत. [सलेलें. २ पूर्ण, भरपूर.
**भरचक्का**—वि० पाण्याचा अंश थोडा अ-
**भरजमा**—स्त्री० अविच्छिन्न झालेला वसूल.
**भरजरी**—वि० कलाबतूचें वस्त्र. [हर.
**भरजवानी-ज्वानी**—स्त्री० तरुणपणाचा ब-
**भरड**—वि० जाड, कणमिश्रित. २ स्त्री० साळी भरडून केलेले तांदूळ. [दळणें.
**भरडणें**—स० कण होण्याइतकें दळणें, जाडें
**भरडा**—पु० कळणा, भुगा, जाड दळण. २ जाड दळलेलें तांदूळ व डाळ यांचें मिश्रण.
**भरण**—(सं) न० भर, भरती, भरणी. २ पोषण.
**भरणा**—पु० जमाव, सांठा, भांडार.
**भरणी**—स्त्री० भर. २ नक्षत्रविशेष. ३ श्राद्धविशेष. ४ ठासणी.
**भरणें**—उ० वि० जमा करणें, घालणें, भर करणें. २ होणें, असणें. ३ निपटणें, निकालास लावणें.
**भरतखंड-वर्ष**—(सं) न० हिंदुस्तान.
**भरतशास्त्र**—(सं) न० नाट्यशास्त्र.
**भरती**—स्त्री० चढती, वृद्धि, भरभराट. २ समुद्राच्या पाण्याची वृद्धि.
**भरतें**—न० पूर्णता, पूर्तता. २ उमाळा.
**भरदार**—वि० खूप-गच्च भरलेलें, जाड विणलेलें. [ध्यान्ह.
**भरदोनप्रहर**—स्त्री० दुपारचा मध्य, ऐन म-
**भरधांव**—क्रि० धांव घेऊन, चौखूर, धूम ठोकून. [बहर.
**भरनवती**—स्त्री० भरज्वानी, तारुण्याचा
**भरपाई-यी**—स्त्री० पोंच, पावती.
**भरपूर**—वि० पुरेसें, बस्स, रगड.
**भरभरणें**—अ० भर्र भर्र वाजणें-होणें. २ भरभराट होणें.

**भरभराट**–पु० ऊर्जित दशा, चलती.
**भरभरीत**–वि० खरखरीत, जाड दळलेलें.
**भरवशाचें कुळ**–न० विश्वासू मनुष्य.
**भरवसा**–पु० विश्वास, भरंसा.
**भरविणें**–स० जेऊं घालणें, तोंडांत घालणें. २ समजावणें.
**भरंसा**–पु० विश्वास, भरोसा.
**भराडी**–पु० डौरे गोसावी, जातिविशेष.
**भरारी**–स्त्री० उड्डाण, उडी.
**भराव**–पु० भरणी, पुरणी, भर, भरती.
**भरीत**–न० एक प्रकारचें रायतें. २ (गाडी इत्यादि) वाहन भरे इतकें ओझें.
**भरींव**–वि० भरलेला, घट्ट, पोकळ नव्हे तो.
**भरोसा**–पु० भरंसा, भरवसा, विश्वास.
**भल्ला**–वि० चांगला, खूप. २ क्रि०रगडून.
**भल्ले**–के० शाबास, खाशी.
**भलता**–वि० भलतासा. [तरी. २ गैर.
**भलतासलता**–वि० कांहीं तरी, कोणता.
**भला**–(सं) वि० चांगला, भद्र. २ विश्वासू.
**भलाइकी**–ई–स्त्री० चांगलेपणा, इमान, विश्वास.
**भले**–के० वाहवा, शाबास, खाशी.
**भव्य**–(सं) वि० प्रशस्त, सुंदर, मनोरम.
**भव**–(सं) पु० संसार, इहलोक. २ शिव. ३ जन्म.
**भवतालचा**–वि० भोतालचा, आसपासचा.
**भवतिनभवति**–(सं) स्त्री० वादविवाद, ऊहापोह.
**भवभय**–(सं) न० संसाराची भीति.
**भवानी**–(सं) स्त्री० देवी. २ प्रथमची विक्री.
**भविष्य**–(सं) वि० पुढें होणारें, भावी. २ न० भाकीत.
**भविष्यकाल**–(सं) पु० पुढें होणारा–येणारा काळ–समय. २ व्याकरणसंज्ञाविशेष.
**भविष्यसूचक**–(सं)वि०भाकीत समजावणारें.
**भविष्यज्ञान**–(सं) न० होणाऱ्या गोष्टींची माहिती. [भूत.
**भस्म**–(सं) न०राख, खाक,रखा,विभूति, वि-
**भस्मरंगी**–वि० खाकी रंगाचा, खाकी.
**भस्मरोग**–(सं) पु० रोगविशेष.
**भस्मस्नान**–(सं) न० राखेनें केलेलें स्नान, स्नानाबद्दल भस्म लावणें.
**भस्त्रा**–(सं) पु० भाता, वाऱ्याचें साधन. २ भरभरीत मल, भसरा.
**भसकटणें**–स० भोंसकणें, खुसडणें.
**भसकण–कन**–क्रि० भुसदिशि–नी.
**भसभशीत–सीत**–वि० कोरडें, भरभरीत.
**भसभोंगळ**–वि० भोंगळसुती, अव्यवस्थित, पोकळ.
**भसाडा**–वि० जाडा, मोठा.
**भळ**–वि० दळ्या, भागुबाई. २ अजागळ.
**भाई**–पु० भाऊ, भय्या, बंधु.
**भाईबंद**–पु० नातेवाईक, भाऊबंद.
**भाऊ**–पु० बंधु, भय्या.
**भाऊक**–(सं) वि० भावुक, भाविक.
**भाऊजी–ओजी–वोजी**–पु० दीर, देवर.
**भाऊपणा**–पु० रहस्य,ओळख, जानपछान.
**भाऊबंद**–पु० सोयरेधायरे, नातेवाईक.
**भाक**–(सं) स्त्री० आण, शपत–थ.
**भाकड**–वि० दूध नसलेली.
**भाकडकथा**–स्त्री० रिकाम्या गोष्टी.
**भाकर**–स्त्री० भाकरी, रोटी.
**भाकरमोड्या**–वि० भोजनभाऊ.
**भाकीत**–न० भविष्य. [श्वर्य.
**भाग्य**–(सं) न० दैव, प्रारब्ध,नशीब. २ ऐ-
**भाग्यवंत–वान–शाली**–(सं) पु० दैववान.
**भाग्यहीन**–(सं) वि० प्रारब्धहीन. [दशा.
**भाग्योदय**–(सं) पु० दैवाचा उदय, ऊर्जित
**भाग**–(सं) पु० हिस्सा, वांटा. २ अवयव. ३ क्रि० जरूर, योग्य.

**भागणें**–(सं) उ० वि० नाहींसें होणें. २ भागाकार करणें. ३ काम होणें, चालणें. ४ दमणें. ५ पळणें. [वाह करणें.
**भागविणें**–(सं) निववविणें, मोडणें. २ नि-
**भागाकार**–पु० भाजकानें भाज्यास भागून येणारें उत्तर.२भागण्याची क्रिया. [जाणें.
**भागानगरास जाणें**–अ० पळणें, पळून
**भागी**–स्त्री० वांटा, सरकत, पाती.
**भागुबाई**–पु० भित्रा, भेकड. २ भळू.
**भाचा**–(सं) पु० बहिणीचा मुलगा,भागिनेय.
**भाची**–(सं)स्त्री०बहिणीची मुलगी,भागिनेयी.
**भाज्य**–(सं) वि० ज्याला भागावयाचें तो.
**भाज–जा**–(सं) स्त्री० बाईल, बायको, स्त्री.
**भाजक**–(सं) वि० भागणारा.
**भाजणी**–स्त्री० कांहीं धान्यें भाजून दळलेलें पीठ. २ गणितसंज्ञाविशेष.
**भाजणें**–(सं) अ० शेकणें, पोळणें, जळणें. २ ( भाकर इत्यादि ) तयार करणें.
**भाजन**–(सं) न० पात्र, भांडें. [मोळा.
**भाजी**–स्त्री० शाख. २ वनस्पति. ३ चोळा-
**भाजीपाला**–पु० पालेभाजी. [ठभात.
**भाजीभाकर–री**–स्त्री० साधें जेवण, मी-
**भाट्या**–पु० भाटिया, जातिविशेष.
**भाट**–पु० जातिविशेष, स्तुतिपाठक, चारण. २ वि० बहुभाष.
**भाटी**–स्त्री० मांजर (मादी), माजरी, माऊ.
**भाड**–स्त्री० दलाली, कुंटणपणाची किंमत.
**भाडखाऊ**–पु० भाडू, कुटण्या.
**भाडें**–न० दुसऱ्याच्या मालकीच्या पदार्थाच्या मुदतवार उपयोगासाठीं दिलेले पैसे.
**भाडेकरी**–पु० भाडें देणारा, भाडें घेणारा.
**भाडेंतोडें**–न० भाडें इत्यादि.
**भाडोतरी–त्री**–पु० बिऱ्हाड, भाडेकरू.
**भात्याण**–न० पेंढा. [लेले तांदूळ.
**भात**–न० डांगर, साळी. २ चरु, शिज-

**भातकुली**–स्त्री० मुलींचा जेवणाचा खेळ.
**भातकुलें**–न० भातुकलीचा पदार्थ.
**भाता**–(सं) पु० भस्त्रा, चर्मयंत्रविशेष.
**भातुकली**–स्त्री० ( **भातकुली** पहा. )
**भातें**–न० भत्ता. २ वनस्पतिविशेष.
**भाद्रपद**–(सं) पु० भादवा, हिंदु महिन्यांतला साहवा महिना. [रणें–करवणें.
**भादरणें**–वि० केस काढणें, हजामत क-
**भादरपट्टी**–स्त्री० हजामत,खरड,तासडपट्टी.
**भान**–(सं) न० शुद्ध–द्धि, स्मृति, आठवण.
**भानगड**–स्त्री० तंटा, कलह, वाद, घोंटाळा.
**भानामती**–(सं) स्त्री० जादु, हातचलाखी.
**भानु**–(सं) पु० रवि, सूर्य. २ किरण.
**भाबडा**–(सं) वि० बावळा, साधाभोळा.
**भाम**–स्त्री० मोठी व खोल विहीर.
**भामटा–ट्या**–पु० भुरट्टेचोर, उचल्या.
**भार्या**–(सं) स्त्री० लग्नाची बायको, दारा.
**भार**–(सं) पु०ओझें, बोजा,वजन. २भारंभार.
**भारंग–गी**–(सं) स्त्री० वनस्पतिविशेष.
**भारणें**–उ० वि० मंतरणें. २ कान फुंकणें.
**भारत**–(सं) न०इतिहासविशेष. २लांब गोष्ट.
**भारद्वाज**–(सं) पु० कुकुडकुंभा, पक्षिविशेष. २ ऋषिविशेष. ३ गोत्रविशेष. [वित.
**भारदस्त**–वि० भारोभार. २वजनदार, संभा-
**भारशिंग**–न० सांबराचें शिंग.
**भारा**–(सं) पु० मोठी भारी.
**भारावणें**–अ० जड होणें, जडत्व येणें.
**भारी**–स्त्री० एकत्र बांधलेल्या पेंढ्या. २ क्रि० फार, पुष्कळ.
**भारूड**–न०मोठी गोष्ट–कथा.
**भारोभार**–क्रि०भारंभार,एकसारखे मापानें.
**भाल–ळ**–(सं) न० कपाळ. २ नशीब. ३ चेंडूदांडूच्या खेळांतील शर्त, भास.
**भालकाठी**–स्त्री० भाल्याची काठी.
**भालदार**–पु० वेत्रधारी, चोबदार.

**भालदोरी**–स्त्री० मंतरलेली दोरी. गंडा.
**भाला**–पु०भल्ल,शस्त्रविशेष.२दोरीनें बांधणें.
**भालू**–स्त्री० ह्मातारा कोल्हा, पशुविशेष.
**भालेकरी**–पु० भाला बाळगणारा.
**भालेराई**–स्त्री० पुंडाई, अंदाधुंदी.
**भाव्य**–(सं) वि० होणारें, भाकीत.
**भाव**–(सं) पु० हेतु, मुद्दा. २ दर, निरख, ३ आदा, अभिनय. ४ नातें, पणा. ५ भक्ति, श्रद्धा. ६ अस्तित्व, सत्ता. ७ मनोविकार. ८ भावार्थ.
**भावजई–य**–(सं) स्त्री० भावाची बायको.
**भावणें**–उ० वि० मानणें, समजणें.
**भावंडें**–न० भाऊ किंवा बहीण, एक्या आईबापांचीं मुलें.
**भावना**–(सं) स्त्री० कल्पना, समज. २ कृति. ३ रोगोद्भव. ४ संस्कार,पुट. ५स्वभाव.
**भावभक्ति**–(सं) स्त्री० श्रद्धा, निश्चय.
**भावला,भावली**–बाहुली, (**बाहुला** पहा.)
**भावार्थ**–(सं) पु० मुद्दा, तात्पर्य.
**भावार्थी**–(सं) वि० भाविक, भोळा.
**भाविक**–(सं)वि०भक्तिवान्.२भावार्थी,भोळा.
**भाविकजन**–पु० भक्तमंडळ, भक्त.
**भाऊक**–(सं) वि० भक्तिवान्. २ होणारें.
**भावी**–(सं) वि० होणारें, भविष्यमाण, होष्यमाण.
**भाष्य**–(सं) न० मूळ ग्रंथावरील व्याख्या, टीका ( वैदिक व शास्त्रीय ग्रंथांवरील टीकेसच हा शब्द लावतात. )
**भाष्यकार**–(सं) पु०टीकाकार,व्याख्याकार.
**भाष**–(सं) स्त्री० वचन, भाक.
**भाषण**–(सं) न० बोलणें, व्याख्यान.
**भाषा**–(सं) स्त्री० बोली.२ व्याख्या, टीका.
**भाषांतर**–(सं) न० तरजुमा, छाया. २ दुसरी भाषा.
**भाषाशास्त्र**–(सं) न० व्याकरण.
**भास्कर**–(सं) पु० रवि, सूर्य, भानु.
**भास्वर**–(सं) न० तेजस्वी. [चाल, रीति.
**भास**–(सं) पु० संशय, शंका.२ अट,शर्त.३
**भासणें**–अ० वाटणें,शंका येणें, समजणें.
**भाळ**–(सं)न०( **भाल** पहा. )
**भाळणें**–उ० वि० भारणें. २ फिदा होणें.
**भाळवणपत्र**–न० वशिल्याचें पत्र, भलावण.
**भाळाभोळा**–वि० साधाभोळा, भाबडा.
**भांग्या**–वि० भांग पिणारा,गांजेकस, भांगट.
**भांग**–पु० दोन बाजूंस केस झाल्यावर मध्यें जी जागा रहाते ती. २ भंग. ३ घोटा.
**भांगणें**–अ० भंगणें, फुटणें.
**भांगेमध्यें तुळस**–स्त्री० वाईटांत चांगलें, कोळश्यांत हिरा.
**भांजणी**–स्त्री० गणितसंज्ञाविशेष.
**भांडण**–न० कज्जा, तंटा, कलागत.
**भांडणें**–अ० लढाई करणें, तंटा करणें.
**भांडवल**–न० मूळ रक्कम, व्यापारांत घातलेला पैसा.
**भांडार**–(सं) न० खजिना, निधि, निधान.
**भांडींकुंडीं**–न० पात्रें इत्यादि, संसार.
**भांडें**–न० पात्र, भाजन, बासन.
**भांत**–न० अनेक प्रकार.
**भांबावणें**–अ० घोंटाळणें, घाबरणें.
**भांसकटणें**–स० गळफटणें.
**भिक्षा**–(सं) स्त्री० भीक, दान.
**भिक्षाटन–ण**–(सं) न० भिक्षेकरितां हिंडणें.
**भिक्षार्थी**–(सं) पु० भिक्षेकरी, भिकारी.
**भिक्षाळ–वळ**–(सं) स्त्री० मुंजींतील नव्या ब्रह्मचाऱ्यानें मागितलेली भिक्षा व तो समारंभ.
**भिक्षु**–(सं) पु० संन्यासी.२ भिक्षावृत्ति.
**भिक्षुक**–(सं) पु० भिक्षावृत्ति करणारा,भिक्षु.
**भिक्षुकी**–स्त्री० भिक्षुकाची वागणूक–वृत्ति.
**भिक्षेकरी**–पु० भिक्षार्थी, भिकारी.

**भूत**-(सं) न० प्राणी. २ पिशाच. ३ काळ-विशेष. ४ वि० झालेला.
**भूतखाना**-पु० मसण, श्मशान.
**भूतचेष्टा**-स्त्री० पिशाचांचा उपद्रव-संचार.
**भूतदया**-(सं) स्त्री० प्राण्याविषयीं काळजी-कीव.
**भूतपीडा-बाधा**-स्त्री० बाधा.
**भूतसंचार**-(सं) भूतबाधा, भूत अंगांत येणें.
**भूति**-(सं) स्त्री० ऐश्वर्य. २ उत्पत्ति. ३ भस्म.
**भूदेव**-(सं) पु० ब्राह्मण.
**भूधर**-(सं) पु० शेष. २ पर्वत.
**भूप**-(सं) पु० नृप, राजा, बादशाहा.
**भूपाल**-(सं) पु० राजा, नृप.
**भूपाळी**-स्त्री०( भुपाळी पहा. )
**भूभार**-पु० व्यर्थ भार, पृथ्वीचा भार-वजन.
**भूमि**-(सं) स्त्री० पृथ्वी, जग. २ जमीन.
**भूमिकंप**-(सं) पु० भूकंप, जमीन हलणें.
**भूमिका**-(सं) स्त्री० मूळ, भूमि, जागा. ३ सोंग, वेष.
**भूमिति**-(सं) स्त्री० भूमीचें प्रमाण.
**भूमितिश्रेढी**-(सं) स्त्री० गणित संज्ञाविशेष.
**भूर**-स्त्री० नेत्रांतील सारा.
**भूल**-स्त्री० चूक, भ्रम, भुरळ.
**भूलोक**-(सं) पु० इहलोक, भूमि, पृथ्वी.
**भूषण**-(सं) न० दागिना. २ शोभा.
**भूषविणें**-स० शोभवणें.
**भूस**-न० तूस, कोंडा, भुसा.
**भृकुटी**-(सं) भिवई, भोवई.
**भृंग**-(सं) पु० भ्रमर, भुंगा.
**भृंगा-गी**-(सं) स्त्री० भांगेचें झाड, ज्ञानवल्ली.
**भृंगिराज**-(सं) पु० माका.
**भृगुवार**-(सं) पु० शुक्रवार.
**भे**-न० भय, भीति.
**भेक**-(सं) पु० बेडूक, मंडूक, बेटकुळी.
**भेकड**-वि० भित्रा.
**भेकर**-न० पशुविशेष.
**भेग**-स्त्री० चीर, फट.
**भेट**-स्त्री० बक्षीस, देणगी, नजर. २ गांठ.
**भेटणें**-उ० वि० गांठ पडणें-घेणें, मुलाखत करणें-होणें.
**भेटबकरा**-पु० वरमाईचा मानविशेष.
**भेटविणें**-स० ओळख करून देणें, मिलाफ करणें.
**भेड**-वि० भ्याड, भित्रा, भेडसर.
**भेडसावणें-डावणें-डाविणें**-स० भय दाखविणें, घाबरवणें.
**भेणें**-अ० भिणें. २ भयानें.
**भेद**-(सं) पु० वियोग. २ विरुद्धपणा. ३ फरक, फेर. ४ प्रकार. ५ दुजा भाव. ६ बातमी, मसलत. ७ फितूर, फिसाद.
**भेदणें**-उ० वि० वियोग करणें, छेदणें, लागणें, मारणें.
**भेदरणें**-अ० घाबरणें, भिणें.
**भेदाभेद**-पु० दुजाभाव, भेदभाव.
**भेदी-द्या**-वि० भेदणारा, मसलती.
**भेरी**-(सं) स्त्री० मोठा नगारा.
**भेल**-स्त्री० मिसळ, मिश्रण.
**भेलकंडी**-स्त्री० झुकांडी, झोंकांडी.
**भेलगा**-पु० वृषण, अंड.
**भेलणें**-अ० मिळणें, एक होणें.
**भेला**-(सं) पु० गोळा.
**भेली**-(सं) स्त्री० ढेप.
**भेश-ष-स**-(सं) पु० वेष-श, पोषाख-क.
**भेषज**-(सं) न० औषध, दवा.
**भेसर**-वि० भेंकड-भेकड, भित्रा.
**भेसुर**-वि० भयंकर.
**भेळ**-स्त्री० मिसळ, मिलाफ.
**भें**-न० भय, भीति, धाक, धास्ती.
**भेंकट-ड**-वि० भित्रा, भ्याड, भिणारा.
**भेंड**-न० ( भुरकुंड पहा. )

**भेंडी**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**भेंडोळें**–न० गुंडाळें, गुंडाळी.
**भेसूर–भेसूर**–वि० भयप्रद, धास्तीचा.
**भैरव**–(सं) पु० रागविशेष. २ देवविशेष, बहिरोबा. ३ भूषणविशेष.४वि० भयंकर.
**भोई**–पु० डोलकर, कहार, कोळी.
**भोक्तव्य**–(सं) न० भोगण्यास योग्य.
**भोक्ता**–(सं) वि० उपभोग घेणारा, भोगी, ग्राहक. २ चांगला ( पुष्कळ ) जेवणारा.
**भोक्तृत्व**–(सं) न० भोगावयाचें तें. २नशीब, दैव, कपाळ.
**भोक–भोंक**–(सं) न० छिद्र, बीळ. २संधान.
**भोकणें**–उ० वि० कुत्र्याचें ओरडणें.
**भोकसा**–पु० छिद्र, भोंक, भगदाड.
**भोग्य**–(सं) वि० भोगण्यास योग्य, उपयोगी.
**भोग्या**–पु० लहान मुलांच्या खेळांतील विशिष्ट मनुष्य, मध्यस्थ. २ (सं) स्त्री० धर्मपत्नी ( लग्नाच्या पहिल्या सजातीय बायको ) शिवाय बायको.
**भोग**–(सं) पु० उपभोगण्याचा व्यापार. २ उपभोग. ३ मैथुनसुख.
**भोगणें**–उ० वि० उपभोग–योग करणें.
**भोगवटा**–पु० वहिवाट, वापर, उपभोग.
**भोगी**–(सं) वि० भोक्ता, हौशी, शोकी. २ स्त्री०मकर संक्रांतीच्या अगोदरचा दिवस.
**भोज्य**–(सं) न० खाद्य, खाजें. २ वि० भोजन घालण्यास योग्य.
**भोजन**–(सं) न० खाणें, जेवण.
**भोजनभाऊ**–पु० भोजनार्थी.
**भोत**–पु० मोठा थैला, थोर कोथळा.
**भोपी–प्या**–पु० उपाध्या.
**भोम**–न० वारूळ.
**भोरपी**–(सं) पु० बहुरूपी, ( हा मूळ अर्थ, परंतु हल्लीं ) डोंबारी (लोकांस लावतात).
**भोरा**–वि० भुरा, पांढुरका. २ भोवरा.

**भोवरा–भोंवरा**–वि० वाटोळा फिरणारा. पु० भोंवरीचें फळ. ३ प्राणिविशेष. ४ मुलांचे खेळण्याचें एक द्रव्य. ५ आवर्त, पाण्याचें वाटोळे फिरणें.
**भो–भोंवरी**–स्त्री० लताविशेष. २ कांटा वगैरे लागल्याजागीं वाढणारें कातडें.
**भोवळ–भोंवळ**–स्त्री० भोंड, चक्कर.
**भोसकणें–भोंसकणें**–अ० टोंचणें, खोचणें.
**भोसका**–पु० भगदाड, मोठें भोंक.
**भोसडणें**–अ० पच्ची करणें,फजेती करणें.
**भोसडपट्टी**–स्त्री० खरडपट्टी, बचेरी.
**भोसडी–भोंसडी**–स्त्री० उपस्थ.
**भोळवट–सर**–वि० साधा, भोळा.
**भोळा**–वि० साधा, भावार्थी, निष्कपट.
**भोळें**–न० न० भोळेपणानें गमावलेलें किंवा घेतलेलें द्रव्य पदार्थ इत्यादि.
**भौंकणें**–न० कुत्र्याचें ओरडणें. [विशेष.
**भौंकर–भोकर**–न० फळविशेष. २ भूषण-
**भौंकरी–भोकर**–स्त्री० भोंकराचें झाड.
**भौंगळ–ळा**–वि० ढिला, पोकळ.
**भौंगळी**–वि० भोळी.
**भौंदणें**–अ० वश करून घेणें.
**भौंदू**–वि० दांभिक, ढोंगी, लबाड.
**भौंपळ्या रोग**–पु० सशक्तपणा.
**भौंपळा**–पु० फळविशेष, तुंबा, कद्दु.
**भौंपळी**–स्त्री० भोंपळ्याचा वेल.
**भौंवणें–भोवणें**–अ० भोंवंडणें, त्रास देणें–येणें, मळमळणें. २ सोसावें लागणें.
**भौम**–(सं) पु० मंगळ. २ वि०भूमीसंबंधी.
**भौमवार**–(सं) पु० मंगळवार.
**भंग**–(सं) स्त्री० भांग, ज्ञानवल्ली. २ डग. ३ छेद, मोड. [ निशाबाज.
**भंगट–ड**–वि० गांजेकस, भांग पिणारा. २
**भंगणें**–अ० फुटणें, मोडणें.
**भंगी**–पु० हेतर, झाडूवाला, हलालखोर.

**भंगीचंगी**–वि॰ छिचोर, रंडीबाज.
**भंगुर**–(सं) वि॰ क्षणिक.
**भंजन**–(सं) न॰ मोडणें, मारक–नाशक उपाय.
**भंडार**–पु॰ पिठी हळद.
**भंडारा**–पु॰ गोसावी बैरागी इत्यादिकांस दिलेलें भोजन.
**भंडारी**–पु॰ जातिविशेष, पिण्याची दारू करणारा.
**भंडावणें**–स॰ त्रास आणणें–देणें.
**भंबेरी**–स्त्री॰ बचेरी, फटफजेती.

---

## म.

**म**–पंचाविसावें व्यंजन. २ मध्यम.
**म्यान**–(फा)न॰ मेण, तरवारीचें आच्छादन.
**म्याना**–(फा) पु॰ एकप्रकारची डोली,मेणा.
**म्यौ**–स्त्री॰ मांजराचा शब्द–ओरडणें. २ मांजर.
**म्लान**–(सं) वि॰ फिका, मलूल.
**म्लेच्छ–म्लेंछ**–(सं) यवन, हिंदु खेरीजचे लोक, परधर्मी.
**म्हण**–स्त्री॰ वाक्य, आधार.
**म्हणजे**–उ॰ अर्थ, तरजुमा, किंवा.
**म्हणणें**–स॰ बोलणें, पढणें. २ न॰ भाषण, बोलणें. ३ वेदाध्ययन, वेदपाठ.
**म्हणून**–उ॰ या कारणास्तव.
**म्हशा**–पु॰ रेडा, हल्या.
**म्हसासुर**–पु॰ म्हसोबा.
**म्हातारचळ**–पु॰वृद्ध दशेंतील संवय, भ्रांति.
**म्हातारा**–(सं) वि॰वृद्ध,जरठ,उतार वयाचा.
**म्हातारी**–(सं) स्त्री॰ वृद्ध झालेली, उतार वयाची. २ रुईच्या फळांतील द्रव्यविशेष. ३ आई, माता.
**म्हेतर**–(सं) पु॰ भंगी, हलालखोर.
**म्हेतराणी**–स्त्री॰ भंगीण.
**म्हैस**–(सं) स्त्री॰ महिषी, रेडी.
**म्हैसा**–(सं) पु॰ रेडा, टोणगा, हल्या.
**मऊ**–(सं) वि॰ नरम, गुळगुळीत, मृदु.
**मक्ता**–(आ) पु॰ ठेका, उक्तें काम.
**मक्तेकरी–दार–वाला**–पु॰ ठेकेदार–वाला.
**मक्षिका**–(सं) स्त्री॰ माशी.
**मकडी**–(सं) स्त्री॰ वानर, माकड.
**मकर**–(सं)पु॰दाहवी रास. २नक्र,सुसर,मगर
**मकरंद**–(सं) पु॰ पुष्पांतील रस, मध.
**मकरसंक्रमण–संक्रांति**–(सं) स्त्री॰ सूर्याचे मकर राशीस जाणें.
**मकराणी**–सा॰ जातिविशेष.
**मका**–पु॰ धान्यविशेष, मकई, मकाणा.
**मकाण–न**–न॰ इमारत, इमला, वाडा, घर.
**मख्ख**–वि॰ अभेद्य, निगरगट्ट.
**मख**–पु॰ यज्ञ.
**मखमल–माल**–(आ) स्त्री॰ अति मृदु वस्त्र. २ फुलझाडविशेष, झेंडू.
**मखर**–न॰ जाळ्यांची ताटी, मंडपविशेष.
**मखलाशी–सी**–(फा) स्त्री॰ लेखी हुकूम,शेरा. २ सही.
**मख–ख्खी**–स्त्री॰ खुबी, मर्म, युक्ति.
**मग्न**–(सं) वि॰ तल्लीन, चूर, बुडालेला.
**मग**–क्रि॰ नंतर, पुढें, पश्चात्.
**मगज**–(फा) पु॰ गीर, मेंदू, गर.
**मगजी**–(फा) स्त्री॰ कोर, कंगोरा, किनार, कांठ.
**मगदूर**–(आ) स्त्री॰ बिशाद, पुण्याई. २ सामर्थ्य, शक्ति.
**मगन**–(सं) वि॰ मग्न, चूर, गढलेला.
**मगनमस्त**–वि॰ झिंगलेला, निशा केलेला.
**मगर**–(सं) स्त्री॰ सुसर, नक्र.
**मगरमिठी**–स्त्री॰ बळकट मिठी.
**मगरूरी**–स्त्री॰ मुजोरी, उद्धटपणा,बेपर्वाई.
**मघा**–(सं) न॰ नक्षत्रविशेष.
**मघां–घांशीं**–क्रि॰ थोड्या वेळापूर्वी.

**मच्छ**–(सं) पु० मासा.२ प्रथम अवतार.
**मच्छर**–पु० डांस, चिलिट.
**मच्छरदानी**–(फा)स्त्री० डांस इत्यादिकांच्या निवारणार्थ,केलेली कपड्याची खोली,भोत.
**मचमच**–स्त्री० जेवतांना तोंड वाजविणें.
**मचवा**–पु० लहान जहाज–तारूं. होडी.
**मचूळ**–वि० मळमळित, कमी चवीचें.
**मज्जा**–(सं) स्त्री० शरीरांतील एक धातु.
**मज्जाव**–स्त्री० मनाई, प्रतिबंध.
**मजकूर**–(आ) पु० वर्तमान, वृत्त. २ वि० वर लिहिलेला, पूर्वी सांगितलेला.
**मजबुती**–(फा) स्त्री० सामर्थ्य,बळ,बळकटी.
**मजबूत**–(आ) वि० बळकट, भक्कम.[फिरणें.
**मजल**–(आ) स्त्री० दहा कोस. २ चाल,
**मजलदरमजल**–क्रि० मजल करितां करितां.
**मजलस**–(आ) स्त्री० सभा, कचेरी,मजालस.
**मजला**–पु०माळ. २ माडी. ३हिस्सा, भाग.
**मजा**–(फा) स्त्री० गम्मत, मौज.
**मजाल**–(आ) स्त्री० शक्ति,सामर्थ्य,बुनियाद.
**मजुरी**–(फा) स्त्री० मोल, हाशील, रोजमुरा. २ काबाड काम.
**मजूरा घालणें**–वि० वजा, कमी करणें.
**मजूर-दार**–(फा) पु० मोलकरी, गडी, कामकरी.
**मजेदार**–(फा) वि० मजेचा, गमतीचा.
**मट्ट**–वि० गुपचिप, उगीच. [मुकाट्यानें.
**मटकन–कर–दिशी**–क्रि०गटकन–दिशी.२
**मटकी**–स्त्री० धान्यविशेष.
**मठ्ठ**–वि० सुस्त, आळशी, मंद.
**मठ्ठा–ठा**–पु० दाट ताक.
**मठ**–पु० गोसावी संन्याशी रहाण्याची जागा.
**मठार**–पु० पांढरा वाटाणा.
**मठारणें–ळणें**–उ०वि० जखम भरत येणें.२ पात्रादिकांचे खांच खळगे नाहींसे करणें. ३प्रवृत्ति कराविणें. ४ कबूल होईसें करणें.

**मडकें**–न० मृत्तिकापात्र, गाडगें.
**मडें–ढें**–न० प्रेत, निर्जीव देह; शव.
**मढणावळ**–स्त्री०मढविण्याची मजूरी–किंमत.
**मढविणें**–स० कातडें घालणें–चिकटविणें.
**मडवळ**–पु० धोबी, परीट, रजक.
**मण**–पु० ( वजनी ) चाळीस शेर, (मापी) बारा किंवा सोळा पायली. ( देश भेदानें ह्याचें प्रमाण भिन्न आढळतें. ) २ मणाचें ओझें–वजन.
**मणका**–पु० पाठीच्या हाडाचा खडा–गांठ. २मणाचें वजन. ३मोठा मणि. [चा भाग.
**मणगट**–न० पंजाचा सांधा व कोपरापर्यंत-
**मणगटी**–स्त्री० दागिनाविशेष.
**मणि–णी**–(सं) पु० रत्न. २ माला बनण्याजोगता केलेला खडा. ३ कपी.
**मणेर–मण्यार**–(सं) स्त्री० सर्पविशेष. २ जातिविशेष.
**मत्कुण**–(सं) पु० ढेकूण, खटमल.
**मत्त**–(सं) वि० माजलेला. [माजलेली.
**मत्ता**–(आ) स्त्री० पुंजी, ऐवज.२ (सं) वि०
**मत्सर**–(सं) पु० द्वेष, हेवा.
**मत्स्य**–(सं) पु० मासा, मच्छी.
**मत**–(सं) न० अभिप्राय, ह्मणणें, बेत.
**मतलब**–(आ) पु० अर्थ, हेतु, आशय, अभिप्राय, तात्पर्य. [यण सांगणारा.
**मतलबी**–वि० कामसाधु, ताकापुरतें रामा-
**मताभिमानी**–(सं) पु० मतवादी.
**मति**–(सं) स्त्री० बुद्धि, धारणाशक्ति.
**मतिभ्रम**–(सं) पु० बुद्धिभ्रंश. [बुद्धीचा.
**मतिमंद**–(सं) वि० जडबुद्धि, मूढ, मंद
**मतिमान**–(सं) वि० बुद्धिवान्. [घुसळणें.
**मथणें**–(सं) उ० वि० अनुकूल होणें. २
**मद्य**–(सं) न० सुरा, शराब, दारू.
**मद्यपान**–(सं) न० दारू पिणें.
**मद्यपी**–(सं) पु० दारू पिणारा.

**मद**–(सं) पु० गर्व, उन्मत्तता. २ माजलेल्या हत्तीच्या गंडस्थळांतून होणारा स्राव.
**मदत–द**–(आ) स्त्री० सहार्य्य. २ अंमल–निशाविशेष. [ दतनीस.
**मदतगार**–(फा) पु० साहाय्य करणारा, म-
**मदतगारी**–(फा) स्त्री० साहाय्य, मदत.
**मदन**–(सं) पु० काम, मन्मथ. [ बाण.
**मदनबाण**–पु० एक फुलझाड. २ मदनाचा
**मदनमस्त**–वि० कामांध, विषयांध.
**मदनमूर्ति**–(सं) पु० मदनाचा पुतळा.
**मदांध**–(सं) वि० उन्मत्त, माजलेला.
**मदार**–(आ) स्त्री० भिस्त. २ उंटाच्या पाठीवरील उंचवटा.
**मदारी**–पु० जादूचा खेळ करणारा, जादूगार.
**मदिरा**–(सं) स्त्री० दारू, सुरा, शराब, मद्य. २ सवाई, छंदविशेष.
**मदोन्मत्त**–(सं) वि० गर्विष्ट, उन्मत्त.
**मध्य**–(सं) पु० गर्भ. २ मध्यबिंदु. ३ दोन भागांचा संधि. [ अवकाशांत.
**मध्यंतरीं**–क्रि० अधांतरीं, मध्यें, मधल्या
**मध्यबिंदु**–(सं) पु० गर्भ, मध्य.
**मध्यम**–वि० मधला. २ साधारण. [र रात्र.
**मध्यरात्र**–(सं) स्त्री० रात्रीचा मध्य, दोन प्रह-
**मध्यरेषा**–(सं) स्त्री० मधोमधची रेघ–खा.
**मध्यस्थ**–(सं) वि० मध्यवर्ती. २ पु० दलाल. ३ निर्णायक, निर्णय करणारा. ४ कुटण्या.
**मध्यान्ह**–(सं) स्त्री० माध्यानकाल, दुपार, अपराण्ह.
**मध्यें**–श० आंत, ठायीं.
**मध**–(सं) पु० स्त्री० मधु, सेद–त. २ मकरंद, पुष्परस.
**मधचा–ला**–वि० मधील, आंतला.
**मधमाशी**–(सं) स्त्री० मधुमक्षिका.
**मधु**–(सं) पु० मध. २ वसंतऋतु.
**मधुकर**–(सं) पु० भ्रमर, भुंगा.
**मधुकरी**–(सं) स्त्री० भ्रमरी. २ शिजल्या अन्नाची भिक्षा मागणारा. ३ पु० शिजल्या अन्नाची भिक्षा.
**मधुमक्षिका**–(सं) स्त्री० मधमाशी.
**मधुर**–(सं) वि० गोड, स्वादिष्ट. २ कर्णादि इंद्रियांना प्रिय. ३ पु० रसविशेष.
**मधुरा**–(सं) पु० ज्वरविशेष.
**मधून**–क्रि० मध्यभागांतून–पासून.
**मधोमध**–क्रि० मध्यभागीं, निमेनिम.
**मन्मथ**–(सं) पु० मदन, काम.
**मन्वंतर**–(सं) न० काळ, वेळ, मनु. २ दुसरा मनु.
**मन**–(सं) न० सुखदुःख समजणारें इंद्रिय. २ ध्यान, स्मृति. ३ नाद, छंद, प्रीति.
**मनःकल्पित**–(सं) वि० मनानें रचलेलें–कल्पिलेलें.
**मनकवडा**–पु० मनांतील हेतु जाणणारा.
**मनकामना**–(सं) स्त्री० इच्छा, हेतु.
**मनदेवता**–(सं) स्त्री० मन, अंतःकरण.
**मनधरणी**–(सं) स्त्री० मनवळवणी.
**मनन**–(सं) न० ध्यास, विचार.
**मनःपूत**–(सं) वि० मनाला पवित्र वाटणारें. २ मन मानेल तें, यथेच्छ, स्वैर, मनसोक्त.
**मनःपूर्वक**–(सं) वि० मनापासून, इमानेंइतबारें. [ तसें–तितकें.
**मनमुक्त**–क्रि० मनमुराद, यथेच्छ, वाटेल
**मनस्वी**–(सं) वि० मानी, स्वाभिमानी. २ पुष्कल, विपुळ, फार, अतिशय.
**मनसब**–(आ) स्त्री० रिसाला.
**मनसुबा**–(आ) पु० बेत, इरादा, हेतु.
**मनसुबी**–(आ) स्त्री० पंचाईत. [ स्वैर.
**मनसोक्त**–(सं) वि० मन मानेल तें, यथेच्छ,
**मना**–(आ) स्त्री० अडथळा, हरकत, प्रतिबंध.
**मनाई**–(फा) स्त्री० बंदी, मना.
**मनीषा**–(सं) स्त्री० बुद्धि, मति. २ इच्छा.

**मनु**–(सं) पु० काळ. २ हिंदूंचे कायदे करणारांपैकीं एक.
**मनुज**–(सं) पु० मनुष्य, मानव.
**मनुष्य**–(सं) न० माणूस, नर.
**मनुष्यपण**–न० माणुसकी.
**मनूक**–(फा) स्त्री० सुकलेलें द्राक्ष.
**मनेच्छा**–(सं) स्त्री० मनीषा. [ हेतु, बेत.
**मनोगत**–(सं) मनांतलें. २ न० इंगित,
**मनोगति**–(सं) स्त्री० मनाचा वेग.
**मनोती**–स्त्री० व्याजाबद्दल प्रथम कापून घेतलेली रक्कम.
**मनोदय**–(सं) पु० हेतु, आशय.
**मनोधर्म**–(सं) पु० मनोवृत्ति. [ त्मसंयमन.
**मनोनिग्रह**–(सं) पु० निश्चय, नियम, आ-
**मनोभंग**–(सं) पु० निराशा.
**मनोभाव**–(सं) पु० मनोदय, आशय. २ भक्ति, भाव, श्रद्धा.
**मनोरंजक**–(सं) वि० मनोरम, मनोहर.
**मनोरथ**–(सं) पु० मनोदय, इच्छा, हेतु.
**मनोरम**–(सं) वि० मनोहर, मोहक.
**मनोरमा**–(सं) स्त्री० मनोहर, मनाला रमविणारी.
**मनोरा**–(आ) पु० कळस, शिखर, मिनारा.
**मनोविकार**–(सं) पु० मनोधर्म, मनोवृत्ति, कामक्रोधादिक.
**मनोवृत्ति**–(सं) स्त्री० मनोधर्म, मनोव्यापार.
**मनोवेग**–(सं) पु० मनोगति, मनोजव.
**मनोव्यापार**–(सं) पु० मनोवृत्ति, मनोधर्म.
**मनोहर**–(सं) वि० मनोरम, मोहक.
**मम**–(सं) वि० माझें.
**ममत्व**–(सं) न० } माया, दया. २ अहं-
**ममता**–(सं) स्त्री० } कार, अहंता.
**ममतालु**–ळु–वि० मायाळू.
**मय**–प्रत्ययविशेषः याचा अर्थ–पूर्ण, भरलेला–असा होतो; जसें–जलमय.
**मयत**–वि० मेलेला, कैलासवासी. [ विशेष.
**मयूख**–(सं) पु० किरण. २ धर्मशास्त्र ग्रंथ-
**मयूर**–(सं) पु० मोर, नीलकंठ.
**मयूरी**–(सं) स्त्री० लांडोर, मोर ( मादी ).
**मर्कट**–(सं) न० माकड, वानर.
**मर्जी**–(आ) स्त्री० खुषी. २ कृपा, प्रसन्नता.
**मर्त्य**–(सं) वि० मनुष्य, मनुज. [ वान्.
**मर्द**–(फा) पु० पुरुष, नर. २ वि०शूर,धैर्य-
**मर्दणें**–(सं)उ०वि०मळणें,चोळणें.२ मारणें.
**मर्दा–ना**–(फा) वि० धीट, धैर्यवान्.
**मर्दाई–मर्दुमी–मर्दी**–(फा) स्त्री० पुरुषार्थ. २ मोठेपणा. ३ मनुष्यपणा. [ पाचें.
**मर्दानी**–(फा) वि० पुरुषायोग्य–जोगतें,पुरु-
**मर्म**–(सं) न० खुबी, तत्त्व, युक्ति, तात्पर्य. २ जीवनस्थान, ज्या ठिकाणीं प्रहार झाल्यानें तत्काळ मरण येतें असा शरीराचा भाग, वर्म.
**मर्मभेद**–(सं) पु० जिव्हाळीं–रीं लागणें.
**मर्मज्ञ**–(सं) पु० तत्वज्ञानी, खुबी जाणणारा, सहृदय.
**मर्यादशीर–ल**–वि० आदबशीर, विनीत, विनयशील, ( स्त्रियांच्या संबंधानें ) शालीन, लाजाळू.
**मर्यादा**–(सं) स्त्री० सीमा, नियम.
**मरगळ**–स्त्री० लंवी, थकवा. [घी, थकवा.
**मरगी**–स्त्री० जरीमरी, वाखा.२ मरगळ,लं.
**मरण**–(सं) न० मृत्यु, मौत, प्राणोत्क्रमण.
**मरणकळा**–(सं) स्त्री० प्रेतकळा.
**मरणें**–अ० मृत्यु येणें, नाहींसें होणें.
**मरणोन्मुख**–(सं) वि० मृतप्राय, मरण जवळ ठेपलेला, आसन्न (मरण).
**मरतमडें–ढें**–न० रोड, मरतुकडा.
**मरतुकडा**–वि० रोड, रोडका, किडकिडित.
**मरफा**–(फा) पु० वाद्यविशेष. २ शिल्पशस्त्रविशेष, मोठी कानस.

**मरवा**–(सं) पु० वनस्पतिविशेष. [ काव्य.
**मरशा**–(आ)पु० कवितविशेष, मरणासंबंधें
**मरळ**–स्त्री० मरगळ, ज्वरांश.
**मराटमोळा**–पु० पडदा, बुरखा.
**मराठी**–(सं) स्त्री. महाराष्ट्र भाषा. २ वि० मराठ्यां संबंधी. [ब–पदवी.
**मरातब**–(आ) पु० सन्मान, सत्कार, किता-
**मरामत**–(आ) स्त्री० डागडूजी, निगा.
**मरी**–(सं) स्त्री० वाखा, जरीमरी. २ गरमी.
**मरीच**–(सं) न० मिरीं, मिरें.
**मल्ल**–(सं) पु० पहिलवान, जेठी.
**मल्लयुद्ध**–(सं) न० कुस्ती, झोंबी.
**मल–ळ**–(सं) पु० गू, विष्ठा. २ घाण.
**मलई**–स्त्री० साय.
**मलंग**–पु० पैलवानाचा पुतळा.
**मलद्वार**–(सं) न० गांड, गुदद्वार.
**मलपृष्ठ**–(सं) न०पुट्ठा,पुस्तकाचें आच्छादन.
**मलम**–(फा) न० मऊ औषधविशेष, मवारी.
**मलमल**–स्त्री० बारीक कापड.
**मलमास**–(सं) पु० अधिक महिना.
**मलविसर्ग–विसर्जन**–(सं) न० हागणें, परसाकडे, शौच. [ होणें.
**मलावरोध**–(सं) पु० मलावष्टंभ, शौचास न
**मलिन**–(सं) वि० मळकट, घाणेरा.२कपटी.
**मलूल**–(आ) वि म्लान, श्रांत, थकलेला.
**मवाई**–स्त्री० मवारी, मऊपणा, नरमपणा.
**मवास**–(आ) वि० स्वतंत्र, वसू, अलग.
**मवाळ**–वि० मवाई, मवारी.
**मशक**–(सं) स्त्री० मसक, पखाल. २ न० चिलीट.
**मशरू**–पु० रेशमी वस्त्रविशेष.
**मशागत**–(फा) स्त्री० श्रम, मेहनत, खटपट, ऊर्जा, तजवीज, निगा.
**मशारनिल्ले–ल्हे**–(आ) वि० येणारे–पाठविलेले गृहस्थ, वर सांगितलेले गृहस्थ.
**मशाल**–(आ) स्त्री० दांड्यावांचूनची दिवटी, अति मोठा काकडा.
**मशालची–जी**–(फा) पु० मशाल धरणारा.
**मशीद**–(आ) स्त्री० मुसलमानांचें देवालय मठ इत्यादि इमारत.
**मषी–स–शी**–(सं) स्त्री० शाई. २ काजळ.
**मस्करी**–(आ) स्त्री० थट्टा, कुचाळी.
**मस्तक**–(सं) न० कपाळ, माथा, डोकें.
**मस्ती**–(आ) स्त्री० माज, गुरमी. २ कैफ.
**मस**–(सं) स्त्री० धुराचें काजळ, राखुंडी.
**मसणवट–वाटी**–(सं) स्त्री० मसण,श्मशान.
**मसणा**–सा० फलाणा, अनियमित.
**मसलत**–(आ) स्त्री० विचार, सल्ला, युक्ति.
**मसलतदार**–(फा) पु० मसलती, कारस्थानी.
**मसाला**–(आ) पु० वस्वार, अनेक पदार्थांचें बळकटी किंवा स्वाद देणारें मिश्रण.
**मसुदा**–(आ) पु०नमुन्याचा लेख,प्रत,खरडा.
**मसूर**–(सं) स्त्री० धान्यविशेष.
**मसूरिका–सूरी**–(सं) स्त्री० रोगविशेष.
**महकूब**–(फा) बंद, तहकूब.
**महकुबी**–स्त्री० बंदी, तहकुबी.
**महत्**–(सं) वि० मोठा, श्रेष्ठ.
**महत्त्व**–(सं) न० मोठेपणा, मान.
**महताब**–(फा) पु० चंद्र.
**महंत**–(सं) पु० श्रेष्ठ गोसांवी–साधु.
**महला**–(आ) पु० शहराचा भाग–शाखा, पुरा. २ घोड्याचा मसाला.
**महशूर**–(फा) वि० प्रख्यात, नांवाजलेला.
**महसूल**–(आ) पु० कर, धारा, जमाबंदी.
**महा**–(सं) वि० ( **महत्** पहा. )
**महाग**–(सं) वि० ज्यास्ती भावाचा, महार्घ.
**महागणें**–अ० भाव चढणें, महाग होणें.
**महागाई**–(सं) महर्गता. २ थोडेपणा.
**महाजन**–(सं) पु० श्रेष्ठ लोक, सावकार.

**महात–द**–(सं) पु० माहत, माहुत, हत्तीला चालवणारा.
**महादेव**–(सं) पु० शंकर, नीलकंठ, शिव.
**महान्**–(सं) वि० मोठा, श्रेष्ठ.
**महाप्रयास**–(सं) पु० अतिप्रयत्न–संकट.
**महापद्म**–(सं) वि० संख्याविशेष.
**महापातक**–(सं) न० मोठें पाप, ब्रह्महत्या–सुरापान–चोरी–गुरुस्त्रीशीं गमन–व हीं करणाराशीं ससागम ह्यांपैकीं प्रत्येक.
**महामारी**–(सं) स्त्री० जरीमरी, वाखा.
**महायात्रा**–(सं) स्त्री० काशीयात्रा.
**महार**–पु० जातिविशेष, अंत्यज, परवारी.
**महारकी**–स्त्री० त्रास, कटकट. २ महाराचें वतन.
**महारथी**–(सं) पु० मोठा योद्धा–वीर.
**महारवडा–वाडा**–पु० महारलोक रहाण्याची जागा. [ मनुष्य.
**महाराज**–(सं) सा० सार्वभौम राजा. २थोर
**महारोग**–(सं)पु०कुष्ट रक्तपिती इत्यादि रोग.
**महाराष्ट्र**–(सं) पु० मराठ्यांचा मुलूख, देशविशेष. [ विभाग, लहान तालुका.
**महाल**–पु० मंदिर, बंगला. २ तालुक्याचा
**महालकरी**–पु०महालाचा अधिकारी, लहान मामलेदार.
**महालय**–(सं) पु० महाल, पक्ष, भाद्रपद-वद्यांतील श्राद्ध.
**महाळ**–(सं) पु० ( **महालय** पहा. )
**महाळुंग**–(सं) न० निंबूविशेष.
**महिना**–(सं) पु० मास, तीस दिवस. २ पगार, महिन्याचें वेतन.
**महिला**–(सं) स्त्री० अबला, बायको.
**महिष**–(सं) पु० हैसा, रेडा.
**महिषी**–(सं) स्त्री० पट्टराणी. २ हैस.
**मही**–(सं) स्त्री० पृथ्वी, जग.
**महीपाल–ळ**–(सं) पु० राजा, नृप, भूप.
**महोत्सव–महोत्साह**–(सं) पु० मोठा उत्सव–समारंभ.
**मळ**–(सं) पु० ( **मल** पहा. )
**मळकट**–वि० मलिन, घाणेरडा.
**मळणी**–स्त्री० धान्य काढण्याची क्रिया.
**मळणें**–अ० मलिन होणें, मैल चढणें. २ चोळणें. ३ धान्य काढणें.
**मळभ**–न० अभ्र, आभाळ, ढग.
**मळमळ**–स्त्री० वांति होण्याच्या अगोदरची स्थिति. २ संशय, शंका.
**मळमळणें**–अ० कळमळणें, उमदळणें, ओकारी होईलसें वाटणें.
**मळवट**–पु० कपाळभर लाविलेलें कुंकू.
**मळविणें**–स० खराब करणें, मलिन करणें.
**मळमूत्र**–न० पेंच.
**मळा**–पु० बाग, भाजीपाला व फळें होणारें शेत, दुपिकी जमीन.
**मळी**–(सं) स्त्री० पाक करतांना साखरेंतून निघणारा मल.२ मळाची वळी–वळकटी.
**मा**–(सं) स्त्री० लक्ष्मी. २ आई.
**माईण–न**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**माऊ–माई**–स्त्री० मांजर.
**माऊसबहीण**–स्त्री० मावशीची मुलगी.
**माऊस भाऊ**–पु० मावशीचा मुलगा.
**माकड**–(सं) न० मर्कट, वानर.
**माकडचेष्टा**–(सं) स्त्री० टिवल्याबाव्हल्या.
**माकडहाड**–न० पाठीच्या कण्याचा शेवट.
**माकण**–स्त्री० बैलावर ठेवण्याची कावड.
**माका**–(सं) पु० वनस्पतिविशेष.
**माकोडा**–पु० मुंगळा, डोंगळा.
**माखण**–(सं) न०लोणी, चोपडण्याचा पदार्थ.
**माखणें**–स० चोपडणें, लावणें.
**माग**–पु० वस्त्रें विणण्याचें यंत्र. २ शोध, तपास, थांग, पत्ता. ३ पाऊल.
**मागचा**–वि० मागला, मागील.

**मागणी**–स्त्री० मागण्याचा अधिकार. २ मागणें, तलब. [ दे. म्हणणें, मागणी.
**मागणें**–(सं) उ० वि० विचारणें, पुसणें,
**मागणेकरी**– } वि० मागणेवाला,मागणारा,
**मागतेकरी**– } तलबदार–गार.
**मागमूस**–पु० माग, थांग, पत्ता.
**मागला**–वि०मागचा, मागील.
**मागसणें**–अ० मागें जाणें–होणें–रहाणें.
**मागाहून**–क्रि० मागून.
**मागी**–स्त्री० मागणें.
**मागील**–वि० मागचें–लें, गुदस्त.
**मागून**–श० मागें, मागोमाग. २ क्रि० मागाहून. ३ विचारून, 'द्या' म्हणून.
**मागें**–श० मागून, नंतर. २ क्रि० मागच्या बाजूस, अगोदर, आधीं, पूर्वी.
**मागेंपुढें**–क्रि० आदिअंताकडे. २ मागच्या पुढच्या बाजूस.
**मागोमाग**–क्रि० पाठोपाठ, मागून.
**माघ**–(सं) पु० हिंदूंचा अकरावा महिना.
**माघार**–स्त्री० आटोपतें घेणें, हार मानणें.
**माघारी**–क्रि० मागें, परत, उलट.
**माच**–(सं) पु० मांचा, गवत पेंढा इत्यादि ठेवण्या करितां केलेला मांडव.
**माचण**–न० शीड फिरविण्याचा प्रकार.
**माचा–माचवा**–(सं) पु० खाट, बाज,पलंग.
**माज**–(सं) पु० मद, मस्ती, गुर्मी. २ पशूंची गर्भाधानयोग्यता. ३ कमर, कंबर.
**माजघर**–न० घराचा मध्यभाग, मध्यघर.
**माजणें**–अ० कैफ चढणें, मस्ती येणें, उन्मत्त होणें. २वाढणें, ज्यास्ती होणें, फाफावणें. [ करणें.
**माजविणें**–(सं) स० लठ्ठ करणें. २ ज्यास्ती
**माजर**–(सं) न० मांजर, मांजरूं, म्याऊ.
**माजरपाट**–न० वस्त्रविशेष.
**माजा**–(फा) पु० जायफळ. २ वि० माझा.
**माजी**–(फा) वि० गुदस्त, मागील, रद्दी.
**माजीं**–श० मध्यें, आंत.
**माजुरी–जोरी**–वि० उन्मत्त, माजलेला.
**माजूम**–(आ) स्त्री०अंमलविशेष, भांगेचें विशिष्ट मिश्रण.
**माझा**–वि० मम, मी ह्या सर्वनामाची षष्ठी.
**माझारी**–श० माजीं, आंत, मध्यें.
**माटमुट**–स्त्री० कायकरूं कसें करूं, धांदल,गडबड, घाबरगुंडी.
**माठ्या**–पु० ठोंब्या, अक्षरशून्य. [रांजण.
**माठ**–पु० वनस्पतिविशेष, एक पालेभाजी. २
**माठणें**–अ० भरून येणें, भरणें. २ घडणें ( इमारतीचा दगड. ) ३ मथवणें, फुसलावणें.
**माड**–पु० नारळाचें झाड. २ रागविशेष.
**माडा**–पु० रोप, रोपा, रोपडा.
**माडी**–स्त्री० मद्यविशेष. २ मजला.
**माणसळणें–साळणें**–अ० मनुष्यांत मिसळणें–येणें.२ रानटीपणा टाकणें. [ शेष.
**माणिक्य–माणीक**–(सं)न० लाल, रत्नवि-
**माणुसकी**–स्त्री० मनुष्यपणा.
**माणूस**–(सं) पु० न० मनुष्य, मानव.
**मात्क्यान**–क्रि० फिरून, पुनः
**मात्र**–(सं) क्रि० फक्त, भर. २ जाति, सर्व.
**मात्रा**–(सं) स्त्री० अक्षरांच्या डोक्यावरची तिरपी (ˋ) रेघ. २ गणाचा अंक. ३ वरपगडा. ४ रसायनाची गोळी.
**मात्रागमनी**–(सं) वि० लबाड, मादरचोद.
**मात्रावृत्त**–(सं) न० आर्यादि छंद.
**मात्सर्य**–(सं) न० मत्सर, द्वेष.
**मात**–(फा) स्त्री० बुद्धिबळाच्या खेळांतील एक हार, डाव .२ कमाल, अखेर, पराकाष्ठा. ३ बातमी. [पडमात.
**मातकापड**–न० कपड्यावर माती लावणें,का-
**मातणें**–अ० ( **माजणें** पहा. )

**मातबर**—(आ) वि० संभावित. २ श्रीमंत.
**मातबरी**—स्त्री० संभावितपणा. २ प्रतिष्ठा.
**माता**—(सं) स्त्री० मातुश्री, आई, जननी.
**मातापितर**—(सं) सा० आईबाप.
**मातामह**—(सं) पु० आईचा बाप, आजा.
**मातामही**—(सं) स्त्री० आईची आई, आजी.
**मार्ती**—(सं) स्त्री० मृत्तिका, मट्टी. २ नाश. ३ धूळ.
**मातुल**—ळ—(सं) पु० मामा, आईचा भाऊ.
**मातुश्री**—तोश्री—(सं) स्त्री० माता, आई.
**मातृका**—(सं) स्त्री० अकारादि एकूणपन्नास वर्ण.
**मातृगमनी**—गामी—(सं) वि० आंतल्या गांठीचा, मात्रागमनी, मादरचोद.
**मातृश्री**—(सं) स्त्री० मातुश्री, आई.
**मातेरा**—पु० **मातेरें**—न० खराबी, घाण, वाईट स्थिति, नाश.
**माथा**—(सं) पु० मस्तक, डोकें. २ शिखर.
**माथाकूट**—स्त्री० डोकेफोड, माथेफोड.
**माथां**—**माथीं**—क्रि० डोकीवर, शिरावर.
**माथीं मारणें**—स० सोंपविणें, हवालीं करणें, ' ह्याचा जबाबदार तूं ' ह्मणून सांगणें.
**माथें**—न० मस्तक, शिर.
**माथेंफिराऊ**—**फिरू**—पु० संतापी, भांगट.
**मादक**—(सं) वि० अमली, निशेचा.
**मादरचोद**—वि० मात्रागमनी.
**मादसाट**—पु० माजपाट—मांजरपाट. [जाति.
**मादी**—(फा) स्त्री० ( पशुपक्ष्यांतली ) स्त्री-
**माध्यंदिन**—(सं) सा० माध्यांजन,धाम्या. २ यजुर्वेदीय शाखाविशेष.
**माध्यान्ह**—(सं) स्त्री० दुपार, मध्यान्ह.
**माध्वी**—(सं) स्त्री० मद्यविशेष.
**माधुकरी**—( **मधुकरी** पहा. )
**माधुर्य**—(सं) न० } मधुरता, मधुरपणा.
**माधुरी**—(सं) स्त्री० }

**मान्य**—(सं) वि० संभावित. २ योग्य. ३ कबूल, खुषी. [२ मान, मर्तबा.
**मान्यता**—(सं) स्त्री० विश्वास, पत, योग्यता.
**मान**—(सं) पु० अहंता, गर्व. २ सत्कार. ३ अदमास. ४ प्रमाण. ५ डौल. ६ स्त्री० गळ्याचा मागचा भाग. [मनुष्यें.
**मानकरी**—सा० सत्कार केला पाहिजे अशीं
**मानखंडना**—(सं) स्त्री० अपमान, अवमान.
**मानखोडा**—पु० मासखुंट,मानेला व पायाला दोरी बांधणें.
**मानगुटी**—स्त्री० बोकांडी, मान, गचांड.
**मानणें**—उ० वि० सुखावह होणें. २ गणणें, लेखणें. ३ मान देणें, मान्यता राखणें.
**मानपत्र**—न० योग्यतालेख.
**मानपान**—पु० आदरसत्कार.
**मानभाव**—पु० जातिविशेष. २ वि० कपटी.
**मानमरातब**—पु० आदरसत्कार.
**मानव**—(सं) पु० मनुष्य, माणूस, नर, मनुज. २ वि० मनुप्रणीत. [णें, पुरवणें.
**मानवणें**—अ० सुखावह होणें. २ सहन हो-
**मानवलोक**—(सं) पु० भूलोक, मनुष्यलोक.
**मानवी**—(सं) वि० मनुष्याचें—मनुष्यासंबंधीं, मनुष्यानें केलेलें.
**मानस**—(सं) न० मन, चित्त, अंतःकरण. २ विचार, हेतु. ३ सरोवरविशेष.
**मानसपूजा**—(सं) स्त्री० मनांत केलेली पूजा.
**मानसिक**—(सं) वि० मनचें, कल्पनेचें, कल्पित. २ कृताकृत, केलें न केलें.
**मानहानि**—(सं) स्त्री० अपमान, मानखंडना.
**माना**—(आ) पु० मायना लिहिण्याची तऱ्हा—रीति. २ मजकूर. ३ अर्थ. [मनुष्यकृत.
**मानुष**—(सं) न० ( **मनुष्य** पहा. ) २मानवी,
**मानेचा कांटा**—पु० मानेचा सांधा.
**माप**—(सं) न० प्रमाण, वजन, तोल, गणती व गणती करण्याचें पात्र. २ पु० विष्णु.

**मापणें**-स० वजन-तोल-गणती करणें, मोजणें.
**मापी**-वि० प्रमाणांतलें, मापीव, मापलेलें.
**माफ**-(आ) वि० क्षमा केलेलें.
**माफक**-(आ) वि० बेताचा, योग्य, पुरता. २ थोडासा, अल्प.
**माफी**-(आ) स्त्री० क्षमा. २सूट, मोकळीक.
**माभळभट**-पु० पोकळभट. [अधिकार.
**मामलत**-(आ) स्त्री० मामला, मामलेदारीचा
**मामलतदार**-(फा) पु० जमाबंदी-वसूल घेणारा इत्यादि अधिकारी, सुभेदार, तहशीलदार.
**मामा**-(सं) पु० मातुल-ळ, आईचा भाऊ.
**मामाजी**-पु० सासरा.
**मामी**-स्त्री० मामाची बायको.
**मामू**-पु० स्तन, अचळ.
**मामूल**-(आ) पु० दस्तूर, नियम, वहिवाट.
**मामेबहीण**-स्त्री० मामाची मुलगी.
**मामेभाऊ**-पु० मामाचा मुलगा.
**मामेसासरा**-पु० दंपत्यांचा मामा, ( वराचा मामा तो वधूचा, वधूचा मामा तो वराचा.)
**मामेसासू**-स्त्री० मामेसासऱ्याची बायको.
**माय**-स्त्री० आई, मा, अम्मा, माता.
**मायना**-(आ) पु०मजकूर,लेख पद्धति,माना.
**मायफळ**-न० औषधी फळविशेष.
**मायबाप**-पु० आईबाप.
**माया**-(सं) स्त्री० ईश्वरी शक्ति. २ दया, ममता. ३ मोह. ४ जादू.
**मायालु-ळू**-वि० दयावान,दयाळू , कृपाळू.
**मायावी**-(सं) वि० कपटी.
**मार्ग**-(सं) पु० रस्ता, रीत, वाट.
**मार्गक्रमण**-(सं) न० वाट चालणें.
**मार्गप्रतीक्षा**-(सं) स्त्री० वाट पहाणें,थांबणें, खोळंबणें.
**मार्गशीर्ष-शीर**-(सं) पु० मार्गेश्वर, हिंदूंचा आठवा महिना.
**मार्गस्थ**-(सं) पु० पांतस्थ, उतारू, वाटसरू, मुशाफर.
**मार्जन**-(सं) न० शिंपणें, झाडणें, उडविणें.
**मार्जार**-(सं) न० मांजर-माजर-रूं. बिलाडू, बिलाड.
**मार्दव**-(सं) न० मृदुत्व, मऊपणा. [ दग.
**मार्मिक**-(सं) वि० खुबीदार, तत्त्वज्ञानी,सह्र-
**मार**-(सं) पु० ताडन, चोप. २ भडिमार. ३ भार. ४ फार. ५ मदन.
**मारक**-(सं) वि० मारणारें. २ प्रतिस्पर्धी.
**मारकट**-वि० मारका, हुंदाडणारा.
**मारका**-वि० हुंदाडणारा, ढुसणी देणारा, मारकट. २ मारणारा.
**मारखाऊ**-वि० मार खाणारा.
**मारण**-(सं) न० मृत्यु आणण्याची क्रिया.
**मारणें**-स० चोपणें, ताडन करणें. २ जीव घेणें. ३ पुष्कळ खाणें.
**मारतापीस**-पु० वस्ताद, जबरदस्त.
**मारफत**-(आ) स्त्री० निसबत, दिम्मत. २ श० कडून, मध्यस्थीनें. [ कज्जा.
**मारामारी**-स्त्री० भांडण, तंटा, हाणाहाणी,
**मारुत**-(सं) पु० वायु, वारा, हवा.
**मारू**-वि० नखरेबाज, छान.
**मारेकरी**-पु० ठार मारणारा मनुष्य.
**माल्य**-(सं) पु० पुष्पांची माला-ळा.
**माल**-(आ) पु० जिन्नस, पदार्थ. २ किंमतीची वस्तु, मोल.
**मालक**-(आ) पु० धनी,मालाचा अधिकारी.
**मालकंस**-(सं) पु० रागविशेष.
**मालकी**-स्त्री० सत्ता, धनीपणा.
**मालचाटी-ट्या**-पु० उपगुरू.
**मालजादी**-स्त्री०हलकट-निर्लज्ज कसबीण.
**मालती**-(सं) स्त्री० पुष्पवल्ली-लताविशेष.
**मालधनी**-पु० मालक, धनी.
**मालपवा-पुवा**-पु० पक्वान्नविशेष.

**मालमत्ता**-(आ) स्त्री० ऐवज, जिनगी, दौलत.
**मालविणें**-स० ओलवणें, नाहींसा करणें, फुंकणें, विझविणें, पदर देणें.
**माला**-(सं) स्त्री० हार, माळ. २ रांग, ओळ.
**मालिन्य**-(सं) न० मलिनपणा, घामटपणा.
**मालीक**-(आ) पु० ( **मालक** पहा. )
**मालीम**-(आ) पु० जहाजावरचा अधिकारी.
**मालीश-स**-(आ) पु० अभ्यंग, तेल लावणें.
**मालूम**-(आ) वि० ठाऊक, माहीत.
**मालें**-न० गळ्यांत नांगर घालून भिक्षा मागणें.
**माव**-(सं) स्त्री० माया. २ कपट. ३ देवीचे फोड-वण.
**मावणें**-अ० समावेश होणें, रहाणें.
**मावली**-स्त्री० माऊली, माय, माता. २ वि० बिचारी, धर्मशील स्त्री.
**मावशी-सी**-स्त्री० आईची बहीण.
**माव-उसबहीण**-स्त्री० मावशीची मुलगी.
**माव-उसभाऊ**-पु० मावशीचा मुलगा.
**मावसा**-पु० मावशीचा नवरा.
**मावळ**-न० देश व कोंकण ह्यांतील प्रदेश.
**मावळण**-स्त्री० मामी. २ आत, फुई. ३ पश्चिमेचा वारा.
**मावळणें**-अ० अस्तास जाणें, अदृश्य होणें.
**मावळत**-स्त्री० पश्चिम.
**मावळा**-पु० मामा.
**मावा**-पु० खवा, आटविलेलें दूध.
**मावीक**-(सं) वि० मायिक, मायेचें, कपटी.
**माशी**-(सं) स्त्री० मख्खी, मक्षिका. २ बंदुकीचा अवयवविशेष. ३ लाख भरलेल्या दागिन्याचा धातु उडून गेलेला भाग.
**माशूक**-(आ) न० इष्ट-प्रिय स्त्री.
**माष**-(सं) पु० उडीद. २ पांच गुंजा.
**मास**-(सं) पु० महिना.
**मासमत्सर**-न० मांसकण.
**मासला**-पु० नमुना. २ परीक्षा.
**मासलेदार-वाईक**-वि० नमुन्यास योग्य, छान.
**मासळी**-स्त्री० लहान मत्स्य.
**मासा**-(सं) पु० मत्स्य. २ आठ गुंजाचें वजन.
**मासिक**-(सं) वि० महिन्याचें श्राद्ध. २ महिन्यास निघणारें.
**मासोळी**-स्त्री० स्त्रियांचें मत्स्याकृति पादभूषण. २ मासळी, मत्स्य. [ मोठेपणा.
**माहात्म्य**-(सं) न० महत्त्व, महिमा, लौकिक,
**माहितगार**-वि० वाकबगार.
**माहिती**-स्त्री० माहितगारी, ज्ञान, खुलासा.
**माही**-पु० माघ महिना.
**माहीत**-(आ) क्रि० ठाऊक.
**माहुटी**-स्त्री० पागोळीचे खालीं वांशास जी फळी मारितात ती, पान.
**माहूत**-पु० महात, गजरक्षक.
**माह**-(फा) पु० महिना, मास.
**माहेर**-(सं) न० माहेरघर, स्त्रियांच्या बापाचें घर. २ विश्रांतिस्थान.
**माहेरवाशीण**-स्त्री० माहेरीं असलेली स्त्री.
**माहेवारी**-स्त्री० महिनेमाल.
**माळ**-(सं) स्त्री० माला, हार. २ खडकाळ-मुरमाची जमीन. ३ रांग, ओळ.
**माळका**-(सं) स्त्री० क्रम, अनुक्रम, ओळ.
**माळजमीन**-स्त्री० माळरान, खडकाळ जमीन.
**माळा**-(सं) हार, कंठी. २ पु० लहान मजला-माडी. ३ शेतांत पांखरें राखण्यासाठीं बसण्यास केलेलें उंच ठिकाण.
**माळी**-पु० फुलें भाजीपाला वगैरेचें काम करणारा, मालाकार. [ होणारा फोड.
**माळीण**-स्त्री० माळ्याची बायको. २ नाकांत
**मांग**-(सं) पु० चांडाळ, मातंग. २ वि० निर्दय.
**मांगल्य**-(सं) वि० मंगलकारक.
**मांजर-रूं**-(सं) न० मार्जार, बिडाल.
**मांजरी**-स्त्री० मांजर (मादी,) भाटी, बिल्ली.

**मांजा**–पु० काचेचें पाणी दिलेली दोरी.
**मांड**–पु० रोगविशेष. २ मांडणी, जम. ३ स्त्री० मांडी.
**मांडणें**–उ० वि० ठेवणें, व्यवस्थेनें लावणें.
**मांडलिक**–(सं) वि० संस्थानिक, सामंत, आसपासचा, मंडलांतला.
**मांडव**–(सं) पु० मंडप.
**मांडवी**–स्त्री० मंडपी. २ बंदरावरील माल ठेवण्याचें घर, गोदी.
**मांडा**–पु० पक्वान्नविशेष.
**मांडी**–स्त्री० ऊरु, जांघ. २ अंक.
**मांद्य**–(सं) न० मंदपणा, सुस्ती, कमीपणा.
**मांदगी**–(फा) स्त्री० आजारीपण.
**मांदा**–(फा) वि० आजारी, बेमारी.
**मांदार**–(सं) पु० पांढरी रुई, वृक्षविशेष.
**मांदें**–न० चरबी, पित्त. [ भोजन.
**मांवदें**–धें–न० महायात्रेप्रीत्यर्थ ब्राह्मण-
**मांस**–(सं) न० गोस, मासकण.
**मिचकाविणें**–स० नेत्र झांकून उघडणें.
**मिचमिच**–स्त्री० मचमच, खातेसमयीं जो तोंडाचा आवाज होतो तो, मिटकी.
**मिजाज–स**–(फा) स्त्री० उपभोग घेण्याची तऱ्हा. २ तब्यत, प्रकृति.
**मिजाजखोर**–वि० मिजाशी, तब्यती.
**मिटकी**–स्त्री० मचमच. [ णें २ बंद होणें.
**मिटणें**–उ० वि० समजणें,एकत्र होणें–कर-
**मिठा**–(सं) वि० गोड, मधुर.
**मिठागर**–न०मिठाचें उत्पत्तिस्थान. [लिंगन.
**मिठी**–(सं) स्त्री० शिसारी,वीट. २भेट, आ-
**मिणमिण**–स्त्री० मंद जळणें.२ मंद बोलणें.
**मित्र**–(सं) पु० स्नेही, सोबती. २ सूर्य.
**मित्रद्रोही**–(सं) पु० स्नेह्याचा द्वेष करणारा.
**मित**–(स) वि० बेताचें, जितक्यास तितकें.
**मिताक्षरी**–(सं) स्त्री० भाषाविशेष.
**मिति**–(सं) स्त्री० माप, प्रमाण. २ तिथि.
**मिथ्या**–(सं) वि० खोटें, अनृत,असत्य, झूट.
**मिथ्यापवाद**–(सं) पु०खोटा आरोप आळ.
**मिथुन**–(सं) स्त्री० तिसरी रास. २ न० मेहुण, जोडपें. | मत.
**मिनतवारी**–(फा)स्त्री० बहुत आर्जव, खुशा-
**मिनहु**–वि० रोजी–तारखेस.
**मिना**–(आ) पु० मृतिकाविशेष. २ वजा. ३ खनिज पदार्थविशेष.
**मिऱ्या**–पु० जंतुविशेष.
**मिरकूट**–न० मुरकूट, जंतुविशेष.
**मिरगी–घी**–स्त्री० फेफरें. २ घेरी.
**मिरची**–स्त्री० मिरच, एक प्रकारची तिखट करण्याची शेंग व तिचें झाड.
**मिरपूड–ट**–स्त्री० मिऱ्यांची भुकटी–चूर्ण.
**मिरमिर**–स्त्री० चुरचुर.
**मिरवण**–स्त्री० हिंडणें,मिरवण्याचा व्यापार, मिरवणूक.
**मिरवणूक**–स्त्री०मिरवण,डामडौलानें फिरणें.
**मिरवणें**–उ० वि० डौलानें, थाटमाटानें रस्त्यांतून फिरणें.
**मिरास**–(फा) स्त्री० मालकीची जमीन.
**मिरी**–स्त्री० निरी, चुनी–णी. [ फळ.
**मिरीं**–(सं) न० मिरें, लताविशेष व तिचें
**मिलाफ**–(फा) पु० एकी, ऐक्य, भेट. २ मिश्रण. [ फितुरी.
**मिलाफी**–(फा) वि० अनुकूळ, मिळालेला,
**मिलिंद**–(सं) वि० रममाण, तल्लीन. २ पु० भुंगा.
**मिश्र**–(सं) पु० देश व ब्राह्मणजातिविशेष. २ वि० मिसल, मिसळलेला, भेळीचा.
**मिश्रण**–(सं) मिसळ, मिश्र झालेला पदार्थ.
**मिश्री–मिसरी**–स्त्री० खडीसाखर.
**मिशाळ**–वि० मोठ्या मिशांचा, कल्लेवाला.
**मिशी**–स्त्री० वरच्या ओठावरचे केस. २ वेश्यापणाचा प्रथमचा समारंभ.

मिष्ट–(सं) वि० गोड, मधुर.
मिष्टान्न–(सं) न० सुग्रास खाणें, चांगलें भोजन.
मिष–(सं) न० मिस, निमित्य, सोंग, अमिष.
मिस्त्र–न० लहान मिशी, मिसरूड.
मिसकीन–ल–वि० रोड. २ लबाड.
मिसमिशीत–वि० मृदु, विसविशीत, नरम.
मिसल–(आ) स्त्री० तजवीज. २ तंबु ठोकण्याची जागा.
मिसळ–स्त्री० मिश्रण, भेट.
मिसळणें–अ० एक होणें, भिसळणें.
मिळकत–स्त्री० कमाई, आय–दा, उत्पन्न, द्रव्यप्राप्ति. [३ संयोग होणें.
मिळणें–उ० वि० भिसळणें. २ कमाई होणें.
मिळमिळीत–क्रि० बेचव.
मिळवणी–स्त्री० बेरीज, मेळ. [करणें.
मिळविणें–स० संपादणें, कमावणें. २ मिश्रण
मिळून–क्रि० एकंदर, एकंदरींत.
मिंधा–वि० ओशाळा, दबलेला.
मी–सर्व० प्रथम पुरुषाचें एकवचन. २ अहंपणा, अहंता.
मीठ–(सं) न० क्षारविशेष, लवण, निमक.
मीठभाकर–स्त्री० भाजीभाकर, साधें जेवण.
मीन–(सं) पु० मासा, मत्स्य. २ स्त्री० बारावी रास.
मीनकेतन–(सं) पु० मदन, काम.
मीपण–णा–पु० अहंता, गर्व, अहंपणा.
मीमांसा–(सं) स्त्री० शास्त्रविशेष. २ विचार.
मीर–(फा) पु० गंजिफांतील राजा.
मीस–(सं) न० मिष, ढोंग, सोंग.
मुक्त–(सं) वि० मोकळा, सुटलेला. २ मुक्ति मिळालेला.
मुक्तद्वार–(सं) न० प्रतिबंधाभाव, कोणासही मनाई नसलेला भोजनसमारंभ.
मुक्ता–(सं) स्त्री० मोती, मुक्ताफळ.
मुक्ताफल–(सं) न० मुक्ता, मोती.
मुक्ति–(सं) स्त्री० मोक्ष. [विशेष.
मुकटा–गटा–पु० सोवळें, रेशमी वस्त्र-
मुकण्या–स्त्री० तुरींतले चहाड, न भिजणाऱ्या तुरी.
मुकणाहत्ती–पु० दंतांशिवायचा हत्ती.
मुकणें–अ० अंतरणें, सुटणें.
मुकदमा–(आ) पु० मोकदमा, खटला, फिर्याद. २ काम.
मुकादम–(आ) पु० गांवचा अधिकारी. २ मजुरांचा मुख्य, मुकद्दम.
मुकरर–(आ) वि० खचित, नक्की, कायम.
मुका–पु० चुंबन. २ जन्मबहिरा, बिलकुल बोलतां येत नाहीं तो. ३ आवाज न करणारा. ४ ठुस्सा.
मुकाट्या–नीं–नें–क्रि० गपचिप. [आराम.
मुकाम–(आ) पु० ठिकाणा, स्थळ. २ विश्रांति,
मुकी–क्की–स्त्री० बुक्का, ठोसा.
मुकुट–गुट–(सं) पु० किरीट, टोप.
मुकुटमणि–(सं) वि० मुख्य. २ पु० मुगुटांतील मुख्य मणि.
मुख्य–(सं) वि० श्रेष्ठ, अधिकारी, अध्यक्ष.
मुख–(सं) न० तोंड, चेहरा.
मुखडा–पु० मुखचंद्र, मुखकमल, तोंड.
मुखत्यार–(आ) पु० प्रतिनिधि. २ अधिकारी. ३ वि० स्वतंत्र. [चें पत्र–कागद.
मुखत्यारनामा–पत्र–पु० अखत्यार दिल्या-
मुखत्यारी–स्त्री० अधिकार, हुकूम. [तो.
मुखदुर्बल–(सं) वि० ज्यास बोलावयास नको
मुखपाठ–वि० तोंडपाठ.
मुखमार्जन–(सं) न० तोंड धुणें.
मुखरण–णी–स्त्री० मुख्य स्त्री.
मुखरस–(सं) पु० थुंकी. २ दुर्भाषण.
मुखवटा–पु० तोंडवळा, चेहरा, तोंड. २ मुखाची प्रतिमा.
मुखस्तंभ–(सं) पु० मुखदुर्बल–ळ, घुम्या.

मुखोद्गत-(सं) न० तोंडपाठ. [ २ सुंदर.
मुग्ध-(सं) वि० संदिग्ध, गुप्त. २ मूढ, मूर्ख.
मुगटा-(सं) पु० ( मुकटा पहा. )
मुगूट-(सं) पु० मुकुट, किरीट. [ कागद.
मुचलका-पु० दंडाबद्दल लिहून घेतलेला
मुजाका-खा-(आ) पु० विशाद, प्रतिष्ठा, मोठेपणा, महत्त्व.
मुजरा-(आ) पु० रामराम, सलाम.
मुजरत-(फा) क्रि० समक्ष, जाणून, मुद्दाम.
मुटकणें-स० हळूहळू बुक्या मारणें.
मुटका-पु० बुक्की.
मुटाळी-मुठेळें-वि० केळ्याची एक जात. २ हस्तमैथुन, मुष्टिजप.
मुठेल-न० मुठीनें दाबून काढलेलें तेल.
मुडदा-(फा) पु० प्रेत, निर्जीव प्राणी, शव.
मुडदार-(फा) वि० हरामी, हरामाचें, फुकटचें.
मुडदारशिंग-स्त्री० औषधिविशेष.
मुडदेफरास-(फा) पु० प्रेत नेणारा, प्रेताचें सामान विकणारा.
मुडी-स्त्री० पुंजी, ऐवज.
मुतणें-(सं) अ० मूत्र सोडणें-मुटणें.
मुतपाक-पु० स्वैपाक, भोजन, जेवण, रसई, मुतबक.
मुतरा-वि० मुतणारा. २ गळका.
मुतसद्दी-त्सदी-(आ) पु० कारस्थानी.
मुतारी-स्त्री० मोरी, पाणी सांडण्याची जागा.
मुद्दा-(आ) पु० मतलब, हेतु, तात्पर्य.
मुद्दाम-(आ) क्रि० जाणून बुजून, बळेंच.
मुद्रा-(सं) स्त्री० चेहरा. २ चिन्ह, छाप, शिक्का. ३ नाणें.
मुद्रिका-(सं) स्त्री० आंगठी. २ छाप.
मुदगल-द्गल-(सं) पु० जोडी, कसरत करण्याचें हत्यारविशेष.
मुदी-(सं) स्त्री० मुद्रिका, आंगठी.
मुनशी-(फा) पु० फारशी भाषेचा गुरु.
मुनसफ-(आ) पु० दिवाणी अधिकारी-न्यायाधीश.
मुनसफी-स्त्री० मुनसफाचा अधिकार.
मुनि-(सं) पु० ऋषि. २ अगस्ता, हदगा.
मुनीम-(आ) पु० गुमस्ता, आडत्या, हुंडेकरी.
मुफत-(फा) क्रि० फुकट, मोलावांचून.
मुबलक-(आ) वि० पुष्कळ, विपुळ.
मुबा-भा-(आ) स्त्री० मोकळीक, प्रतिबंधाभाव.
मुमुक्षु-(सं) वि० मोक्ष इच्छिणारा.
मुरकणें-अ० मुरडणें, मुरका मारणें.
मुरका-पु० नखरा, लाजेचें एक चिन्ह.
मुरकूट-न० चिलट-लीट, डांस. [ करणें.
मुरगळणें-उ० वि० पिळवटून वांकडा होणें-
मुरडणें-उ० वि० मुरकणें. २ वळणें, वळवणें.
मुरडशेंग-स्त्री० औषधविशेष.
मुरडा-पु० बारीक पोटांत दुखणें, रोगविशेष.
मुरणें-अ० जिरणें, आंत जाणें.
मुरदुंग्या-पु० आट्यापाट्याच्या खेळांतील उभी पाटी धरणारा. २ पखवाजा.
मुरदुंग-पु० मृदंग, पखवाज.
मुरब्बा-(आ) पु० मुरंबा, साखरेंत मुरविलेला पदार्थ, अवलेह.
मुरमुरणें-अ० चुरचुरणें.
मुरमुरा-पु० चुरमुरा.
मुरली-(सं) स्त्री० सुषिर वाद्यविशेष.
मुरवत-(आ) स्त्री० भीड, पर्वा, भय, लज्जा.
मुरळी-स्त्री० खंडोबा देवास वाहिलेली स्त्री. २ विळी. [ इच्छा, वांछा.
मुराद-(आ) वि० खूप, पुष्कळ. २ स्त्री०
मुरूम-पु० बुरूम, घट्ट मातीचे खडे. २ ज्वानीचें सूचक मुखावरील पुरळ.
मुलकी-खी-वि० मुलखासंबंधी, वसुलाचें.
मुलगा-पु० पुत्र. २ छोकरा.
मुलगी-स्त्री० कन्या. २ छोकरी.
मुलाईम-(आ) वि० मऊ, नरम.

**मुलाना-णा**-(आ) पु० मुसलमान बलुतेदार, मुल्ला.
**मुलाखत**-(आ) स्त्री० भेट, ओळख, परिचय.
**मुलाजा**-(आ) पु० भय, लाज, पर्वा, मान.
**मुलामा**-(आ) स्त्री० कल्हई, पाणी देणें.
**मुलूक-ख**-(आ) पु० देश, प्रांत, इलाखा.
**मुशकील-मुस्कील**-(आ) स्त्री० कठिणावस्था. २ वि० दुर्घट.
**मुशाफर**-(आ) पु० वाटसरू, पांथस्थ.
**मुशाफरी**-(आ) स्त्री० प्रवास. २ वि० वाटेचें.
**मुशारा**-(आ) पु० मुशाहिरा, पगार.
**मुष्टि**-(सं) स्त्री० मूठ. २ बुक्की, ठोसा.
**मुष्टिमोदक**-(सं) पु० बुक्यांचा मार.
**मुस्तकीम**-(आ) वि० मजबूत, कायमचें.
**मुसक्या**-स्त्री० दंड मागें बांधणें, चतुर्भुज करणें.
**मुसकट**-न० तोंड, थोबाड.
**मुसकें**-न० खातां येऊं नये ह्मणून गुरांच्या तोंडास बांधावयाची जाळी. [पसणें.
**मुसंडा**-पु० मुसलमान, म्लेंच्छ. २ मुसंडी, खु-
**मुसंडी**-स्त्री० समोर घुसणें.
**मुसमुसणें**-अ० तारुण्याचा भर असणें. २ दाबून दाबून रडणें.
**मुसलमान**-(आ) पु० यवन, म्लेंच्छ, महंमदी धर्माचे लोक, अविध. [कूड.
**मुसळ-ल**-(सं) न० कांडणी, कांडण्याचें लां-
**मुसूम**-(आ) वि० नेमलेला. २ मोसम, बार, बहार, ऋतु, हंगाम. [त वेळ, शुभ वेळ.
**मुहूर्त्त**-(सं) पु० साडेतीन घटिका. २ नियमि-
**मुळमुळीत**-वि० बेचव, मचूळ.
**मुळा**-(सं) पु० वनस्पतिविशेष.
**मुळारंभ**-(सं) पु० प्रथमारंभ.
**मुळी**-(सं) स्त्री० मूळ, जडी, पाळ.
**मुळीं**-क्रि० अगदीं, बिलकुल, सर्वथा. २ पहिली गोष्ट, प्रथमतः.
**मुळें**-श० कारणानें, साठीं.
**मुंगळा**-पु० डोंगळा, मंकोडा. [पीलिका.
**मुंगी**-स्त्री० मुंगळ्या जातीचा एक जंतु, पि-
**मुंज-जी**-(सं) स्त्री० मौंजीबंधन. २ तृणविशेष.
**मुंड**-(सं) वि० भादरलेलें. २ न० मुंडकें, शिर.
**मुंडकें**-न० शिर, डोकें. [करणें.
**मुंडण-णें**-(सं) न० केस काढणें, हजामत
**मुंडावळ**-स्त्री० मंडावळ, फुलें किंवा कागद व वर्ख यांचें भूषणविशेष.
**मुंडाविणें**-(सं) अ० हजामत करणें.
**मुंडासें**-न० पागोटें, फेटा, बत्ती.
**मुंडी-ढी**-स्त्री० डोकें, मुसंडी. २ मुंढेरी, भिंत. ३ वि० विधवा.
**मुंढा**-वि० आकुंचित, बोटें मिटून जी हाताची लांबी तिला 'मुंढा हात' ह्मणतात. २ पु० डोळ्यांत भरण्यासाठीं वरच्या अंगास लावलेला चांगला माल.
**मुंढेरी**-स्त्री० भिंतीच्या उंचीच्या समाप्तीचा अरुंद होत गेलेला भाग.
**मूग**-पु० धान्यविशेष.
**मूठ**-(सं) स्त्री० मुठि, बुक्की, ठोसा. २ लांच. ३ जुडी. ४ मारक प्रयोगविशेष.
**मूठमाती**-स्त्री० गाडणें, पुरणें.
**मूढ**-(सं) वि० मूर्ख, अडाणी, अविद्वान्.
**मूत्र-त**-(सं) न० लघवी, पिसाब.
**मूत्रकृच्छ्र**-(सं) } न० रोगविशेष.
**मूतखडा**-पु० }
**मूत्रपिंड**-(सं) पु० रोगविशेष.
**मूत्रमार्ग**-(सं) पु० मूत येण्याचा रस्ता.
**मूद**-स्त्री० भूषणविशेष.
**मूर्ख**-(सं) वि० मूढ, अडाणी. [मूर्च्छा.
**मूर्छना**-(सं) स्त्री० गायनसंज्ञाविशेष. २ घेरी,
**मूर्छा**-(सं) स्त्री० घेरी, चक्कर.
**मूर्त**-(सं) स्त्री० मूर्ति, चेहरा, प्रतिमा. २ वि० मूर्तिमंत, साक्षात्.
**मूर्ति**-(सं) स्त्री० प्रतिमा. २ शरीर.

**मूर्धा**–(सं) पु० मस्तक, डोकें.
**मूर**–न० दंव, धुकें. २ चीर, भेग.
**मूल्य**–(सं) न० मोल, किंमत.
**मूल**–(सं) न० लहान बालक, बाळ. २मूळ.
**मूलशब्द**–(सं) पु० धातु, आरंभशब्द.
**मूष–क**–(सं) पु० उंदीर, चुव्वा.
**मूस**–(सं) स्त्री० आटणी, सांच्या. २ मार्ग.
**मूळ**–न० मुळी, पाळ. २ आरंभ. ३ स्वतः (टीकेशिवाय) ग्रंथ. ४ वि० आद्य आरंभींचें. ५ नक्षत्रविशेष. ६ बोलावणें.
**मूळग्रंथ**–(सं) प्रथमचा–पहिला ग्रंथ.
**मूळपीठ**–(सं) न० आदिपीठ–स्थान.
**मूळपुरुष**–(सं) पु० आदिपुरुष.
**मूळव्याध–धि**–(सं)स्त्री०बवासीर,रोगविशेष.
**मूळस्वभाव**–(सं) पु० जन्मस्वभाव.
**मृग**–(सं) पु० हरण–रिण.
**मृगजल**–(सं) न० सूर्यकिरणांच्या परावर्तनानें होणारा जलाचा भास.
**मृगया**–(सं) स्त्री० पारध, शिकार.
**मृत्तिका**–(सं) स्त्री० माती, मट्टी, धूळ.
**मृत्यु**–(सं) पु०मरण,जीव जाणें,प्राणोत्क्रमण.
**मृत्युपत्र**–(सं) न० मरणसमयींचा लेख.
**मृत**–(सं) वि० मेलेला, निर्जीव. [मेलेला.
**मृतप्राय**–(सं) वि० मेल्यासारखा, बहुतेक
**मृदंग**–(सं) पु० पखवाज, आडवा तबला.
**मृदुल–मृदु**–(सं) वि० मऊ, नरम.
**मेकूड**–न० वाळलेला शेंबुड, मेकड.
**मेख्या**–पु० खमक्या, शिरजोर.
**मेख**–(फा) स्त्री० खुंटा–टी. [रपट्टा.
**मेखला**–(सं) स्त्री० भूषणविशेष,कांची, कम-
**मेघ**–(सं) पु० ढग, बादल, आभाळ, अभ्र.
**मेघडंबर**–(सं) न० ढग, गडगडणें, आडंबर.
**मेघमंडल**–(सं) न० ढगांचा समुदाय.
**मेज**–(फा) न० लांकडाची ठेवण, एक प्रकारची घडवंची.
**मेजबानी–वानी**–(फा) स्त्री० भोजन, थाटमाटाचें भोजन.
**मेटणें**–अ० मिटणें, बंद होणें.
**मेटाकुटी**–स्त्री० महाप्रयास. [धारस्तंभ.
**मेढ–ड**–स्त्री० दुबेळकें असलेलें लांकूड, आ-
**मेण**–न० मोम, तेलाची बेरी.
**मेणकट**–वि० मेणचट, ओशट.
**मेणकापड**–न० मेणानें सारविलेलें कापड.
**मेणचट**–वि० मेणकट.
**मेणबत्ती**–स्त्री० मेणाची वात.
**मेणा**–पु० म्याना. २ कुत्सित भाषण.
**मेतकूट**–न० एक तोंडीं लावणें. २ ऐक्य.
**मेथी**–(सं) स्त्री० वनस्पतिविशेष.
**मेद**–(सं) पु० चरबी.
**मेर**–स्त्री० कड, किनारा, कांठ.
**मेरु**–(सं) पु० एक पर्वत. २ मुख्य, श्रेष्ठ.
**मेला**–वि० मेलेला. २ मेळा, यात्रा,समारंभ.
**मेवा**–(फा) पु० फळफळावळ, फळें.
**मेष**–(सं) पु० मेंढा, एडका. २ प्रथम राशी.
**मेषपात्र**–(सं) वि० खुळचोंट. २बेढब चेहऱ्याचा. ३ तृतीयाप्रकृति.
**मेस्तर**–न० नवला, गंवड्याचें एक हत्यार.
**मेस्तरी**–पु० सुतार किंवा गंवडी, कारागीर.
**मेह**–(सं) पु० रोगविशेष.
**मेहतर–म्हेतर**–पु० भंगी, झाडू.
**मेहनत**–(आ) स्त्री० श्रम, कष्ट.
**मेहमन–मान**–(फा) पु० पाहुणारावळा.
**मेहर**–(फा) स्त्री० खुपमर्जी, मेहरनजर.
**मेहरबान**–(फा) वि० कृपाळू, दयावंत.
**मेहरबानी**–(फा) स्त्री० कृपा, खुपमर्जी.
**मेहुणा–व्हणा**–पु० बहिणीचा नवरा, बायकोचा भाऊ.
**मेहुणी–व्हणी**–स्त्री० बायकोची बहीण.
**मेहुण**–न० जोडपें.
**मेळ**–(सं) पु० जम. २ एकी. ३ ताळा.

**मेळा**–(सं) पु० यात्रा, जत्रा, जमाव.
**मेंग**–स्त्री० सापाची त्वचा, कात.
**मेंगा–ग्या**–वि० गरीब दिसणारा. २ पुळ-पुळीत, सत्वहीन.
**मेंढका**–पु० मेंढा, एडका.
**मेंढक्या**–वि० मेंढपाळ, मेंढरें राखणारा.
**मेंढरूं**–न० मेंढी, मेंढा.
**मेंढा**–पु० एडका, मेंढका.
**मेंदी**–स्त्री० वनस्पतिविशेष.
**मेंदू**–पु० ज्ञानतंतु, मगज.
**मैत्र**–(सं) पु० मित्र, स्नेही.
**मैत्रकी**–स्त्री० मित्रत्व, भाऊपणा.
**मैत्रणी–त्रीण**–स्त्री० स्त्रीमित्र, स्नेही (बायको), सोबतीण.
**मैथुन**–(सं) न० संभोग, स्त्रीपुरुषसंयोग.
**मैदा**–पु० बारीक पीठ, सपीठ.
**मैदान**–(फा) न० पटांगण, सपाट मुलूख.
**मैना**–स्त्री० पक्षिविशेष.
**मैयत**–(आ) वि० मेलेला.
**मैया**–(आ) वि० शंभर.
**मैल**–(सं) पु० मळ, घाण.
**मैलागर–मैलागिरीचंदन**–(सं) पु० मलागिरीवरचा चंदन.
**मैंद**–(सं) वि० मंद, आळशी, सुस्त.
**मोक्ष**–(सं) पु० मुक्ति, मोकळीक.
**मोकदमा**–(आ) पु० मुकदमा, खटला.
**मोकळा**–(सं) वि० सुटलेला, रिकामा, मुक्त.
**मोकळीक**–(सं) स्त्री० परवानगी.
**मोकार**–वि० रिकामा, सुटा, स्वतंत्र.
**मोकाशी–सी**–पु० इनामाचा भागीदार.
**मोकासा**–(आ) पु० इनाम, जहागीर.
**मोगरा–र**–पु० एक सुवासिक फुलझाड. २ चोपणें. [हातोडा.
**मोगरी**–स्त्री० मोगरीचा वेल. २ लांकडी
**मोगलाई**–स्त्री० बेबंदराज्य.
**मोगली एरंड**–पु० वनस्पतिविशेष.
**मोगली बेदाणा**–(फा) पु० औषधिविशेष.
**मोगली मिरची**–स्त्री० औषधिविशेष.
**मोघम**–(आ) वि० स्फोट न झालेलें, बिन्नावी, गुप्त. २ अमानत.
**मोघा**–पु० एक प्रकारचें मडकें.
**मोचा–जा**–पु० ( **मोजा पहा.** )
**मोची**–पु० जोडे शिवणारा, चांभार.
**मोज**–न० माप.
**मोजका**–वि० मोजलेला, मापलेला, नेमका.
**मोजणी**–स्त्री० मोजण्याचा व्यापार. २ प्रतबंदी, पैमाप.
**मोजणीदार**–पु० जमीन मोजणारा-मापणारा.
**मोजणें**–स० पैमाप करणें, मापणें, गणणें.
**मोजदाद–त–स्त**–(आ) गणती, मोजमाप.
**मोजा**–(फा) पु० हातांचें किंवा पायांचें आच्छादन. [रामय्या.
**मोट**–स्त्री० विहिरींतून पाणी काढण्याचें चर्म,
**मोटकरी**–पु० मोटवाला–हांकणारा. [टळी.
**मोटकुळी**–स्त्री० लहान गांठोडें, गांठोडी, मो-
**मोटन**–(सं) न० मोडण.
**मोठा**–वि० श्रेष्ठ, भारी.
**मोठाई**–स्त्री० बढाई. [अंकुर.
**मोड**–पु० पराजय–भव. २ रीत, तऱ्हा. ३
**मोडकळीस येणें**–अ० जीर्ण होणें, पडण्याजोगा होणें.
**मोडणी**–(सं) स्त्री० मांडणी, रीत, मोड.
**मोडणें**–(सं) उ० वि० फिसकटणें, तुटणें, तोडणें, पिचविणें, पिचणें.
**मोडतोड**–स्त्री० नवें जुनें, दुरुस्ती.
**मोडा**–पु० अडथळा, हरकत, नाट.
**मोडी**–स्त्री० लिपिविशेष. २ वि० मोडणारी.
**मोत**–(आ) स्त्री० मृत्यु, मरण.
**मोतदार**–पु० घोडा संभाळणारा.
**मोताद**–(आ) स्त्री० महाग, मुस्कील.

**मोतिया**–पु० एक फुलझाड. २ रंगविशेष, जवळ जवळ गुलाबी रंग.
**मोतीं**–(सं) न० मौक्तिक, मुक्ताफळ.
**मोतीदाणा**–पु० मोतीं.
**मोतीबिंदु**–पु० वडसासारखा एक नेत्ररोग.
**मोदक**–(सं) पु० पक्वान्नविशेष. २ खाऊ, कोणताही गोड पदार्थ.
**मोदी**–पु० कोठावळा, वाणी.
**मोदीखाना**–पु० लष्कराची कोठी.
**मोनजात**–स्त्री० मुके प्राणी.
**मोना**–(सं) वि० मुका, मूक.
**मोप**–वि० लई, पुष्कळ, मस्त. २ न० लांकूड आडवें कापणें.
**मोबत–द**–(आ) स्त्री० कृपा, दया.
**मोबदला**–(आ) पु० बदला, ऐवज. २ गहाण.
**मोमीन**–(आ) पु० एक प्रकारचे मुसलमान.
**मोर्त्तब**–(आ) न० शिक्का, ठसा.
**मोर**–(सं) पु० मयूर, नीलकंठ.
**मोरचंग**–पु० वाद्यविशेष.
**मोरचल–चेल**–न० मोराच्या पिसांचा कुंचा.
**मोरचा**–(फा) पु० सैन्यांतील पुढारी शिपाई.
**मोरचूत–द**–पु० खनिज पदार्थविशेष.
**मोरवा**–पु० मोघा, मडकें.
**मोरंबा**–(फा) पाकांत मुरविलेला पदार्थ.
**मोरी**–स्त्री० घाणी, खाळ, मुतारी.
**मोल**–(सं) न० मूल्य, किंमत. २ मोबदला.
**मोलकरी**–पु० मजूर, कामकरी. [ळंबीण.
**मोलारीण–लकरीण**–स्त्री० स्त्रीमजूर, कु-
**मोसबा–जबात**–(आ) पु० हिशोब, जमाखर्च.
**मोसंबी**–स्त्री० एक प्रकारचें नारिंग. २ वि० रंगविशेषाचें.
**मोसम**–(आ) पु० बहार, ऋतु, बार, हंगाम.
**मोह**–(सं) पु० लळा, ममता, माया, प्रीति. २ मूर्छा. ३ तोंडाला पाणी सुटणें. ४ वृक्षविशेष.
**मोहक**–(सं) वि० मोह आणणारें.
**मोहजाल–पाश**–(सं) न० मायापाश–जाल.
**मोहणें**–(सं) उ० वि० स्वाधीन करून घेणें, स्वाधीन होणें, भुलणें, भुलविणें, भाळणें.
**मोहनी**–(सं) स्त्री० मोहन, मोहणें, भूल, भुरळ.
**मोहबत–द**–(आ) स्त्री० मर्जी, कृपा, दया, मुरवत.
**मोहर**–(फा) स्त्री० एक सोन्याचें नाणें. २ शिक्का, मुद्रा. ३ स्त्री० आम्रवृक्षाची मंजरी.
**मोहरकाड्या**–वि० म्होरप्या, पुढारी.
**मोहरकी**–स्त्री० एक प्रकारचें दावें.
**मोहरम**–(आ) पु० मुसलमानी एक महिना.
**मोहरा**–(फा) पु० पखवाजाची गत, परण. २ चेहरा. ३ बुद्धिबळांतील जनावर अगर वजीर.
**मोहरी**–स्त्री० राई.
**मोहरें**–क्रि० पुढें, मग. २ न० मोहरा, बुद्धिबळांतील वजीर हत्ती इत्यादि.
**मोहळ–होळ**–न० मधमाशांचें पोळें, मोहो.
**मोहा**–(सं) पु० वृक्षविशेष, महुडा. [री.
**मोहीम**–(आ) स्त्री० लष्कराची–फौजेची स्वा-
**मोहोर**–पु० ( मोहर पहा. ) [विशेष.
**मोळ**–पु० पाल्याचा उतार–ढाळ. २ तृण-
**मोळक्या–मोळविक्या**–पु० भारेवाला, काटक्या विकणारा.
**मोळा**–पु० रीत, रिवाज, शिरस्ता, ओळा.
**मोळी**–स्त्री० भारी, लांकडांचें ओझें.
**मौक्तिक**–(सं) न० मोतीं, मुक्ताफळ.
**मौज**–(आ) स्त्री० मजा, गम्मत. [२ चैन.
**मौजा**–(आ) पु० गांव, ग्राम, मुक्काम, मौजें,
**मौजें**–पु० गांव, मुक्काम.
**मौत**–(आ) स्त्री० मोत, मृत्यु, मरण.
**मौन–न्य**–(सं) न० अबोला, मुकेपणा.
**मौर्ख्य**–(सं) न० मूर्खपणा, पाजीपणा, अज्ञान.
**मौलवी**–(आ) पु० मुसलमान पंडित.

मौंजीबंधन–(सं) न० मुंज, उपनयन.
मंगल–ळ–(सं) न० शुभकार्य, कल्याण. २ नमन, नांदी. ३ ग्रहविशेष. ४ वि० कल्याणकारक, शुभ.
मंगलस्नान–(सं) न० शुभकार्यांतील न्हाणें.
मंगलाचरण–(सं) न० नमन, आरंभींची ईश्वराची स्तुति. २ नांदी, नाटकारंभींची स्तुति. [णण्याची कविता.
मंगलाष्टक–(सं) न० शुभकार्यसमयीं म्ह-
मंगलाक्षता–(सं) स्त्री० मंगलसमयीं उपाध्यांनें अंगावर टाकलेले तांदुळ.
मंगळवार–(सं) पु० भौमवार.
मंगलसूत्र–(सं) न० सौभाग्यसूत्र.
मंचक–(सं) पु०पलंग, मंच, माचा, झोपाळा.
मंजन–(सं)न० राखुंडी, तोंड धुण्याची पूड.
मंजरी–(सं) स्त्री० तुरा, डिकशी.
मंजिरी–लहान टाळ, वाद्यविशेष.
मंजु–(सं) वि० कोमल, मजेदार, मंजुळ.
मंजूर–(फा) वि० कबूल, अनुमत.
मंडई–(फा) स्त्री० मंडी, बाजार.
मंडन–(सं) न० भूषण, अलंकार.
मंडप–(सं) पु० मांडव, मोठी मंडपी.
मंडपी–स्त्री० लहान मंडप, मांडवी.
मंडल–ळ–(सं)न०वर्तुल,गोल, चक्र. [दाय.
मंडली–ळी–(सं)स्त्री०जमाव, पंच, जनसमु-
मंडूक–(सं) पु० बेडूक, भेक.
मंडूर–(सं) पु० रसायनविशेष.
मंत्र–(सं) पु० जप करण्याची अक्षरें, मंतर. २ बोलावणें. ३ गुप्त गोष्ट, गौप्य.
मंत्रतंत्र–(सं) न० ⎱ जादुटोणा, छांछू, छू
मंत्रप्रयोग–(सं)पु० ⎰ मंतर. [ला विस्तव.
मंत्राग्नि–(सं) पु० मंत्र ह्मणून प्रेतास दिले-
मंत्राक्षत–ता–(सं) स्त्री० मंतरलेले तांदुळ.
मंत्री–(सं) पु० मंत्र शिकलेला, पंचाक्षरी. २ सचिव, प्रधान, वजीर.
मंथणी–(सं) स्त्री० रवी, घुसळण–णी.
मंथन–(सं) न० घुसळणें, ढवळणें.
मंद–(सं) वि० आळशी, सुस्त, मैंद. २ पु० शनि, शनैश्चर. ३ क्रि०हळू, सावकाश.
मंदगति–(सं) स्त्री०आळशी चालीचा, सुस्त.
मंदभाग्य–(सं) पु० अभागी, कमनशीबी.
मंदमति–(सं) पु० बुद्धीचा खंदक, मतिहीन.
मंदवार–(सं) पु० शनवार.
मंदाई–स्त्री० मंदी, सुस्ती.
मंदार–(सं) पु०(पांढऱ्या)रुईचें झाड,मांदार.
मंदावणें–स०आळसावणें,रेंगाळणें. [राजगृह.
मंदिर–(सं) न०देऊळ, देवालय, २ मोठें घर,
मंदी–(सं) स्त्री० मंदाई, स्वस्ताई. २ आलस्य, आळस, सुस्ती.
मंदील–पु० जरीचें पागोटें. [टकुली.
मंदोदरी–(सं) स्त्री० रावणाची स्त्री. २ बे-

## य.

य–सव्विसावें व्यंजन.
यक्ष्मा–(सं) पु० रोगविशेष, क्षय.
यक्ष–(सं) पु० उपदेवताविशेष.
यक्षिणी–(सं) स्त्री० यक्षस्त्री.
यकृत्–(सं) पु० रोगविशेष.
यच्चयावत्–(सं) क्रि० झाडून, चटसारें.
यज्ञ–(सं) पु० मख, होमहवन. [ जागा.
यज्ञकुंड–(सं) न० होम करण्याची नियमित
यज्ञोपवीत–(सं) न०जानवें,जनोई, ब्रह्मसूत्र.
यजणें–(सं) उ० वि० होमहवन करणें.
यजमान–(सं) पु० यज्ञ करणारा. २ धनी, मालक. ३ नवरा. [ण, मालकीण.
यजमानीन–स्त्री० यजमानाची स्त्री. २धनी-
यजुर्वेद–(सं) पु० दुसरा वेद.
यत्किंचित्–(सं) क्रि० थोडासुद्धां.

**यत्न**–(सं) पु० उद्योग, प्रयत्न, पुरुषार्थ.
**यति–ती**–(सं) पु० संन्याशी–सी. २ पद्यांतील विराम.
**यथा**–(सं) क्रि० जसा, ज्याप्रमाणें.
**यथाक्रम**–(सं) क्रि० क्रमाप्रमाणें,क्रमानुरूप.
**यथाकाल–लीं–ळीं**–(सं) क्रि०यथावकाश. वेळच्या वेळीं.
**यथातथ्य**–(सं) क्रि० खरोखर, बरोबर.
**यथाबुद्धि**–(सं) क्रि० बुद्धीप्रमाणें,बुध्यनुरूप.
**यथायोग्य**–(सं) क्रि० योग्यतेनुरूप–प्रमाणें, बरोबर, न्याय्य. [ अर्थानुरूप.
**यथार्थ**–(सं) क्रि० बरोबर, खरोखर,रास्त.२
**यथाविधि**–(सं) क्रि० विधीप्रमाणें.
**यथाशक्ति–क्त्या**–(सं) क्रि० शक्तीप्रमाणें, शक्त्यनुसार.
**यथाशास्त्र**–(सं) क्रि० शास्त्रानुरूप–प्रमाणें.
**यथास्थित**–(सं) क्रि० जसें होतें तसें. २ ठीक, बरें. ३ यथेच्छ. [ तेनें.
**यथासांग**– (सं)क्रि० सांगितल्याप्रमाणें,पूर्ण-
**यथेच्छ**–(सं) क्रि० इच्छेप्रमाणें–नुरूप.
**यद्यपि**–(सं) उ० जरी, यथापि,यत्रापि.
**यम**–(सं) पु० धर्मराज, पितृपति, कृतांत. २ इंद्रियनिग्रह.३ रागिट मनुष्य,कर्दनकाळ.
**यमक**–(सं) न० कवितेंत चरणांच्या शेवटलीं–पहिलीं–मधलीं सारखीं अक्षेरं, शब्दालंकारविशेष.
**यमदूत**–(सं) पु० यमाचे सेवक, काळपुरुष.
**यमयातना**–(सं) स्त्री० मरणकाळच्या वेदना, दुःसह दुःख.
**यमुना**–(सं) स्त्री० नदीविशेष.
**यव**–(सं) पु० जव, सातु, धान्यविशेष.
**यवन**–(सं) पु० म्लेंच्छ, मुसलमान.
**यश**–(सं) न० कीर्ति, आबरू. २जय, फत्ते.
**यष्टि**–(सं) स्त्री० काठी, दंड.
**या**–(फा) उ० अथवा, किंवा.
**याकुती**–स्त्री० एक प्रकारचें भांगेचें मिश्रण,,
**याकूत**–(आ) न० रत्नविशेष. [ करणारा.
**याचक**–(सं) वि० भिक्षुक, भिकारी, याचना
**याचना**–(सं) स्त्री० भिक्षा, भीक.
**याज्ञिक**–(सं) पु० अग्निहोत्री, होम करणारा. २ धर्मकर्माचे मंत्र जाणणारा. ३धार्मिक कर्म.
**याज्ञिकी**–(सं) न० यज्ञाची क्रिया.
**याजन**–(सं) न० यज्ञ करविणें.
**यात्रा**–(सं) स्त्री० जत्रा, मेळा.
**यात्रेकरी**–रू–सा० यात्रेस जाणारा.
**यात–ती**–(सं) स्त्री० जात–ती.
**यातना**–(सं) स्त्री० कष्ट, श्रम, त्रास, वेदना.
**यातायात**–(सं) स्त्री० घोंटाळा, गोंधळ, भानगड. २ त्रास. ३ जा य, वेरझार.
**याद**–(फा) स्त्री०आठवण, स्मृति. २ यादी, टिपण. [ वण.
**यादगारी–गिरी**–(फा) स्त्री० स्मृति, आठ-
**यादी**–स्त्री० टिपण, याद.
**यान**–(सं) न० वाहन, गाडी घोडा इत्यादि.
**यार**–(फा) पु०मित्र,ओळखी, स्नेही. २जार.
**यारी**–(फा) स्त्री० दोस्ती, स्नेह. २ ओझें उचलण्याचें यंत्र.
**यावत्**–(सं) श० जोंपर्यंत–पावेतों.
**यावनाल**–(सं) पु० जोंधळा, ज्वारी.
**युक्त**–(सं) वि० योग्य, जोगें. २ सहित,सह. ३ मिश्रित. [ क्लृप्ति.
**युक्ति**–(सं) स्त्री०योजना,कल्पना,खुबी, कळ,
**युग्म**–(सं) न० जोडी–डा, मेहुण,द्वय.
**युग**–(सं) न० अति मोठी कालाची यत्ता.
**युत**–(सं) वि० जोडलेला,सांधलेला. २ सह.
**युद्ध**–(सं) न० लढाई, भांडण.
**युवती**–(सं) स्त्री० तरुण स्त्री,जवान बायको.
**युवराज–जा**–(सं) पु० गादीचा मालक, राजपुत्र.

**युवा**-(सं)-पु० तरुण मनुष्य.
**येऊनजाऊन**-क्रि० फार तर, निदानीं.
**येणें**-(सं) अ० आगमन करणें. २ अवगत होणें. ३ न० ऋण येणें, येणें.
**येणेंजाणें**-न० जाण्यायेण्याचा परिपाठ, दळणवळण, व्यवहार.
**येथ**-क्रि० येथें, याजागीं.
**येथचा**-वि० येथील, इथला.
**येथपर्यंत**-क्रि० येथपावेतों-येथवर.
**येथील**-वि० येथचा, ह्या ठिकाणचा.
**येथून**-क्रि० ह्या स्थलापासून.
**येथें**-क्रि० येथ, याठिकाणीं.
**येधवां**-क्रि० एधवां, यावेळेस.
**येरे**-सर्व० दुसरा.
**येरंड**-पु० एरंड. [ सत, चांगला.
**योग्य**-(सं) वि०युक्त,जोगा, लायक.२मान्य,
**योग**-(सं) पु० वेळ, काळ. २ समाधिसाधन. ३ योगायोग, प्रसंग.
**योगिनी**-(सं) स्त्री० देवताविशेष. [नी.
**योगी**-(सं) पु० जोगी, गोसांवी, योगसाध-
**योजणें**-(सं) उ० वि० कल्पणें, कल्पना करणें, योजना करणें.
**योजन**-(सं) न० चार कोस.
**योजना**-(सं) स्त्री० युक्ति, कल्पना.
**योद्धा**-(सं) पु० वीर, पराक्रमी पुरुष, लढवय्या, लढाऊ.
**योनि**-(सं)स्त्री० स्त्रीचें जननेंद्रिय. २कारण.
**यौवन**-(सं) न० तारुण्य, ज्वानी.
**यंत्र**-(सं) न० साधन, अवजार, हत्यार.
**यंदां**-क्रि० ह्यावर्षी, ह्यासालीं.
**यंव**-क० शाबास, भले, खाशी.

---

र-सत्ताविसावें व्यंजन.
**रक्त**-(सं) न० रुधिर, रगत. २ वि० तांबडा. ३ अनुरक्त, आषक.
**रक्तओढा**-पु० तांबडा लेप.
**रक्तचंदन**-(सं) न० चंदनविशेष.
**रक्तपात**-(सं) पु० रक्तस्राव-प्रवाह.
**रक्तपिती**-(सं) स्त्री० रोगविशेष, महारोग.
**रक्तबोळ**-पु० औषधविशेष.
**रक्तवाहिनी**-(सं) स्त्री० शीर, स्नायु.
**रक्तस्राव**-(सं) पु० रक्तपात-प्रवाह.
**रक्ष्य**-(सं) वि० रक्षण करण्यास योग्य.
**रक्षक**-(सं) पु० त्राता, रक्षण करणारा.
**रक्षण**-(सं) न० त्राण, संभाळणें. [राखणें.
**रक्षणें**-(सं) स० संरक्षण करणें, संभाळणें,
**रक्षा**-(सं) स्त्री० संरक्षण.२राख.३ राखी.
**रकटें-गटें**-न० असकर, लक्तेरें, फाटकें व मलिन वस्त्र.
**रकम-रक्कम**-(आ) स्त्री० ऐवज, जमा, हंशील. २ क्रम. ३ कलम. ४ चीज, जिन्नस, वस्तु. [ कमवार, कलमवार.
**रकमबंद**-(फा) वि० पैसेवाला. २ क्रि० र-
**रखडणें**-उ० वि० ताणणें, खितपणें.
**रखरख**-(सं) स्त्री० भकभक, रुक्षता.
**रखरखीत**-वि० भगभगीत, रुक्ष.
**रखवालदार**-पु० राखणदार, रक्षक.
**रखवाली**-स्त्री० राखण, पहारा.
**रखा**-(सं) स्त्री० रक्षा, रक्षण.२राख,खाक.
**रग**-(फा) स्त्री० कळ. २ गुर्मी. ३ शीर.
**रगड**-वि० पुष्कळ, बक्कळ, रगडून.
**रगडणें**-उ० वि० चिरडणें. २.खाणें. ३चेपणें, मर्दन करणें
**रगडा-रगाडा**-पु० दाटी, गर्दी.
**रगाडी**-स्त्री० चंगळ, गर्दी.
**रगडून**-क्रि० पुष्कळ, खूप, रगड.

रचणें-(सं) उ० वि० ढीग करणें.२ कवणें, ग्रंथणें. ३ करणें.
रचना-(सं) स्त्री० बांधणी, योजना.२ कवन.
रचाई-स्त्री० बांधकाम, बांधणी, चणतर.
रज्जु-(सं) स्त्री० दोरी, रशी.
रज-(सं) न० गुणविशेष. २ धूळ, कण. ४ विटाळ, आर्तव.
रजई-जाई-(फा) स्त्री० दुलई, लहान लेप.
रजक-(सं) पु० परीट, धोबी.
रजनि-नी-(सं) स्त्री० रात्र, निशा.
रजवाडा-पु० संस्थानिक, मांडलिक राजा.
रजस्वला-(सं) स्त्री० ऋतुमती, विटाळशी.
रजा-(आ) स्त्री०सुट्टी, मोकळीक,परवानगी.
रजोगुण-स्त्री० पु० गुणविशेष.
रजोदर्शन-स्त्री० न० ऋतुप्राप्ति, नहाण.
रट्टा-ट्या- पु० गर्दी, मोठा ठोसा, ठोका.
रड्या-वि० रडणारा, भित्रा, मेषपात्र.
रड-स्त्री० रर, नकार, रडणें, रडगाणें.
रडकथा-स्त्री० रडगाणें.
रडका-वि० रडणारा, रड्या, रडवा.
रडगाणें-न० रडकथा, रड.
रडणें-(सं) अ० रुदन करणें, डोळ्यांतून पाणी काढणें, शोक करणें, रडूं.
रडतोंड्या-वि० गायमुख्या, मेषपात्र.
रडविणें-स० रुदन करविणें, रडायास लावणें.२ दमविणें, नकोनकोसें करणें.
रडारड-स्त्री० पुष्कळांचें रडणें.
रण-(सं) न० युद्धभूमि, समरांगण. २ लढाई, युद्ध. ३ मैदान.
रणकंदन-(सं) न० तुमुल युद्ध.
रणगाडा-पु० रथ, लढाईची गाडी.
रणझेंडा-पु० ध्वज, निशाण, पताका.
रणतुंबळ-(सं) न० मोठें युद्ध.
रणवाद्य-(सं) न० वाद्यविशेष, ताशा.
रणशूर-(सं) पु० युद्धकुशल, योद्धा.

रत्न-(सं) न० मणि, मोल्यवान् दगड.
रत्नखचित- } (सं) रत्नें बसविलेलें, कोंदण
रत्नजडित- } केलेलें, जडावाचें.
रत्नपारखी-(सं) वि० रत्नपरीक्षक.
रत्नाकर-(सं) पु० समुद्र, दर्या, सागर.
रत-(सं) वि० निमग्न, रमलेला.
रतल-त्तल-(आ)पु० अर्धा शेर वजन, सरासरी अर्धा शेर.
रताळें-(सं) न० कंदविशेष, सकरकंद.
रति-(सं) स्त्री० मदनस्त्री. २ प्रीति. ३ प्रमाणविशेष. ४ संभोग.
रति-(सं) न०संभोगसुख. [मलेलें खाणें.
रतीब-(आ) पु० उकाडा. २ नियमाचें-ने-
रथ-(सं) पु० गाडी, गाडा.
रद्द-द-(फा) वि० निरुपयोगी, व्यर्थ.
रद्दी-(फा) स्त्री० लिहून निरुपयोगी झालेले कागद.
रदबदली-(आ) स्त्री० शिफारस, भीड.
रपकन्-दिशी-क्रि०रप् अशा आवाजासह.
रपका-पु० चापट, धपका.
रपाटा-पु० धपाटा, रट्टा-ट्या.
रपेट-स्त्री० सहल, व्यायाम.
रफू-(फा) पु० विणणें, वीण, तुणणें.
रबका-पु० रपाटा, धपाटा.
रबडा-पु० चिखल, गारा. [पूर्वधान्य.
रबी-ब्बी-(आ) स्त्री० कार्तिकफल-धान्य,
रम्य-(सं)वि० रमण्यास योग्य,सुंदर,मनोहर.
रमण-(सं) पु० पति, नवरा.
रमणा-पु० समाज, समुदाय. २ समाज जमण्याची जागा. [दरी.
रमणी-(सं) स्त्री० बायको, स्त्री, रामा, सुं-
रमणीय-(सं) वि० सुंदर, मनोहर.
रमणें-अ० खेळणें. २ सुख अनुभवणें. रंगाळणें. ४ मन लागणें.
रमविणें-स० दुसऱ्यास सुख देणें.

**रमल**–(आ) न० ज्योतिष.
**रमारमी**–स्त्री० बेतास बेत.
**रमूज**–(आ) स्त्री० खेळ, गम्मत.
**रयत**–(आ) स्त्री० प्रजा, लोक.
**रर**–स्त्री० रड, रडगाणें, रडकथा.
**रयां**–ई–स्त्री० कळा, टवटवी, गुण.
**रव**–(सं) पु० स्वर, आवाज. २ रांग, ओळ, पंगत. ३ रीघ, शिरकाव.
**रवा**–(आ) पु० सोजी, बारीक सांजा, एक प्रकारचें दाणेदार पीठ. २ रंगविलेलें हळकुंड. ३ कण, दाणा.
**रवानगी**–(फा) स्त्री० पाठवणी, बोळवणी.
**रवाना करणें**–स० पाठविणें, पोहोंचता करणें.
**रवाळ**–वि० दाणेदार.
**रवि**–(सं) पु० सूर्य.
**रविवार**–(सं) पु० आदित–त्यवार.
**रवी**–स्त्री० ताक–लोणी करण्याचें साधन, घुसळणी, मंथा, माथ्या.
**रश्मि**–(सं) पु० किरण, प्रभा, तेज.
**रस्ता**–(फा) पु० मार्ग, वाट, क्रम.
**रस्सी**–स्त्री० दोरी, रज्जू.
**रस**–(सं) पु० पातळ पदार्थ. २ धातू. ३ चव, माधुर्यादि रुचि. ४ शृंगारादि नवांपैकीं प्रत्येक. ५ पाणी.
**रसकापूर**–(सं) पु० औषधविशेष.
**रसना**–(सं) स्त्री० चव, रुचि. २ जीभ.
**रसभरित**–क्रि० रसानें भरलेलें.
**रसरशीत**–क्रि० प्रज्वलित, जळतें, तापलेलें.
**रसवंती**–स्त्री० वनस्पतिविशेष. २ जिव्हा.
**रससिंदूर**–(सं) पु० शेंदराचें रसायन.
**रसा**–(सं) पु० रस असलेली भाजी.
**रसातळ**–(सं) न० तळ, खालचा भाग. २ पाताळ. ३ नाश.
**रसायण–न**–(सं) भस्म केलेली धातू.
**रसायनशास्त्र**–(सं) न० धातूंच्या जारण-मारणाचें शास्त्र.
**रसाळ**–(सं) वि० रसभरित. २ जातिविशेष.
**रसिक**–(सं) पु० ज्ञानी, जाणता, सहृदय.
**रहदारी**–(फा) स्त्री० जाणें येणें. २ वहिवाट, वागणूक.
**रहवास**–पु० रिवाज, रहाणें. २ स्थल.
**रहस्य**–(सं) न० गुप्त गोष्ट, गूढ, अंतरंग.
**रहा**–(फा) स्त्री० धाटणी, तऱ्हा, रीत.
**रहाट**–पु० पाणी किंवा सूत काढण्याचें चक्र.
**रहाटगाडगें**–न० एक तऱ्हेचा रहाट.
**रहाटी**–स्त्री० वागण्याची चाल–तऱ्हा.
**रहाणी**–स्त्री, चाल, रीत, वागणूक.
**रहिवास–सी**–सा० राहणारे, स्थायिक.
**राई**–(सं) स्त्री० झाडी, बन. २ मोहरी.
**राऊत**–पु० घोडेस्वार.
**राऊळ**–(सं) न० राजवाडा. २ जातिविशेष.
**राक्षशीण–सीण**–(सं) स्त्री० राक्षसी, राक्षसाची बायको. २ दुष्ट स्त्री.
**राक्षस**–(सं) पु० दैत्य, दानव. २ क्रूर मनुष्य.
**राक्षसी**–(सं) स्त्री० स्त्रीराक्षस. २ वि० अचाट, राक्षसासंबंधी, राक्षसायोग्य.
**राक्षसी वेळ**–स्त्री० वाईट वेळ.
**राख**–(सं) स्त्री० रक्षा, रखा, भस्म, राखुंडी. २ रांड, वेश्या, राखलेली स्त्री.
**राखडी**–स्त्री० स्त्रियांचा एक डागिना.
**राखण**–(सं) स्त्री० संरक्षण. २ पहारा, पहारेकरी. ३ राखणावळ.
**राखणकरी**–पु० रखवालदार, पहारेकरी.
**राखणावळ**–स्त्री० चारणावळ, राखण्याबद्दल वेतन.
**राखणी**–स्त्री० चारणी, चारणें, संरक्षण, राखण.
**राखणें**–उ० वि० रक्षणें, बाळगणें. २ बचावणें, संभाळणें.
**राखरांगोळी**–स्त्री० नाश, नायनाट.

राखुंडा–पु० रांख, राखेचा उकिरडा. २ रांवा, वरील ओंठ चिरलेला मनुष्य.
राखुंडी–खोंडी–स्त्री० काळी राख, रक्षा.
राग–(सं) पु० प्रीति. २ संताप, कोप. ३ गाण्याचा प्रकार. ४ रंग.
रागरंग–पु० बातबेत, अदमास.
रागावणें–अ० संतापणें, कातावणें, कोपणें.
रागिणी–(सं) स्त्री० लहान राग, पोटराग.
रागिष्ट–वि० रागीट, संतापी.
राघू–पु० पोपट, शुक, कीर, तोता.
राज्ञी–(सं) स्त्री० राणी, राजाची स्त्री.
राज्य–(सं) न० अम्मल, धनीपणा. २ राजाच्या अमलांतला प्रांत.
राज्याभिषेक–(सं) पु० राजास गादीवर बसविण्याचा संस्कार.
राजकीय–(सं) वि० राजासंबंधी.
राजकुमार–(सं) पु० राजपुत्र.
राजकुमारी–(सं) स्त्री० राजकन्या.
राजकुल–(सं) न० राजवंश.
राजगिरा–पु० तृणविशेष व त्याचें धान्य.
राजचिन्ह–(सं) न०छत्रचामरादि बाह्य वस्तु, चक्रपद्मादि हस्तपादादिगतरेषा.
राजदरबार–पु० राजाची कचेरी–सभा.
राजधानी–(सं) स्त्री० राजनगरी.
राजनीति–(सं) स्त्री० राजानें वागण्याचा कायदा.
राजपथ–(सं) पु० राजमार्ग. [सिंहासन.
राजपद–(सं) न० राज्य, राजाची गादी,
राजबिंडा–पु० सुरेख मनुष्य.
राजपुत्र–(सं) पु० राजकुमार.
राजमंदिर–(सं) न० राजमहाल, प्रासाद.
राजमान्य–(सं) वि० राजांनीं मान देण्याजोगा.
राजमार्ग–(सं) पु० राजपथ, मोठा रस्ता.
राजरूशी–रोस–क्रि० उघड, प्रसिद्धपणें.
राजवंश–(सं) पु० राजकुल, राजघराणें.
राजवाडा–पु० राजमहाल, राजमंदिर.
राजवैद्य–(सं) पु० नामांकित वैद्य. २ राजाचा वैद्य.
राजश्रियाविराजित–(सं) वि० थोर, श्रेष्ठ.
राजश्री–(सं) पु० गृहस्थ. २ के० बच्चाजी, बच्चाजीमोरे.
राजसत्ता–(सं) स्त्री० राजाची मालकी.
राजसभा–(सं) स्त्री० राजदरबार.
राजहंस–(सं) पु० पक्षिविशेष.
राजा–(सं) पु० राव, राय, करभार घेणारा, नृप, भूप.
राजासन–(सं) न०राजाची गादी, सिंहासन.
राजी–(आ) वि० खुष, तयार.
राजीखुषी–स्त्री० आपखुषी, स्वतःची खुषी.
राजीनामा–(फा) पु० अर्ज मागें घेणें. २ चाकरी नको ह्मणून पाठविलेलें पत्र.
राजीव–पु० कमल.
राजू–(सं) पु० रज्जु, दोरी.
राजेंद्र–(सं) पु० महाराज. [चिखल, कर्दम.
राड–स्त्री० हाळीचा खळगा. २ राख,रक्षा,
राणा–पु० राजा, राय, राव.
रात्र–(सं) स्त्री० निशा, रात, रात्रि.
रातंबा–पु० रातंबीचें फळ.
रातंबी–स्त्री० वृक्षविशेष.
रातांधळा–पु० रात्रीं दृष्टि नसलेला,रात्र्यंध.
रातोरात–क्रि० रात्रीच्या रात्रींत.
रान–(सं) न० अरण्य, जंगल, वन.
रानट–टी–वि० जंगली, वनांतील.
रानभाजी–स्त्री० हलकी–पालेभाजी.
रानमांजर–न० जंगली मांजर.
रानोरान–क्रि० रानोमाळ, रानभर.
रापणें–रांपणें–अ० भिजूं देणें. २ व्यापणें, कलंक लागणें.
राब–स्त्री० काकवी, पातळ गूळ.

**राबणें**–अ० खपणें, मेहेनत करणें. २ वहिवाटीनें–उपयोगानें योग्य होणें.
**राबता**–(आ) पु० संवय, रवेता, रबत.
**राम**–(सं) पु० विष्णूचा सातवा अवतार. २ एक रुपया. ३ अर्थ, जीव, तकवा. ४ तीन, ३. [थमचा ठोसा, रामटोमणा.
**रामटोला**–पु० चेंडू दांडूच्या खेळांतील प्र-
**रामपहारा**–पु० सकाळ, प्रातःकाळ.
**रामपात्र**–पु० एक तऱ्हेचें पंचपात्र.
**रामफळ**–पु० फळविशेष. २ स्त्री० त्याचें झाड.
**रामबाण**–(सं) पु० रामाचा बाण. २ वि० अचूक लागणारें, अचूक गुण करणारें.
**रामरक्षा**–(सं) स्त्री० स्तोत्रविशेष.
**रामरट्टा**–पु० रामरगडा, गर्दी.
**रामा**–(सं) स्त्री० स्त्री, बायको.
**रामायण**–(सं) न० रामराजाची कथा.
**रामोशी**–पु० रखवालदार. २ जातिविशेष.
**राय**–(सं) पु० राव, राजा. [हरपररेवडी.
**रायआंवळा**–पु० एक प्रकारचा आंवळा,
**रायतें**–न० एक प्रकारचें तोंडीलावणें.
**राय–रावबहादुर**–पु० पदवीविशेष.
**रायवळ**–वि० जंगली.
**राव**–पु० राय, राजा. २ पदवीविशेष.
**रावटी**–स्त्री० डेरा, लहान तंबु.
**रावण**–(सं) पु० रामाचा प्रतिस्पर्धी.
**रावा–रांवा**–पु० पोपट, राघू. २ राखुंडा, वरचा ओठ चिरलेला मनुष्य.
**राशि**–(सं) स्त्री० ढीग. २ रास.
**राष्ट्र**–न० देश, प्रांत.
**राष्ट्रीयसभा**–(सं) स्त्री० राष्ट्रीयपरिषद्, राज्यांतील लोकांनीं निवडलेल्या मुखत्यार लोकांची कचेरी.
**रास्त**–(फा) वि० खरें, वाजवी, वास्तविक.
**रास्ता**–पु० एक जातीचें लुगडें.
**रास**–(सं) स्त्री० राशि, ढीग. २ क्रीडाविशेष.
**रासभ**–(सं) पु० गाढव, गर्दभ.
**राहणें**–अ० रहाणें, असणें, वास करणें.
**राहु**–(सं) पु० एक ग्रह, भूमिच्छाया.
**राहुटी–होटी**–स्त्री० रावटी.
**राळ**–(सं) स्त्री० धूळ, राखरांगोळी. २ एक ज्वालाग्राहि औषधि.
**राळा**–पु० धान्यविशेष.
**रांकट**–वि० बळकट, कष्टाळू, रांठ.
**रांग**–स्त्री० ओळ, हार, पंगत.
**रांगणें**–अ० हात व गुडघे टेंकून चालणें.
**रांगोळी**–स्त्री० गारेचें पीठ. २ नाश.
**रांगोळें**–न० रांगोळी घालण्याचें साधन.
**रांजण**–पु० मोठें मडकें, डेरा.
**रांजणवाडी**–स्त्री० डोळ्यांच्या पापणीला झालेला फोड.
**रांठ**–वि० खरखरीत, रांकट. [जडा.
**रांड्या–रांड्याराघोजी**–वि० बायक्या, हि-
**रांड**–स्त्री० रंडकी. २ वेश्या, कसबीण.
**रांडबाज**–पु० रंडीचा शोकी, विषयी.
**रांडलेंक**–पु० रांडेचा मुलगा.
**रांधणें**–स० शिजविणें, बनविणें.
**रांधा**–पु० मिश्रण.
**रिक्त**–(सं) वि० रिकामें, कोरडें, रितें.
**रिकबी**–(आ) स्त्री० रिकीब, घोड्यावर बसून पाय ठेवण्याकरितां केलेल्या कड्या.
**रिकामचावडी**–स्त्री० चांडाळचौकडी.
**रिकामचोट–टवळा–टेकडा**–वि० रिकामा, आळशी, निरुद्योगी.
**रिकामा**–वि० कामाशिवाय, निरुद्योगी. २ रिता, रिक्त, कोरडा. ३ क्रि० विनाकारण, व्यर्थ.
**रिघणें**–अ० शिरणें, आंत जाणें.
**रिघाव**–पु० रिगाव, शिरकाव, वाट, प्रवेश.
**रिचवणें**–उ० वि० रिकामें करणें. २ पिणें.
**रिजणें–झणें**–अ० खुष होणें, रंजन होणें.

रिठा–(सं) पु० फळविशेष.
रिणकर–री–पु० धनको.
रिणको–पु० कर्ज घेणारा.
रिता–(सं) वि० रिक्त, रिकामा. [ ऋद्धि.
रिद्धि–(सं) स्त्री० संपत्ति, धन, द्रव्य, ऐश्वर्य,
रिपु–(सं) पु० शत्रु, दुश्मन, गलीम.
रिवाज–(आ) पु० दस्तूर, चाल, रीत.
रिसालदार–(फा) पु० स्वारांचा मुख्य.
रिसाला–(आ) पु० घोडेस्वार.
रिंगणी–स्त्री० एक प्रकारचें झाड, डोरली.
रिंगणें–न० रिंगणीचें फळ. २ लहान मुलांचें खेळण्याचें एक द्रव्य.
री–स्त्री० ऋषभ, स्वरविशेष.
रीग–घ–स्त्री० रिघाव, शिरकाव.
रीण–(सं) न० ऋण, कर्ज, देणें.
रीत–ति–स्त्री० रस्ता, मार्ग, चाल.
रीतभात–स्त्री० चालरीत, रीत, रिवाज.
रीप–स्त्री० बारीक वांसा. [स्वल.
रीस–(सं) स्त्री० रोष, राग, रुसवा. २ आ-
रुई–(सं) स्त्री० रुरु, पशुविशेष. २ कापूस. ३ विशिष्टवृक्ष. [ खरखीत.
रुक्ष–(सं) वि० कोरडें, स्निग्ध नसलेलें, र-
रुका–क्का–पु० पै, पैशाचा बारावा भाग.
रुकार–(सं) पु० संमति, अनुमोदन. २ रुजू घेतल्याची–पाहिल्याची निशाणी.
रुखरुख–स्त्री० खुरखूर, चिंता.
रुखवत–न० लग्नांतील एक नियमित फराळ
रुखा–(सं) वि० रुक्ष, कोरडा.
रुचकर–(सं) वि० रोचक, चवदार.
रुचणें–(सं) अ० आवडणें, पसंत होणें, चव लागणें.
रुचि–(सं) स्त्री० चव, गोडी, आवड.
रुजणें–झणें–(सं) अ० लागणें, उगवणें.
रुजामा–(फा) पु० पोटीं रू असलेलें जाजम वगैरे.
रुजुवात–जवात–(आ) स्त्री० ताडून पहाणें. २ खरें करणें, कबूली, कबूल करविणें.
रुजू–(आ) वि० कबूल, मान्य.
रुटुखुटु–क्रि० सावकाश, खुटुरुटु, आस्ते.
रुणझुणणें–अ० नूपुर इत्यादि वाजणें.
रुतणें–अ० रुपणें, घुसणें. [य, रुद्रसूक्त.
रुद्र–(सं) पु० संहारक देवता. २ रुद्राध्या-
रुद्राक्ष–(सं) पु० एक वृक्ष व त्याचें फळ.
रुदन–(सं) न० रडणें, रोदन, रडें.
रुधिर–(सं) न० रक्त, लोही.
रुपणें–अ० रुतणें, खुपणें, बोंचणें.
रुपया–पाया–पु० सोळा आणे, एक चांदीचें नाणें.
रुपें–(सं) न० चांदी, रौप्य.
रुमणी–स्त्री० रुमणें, नांगराचा दांडा.
रुमणें–न० नांगराचा दांडा, टुमणें.
रुमाल–(आ) पु० समचतुरस्त्र वस्त्र.
रुश्वत–ष्वत–(फा) स्त्री० लांचलुचपत.
रुष्ट–(सं) वि० रागावलेला, संतापलेला.
रुस्तुमजी–पु० गोमाजीकापशा, अरेराव, बाजीराव.
रुसणें–(सं) अ० रागावणें, संतापणें.
रुसवा–(सं) पु० रोष, राग.
रुसविणें–स० संतापविणें, राग आणणें.
रुळणें–अ० संवय होणें, वहिवाटणें, राबणें.
रुंड–ढ–(सं) न० मुंडकें, शीर [ ठभूषण.
रुंडमाला–(सं) स्त्री० मुण्डमाळा. २ शिवकं-
रुंद–रुंदट–ड–वि० चवडा, आडवा.
रुंदी–स्त्री० आडवी लांबी, पोळाई, चवडाई.
रू–(फा) पु० कापूस, रुई. २ बच्या, पिल्लूं. ३ तोंड, पुढची बाजू.
रूढ–ढि–(सं) स्त्री० वहिवाट, चाल.
रूप–(सं) न० स्वरूप, देखावा, चेहरा. चीज. ३ सोंग, वेश–ष.
रूपक–(सं) न० अर्थालंकारविशेष.

रूपरंग–न० रंगरूप, तजेला.
रूपवती–(सं) स्त्री० रूपवान्–सुरेख स्त्री.
रूपवान्–(सं) वि० सुस्वरूप, सुरेख.
रूपांतर–(सं) न० स्वरूपाचा पालट.
रूपुस्त–(फा) न० पुढली मागली बाजू.
रूबरू–बुरू–क्रि० समक्ष, प्रत्यक्ष.
रूळ–स्त्री० एक स्त्रियांचा दागिना.
रे–के० अरे, अगा.
रेक्ता–(फा) पु० कविताविशेष.
रेकला–पु० छकडा, लहान गाडी.
रेखटणी–स्त्री० आंखणी, आंखण्याची पट्टी.
रेखणें–खाटणें–उ० वि० रेषा काढणें–ओढणें, चितरणें.
रेखा–(सं) स्त्री० रेषा, रेघ, ओळ.
रेघ–(सं) स्त्री० रेषा, रेखा, ओळ.
रेच–(सं) पु० ढाळ, मलशुद्धि, जुलाब.
रेचक–(सं) वि० ढाळक, जुलाब करणारें.
रेजा–(फा) पु० कण. २एक, पव. ३ तुकडा.
रेटणें–स० घालविणें, दडपणें. २ जोरानें दाबणें.
रेडकूं–रेडूक–न० पारडूं.
रेडा–पु० टोणगा, हल्या, महिष.
रेडी–स्त्री० पाडी, ह्मैस, महिषी.
रेणु–(सं) स्त्री० धूळ, कण.
रेत–(सं) न० वीर्य, धातु, गर्भोत्पादक द्रव्य. २ बारीक वाळू, रेती.
रेतदाणी–स्त्री० रेती ठवण्याची दौत.
रेती–स्त्री० वाळू, वालुका.
रेप–रेंप–स्त्री० अंग वळणें, हींव येणें, शहारा.२ धोंड. ३ भव्य वस्तु.
रेफ–(सं) पु० ओळीवर काढलेला रकार.
रेम्याडोक्या–वि० जडबुद्धि, जड.
रेल–स्त्री० पूर, लोंढा. २ विपुलता.
रेलचेल–स्त्री० विपुलता, सुबत्ता, चंगळ.
रेलणें–(आ) अ० झुकणें, पडणें, कलणें.
रेव–रेंव–स्त्री० रेती, बारिक खडे.
रेवड–स्त्री० एक प्रकारची गुंतागुंत–वीण.
रेवडी–स्त्री० खाण्याचा पदार्थ. २ बचेरी, हुर्यो, फजिती, टर.
रेवस–रेवाचिनी–(फा) स्त्री०औषधिविशेष.
रेवाळ–वि० रेव असलेलें, रवाळ. [प्राणी.
रेशमीकिडा–पु० रेशीम उत्पन्न करणारा
रेशीम–(फा) न० एक जातीच्या किड्यापासून निघणारे तंतु.
रेषा–(सं) स्त्री० रेघ, रेखा, ओळ, पंक्ति.
रेंकणें–न० ह्मशीचें ओरडणें. २ ओरडणें.
रेंगाळणें–अ० आळस येणें, मागें राहणें.
रेंच–(सं) पु० रेच, जुलाब, ढाळ.
रेंद–पु० गुत्ता, पिठा, दारू विकण्याचें स्थान.
रेंदा–पु० चिखल, गारा. [विशेष.
रेंप–स्त्री० रेप, शिणक, ज्वरजन्य विकार-
रेंरें–क्रि० हळूहळू, आस्ते, रेंगाळत.
रेंवट–वि० रेताड, रेतीचा.
रेवती–(सं) स्त्री० सत्ताविसावें नक्षत्र. २ बलरामाच्या पत्नीचें नांव. [कण.
रेंस–रेस–पु० पैशाचा सव्वासाहवा भाग. २
रोकड–वि० रोख, नगदी. २ स्त्री० द्रव्य.
रोकडीहुंडी–स्त्री० दर्शनी हुंडी.
रोख–(सं) स्त्री० द्रव्य, रोकड. २ नगदी. ३ कल, वळण. ४ नेम, शिस्त, लक्ष.
रोखणें–रोंखणें–अ० लक्ष जाणें–देणें, नेम–शिस्त धरणें.
रोखा–पु० खत, कागद.
रोखारोखी–वि० प्रतिस्पर्ध्यांची परस्परांवर शिस्त, सलामी, नजरानजर, दृष्टादृष्ट.
रोखी–वि० नगदी.
रोग–(सं) पु० दुखणें, बिमारी, इजा. २उपद्रव.
रोगट–वि० रोग असलेला, रोगी.
रोगण–(फा) न० तेल, राळ मेण इत्यादींचा एक चिकट पदार्थ.

**रोगराई**–स्त्री० बिमारी, आजार.
**रोगिष्ट**–(सं) वि० रोगी, आजारी.
**रोगी**–(सं) वि० आजारी, रोगिष्ट.
**रोचणें**–उ० वि० रोवणें, टोंचणें, बोचणें.
**रोज**–(फा) पु० दिवस, दिन. २ क्रि० नेहमीं, हमेशा. ३ एका दिवसाचा पगार.
**रोजकीर्द**–(फा) स्त्री० प्रत्येक दिवसाची देवघेव मांडण्याची वही.
**रोजखरडा**–पु० कच्ची रोजकीर्द.
**रोजगार**–(फा) पु० धंदा, उद्योग, व्यापार. २ चाकरी. ३ काम, कृत्य.
**रोजगारी**–पु० व्यापारी, उदमी. २ चाकर, नोकर. ३ वि० रोजगारासंबंधी.
**रोजगुदस्त**–(फा) क्रि० काल.
**रोजनदारी**–स्त्री० रोजमजूरी.
**रोजनिशी**–(फा) स्त्री० जीवनी, रोजनामा.
**रोजमुरा**–(फा) पु० मजूरी, मुशाहिरा.
**रोजमेळ**–पु० रोजच्या हिशेबाची शिल्लक.
**रोजा**–(फा) पु० मुसलमानांचें नक्त, अर्धा उपवास, उपास.
**रोजी**–(फा)स्त्री०रोजची मजुरी--खर्ची, खर्च.
**रोजीं**–(फा) क्रि० दररोज, प्रत्येक दिवशीं, एका दिवसाला.
**रोटी**–स्त्री० भाकरी, पोळी.
**रोठ–रोडगा**–पु० मोठी–जाड भाकर.
**रोड–का**–वि० किडकिडित, लुकडा.
**रोडा**–पु० ढोला, विटकर.
**रोडावणें**–अ० रोड–कृश होणें, वाळणें.
**रोदन**–(सं) न० रुदन, रडणें, आक्रोश.
**रोप**–(सं) न० लहान झाड, रोपा.
**रोम**–(सं) न० शरिरावरील केस, कुसळ. २ शष्प, शेंट.
**रोवणें**–स० खोंचणें, खुपसणें.
**रोवथ–रवथ**–(सं) न० चघळणें, पुनः पुनः चावणें.
**रोवळी–रोंवळी**–स्त्री० दुरडी, वंश–धातुपात्रविशेष.
**रोशनाई–रोषणाई**–(आ) स्त्री० आरास.
**रोशेल**–न०एक प्रकारच्या गवताचें तेल.
**रोष**–(सं) पु० राग, संताप.
**रोहिणी**–(सं) स्त्री० नक्षत्रविशेष.
**रोंख**–पु० कल, झोंक.
**रोंखणें**–स० नेमणें, लक्ष धरणें.
**रोंठा**–पु०एक प्रकारची सुपारी,रोंठी सुपारी.
**रौक्ष्य**–(सं) न० रुक्षता, रखरखितपणा.
**रौद्र**–(सं) पु० रसविशेष. २ वि० भयंकर.
**रौप्य**–(सं) न० रुपें, चांदी.
**रौरव**–(सं) पु० नरकविशेष.
**रंक**–(सं) पु० गरीब, भिकारी, कंगाल.
**रंग**–(सं) पु० वर्ण. २ मजा. ३ अदमास. ४ रंगविण्याचें द्रव्य.
**रंगढंग**–पु० चवढव, चटोरपणा.
**रंगण**–न० वर्तुल, गोल जागा. २ वाटोळें चालणें, चक्कर.
**रंगणें**–अ० रंग येणें, वर्ण उमटणें. २ तोंडाला रंग लावणें, सोंग घेणें. ३ रमणें.
**रंगभूमि**–स्त्री० नाटकांतील पात्रांच्या प्रयोगाची जागा.
**रंगमहाल**–पु० मंदिर.
**रंगरूप**–न० भावी स्थितीचा अदमास. २ बाह्य आकृति.
**रंगविणें**–स० रंग देणें, चितारणें.
**रंगारी**–पु० रंग देणारा.
**रंगीत**–वि० रंगलेलें, रंग लावलेलें, रंगाचें.
**रंगेल–ला**–वि० आनंदी, मौज्या.
**रंज**–(फा) स्त्री० नाखुषी, गैरसंतोष, त्रास, पीडा.
**रंजणूक**–स्त्री०रंजन, करमणूक.
**रंजणें**–(सं) अ० रमणें, खुष होणें.
**रंजन**–(सं) न० मनाचें समाधान, मौज.
**रंजीस**–वि० त्रस्त, कंटाळलेला.
**रंडकी**–(सं) स्त्री० रांड, विधवा.

**रंडी**–स्त्री० रांड, वेश्या, कसबीण.
**रंडीबाज**–पु० रांडबाज, बाहेरख्याली.
**रंधणें**–अ० कीस काढणें, रंधा मारणें.
**रंधा**–पु० लांकूड साफ करण्याचें हत्यार.
**रंभा**–(सं) स्त्री० परी, देवांगना. २ केळ.
**रंवदळणें–दाळणें**–स०गढुळणें,गढूळ करणें.

---

## ल.

**ल**–अठ्ठाविसावें व्यंजन.
**लइलूट**–स्त्री० विपुलता, लयलूट. [एकाग्रता.
**लई**–स्त्री० खळ. २ वि० पुष्कळ. ३ लय,
**लक्क–क्ख**–वि० चक्क. २ निर्मळ, स्वच्छ. ३ प्रकाशित. ४क्रि० अति तेज पडल्यासारखें.
**लक्का**–(आ) पु० एक प्रकारचें खबूतर.
**लक्ष्मी**–(सं) स्त्री० द्रव्य,पैसा. २विष्णूची स्त्री.
**लक्ष्मीवान्–वंत**–पु० धनवान् , श्रीमंत.
**लक्ष्य**–(सं) न० ज्यावर लक्ष–शिस्त धरावयाची तो पदार्थ, पारध, शिकार,सावज.
**लक्ष**–(सं) न० ध्यान, मन. २ नेम, शिस्त. ३ वि० लाख, संख्याविशेष. [३दुर्गुण.
**लक्षण**–(सं) न० चिन्ह, खूण. २ व्याख्या.
**लक्षणें**–(सं) स० लक्ष–नेम धरणें. २पहाणें.
**लक्षाधीश–धिपति**–(सं) पु० सावकार, श्रीमंत, लखापति.
**लकटणें**–अ० ढकलणें.
**लकडा**–पु० निकड, निकर, त्रास, लफडा.
**लकडी**–स्त्री० काडी, लांकूड. २ जास्त कडक झालेला गूळ इत्यादिकांचा पाक.
**लकब**–(आ) स्त्री०वाईट संवय,आदत,दुर्गुण.
**लकलकणें**–अ० चकाकणें.
**लकाकी**–स्त्री० चकाकी, तजेला, तेज.
**लकीर–री**–स्त्री० ओळ, रेघ.
**लकेर–री**–स्त्री० तान. २ चकाकी, झांक.
**लखलखणें**–अ० चकचकणें.
**लखलखित**–वि० चक्क, प्रकाशमान.
**लखलखी**–स्त्री० लखाकी, प्रकाश.
**लखलखाट**–पु० उजेड, प्रकाश, उजाला.
**लखलाभ**–पु० प्राप्ति, मिळकत. [स्वच्छता.
**लखालखी**–स्त्री० चाकचक्य, साफसुफी,
**लखोटा**–पु० लिफाफा, लाखोटा. २ चिकट पदार्थ. [होणें. ३ कालविशेष.
**लग्न**–(सं) न० विवाह. २ एकीकरण, एक
**लग्नकार्य**–(सं) न० विवाह मौंजी इत्यादि.
**लग्नघटका**–स्त्री० लग्नाची–विवाहाची वेळ. २ घाईची वेळ. [आमंत्रण.
**लग्नचिटी–ठी**–स्त्री० लग्नपत्रिका, लग्नाचें
**लग्नमुहूर्त**–पु० लग्नाचा मुहूर्त–वेळ.
**लग्न–गन–गिन–सराई**–स्त्री० लग्नांचा मोसम–हंगाम.
**लग्नसोहळा**–पु० लग्नसमारंभ–कौतुक.
**लग**–स्त्री० तुळई, बहाल.
**लगट**–स्त्री० मैत्री, दिललगी. २ पाठलाग.
**लगटणें**–उ० वि० ढकलणें, मित्रत्व जोडणें, आंग सरपटीस जाणें.
**लगड**–स्त्री० कांब, वीट.
**लगत**–क्रि० सोबत, बरोबर, लागून, जवळ.
**लगतऱ्या**–स्त्री० चिंध्या. [पदार्थ.
**लगदा**–पु० भिजविलेला–शिजलेला पुष्कळ
**लगा–ग्गा**–पु० लाग, साधन, संधान.
**लगाम**–(फा) पु० घोड्याचें दावें.
**लगाविणें**–उ० वि० मारणें, हाणणें,चोपणें.
**लगेहात**–क्रि० लागलीच.
**लगोऱ्या**–स्त्री० एक खेळ व त्याचें साहित्य.
**लघ्वी**–स्त्री० मुतणें, मूत्र, पिसाब.
**लघळ–घाळ**–वि० व्यर्थ गोष्टी सांगणारा, हांजी–तोंडपुजेपणा करणारा.
**लघु**–(सं) वि० लहान, ऱ्हस्व, आंखूड.
**लघुत्व**–(सं) न० नीचपणा, लघुता.

**लाटणें**–स० थपेटणें, वळकावणें. २ हालवणें. ३ न० लाटण्याचें हत्यार, वेलण.
**लांटालाट–लाटी**–स्त्री० गडबडगुंडा, लटपट, दडपादडप.
**लाड**–पु० चोज, कौतुक.
**लाडका**–वि० आवडता, प्रिय.
**लाडकावणें**–अ० लाड करणें. [करणें.
**लाडावणें**–अ० लाडांत येणें, लाडिकपणा
**लाडिकपणा**–पु० लाड, लडिवाळपणा.
**लाडू**–(सं) पु० लड्डुक, लड्डु, गोड पदार्थाचा गोळा.
**लात–थ**–(सं) स्त्री० लत्ता, पाय. २तंगडी.
**लाता–डी**–स्त्री० लाथ, तंगडी, पाय.
**लाथाडणें**–( **लथडणें** पहा. )
**लादणें**–स० चढवणें, घालणें.
**लादा**–पु० चोळामोळा, लद्दा. २ लगदा.
**लादी–लादणी**–स्त्री० छावणी, दगडाची पटाई.
**लाधणें**–स० लाभणें, मिळणें.
**लापशी**–स्त्री० एक तऱ्हेची खीर.
**लाभ**–(सं) पु० प्राप्ति, मिळकत.
**लाभणें**–स० लाधणें, मिळणें. २ लाभदायक होणें, फळणें, फळास येणें.
**लामणदिवा**–पु० एक प्रकारचा दिवा, ओवाळणीचा दिवा.
**लायक**–वि० योग्य, माफक.
**लायकी**–(फा) स्त्री० योग्यता.
**लाल**–(आ) पु० माणिक. २ वि० तांबडा.
**लालची**–वि० लांच इच्छिणारा, लालुचखोर.
**लालूच**–स्त्री० लांच, लुचपत.
**लालडी**–स्त्री० लहान लाल.
**लालन**–न० वाढविणें, संगोपन करणें.
**लालनपालन**–न० पाळणपोषण.
**लालचावणें**– } अ० लांच इच्छिणें, लो-
**लालचणें**– } भणें, प्राप्तीची इच्छा असणें.
**लावण्य**–(सं) न० सुस्वरूपता, सौंदर्य, रूप.
**लावणी**–स्त्री० पद्यविशेष. २ पेरणी.
**लावणें**–उ० वि० चोळणें. २ पुरणें, पेरणें.
**लावसट–चट**–वि० लघाळ, लगट करणारा.
**लावालाव–वी**–स्त्री० चहाडी, चुगली, कळ.
**लासूर–सरू**–न० रोगविशेष, नासूर.
**लाही**–(सं) स्त्री० आग, ज्वलन. २ भाजून झालेलें धान्याचें फूल, लाजा.
**लाहो**–पु० हावरेपणा.
**लाळ**–(सं) स्त्री० लाला, थुंकी.
**लांकूड**–न० लकडी, काष्ठ.
**लांगूल**–(सं) न० शेपूट, शेपटी, पुच्छ.
**लांच्छन**–(सं) न० डाग, कलंक, दोष.
**लांच**–पु० लुचपत, रुश्वत.
**लांचावणें**–अ० ललचावणें.
**लांडगा**–पु० एक मांसहारी प्राणी.
**लांडा**–(सं) वि० शेपटी तुटलेला–नसलेला.
**लांडोर**–स्त्री० मोराची मादी. [अंतराचें.
**लांब–ट**–(सं) वि० लंबायमान, दीर्घ. २ दूर,
**लांबण**–स्त्री० दूरमार्ग, अवकाश.
**लांबणें**–उ० वि० मोठा होणें, काल लागणें.
**लांबरुंद**–वि० लांबी व रुंदी बहुत असलेलें.
**लांबी**–स्त्री० आडवी रुंदी. २ लुकण.
**लांबोडा–ळा**–वि० लांबट, लांबसर.
**लांव**– } स्त्री० राक्षसी, राक्षशीण.
**लांस**– }
**लिकणें**–अ० लपणें, छपणें.
**लिखित**–(सं) वि० लिहिलेलें.
**लिगाड**–न० लचांड.
**लिपणें**–उ० वि० लिंपणें, रचणें, थापणें.
**लिपि**–(सं) स्त्री० लेखनपद्धति, लेखन.
**लिफापा–फा**–पु० लखोटा.
**लिबलिबीत**–क्रि० बिलबिलित, मऊ.
**लिलांव**–पु० विक्रय, हरराजी. [लवचिक.
**लिवलिवीत**–क्रि० विळविळित, गिळगिळीत,

**लिहिणावळ**—स्त्री० लिहिण्याची मजूरी.
**लिहिणें**—(सं) उ० वि०लेखन करणें,रचणें.
**लिंग**—(सं) न० शिस्न, पुरुषेंद्रिय. २ व्याकरणसंज्ञाविशेष. ३ शिवचिन्ह.
**लिंपण**—(सं) न० सारवण, लेप.
**लिंपणें**—(सं) स० लिपणें, थापणें, रचणें.
**लिंब**—(सं) न० कडूनिंब.
**लिंबू**—न० फलविशेष व त्याचें झाड.
**लिंबोटी**—स्त्री० लिंबाचें औषधविशेष. [रूप.
**लीख**—(सं) स्त्री० सूक्ष्म जंतुविशेष, ऊचें पूर्व-
**लीद**—न० घोड्याचें-उंटाचें शेण.
**लीन**—(सं) वि० गरीब, नम्र.
**लीला-ळा**—(सं) स्त्री०खेळ,चमत्कार,क्रीडा.
**लुक्का-का**—(आ) पु० सोदा, लुच्चा मनुष्य.
**लुकडा-ड्या**—वि० वाळका, रोडका.
**लुकण-लुक्कण**— न० लांबी.
**लुकलुकणें**—अ० चकचकणें.
**लुगडें**—न० मोठी साडी, स्त्रियांचें वस्त्र.
**लुच्चा**—वि० लबाड, लुक्का.
**लुच्चेगिरी**—स्त्री० लबाडी, फसवणूक.
**लुटणें**—अ० लुबाडणें, हिसकावून घेणें.
**लुटविणें**—स० लुटूं देणें, चोरूं देणें. २ हवें तितकें नेऊं देणें.
**लुटारू**—वि० लुटणारा, चोर.
**लुटुपुटु**—वि० लटकें, व्यर्थ, रिकामें.
**लुडबुड**—स्त्री० गडबड, मध्यें मध्यें येणें.
**लुडबुडणें**—अ० व्यर्थ गडबड करणें.
**लुप्त**—(सं) वि० नष्ट, लोपलेला.
**लुब्ध**—(सं) वि० लोभी, तत्पर.
**लुब्धक**—(सं) पु० पारधी, शिकारी, व्याध.
**लुबरा**—वि० कारणावांचून बोलणारा,चहाड.
**लुबाडणें**—स० लुटणें, जबरीनें घेणें, उपटणें.
**लुला**—(सं) वि० पंगु, व्यंग.
**लुलुपतू-पुतू**—स्त्री० हयगय. २ भीड.
**लुसलुशीत-सीत**—वि० फार कोंवळें.
**लूट**—स्त्री० लुटीचें द्रव्य, चोरीचा पैसा. २ लुटण्याची क्रिया.
**लूत**—स्त्री० एक रोग. [पत्र.
**लेख**—(सं) पु० लिहिलेलीं अक्षरें, कागद,
**लेखक**—पु० कारकून, लिहिणारा.
**लेखणी-नी**—(सं) स्त्री० कलम, लिहिण्याचें साधन, लेखण.
**लेखन**—(सं) न० लिहिणें.
**लेचापेचा**—वि० असमर्थ, रोड, अशक्त.
**लेजीम**—(फा) स्त्री० एक प्रकारची सांखळी.
**लेणें**—न० भूषण, दागदागिना. [जई.
**लेप**—(सं) पु० ओढा, सारवण. २ मोठी र-
**लेपणें**—(सं) न० लेपन, सारवण. २ स० लेप करणें, सारवणें, लिंपणें.
**लेवा**—पु० घेणें. २ लेप.
**लेश**—(सं) पु० लवमात्र, अंश.
**लेह**—(सं) पु० वट्ट पाक, चाटण.
**लेंक**—पु० स्त्री० मुलगा, मुलगी.
**लेंकरूं**—न० मूल, बाळ.
**लेंकवळा**—पु० वेश्यापुत्र.
**लेंकुरवाळी**—स्त्री० मूल असलेली स्त्री.
**लेंड**—न० लेंडी, पोहो. २ चेंडूदांडूच्या खेळांतील संज्ञाविशेष.
**लेंडी**—स्त्री० लेंडूक. २ घोड्याच्या शेपटीस अडकविण्याची दोरी.
**लोक**—(सं) पु० पृथ्वी, जग. २ मनुष्यजाति.
**लोकग्रह**—(सं) पु० लोकमत.
**लोकपाल**—(सं) पु० राजा. २ इंद्रादि दिशाधिपति.
**लोकापवाद**—(सं) पु० लोकांनीं केलेली निंदा, लोकवाद.
**लोखंड**—(सं) न० लोह.
**लोखंडी रस्ता**—पु० लोहमार्ग.
**लोचन**—(सं) न० नेत्र, डोळा.
**लोट**—पु० पूर, लोंढा. २ वळण, ठेवण.

**लोटणें**—उ० क्रि० ढकलणें, धक्का देणें. २ हाकारणें, चालू करणें.
**लोटा**—पु० तांब्या, गडवा, चंबु.
**लोटांगण**—न० दंडवत, साष्टांग नमस्कार.
**लोटी**—स्त्री० मनकर्णिका, तपेली, चिंचोळ्या तोंडाचें एक पात्र. [मत्याची मूठ.
**लोड**—पु० वाटोळा व लांबट तक्या. २ सा-
**लोण**—न० लवण. २ आव्यापाव्यांच्या खेळांतील संज्ञाविशेष.
**लोणचें**—न० आचार.
**लोणा**—पु० ओल. [विकणारा.
**लोणारी**—पु० जातिविशेष, चुना-कोळसे
**लोणी**—न० अशोधित घृत, नवनीत.
**लोप**—(सं) पु० नाश, अदर्शन.
**लोपणें**—अ० नाहींसा होणें.
**लोभ**—(सं) पु० आशा. २ प्रेम. ३ वांछा.
**लोभान**—(आ) पु० ऊद, एक धूप.
**लोभी**—(सं) लुब्ध, लालस.
**लोम**—(सं) पु० केस, लव.
**लोल**—(सं) वि० चंचल, क्षणभंगुर.
**लोलक**—पु० लांबट मणि.
**लोलुप**—(सं) वि० लोभी.
**लोह**—(सं) न० लोखंड. २ लोहभस्म.
**लोहचुंबक**—(सं) पु० चुंबकमणि. [णारा.
**लोहार**—(सं)पु०लोहकार, लोखंडी काम कर-
**लोहाळा**—पु० लव्हाळा.
**लोहित**—(सं) वि० तांबडें, लाल.
**लोळ्या**—वि० लोळणारा.
**लोळ**—पु० ज्वाळा, जाळ. २ समुदाय.
**लोळणें**-(सं) अ० निजणें, पडणें, पालथें उलथें होणें, फिरणें.
**लोळा**—(सं) पु० घंटेचा दांडा, मोठी लोळी.
**लोळी**—स्त्री० लहान लोळा. २शेंबडाची तार.
**लोंकर**—(सं) स्त्री० लोम, केस.
**लोंगर**—स० घड, लोंबर, घोस.
**लोंचट**—वि० चावट, पानचट, बिलगणारा.
**लोंढा**—पु० पूर, लोट.
**लोंबणें**-अ० लटकणें, टांगणें.
**लौकिक**—(सं) पु० कीर्ति, नांव.
**लंका**—(सं) स्त्री० रावणाची राजधानी. २ अग्निकौतुक.
**लंकेची पार्वती**—स्त्री० भूषणविरहित स्त्री.
**लंगडणें**—अ० एका पायावर चालणें.
**लंगडा**—वि० एक पाय नसलेला. [न,नांगर.
**लंगर**—(फा) पु०जहाज उभें करण्याचें वज-
**लंगूल**—(सं) न० शेपूट, शेपटी, पुच्छ.
**लंगोट-टा**—पु० लांग, मोठी लंगोटी.
**लंगोटी**—स्त्री० गुह्य झांकण्यापुरतेंच वस्त्र, कौपीन, चिंधी, फडकें.
**लंगोटीयार-मित्र**—पु० बाळमित्र.
**लंघणें**—(सं) उ० वि० दमणें, त्रासणें. २ वलांडणें.
**लंघी**—स्त्री० थकवा. [ जाणें.
**लंघन**—(सं) न० निराहार, उपवास. २ पार
**लंड**—पु० शिश्न. २ वि० लांडा.
**लंडभारती**—पु० धश्चोट.
**लंडी**—स्त्री० नामर्द, गांडू.
**लंपट**—(सं) वि० विषयी, विषयलोलुप.
**लंब**—(सं) पु० उभी सरळ रेषा.
**लंबक**—(सं) पु० आंदोलक.
**लंबकर्ण**—(सं) पु० गाढव, रासभ.
**लंबाडा-ड्या**—वि० उंचट, उंच, ढांगळ.
**लंबोदर**—(सं) पु० गणपति, गजानन. २ वि० मोठ्या पोटाचा.
**लंवडा**—पु० नाच्या, पोऱ्या, मुलगा.
**लंवडी**—स्त्री० बटीक, दासी, मुलगी.

## व.

**व**–एकुणतिसावें व्यंजनः (आ) उ० आ-णि, आणखी.
**व्यक्त**–(सं) वि० स्पष्ट, उघड.
**व्यक्ति**–(सं) स्त्री० प्राणि, मूर्ति. २ द्वाड-व्रात्य मनुष्य.
**व्यग्र**–(सं) वि० उदास, दुःखी, सचिंत,
**व्यंग**–(सं) वि० पंगु, निरुपयोगी. २ न० अंगावरची तीळ.
**व्यंजन**–(सं) न० स्वराच्या साहाय्यावांचून ज्याचा उच्चार पूर्ण होत नाहीं तें अक्षर.
**व्यंजना**–(सं) स्त्री० अलंकारोक्त वृत्तिविशेष, मुख्य वृत्ति.
**व्यत्यय**–(सं) पु० हरकत, अडचण.
**व्यतिरिक्त**–(सं) वि० स्वतंत्र, निराळा. २ श० शिवाय.
**व्यतिपात**–(सं) पु०योगविशेष. २वि०द्वाड.
**व्यथा**–(सं) स्त्री० दुःख, रोग, पीडा.
**व्यभि–भीचार**–(सं) पु० अव्यवस्था. २ बाहेरख्यालीपणा, छिनाली.
**व्यय**–(सं) पु० खर्च. [कामा,वाया,वायफळ.
**व्यर्थ**–(सं) वि० निरुपयोगी, निकामी, रि-
**व्यवधान**–(सं)न० अडथळा, आड.
**व्यवस्था**–(सं) स्त्री० योजना. २ व्यवस्थितपणा, नीटनेटकेपणा.[व्यवस्था करणारा.
**व्यवस्थापक**–(सं) वि० अध्यक्ष, मुख्य,
**व्यवस्थित**–(सं) वि० नीटनेटकें.
**व्यवसाय**–(सं) पु० उद्योग, धंदा, रोजगार.
**व्यवहार**–(सं)पु०संसारांत वागणें. २व्यापार.
**व्यवहारशून्य**–(सं) वि० व्यवहार न जाणणारा, मूर्ख. [ सोन्यानाण्याचा व्यापारी.
**व्यवहारी**–(सं) पु० व्यवहार करणारा. २
**व्यस्त**–(सं) वि० विषम, निराळा, घोंटाळ्याचा, उलटा. २ न० प्रमाणविशेष, उलट प्रमाण. ३ गणित संज्ञाविशेष.
**व्यसन**–(सं) न० आवड, रुचि. २ खोड, वाईट सवय, आदत.
**व्याक्षेप**–(सं) पु० व्यत्यय, खोळंबा, खो.
**व्याकरण**–(सं) न० भाषाशास्त्र. २ भाषाशास्त्राचें पुस्तक. [ ग्रस्त.
**व्याकुल–ळ**(सं) वि० विव्हल, व्यापलेला,
**व्याख्या**–(सं) स्त्री०टीका,स्पष्टीकरण,लक्षण.
**व्याख्यान**–(सं) न० संभाषण, विषयप्रतिपादन.
**व्याघ्र**–(सं) पु० वाघ, शार्दूल.
**व्याघ्रांबर**–(सं)न० व्याघ्रचर्म,वाघाचें कातडें.
**व्याज**–(सं) न० कारण, मिष. २ पैशाचें भाडें, मनोती.
**व्याजस्तुति**–(सं) स्त्री० आंत एक व बाहेर एक दिसावें असें वाक्य, अर्थालंकारविशेष. [व्याध–द.
**व्याध**–(सं) पु० पारधी, शिकारी. २ पीडा,
**व्याधि**–(सं) स्त्री० व्यथा, रोग, उपद्रव.
**व्याधिष्ट**–(सं) वि० व्यथित,रोगी,दुखणाईत.
**व्याप्ति**–(सं) स्त्री० मर्यादा, सीमा.
**व्यापक**–(सं) वि० व्यापणारा.
**व्यापणें**–(सं) वि० पसरणें, होणें, भरणें.
**व्यापार**–(सं) पु० उदीम, धंदा. २ काम. ३ गति, व्यवहार.
**व्यापारी**–पु० उदमी. २वि० व्यापारसंबंधी.
**व्यामोह**–(सं) पु० भ्रम, भ्रांति.
**व्यायाम**–(सं) पु० कसरत, मेहनत, श्रम.
**व्यावहारिक**–(सं) वि० व्यवहारासंबंधी.
**व्यास**–(सं) पु० गर्भरेषा, मध्यरेषा. २ पुराणीक. ३ वेदाचे विभाग व आठरा पुराणे रचणारा.
**व्यासंग**–(सं) पु० अभ्यास, शिकणें,उद्योग.
**व्यासपीठ**–(सं) न० पुराणिकाचें आसन.
**व्यासार्ध**–(सं) न० त्रिज्या.
**व्याही**–पु० वधूवरांचे बाप.

**व्याळ**–(सं) पु० सर्प, साप. [ उपपत्ति.
**व्युत्पत्ति**–(सं)स्त्री० अर्थ, अर्थज्ञान, उत्पत्ति,
**व्यूह**–(सं) पु० कवाईत, सैन्यरचनाविशेष. २ मसलत.
**व्योम**–(सं) न० आकाश, आभाळ.
**व्रज**–(सं) पु० गवळ्यांचा गांव. २ समूह, समुदाय, वर्ग.
**व्रण**–(सं) पु० क्षत, छिद्र, वर्ण.
**व्रत**–(सं) न० नियमविशेष.
**व्रतबंध**–(सं) पु० मौंजीबंधन, मुंज.
**व्रतस्थ–व्रती**–(सं) वि० नियमित, नियमानें वागणारा.
**व्रात्य**–(सं) वि० द्वाड. [वाईट प्रसंग.
**वक्त**–(आ) पु० वेळ, नियमित काळ. २
**वक्तशीर**–क्रि० वेळेवर. २ कदाचित्.
**वक्ता**–(सं) वि० भाषण करणारा.
**वक्तृत्व**–(सं) न० भाषणाची शक्ति,भाषण.
**वक्र**–(सं) वि० वांकडें, बाक असलेलें. २ कुटिल.
**वक्रतुंड**–(सं) पु० गणपति.
**वक्रदृष्टि**–(सं) स्त्री० वांकडी नजर, अवकृपा.
**वक्षस्थल–वक्ष**–(सं) न० छाती, हृदय.
**वकूल**–(आ) न० स्त्री० कुटुंब. २ वेश्या.३ बिऱ्हाड, स्थान.
**वकिलात–ली**–(फा) स्त्री० मुखत्यारी.
**वकील**–(आ) पु० मुखत्यार, गुमस्ता.
**वकूब**–(आ) पु० शहाणपणा,हुशारी, तर्क.
**वखत**–पु० ( वक्त पहा. )
**वखवखणें**–अ० धाधावणें.
**वखार**–स्त्री० कोठी, सांठा.
**वग**–स्त्री० दशीला, ओळख, भीड, आश्रा.
**वगळणें**–(सं) स० गाळणें, सोडणें.
**वगैरे**–(फा) उ० इत्यादि.
**वघळणें**–अ० पाझरणें,ओघळ जाणें,पघळणें.
**वच**–(सं) न० भाषण, वचन.
**वचक–का**–पु० भय, धास्ती, धाक.
**वचकणें**–अ० घाबरणें, भय वाटणें.
**वचन**–(सं) न० भाषण, वच, बोलणें.२व्याकरणसंज्ञाविशेष. ३ प्रतिज्ञापूर्वक भाषण.
**वज्र**–(सं) न० रत्न. २ पंधरावा योग. ३ इंद्राचें आयुध. ४ दगड, पाषाण.
**वज्रचुडेमंडित**–(सं) वि० ह्याचा उपयोग सुवासिनी स्त्रियांकडे लिहिण्यांत होतो.
**वज्रटीक**–स्त्री० एक दागिना. [ वज्रशरीर.
**वज्रदेह**–(सं) पु० न भेद पावणारें शरीर,
**वज्रलेप**–(सं) पु० कठिण–पक्कें आच्छादन.
**वजन**–(आ) न० तोल, माप. २ओझें.३मान, आबरू. [ मान्य.२पुष्कळ वजनाचा.
**वजनदार**–(फा) वि० अब्रूदार, वजनशीर,
**वजनी**–वि० वजन केलेलें, तोललेलें.
**वजपा–चपा**–पु० सूड, वजावाट.
**वजा**–(आ) वि० कमी, कमती, बाद. २ थाटाचें, चालीचें, शाही.
**वजाबाकी**–(आ) स्त्री० बादबाकी, वजावाट. २ गणितसंज्ञाविशेष.
**वजीर**–(आ) पु० पेशवा, मुख्य प्रधान. २ बुद्धिबळांतलें एक मोहरें.
**वट**–(सं) पु० वृक्षविशेष, वड. २ न्यूनताबोधक प्रत्ययविशेष. [भाषण.
**वटवट**–स्त्री० बडबड, गडबड, त्रासदायक
**वटविणें**–स० मोडणें, चालवणें,खुर्दा करणें.
**वटाव**–पु० बट्टा. [ पवन.२ वडी.
**वटिका–वटी**–(सं) स्त्री० बगीच्या,बाग,उ-
**वठणीस येणें**–अ० नम्र होणें, शरण येणें.
**वठणें**–अ० उठणें, होणें, ठसा निवणें. २ वाळणें– शुष्क होणें.
**वड**–(सं) पु० वटवृक्ष.
**वडव्रत**–(सं) न० वटव्रत. [अग्नि.
**वडवाग्नि**–(सं) पु० वडवानल, समुद्रांतील
**वडस**–पु० नेत्ररोगविशेष.

वडा–(सं) पु० वटक, एक प्रकारची पुरी.
वडार–न० जातिविशेष.
वडिलोपार्जित–वि० वंशपरंपरागत.
वडी–(सं) स्त्री० लहान वडा.
वडील–(सं) वि० वृद्ध. २ पु० बाप, वालिद.
व्रण–(सं) पु० व्रण, डाग, खूण.
वणजारा–री–(सं) पु० जातिविशेष.
वणवण–स्त्री० उगाच फिरणें, भटकणें.
वणवा–(सं) पु० दावानल, अरण्याला लागलेली आग.
वत्स–(सं) पु० वासरूं, बच्चा, मूल.
वत्सर–(सं) पु० वर्ष, संवत्सर.
वत्सल–(सं) वि० मायाळू.
वतन–(आ) न० वडिलोपार्जित मालमत्ता, जमीन, घरदार इत्यादि.
वतनदार–(फा) सा० वतन असलेला.
वतनवाडी–स्त्री० जमीनजुमला.
वतीं–तीनें–क्रि० तर्फे, तर्फेनें, कडून.
वद्यपक्ष–(सं) पु० पूर्णिमेपासूनचा पंध्रवडा, कृष्णपक्ष.
वदणें–(सं) उ० वि० बोलणें, भाषण करणें.
वदन–(सं) न० तोंड, मुख, चेहरा.
वदान्य–(सं) वि० उदार.
वध्य–(सं) वि० मारण्यास योग्य–जोगें.
वध–(सं) पु० मार, मारणें, ठार करणें, हत्या.
वधू–(सं) स्त्री० मुलगी, कुमारी. २ सून. ३ नवरी मुलगी.
वन्य–(सं) वि० जंगली, रानटी.
वन–(सं) न० विपिन, रान, जंगल, कानन.
वनगाय–स्त्री० जनावरविशेष, चमरी.
वनचर–(सं) वि० जंगली, रानांत रहाणारा.
वनभोजन–(सं) न० बागेंतलें जेवण.
वनमाला–(सं) स्त्री० विष्णूचें कंठभूषण.
वनवास–(सं) पु० रानांत रहाणें. २ जाच, त्रास.
वनस्पति–(सं) स्त्री० झाड, लता, झुडूप.
वनसें–वन्सें–स्त्री० नणंद, नवऱ्याची बहीण.
वनिता–(सं) स्त्री० स्त्री, वधू, बायको.
वपन–(सं) न० श्मश्रु, हजामत, मुंडन.
वपु–(सं) न० शरीर, काय, देह.
वमन–(सं) न० वांति, ओकारी, उलटी.
वय–(सं) न० वर्षें, उमर. [ल, वयस्कर.
वयस्क–(सं) वि० ज्यास्ती वयाचा, वृद्ध, वडी-
वयातीत–(सं) वि० वयोवृद्ध.
वरख–(आ) पु० ( वरख पहा. )
वर्ग–(सं) पु० भाग, हिस्सा, जाति.
वर्गणी–स्त्री० भाग, हिस्सा.
वर्गणीदार–सा० भागीदार.
वर्गमूल–(सं) न० गणितशास्त्रसंज्ञाविशेष.
वर्गसमीकरण–(सं) न० गणितशास्त्रसंज्ञाविशेष.
वर्गावर्गी–स्त्री० अदलाबदल.
वर्गीकरण–(सं) न० वर्ग लावणें, प्रतबंदी.
वर्चस्व–(सं) न० मान, मुख्यत्व, प्रमुखता.
वर्ज्य–(सं) वि० पथ्य, अयोग्य, त्याज्य.
वर्जणें–(सं) स० सोडणें, अमान्य करणें.
वर्ण–(सं) पु० रंग. २ कांति. ३ क्षत, जखम. ४ जाति, वर्ग. ५ अक्षर.
वर्णन–(सं) न० स्तुति, प्रौढी. [स्तुत्य.
वर्णनीय–(सं) वि० वर्णन करण्यायोग्य,
वर्तणूक–(सं) स्त्री० वागणूक, राहणी, वर्तन.
वर्तणें–(सं) अ० वागणें, रहाणें, चालणें.
वर्तन–(सं) वागणूक, स्थिति, चाल.
वर्तमान–(सं) न० खबर, बातमी. २ वि० सांप्रत, चालू. [पु. २ चालू काळ.
वर्तमानकाळ–(सं) पु० व्याकरणसंज्ञाविशे-
वर्तमानपत्र–(सं) न० बातमी देणारें छापील पत्र, अखबार.
वर्तवळा–पु० वरतवळा, वटाव.
वर्तविणें–स० वागविणें. २ गणितानें काढणें, गणित करणें.

**वर्तुल**–(सं) न० गोल, मंडल, चक्र.[वाटोळें.
**वर्तुलाकार**–(सं) वि० मंडलाकार, गोल,
**वर्दळ**–स्त्री० ( वरदळ पहा. )
**वर्दी**–स्त्री० बातमी, खबर.
**वर्धक**–(सं) वि० वाढविणारा.
**वर्धन**–(सं) न० वाढणें, पसरणें, वृद्धि.
**वर्धमान**–(सं) वि० वाढणारा.
**वर्म**–(सं) न० मर्म. २ उणेपणा.
**वर्याळी**–स्त्री० औषधिविशेष.
**वर्ष**–(सं) न० साल, बारा महिने. २ खंड.
**वर्षप्रतिपदा**–(सं) स्त्री० गुढीचा पाडवा.
**वर्षाऋतु**–(सं) पु० पावसाळा.
**वर्षाव**–(सं) पु० पाऊस पडणें, वृष्टि.
**वर्षासन**–(सं) न० वर्षाचें–सालाचें उत्पन्न.
**वऱ्हाड**–न० वधू–वरपक्षांकडील मंडळी. २ पु० देशविशेष.
**वऱ्हाडी**–न० वधू–वरपक्षांकडील मंडळी.
**वर**–(सं) पु० नवरा मुलगा. २ आशीर्वाद, देणगी. ३ वि० श्रेष्ठ, मुख्य. ४ श० उपरि, नंतर, आकाशाच्या बाजूस.
**वरकड**–वि० बाकीचा, शिल्लक, इतर.
**वरकरणी**–वि० बाहेरून,तोंडापुरतें,वरकांति.
**वरकाम**–न० किरकोळ काम.
**वरख**–(आ) पु० पुस्तकाचें पान, पत्र, वर्ख.
**वरखडणें**–उ० वि० ओरखडणें,बोचकारणें.
**वरखर्च**–पु० इतर–किरकोळ खर्च.
**वरंगळ**–स्त्री० उतरण. २ शालिविशेष.
**वरघोडा**–पु० वराची मिरवणूक.
**वरचढ**–वि० श्रेष्ठ, चांगला. २ जबरदस्त.
**वरचष्मा**–पु० प्रतिष्ठा, डौल, बडेजाव. २ आधिक्य, जबरदस्ती, सरशी.
**वरचेवर**–क्रि० पुनः पुनः, फिरफिरून. २ खालीं पडूं दिल्याशिवाय, अधांतरीं.
**वरंड**–स्त्री० भारा, ओझें.
**वरण**–(सं) न० डाळ, शिजविलेली दाळ.
**वरणभात**–पु० वधूपेक्षां वर लहान असलेलें जोडपें.
**वरणें**–उ० वि० स्वीकारणें, अंगीकारणें.
**वरतावळा**–पु० वटाव, बट्टा, वर्तवळा.
**वरद**–(सं) वि० वर देणारा. [खबर.
**वरदी**–(सं) वि० प्रासादिक.२ स्त्री० बातमी;
**वरदळ**–स्त्री० वागणूक, वहिवाट.
**वरदक्षिणा**–(सं) स्त्री० नवऱ्यामुलास दिलेलें आंदण–बक्षीस, हुंडा.
**वरदान**–(सं) न० आशीर्वाद.
**वरपणें**–स० ओरपणें.
**वरपक्ष**–(सं) पु० श्रेष्ठपक्ष, चांगली बाजू. २ नवऱ्याकडील वऱ्हाडी.
**वरमणें**–(सं) अ० शरमणें, लाजणें, वचकणें.
**वरमाय**–स्त्री० वराची आई.
**वरव**–स्त्री० एकसारखें तेंच खाणें, फसल.
**वरवंटा**–पु० वांटा, वांटण्याचा दगड. २ बायकांच्या लुगड्याचें बेंबीपाशीं करितात तें कमळ–केळें.
**वरात**–(सं) स्त्री० वरघोडा, एक वधूवरांची मिरवणूक. २ चिठ्ठी.
**वराह**–(सं) पु० डुक्कर, शूकर. २ विष्णूचा तिसरा अवतार.
**वरिष्ठ**–(सं) वि० श्रेष्ठ, मुख्य.
**वरी**–स्त्री० धान्यविशेष. २ श० वर, नंतर.
**वल्कल**–(सं) न० झाडांची साल व त्यांचीं वस्त्रें. [यफळ गर्वोक्ति.
**वल्गना**–(सं) स्त्री० उड्या,गप्पा, बडबड,वा-
**वल्द**–(आ) पु० वलद, बिन.
**वल्लभ**–(सं) पु० वर, पति, नवरा. [वेल.
**वल्ली**–(आ) पु० साधु, सिद्ध. २ (सं) स्त्री०
**वल्हें**–न० नाव चालण्याकरितां पाणी हलवण्याचें लांकूड, वलें.
**वल्हविणें**–न० वलें मारणें–हलवणें.
**वश**–(सं) वि० जिंकलेला, अधीन.

**वशट**–वि० ओशट, तेलकट, तुपट.
**वशिला**–(आ) पु० वग, ओळख, मित्रता,
**वशिंड**–(सं) न० बैलाच्या मानेवरील उंचवटा–मांस, पोळ, कोळें.
**वस्त्र**–(सं) न० कापड. २ चिरगूट, पांघरूण.
**वस्त**–(सं) स्त्री० वस्तु, चीज, जिन्नस.
**वस्तरा**–(फा) पु० क्षुर, सुरा, वस्त्रा. [जबस्त.
**वस्तवानी**–स्त्री० वस्त्रपात्र, मालमत्ता, चीं-
**वस्ताद**–(सं) पु० निष्णात, निपुण मनुष्य. २ गुरु. [लोक संख्या.
**वस्ती**–(सं) स्त्री० रहाणें, स्थान. २ लोक. ३
**वस्तु**–(सं) स्त्री० वस्त, पदार्थ, जिन्नस.
**वस्वी**–स्त्री० मायणी, विडी.
**वसणें**–(सं) अ० रहाणें, वस्ती करणें-असणें.
**वसंत**–(सं) पु० ऋतुविशेष, मधु.
**वसन**–(सं) न० वस्त्र, पांघरूण, प्रावरण.
**वसवसा**–क्रि० वसावसा, ख्यां ख्यां.
**वसवा**–पु० सावट. [धातु.
**वसा**–पु० नियम, व्रत. २ शरिरांतील एक
**वसात–वसाहत**–स्त्री० वस्ती.
**वसु**–(सं) पु० देवताविशेष. २ द्रव्य.
**वसू**–(सं) पु० पोळ, मोकळा सोडलेला अंडिल बैल.
**वसूल**–(आ) पु० उपज, उत्पन्न.
**वहन**–(सं) न० वाहन, गाडी घोडे वगैरे.
**वहमा–हिमा**–(आ) पु० वहीम, संशय, शंका.
**वहाण**–(सं) न० वाहन, जहाज, नाव. २ एक प्रकारचा जोडा, चेपल्या, चंपल.
**वहाणें**–(सं) प्रवाहरूपानें जाणें. २ प्रवाहाबरोबर जाणें. ३ जमिनीची वहिवाट करणें. ४ (ओझें) नेणें. ५ देवादिकांस अर्पण करणें.
**वहिनी**–स्त्री० भावाची बायको, भावजय.
**वहिवाट**–(सं) स्त्री० राबता, वागणूक, भोगवटा. २ दस्तूर, रिवाज.
**वहिवाटदार**–पु० वहिवाट करणारा.
**वही**–स्त्री० वई, कुंपण. २ चोपडी, पुस्तक. ३ बोहल्याच्या चारी कोपऱ्यांस एकांवर एक ठेवलेलीं मडकीं.
**वहीम**–(आ) पु० वहमा, संशय.
**वहू**–स्त्री० वऊ, सून, मुलाची स्त्री.
**वळ**–(सं) स्त्री० ओळ, रांग. २ गांठ, वद. ३ मारल्याची खूण. [ळी. २ वळी.
**वळकटी–कुटी**–स्त्री० आंथरुणाची गुंडा-
**वळगणें**–अ० आलिंगणें, लटकणें.
**वळचण**–स्त्री० पागोळीच्या खालची जागा.
**वळण**–(सं) न० चाल, रीत. २ वांक. ३ अक्षराचा नमुना.
**वळणशुद्ध**–(सं) वि० वळणाला अनुसरून.
**वळणें**–अ० फिरणें, सरणें, कल असणें.
**वळंबा**–पु० ओळंबा, गंवड्याचें एक हत्यार.
**वळविणें**–स० फिरविणें, सरकविणें.
**वळसा**–पु० वेढा, उगाळणें, फेरा.
**वळवळ**–स्त्री० चळवळ.
**वळी**–स्त्री० गुंडाळी, वळकटी.
**वळीव**–पु० एकदम येणारा पाऊस. [घोडा.
**वळू**–पु० घोड्या फळवण्याकरितां ठेवलेला
**वळें**–(सं) न० आंगठी, मुद्रिका. [हो, खाशी.
**वा**–(सं) उ० अथवा, किंवा. २ के० ओ-
**वाईट**–वि० अयोग्य, निरुपयोगी.
**वाऊगा**–वि० उगाच व्यर्थ. [ब्दसमूह.
**वाक्य**–(सं) न० शब्दरचना. १ सार्थ श-
**वाक्यरचना**–(सं) स्त्री० व्याकरणाचा एक भाग. [सालीचे तंतू. २ चूक, दोष.
**वाक–ख**–पु० वनस्पतिविशेष, व तिच्या
**वाकनवीस–नीस**–(फा) पु० मंत्री, वृत्तांतलेखक. २ जेवणाचा बंदोबस्त ठेवणारा, कोठवळा.
**वाकबगार**–वि० हुशार, पटु, माहितगार.
**वाकबगारी**–(फा) स्त्री० हुशारी, माहितगारी.

**वाखा**–(आ) पु० उपद्रव, जरीमरी, पटकी.
**वाखाणणी**–स्त्री० स्तुति, तारीफ.
**वखाणणें**–उ० वि० स्तुति–तारीफ करणें.
**वागणूक**–(सं) स्त्री० वर्तणूक, चाल, रीत.
**वागणें**–अ० रहाणें, चालणें.
**वागूळ–घूळ**–न० वडवागूळ, पक्षिविशेष.
**वाघ**–(सं) पु० व्याघ्र.
**वाघरी**–पु० जातिविशेष.
**वाघीण**–स्त्री० वाघाची मादी.
**वाचक**–(सं) सा० वाचणारा. २ वि० अर्थाचा.
**वाचणी**–स्त्री० ह्मणणें, पाठ.
**वाचणें**–(सं) उ० वि० ह्मणणें, पुस्तकाकडे पाहून उच्चारणें. २ अ० जगणें. ३ न० वाचन.
**वाचा**–(सं) स्त्री० वाणी, भाषण.
**वाचाल–ळ**–(सं) वि० बोलका, बहुभाष.
**वाचाशक्ति**–(सं) स्त्री० वक्तृत्व. [ वादन.
**वाजणें**–अ० आवाज होणें, गाजणें. २ न०
**वाजंत्री**–पु० घडशी, जातिविशेष.
**वाजवी**–वि० वास्तवीक, खरें.
**वाजी**–(सं) पु० घोडा, अश्व. [ यवविशेष.
**वाट**–स्त्री० मार्ग, रस्ता, पंथ. २ शरीराव-
**वाटखर्च**–पु० वाटखर्ची, गाडीभाडें. [ टोरा.
**वाटगा–डगा**– पु० वाटका, मोठी वाटी, क-
**वाटचा चोर**–पु० बिनगरजू, क्षुल्लक, वाटसरू, येणारा जाणारा कोणीही मनुष्य.
**वाटणें**–उ० वि० पाट्यावर ठेवून बारीक करणें. २ दिसणें, समजणें. ३ भावणें.
**वाटवा**–पु० एक तऱ्हेची पिशवी, बटवा.
**वाटसरू**–पु० पांथस्थ, उतारू.
**वाटाघाट**–स्त्री० चर्चा, ऊहापोह, वादविवाद.
**वाटाड्या**–पु० वाटेचा माहितगार.
**वाटाणा**–पु० धान्यविशेष. [बाग, वाटिका.
**वाटी**–स्त्री० पात्रविशेष, बोघणी, पातेली. २
**वाटोळा**–(सं) वि० गोल, वर्तुल.
**वाड**–स्त्री० कुंपण, कुपण.
**वाडगें**–न० परूस, मळा.
**वाडवडील**–पु० पूर्वज.
**वाडा**–पु० मंदिर, घर. २ गुरांची वाडी.
**वाडी**–स्त्री० लहान गांव, वाटिका.
**वाढ**–स्त्री० वृद्धि, मोठें होणें, जास्त भरणें, उसाचा वरचा भाग, वाढें.
**वाढणें**–अ० अ० वृद्धि होणें, मोठा–थोर होणें, जास्त होणें, थोडथोडें देणें, पिरसणें.
**वाढदिवस**–पु० जन्मदिवस.
**वाढपी**–पु० वाढणारा, वाढप्या.
**वाढवण**–स्त्री० केरसुणी, खराटा.
**वाढविणें**–स० जास्त करणें, पातळ करणें. मोठा करणें.
**वाण**–(सं) पु० वर्ण, रंग, चेहरा. २ गरज, तूट, कमीपणा. ३ न० वायन. ४ तऱ्हा.
**वाणणें**–(सं) उ० वि० वर्णणें, वर्णन करणें.
**वाणी**–(सं) पु० वणिज, वैश्य, गांधी. २ स्त्री० भाषण, बोलणें. ३ श० सारखें.
**वात्रट**–वि० चावट, पाचकळ, चिवट.
**वात्सल्य**–(सं) न० कौतुक, लाड.
**वात**–(सं) पु० वायु, वारा. २ स्त्री० बत्ति.
**वातावरण**–(सं) न० आकाश, अवकाश.
**वाताहात**–(सं) स्त्री० फुटाफूट.
**वातुळ–ल**–(सं) वि० वायुकारक. [ त्यार.
**वाद्य**–(सं) न० वाजविण्याचें अवजार–ह-
**वाद**–(सं) पु० भांडण, तंटा.
**वादळ**–(सं) वि० वावटळ, वायधूळ, तुफान.
**वादी**–(सं) सा० फिर्यादी. २ स्त्री० चर्माची अरुंद पट्टी.
**वाधणा**–पु० अवधाणा.
**वानगी**–स्त्री० बालमुखी, नमुना. [ माकड.
**वानर**–(सं) पु० काळ्या तोंडाचें माकड,
**वानरी**–स्त्री० माकड ( मादी. )
**वानवा**–पु० संशय, शंका.
**वापर**–(सं) पु० व्यापार, उपयोग.

**वापरणें**-उ० वि० भोगणें, उपयोग करणें.
**वापी**-(सं) स्त्री० विहीर, कूप.
**वाफ**-(सं) स्त्री० बाष्प, वराळ.
**वाफणें**-अ० शिजणें, वाफ घेणें.
**वाफा-पा**-पु० अळें, लहान खाचर.
**वाम**-(सं) वि० डावें. २ पु० मत्स्यविशेष. ३ पायांत गोळे उठणें.
**वामकुक्षि**-(सं) स्त्री० डावी कूस. २ डुलकी.
**वामन**-(सं) वि० खुजा, बुटका.
**वामळ**-(सं) स्त्री० वांभाळ, वादळ, खार.
**वायगोळा**-पु० रोगविशेष.
**वायदा**-(आ) पु० करार, वचन.
**वायन**-(सं) न० एक धर्म, वाण.
**वायफल-ळ**-वि० व्यर्थ, रिकामें.
**वायला**-वि० वेगळा, निराळा, स्वतंत्र.
**वायव्य**-(सं) स्त्री० दिशाविशेष.
**वायस**-(सं) पु० काक, कावळा.
**वायु**-(सं) पु० वात, वारा.
**वार्त्ता**-(सं) स्त्री० बात, गोष्ट, कहाणी.
**वार्धक्य**-(सं) न० वृद्धदशा, म्हातारपण.
**वार्षिक**-(सं) वि० वर्षाचें.
**वार**-(सं) पु० वासर, दिवस. २घाव, जखम.
**वारकरी**-पु० खेपा करणारा.
**वारण**-(सं) वि० अडथळ्याचें, हरकतीचें. २ न० निवारण. ३ पु० हत्ती.
**वारणें**-अ० मरणें.
**वारंवार**-(सं) पुनः पुनः, फिरफिरून.
**वारस**-(आ) पु० हक्कदार.
**वारसा**-(आ) पु० हक्क, संबंध. [ कापाक.
**वारासारी**-स्त्री० आवराआवर, व्यवस्था, झा.
**वारा**-पु० वायु, वात.
**वारांगना**-(सं) स्त्री० वेश्या, कसबीण.
**वारी**-स्त्री० फेरी, पुनः पुनः जाणें.
**वारू**-(सं) पु० घोडा, तट्टू.
**वारूळ**-न० मुंग्यांचें घर.
**वारें**-न० संचार. २ वारा.
**वाल**-पु० धान्यविशेष. २ प्रमाणविशेष.
**वालीफ**-वि० हलकें, झिरझिरीत.
**वालुका**-(सं) स्त्री० रेती, वाळू.
**वाव-वांव**-स्त्री० चार हातांचें माप.
**वावगा**-वि० व्यर्थ, वायफळ.
**वावटळ**-स्त्री० वायधूळ, मोठा वारा.
**वावडा**-वि० कुपथ्य, अपथ्य, अयोग्य.
**वावडिंग**-(सं) न० औषधिविशेष.
**वावडी**-स्त्री० एक तऱ्हेचा पतंग, तुक्कल.
**वावर**-न० जागा, खाचर, जमीन. २वहिवाट.
**वास्तपुस्त**-स्त्री० विचारपूस.
**वास्तविक**-वि० वाजब, वाजवी, खरें.
**वास्तु**-(सं) स्त्री० घर, वाडा.
**वास्तुशांत-ति**-(सं) स्त्री० गृहसंस्कार.
**वास**-(सं) पु० निवास, रहाणें. २ गंध.
**वासणें**-उ० वि० उघडणें, पसरणें, फाकणें.
**वासना**-(सं) स्त्री० इच्छा, हेतु, आशा.
**वासरूं**-न० गाईचा बच्चा-पोर. [ वेळू.
**वासा-वांसा**-(सं) पु० बारीक खांब, मोठा
**वाहक**-(सं) वि० वाहणारें, नेणारें.
**वाहणें**-(सं) उ० वि० घेऊन जाणें-नेणें, सोसणें, अर्पणें.
**वाहतीवाट**-स्त्री० रहदारीचा मार्ग.
**वाहन**-(सं) न० उखळ. २गाडी घोडा इत्यादि.
**वाहवा**-(फा) के० शाबास, भले. २ स्त्री० शाबासकी.
**वाळका**-वि० रोड, वाळलेला, लुकडा.
**वाळणें**-अ० रोडणें, सुकणें.
**वाळवंट**-न० वाळूचें-रेतीचें मैदान.
**वाळविणें**-स० सुकवणें, कोरडें करणें.
**वाळवी**-स्त्री० उधई, जीवविशेष.
**वाळा**-पु० दागिनाविशेष. २ खस.
**वाळी**-स्त्री० ग्रामण्य, बहिष्कार.
**वाळू**-(सं) स्त्री० वालुका, रेती.

**वाळूक**–न० फळविशेष. [वळण, पोंक.
**वांक**–पु० अपराध, दोष. २ न० वांकण,
**वांकडा**–वि० वक्र, तिरपा, आडवा.
**वांकणें**–अ० पोंक येणें, लवणें.
**वांकस**–पु० सुताराचें एक हत्यार.
**वांकुल्या**–स्त्री० माकडचेष्टा, वेडावणें.
**वांग**–पु० रोगविशेष.
**वांगें**–न० वांयगण, बैंगन.
**वांछा**–(सं) स्त्री० इच्छा, आशा.
**वांच्छित**–(सं) वि० इच्छित.
**वांचून**–श० शिवाय.
**वांझ**–(सं)स्त्री०वंध्या, संतान न होणारी स्त्री.
**वांटणी**–स्त्री० वांटा, भाग.
**वांटणें**–उ० वि० हिस्सा करणें, भाग करणें.
**वांटा**–पु० हिस्सा, भाग.
**वांटावांट**–स्त्री० फुटाफूट, विभाग, वांटणी.
**वांटेकरी**–पु० भागीदार.
**वांति**–(सं) स्त्री० ओकारी, उलटी, वमन.
**वांधा**–पु० संशय, फाटा, हरकत.
**वांयंडा**–वि० वावंडा, व्यर्थ.
**वांयां**–क्रि० व्यर्थ, फुकट.
**वांवडा**–पु० व्यर्थ, मुफत.
**विक्रम**–पु० एक राजा, शककर्ता.२पराक्रम.
**विक्रय**–(सं) पु० विक्री.
**विक्राळ**–(सं) वि० भयाण, भयंकर.
**विकृति**–(सं) स्त्री० विकार, बिघाड.
**विक्षिप्त**–(सं) वि० विलक्षण, चमत्कारिक.
**विक्षेप**–(सं) पु० आडफाटा, अडथळा.
**विकणें**–(सं) अ० विक्रय करणें.
**विकराल–ळ**–(सं) वि० विक्राळ.
**विकल्प**–(सं) पु० संशय.
**विकला**–(सं) स्त्री० कळेचा साठावा भाग.
**विकसणें**–(सं) अ० फुलणें, खुलणें.
**विकाऊ**–वि० विक्रीचा.
**विकार**–(सं) पु० विकृति, इजा, रोग.
**विख्यात**–(सं) वि० प्रसिद्ध, नामांकित.
**विख**–(सं) न० विष, जहर.
**विग्रह**–(सं) पु० भांडण, तंटा. २ व्याकरणसंज्ञाविशेष.
**विगत**–(सं) स्त्री० दशा. २ गोष्ट.
**विगलित**–(सं) वि० अव्यवस्थित.
**विघ्न**–(सं) न० संकट, अडथळा.
**विच्छिन्न**–(सं) वि० छिन्नभिन्न.
**विचकट**–वि० बीभत्स, अभद्र.
**विचकणें**–अ० वासणें, पसरणें, चिवडणें.
**विचकुरा–कोरा**–पु० बोचकरा–कारा.
**विचक्षण**–(सं) वि०चतुर, सुज्ञ.
**विचक्षणा**–स्त्री० फोड, स्पष्टीकरण.
**विचार**–(सं) पु० तर्क, कल्पना, मनोव्यापार. २ मर्यादा, ताळतंत.
**विचारणें**–अ० पुसणें, प्रश्न करणें.
**विचारी**–वि० सुज्ञ, कल्पक.
**विचित्र**–(सं) वि० नानातऱ्हेचा.
**विज्ञप्ति**–(सं) स्त्री० विज्ञापना.
**विजाण**–पु० विझणा, पंखा.
**विजय**–(सं) पु० जय. २ संवत्सरविशेष. ३ देवाचा द्वारपाळ.
**विजवटा**–वि० द्वाड, व्रात्य.
**विजार**–स्त्री० इजार, पायजमा, चोळणा.
**विजोड**–वि० कमजास्ती, व्यस्त.
**विझणें**–अ० नाहींसें होणें, शांत होणें.
**विझविणें–वणें**–स० नाहींसा करणें, शांत करणें.
**विट्ट**–पु० त्रास, कंटाळा.
**विटकर**–पु० टोला, रोडा, विटेचा तुकडा.
**विटणें**–अ० दूषित होणें, मळणें, आंबणें, खराब होणें. २ कंटाळा येणें.
**विटंबना**–(सं) स्त्री० फजिती, उपहास.
**विटाळ**–पु० अस्पृश्य स्पर्श.२ ऋतु.३ मुंडण.
**विटाळणें**–उ० वि० विटाळ होणें–करणें.

**विटाळशी**–स्त्री० ऋतुमति.
**विटाळें**–न० विटा पाडण्याची चौकट.
**विटी**–स्त्री० चेंडूच्या ठिकाणीं वापरतात तें लांकूड.
**विठ्ठलसवाशीण**–स्त्री० विधवा.
**विडा**–पु० तांबूल, पानसुपारी. २ पैज.
**विडी**–स्त्री० चुट्टा, बिडी. २ पट्टी, विडा. ३ मायणी, शेंबी.
**विणकर**–स्त्री० नानातऱ्हेची वीण, विणण्याची रीत. २ साळी.
**विणणें**–अ० गुंतविणें, तयार करणें.
**विणें**–अ० प्रसूत होणें, प्रसवणें.
**वित्त**–(सं) न० द्रव्य, पैसा, पदार्थ.
**वितंडवाद**–(सं) पु० दुराग्रह, खोटा वाद.
**वितळणें**–अ० पाघळणें, रस होणें, वितुळणें, द्रवणें.
**वितुष्ट**–(सं) न० वांकडें, भांडण, बेबनाव.
**विद्यमान**–(सं) वि० वर्तमान, सांप्रतचा. २ जीवंत.
**विद्या**–(सं) स्त्री० ज्ञान, कलाकौशल्य.
**विद्यार्थी**–(सं) पु० अभ्याशी–सी, व्यासंगी.
**विद्युत्**–(सं) स्त्री० } वीज, चपला, बिजली.
**विद्युल्लता**–(सं) स्त्री० }
**विद्रा–विद्रूप**–(सं) वि० कुरूप, विशोभित.
**विद्रुम**–(सं) न० प्रवाल, पोंवळें. [भूषित.
**विद्वान्**–(सं) वि० विद्या असलेला, विद्यावि-
**विद्वत्ता**–(सं) स्त्री० ज्ञान, विद्या.
**विदारण**–(सं) न० विदारणा, फाडणें.
**विदारणें**–(सं) अ० बाहेर काढणें, स्फोट करणें, फाडणें.
**विदित**–(सं) वि० माहीत, ठाऊक, परिज्ञात.
**विदुर**–(सं) पु० जातिविशेष.
**विदेश**–(सं) पु० परदेश, अन्यदेश.
**विदेही**–(सं) वि० देहाभिमान सुटलेला.
**विध्वंस**–(सं) पु० नाश.
**विधवा**–(सं) स्त्री० गतभर्तृका, रंडकी.
**विधाता**–(सं) पु० ब्रह्मदेव, विधि.
**विधान**–(सं) न० कर्म करण्याची रीति.
**विधि**–(सं) पु० विधान. २ ब्रह्मदेव. ३ दैव.
**विधिनिषेध**–(सं) पु० बरेंवाईटपणा, भिन्नभाव, कार्याकार्य.
**विधुर**–(सं) पु० स्त्री मेलेला.
**विन्मुख**–(सं) वि० विमुख, रिकामा.
**विनंति**–(सं) स्त्री० विज्ञप्ति, विज्ञापना, विनति.
**विनय**–(सं) पु० नम्रता.
**विनवणी**–स्त्री० प्रार्थना.
**विनविणें**–अ० प्रार्थणें, आर्जव करणें.
**विना**–(सं) श० शिवाय, खेरीज.
**विनाश**–(सं) पु० नाश–स, आपत्ति.
**विनियोग**–(सं) पु० उपयोग, योजना.
**विनोद**–(सं) पु० थट्टा, मस्करी.
**विप्र**–(सं) पु० ब्राह्मण.
**विपर्यास**–(सं) पु० विपरीतपणा, विरोध.
**विपरीत**–(सं) वि० उलट, विरुद्ध.
**विपल–ळ**–(सं) न० पळाचा साठांश.
**विपाक**–(सं) पु० परिणाम, शेवट.
**विपुल–ळ**–(सं) वि० पुष्कळ, बहुत.
**विफल–ळ**–(सं) वि० निष्फळ, निरुपयोगी.
**विबुध**–(सं) पु० पंडित, शहाणा, सुज्ञ.
**विभक्ति**–(सं) स्त्री० व्याकरणसंज्ञाविशेष.
**विभव**–(सं) पु० दुसरा संवत्सर. २ वैभव, ऐश्वर्य.
**विभाग**–(सं) पु० वांटा, भाग, हिस्सा.
**विभागणें**–उ० वि० भाग करणें–होणें, विभक्त करणें.
**विभु**–पु० व्यूह. २ विचार, रचना. ३ प्रभु.
**विभूति–त**–(सं) स्त्री० भस्म, राख. २ ऐश्वर्य.
**विमल**–(सं) वि० निर्मल–ळ, स्वच्छ.
**विमा**–पु० मालाची घेतलेली हमी–जामिनकी.

**विमान**—(सं) न० आकाशांतून चालणारें यान—वाहन.
**विमुख**—(सं) वि० विन्मुख, परत, रिकामा.
**वियोग**—(सं) पु० विरह, निराळेपणा.
**विरक्त**—(सं) वि० विदेही, निरिच्छ.
**विरघळणें**—अ० द्रवणें, पाघळणें.
**विरजण**—न० विरजलेलें दूध.
**विरजणें**—उ० वि० दुधांत दहीं—ताक मिळविणें, दहीं होणें.
**विरणें**—अ० द्रवणें, रस होणें, झरणें. २ विरळ—ल होणें.
**विरमणें**—अ० वरमणें, विश्रांति घेणें, थांबणें.
**विरल—ळ**—(सं) निराळें, पृथक्, झिरझिरीत.
**विरलें**—न० इरलें.
**विरस**—(सं) पु० नीरस. २ मनोभंग.
**विरह**—(सं) पु० वियोग, निराळेपणा.
**विरळा**—(सं) वि०विरल, क्वचित्,कधीं कधीं.
**विराकत**—(आ) स्त्री० मूत्र—त, मुतणें.
**विरागी**—(सं) वि० बैरागी, विरक्त.
**विराजमान**—(सं) वि० सुशोभित, शोभिवंत.
**विराम**—(सं) पु० विश्रांति,विसांवा, आराम.
**विरी**—(सं) स्त्री० तत्त्व, सत्वांश. २ सुपारीचें शिपूट ज्यांत असतें तो सावळीचा भाग.
**विरुद्ध**—(सं) वि० प्रतिकूल, उलट.
**विरूप**—(सं) वि० विद्रूप, कुरूप.
**विरोध**—(सं) पु० प्रतिकूलता, वितुष्ट.
**विल्हा**—(आ) पु० वर्ग, भाग, खातें.
**विल्हेवाट**—स्त्री० उधळपट्टी, निःशेषता.
**विल्हेवार**—क्रि० क्रमवार, खातेवार.
**विलग**—वि० अलग, निराळें, स्वतंत्र.
**विलंब**—(सं) पु० वेळ, उशीर, अवकाश.
**विलक्षण**—(सं) वि०चमत्कारिक,असाधारण.
**विलाप**—(सं) पु० रडणें, शोक, दुःख.
**विलायत**—(आ) पु० मूळ देश—स्थान. २ इंग्रज लोकांचा देश.

**विलास**—(सं) पु० खेळ, सुख, चैन, गम्मत.
**विलोकन**—(सं) न०पहाणें,नजर,अवलोकन.
**विवंचना**—(सं)स्त्री०काळजी, चिंता विचार.
**विवर**—(सं) न० गुहा, तळघर, जमिनींतलें भोंक.
**विवरण**—(सं) न० स्पष्टीकरण, स्फोट.
**विवळणें**—अ० विव्हल होणें, तळमळणें.
**विवक्षित**—(सं) वि० नियमित, अमकें. २ बोलूं इच्छिलेलें.
**विवाद**—(सं) पु० वाद, भांडण, कलह.
**विवाह**—(सं) पु० लग्न.
**विवाहित**—(सं) वि० लग्न झालेला.
**विविध**—(सं) तऱ्हेतऱ्हेचे, नाना प्रकारचे.
**विवेक**—(सं) पु० विचार.
**विवेचन**—(सं) न० विचार, व्याख्यान,वर्णन.
**विश्रांति**—(सं) स्त्री० आराम, सुख, विश्राम.
**विश्व**—(सं) न० जग, पृथ्वी. २ वि० सर्व.
**विश्वतोमुखीं**—(सं) क्रि० सर्वांच्या तोंडीं.
**विश्वसनीय**—(सं) वि०संभवनीय, प्रामाणिक.
**विश्वास**—(सं) वि० पु० निश्चय, पत, प्रामाणिकपणा, श्रद्धा.
**विश्वासघात**—(सं) पु० अप्रामाणिकपणा.
**विशाखा**—(सं) न० नक्षत्रविशेष.
**विशाल—ळ**—(सं) वि० मोठें,भव्य,अवाढव्य.
**विशिष्ट**—(सं) वि० सविशेष.
**विशी**—स्त्री० वीस वर्षांचें वय.
**विशेष**—(सं) पु०आधिक्य. अधिकपणा.
**विशेषण**—(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष, नामाचा गुण दाखविणारा शब्द.
**विशेषेंकरून**—क्रि० विशेषतः, बहुतेक.
**विशोभित**—(सं) वि० शोभारहित, विद्रूप.
**विष्ठा**—(सं) स्त्री० मल, गू.
**विष्णु**—(सं) पु० एक देव.
**विष**—(सं) न० जहर, विख, हालाहल.
**विषम**—(सं) वि०व्यस्त, विजोड, उंच सखल.

**विषय**–(सं) पु० भार्ग, आख्यान. २ मैथुन. ३ हेतु. ४ काम. ५ द्रव्य, पैसा. ६ मुद्दा.
**विषयी**–(सं) पु० मैथुनासक्त. २ संसारी.
**विषयीं**–श० संबंधानें, संबंधीं.
**विषाण**–(सं) न० शिंग.
**विषाद**–(सं) पु० खेद, दुःख.
**विषार**–(सं) पु० विष, जहर.
**विस्तव**–(सं) पु० अग्नि, आग.
**विस्तार**–(सं) पु० प्रसार, फैलाव.
**विस्तीर्ण**–(सं) वि० अवाढव्य, भव्य.
**विस्मय**–(सं) पु० आश्चर्य.
**विस्मरण**–(सं) न० विसर, विस्मृति.
**विस्मृति**–(सं) स्त्री० विसर, विस्मरण.
**विसकटणें**–उ० वि० अस्ताव्यस्त–अव्यवस्था करणें–होणें.
**विसंगत**–(सं) वि० निराळें, पृथक्, विजोड.
**विसण**– न० कढत पाण्यांत मिसळावयाचें थंड पाणी.
**विसंबणें**–अ० विसरणें, थांबणें.
**विसर्ग**–(सं) पु० ( : ).
**विसर्जन**–(सं) न० निरोप, संपविणें, बरखास्त.
**विसर**–पु० विस्मरण, विस्मृति. [हींशी होणें.
**विसरणें**–अ० विस्मृति, होणें, आठवण ना-
**विसळणें**–स० स्वच्छ करणें, धुणें.
**विसार–रा**–पु० बयाणा, इसार.
**विसांवा**–पु० आराम, विश्रांति, विश्राम.
**विहार**–(सं) पु० क्रीडा, खेळ, मौज.
**विहित**–(सं) वि० शास्त्रसंमत, योग्य.
**विहीण**–स्त्री० आपले मुलाची–मुलीची सासू, व्याह्याची बायको.
**विहीर**–स्त्री० बांव, वापी, कुव्वा, आड.
**विळखा**–पु० वेढा, वेटोळें, फेरा.
**विळा**–पु० इळा, कोयता.
**विळी**–स्त्री० इळी, भाजी चिरण्याचें हत्यार.
**विळविळीत**–क्रि० गिळगिळीत, सुळसुळीत.

**विंचरणें**–स० साफ करणें.
**विंचू**–(सं) पु० वृश्चिक, एक विषारी प्राणी.
**विंझणा**–पु० पंखा, झडपा.
**विंध**–न० छेद, छिद्र, भोंक.
**विंधणें**–अ० भोंक पाडणें, छेदणें, छिद्र होणें.
**वीज**–(सं) स्त्री० विद्युत, बिजली. [त्रास.
**वीट**–स्त्री० ईट, भाजलेला भेंडा. २ कंटाळा,
**वीटबंदी**–वि० विटांनीं बांधलेलें.
**वीण**–स्त्री० विऊन उत्पत्ति होते ती.
**वीणा**–(सं) पु० तंबुरा–चोरा, तंतुवाद्यविशेष.
**वीत**–स्त्री० अर्धा हात. [पराक्रम.
**वीर्य**–(सं) न० रेत, धातु. २ शक्ति, शौर्य,
**वीर**–(सं) पु० योद्धा. [स्फुरण.
**वीरश्री**–(सं) स्त्री० अवसान, धैर्य, बाहु-
**वीस**–(सं) वि० २०, संख्याविशेष.
**वृक्ष**–(सं) पु० झाड, पेड, दरख्त.
**वृक**–(सं) पु० लांडगा, हिंस्त्र पशुविशेष.
**वृत्त**–(सं) न० हकीकत, गोष्ट. २ छंद. ३ वि० गोल, वर्तुल.
**वृत्तांत**–(सं) पु० वृत्त, इतिहास, कहाणी.
**वृत्ति**–(सं) स्त्री० स्थिति, चाल, रहाणी.
**वृथा**–(सं) क्रि० व्यर्थ.
**वृंद**–(सं) न० समुदाय, मंडळी.
**वृंदावन**–(सं) न० तुलसी लावण्याची कुंडी–जागा इत्यादि.
**वृद्ध**–(सं) वि० वयस्क, म्हातारा, जरठ.
**वृद्धावस्था**–(सं) स्त्री० जरा, म्हातारपण.
**वृद्धि**–(सं) स्त्री० आधिक्य. २ सोयर.
**वृश्चिक**–(सं) पु० विंचू. [पतन.
**वृष्टि**–(सं) स्त्री० पर्जन्य, पाऊस. २ वर्षाव,
**वृषण**–(सं) पु० अंड, भलगा.
**वृषभ**–(सं) पु० बैल, नंदी. २ दुसरी रास.
**वेखंड**–न० एक औषध.
**वेग**–(सं) पु० गति, सामर्थ्य. २ पेटका.
**वेगळा**–वि० निराळा, स्वतंत्र, पृथक्.

**वेगीं-वेगें**-क्रि० सत्वर, लौकर.
**वेचणें**-अ० व्यय होणें-खर्च होणें, खरचणें.
**वेज-जें**-न० छिद्र, भोंक, छेद.
**वेटाळणें**-स० गुंडाळणें, वेष्टणें.
**वेटोळें**-न०गुंडाळें-ळी.
**वेठ**-स्त्री० बिगार.
**वेड**-न० खूळ, भ्रम, चळ.
**वेडगळ**-वि० वेडसर, खुळचोट.
**वेडवणें-डावणें**-अ० अनुकरण करणें, वाकुल्या दाखविणें.
**वेडसर**-वि० वेडापीर, दिवाणा.
**वेडा**-पु० भ्रमिष्ट, खुळा, दिवाणा.
**वेडेचार**-पु० खुळ्याचा आचार, चाळे.
**वेढणें**-(सं) न० दागिनाविशेष. २ उ० वि० व्यापणें, फेरा देणें.
**वेढा**-पु० फेरा, चक्कर, आटा.
**वेढें**-न० एक दागिना, वळें.
**वेण-वेणा**-(सं) स्त्री० वेदना, कष्ट.
**वेणी**-(सं) स्त्री० केसांची एक प्रकारची वळलेली दोरी.
**वेणू**-(सं)पु० बांबू, वेळू. २ पावा, बासरी.
**वेत्र**-(सं) पु० दंड, काठी, छडी.
**वेत्ता**-(सं) पु० ज्ञानी, जाणता, मर्मज्ञ.
**वेत**-(सं) पु० एक जातीचा बोरू. २ वीण.
**वेतन**-(सं) न० दरमहा, पगार.
**वेताळ**-(सं) पु० भुतांचा राजा.
**वेद**-(सं) पु० श्रुति, निगम.
**वेदना**-(सं) स्त्री० वेणा, कळ, तिडीक.
**वेदी-वेदिका**-(सं) स्त्री० यज्ञकुंडाची मर्यादा, यज्ञ होण्याची जागा.
**वेध**-(सं) पु० छिद्र, छेद. २ ग्रहणाच्या अगोदरचा. कांहीं काल. ३ नाद. ४ हरकत. ५ विरोध. ६ तारे पहाणें.
**वेधगृह-शाला**-(सं) न० स्त्री० वेध घेण्यासाठीं बांधलेली जागा.

**वेल्हाळ**-स्त्री० गोष्टी सांगणारी स्त्री. २ आवडती बायको. ३ पु० पाल्हाळ.
**वेल**-(सं) पु० लता, झुडूप, वल्ली.
**वेलची**-स्त्री० वेलदोडा, एलची.
**वेलांटी**-स्त्री०इकाराची खूण-चिन्ह. [कीण.
**वेश्या**-(सं) स्त्री०वारांगना, कसबीण, अय-
**वेष्टणें**-(सं) उ० वि० गुंडाळणें, फिरविणें. वेढणें, सभोंवती जमणें.
**वेष्टन**-(सं) न० गुंडाळण्याचें वस्त्र.
**वेष**-(सं) पु० पोषाख, पेहराव .२ सोंग.
**वेषधारी-धार**-(सं) वि० सोंगाड्या.
**वेस**-स्त्री० गांवदरवाजा, मोठें द्वार.
**वेसकर-री**-पु० महार.
**वेसण**-(सं) स्त्री० व्यसन, वाईट सवय. २ बैलादिकांच्या नाकांतील दोरी.
**वेसवा**-(सं) स्त्री० वेश्या, रांड.
**वेळ**-(सं) स्त्री०काळ,अवकाश,उशीर,प्रसंग.
**वेळणी**-स्त्री० वाढणी, पात्रविशेष.
**वेळा**-स्त्री० एक प्रकारच्या वाकी-बाहुभूषणें. २ समुद्राची मर्यादा.
**वेळू**-पु० बांबू, वंश, वेणू.
**वेळोवेळां**-क्रि० नेहमीं, पुनःपुनः.
**वेंग**-स्त्री० कवळी, वाव.
**वेंगटणें**-अ० भेटणें, आलिंगणें.
**वेंगणें**-अ० लोंबणें,लोंबकळणें.
**वेंगाटी**-स्त्री० लोंबकळणी.
**वेंचा**-पु० निवडक उतारा.
**वै-वई-वही**-स्त्री० कुपण-कुंपण.
**वैखरी**-(सं) स्त्री० वाणी, वाचा.
**वैचित्र्य**-(सं) न० विचित्रपणा, निराळेपणा.
**वैताग**-पु० संताप. २ वैराग्य.
**वैद्य**-(सं) पु० औषधींचे गुणदोष समजणारा, औषध देणारा, हकीम.
**वैद्यकी-**
**वैद्यगिरी-** } स्त्री० वैद्यक्रिया, वैद्यपणा.

वैभव–(सं) न० विभव, ऐश्वर्य, मोठेपण.
वैमनस्य–(सं) न० वितुष्ट, वांकडें.
वैय्याकरण-णी–(सं)पु० व्याकरणशास्त्रज्ञ.
वैर–(सं) न० शत्रुत्व, दावा.२ सूड.
वैरण–स्त्री० गवत इत्यादि.
वैरणें–स० ओतणें.
वैराग्य–(सं) न० वैताग, विरक्ति, जोग.
वैरागी–(सं) पु० बैरागी, जोगी.
वैरी–(सं) पु० शत्रु, दावेदार, दुस्मान.
वैल–पु० अवेल, चूलीचा अर्धा भाग.
वैश्य–(सं) पु० वणिज, वाणी.
वैश्वदेव–(सं) पु० नित्याचा अग्निबलि.
वैश्वानर–(सं) पु० अग्नि, अनल.
वैशाख–(सं) पु० दुसरा महिना.
वैष्णव–(सं) पु० विष्णुभक्त.
वैषम्य–(सं) न० वितुष्ट, वांकडें.
वंग–(सं) न० शिसें, एक धातु.
वंगण–न० ओंगण.
वंचणें–उ० वि० फसणें, फसवणें.२ वगळणें.
वंदणें–(सं) उ० वि० वंदन करणें,पूज्य मानणें. २ न० वंदन, नमन.
वंदन–(सं) न० नमन, नमस्कार.
वंध्या–(सं) स्त्री० वांझ.
वंश–(सं) पु० वेळू. २ कुल.
वंशज–(सं) वि० कुळांतील.
वंशलोचन–(सं) न० औषधिविशेष.

---

## श.

श–तिसावें व्यंजन.
श्मशान–(सं) न० मसण–साण, प्रेतें जाळण्याची–पुरण्याची जागा.
श्मश्रु–(सं) स्त्री० वपन, हजामत, डोकी.
श्याम–(सं) वि० आस्मानी, निळा.
श्रद्धा–(सं) स्त्री० निष्ठा, भक्ति.
श्रम–(सं) पु० कष्ट, मेहनत, त्रास.
श्रमणें–अ० कष्ट होणें, थकणें.
श्रय–(सं) न० श्रेय, पुण्य, सार्थकता.
श्रवण–(सं) न० कान. २ ऐकणें.
श्रांत–(सं) वि० थकलेला, श्रमित.
श्राद्ध–(सं) न० पितृकर्मविशेष.
श्राप–(सं) पु० शाप, दुर्भाषण.
श्राव–(सं) पु० स्राव, पाट.
श्रावण–(सं) पु० पांचवा महिना.
श्रावणी–(सं) स्त्री० नवीन यज्ञोपवीत धारण करण्याचें कर्म.
श्री–(सं) स्त्री० शोभा. २ लक्ष्मी, द्रव्य.
श्रीखंड–(सं) न० पक्वान्नविशेष. २ चंदन.
श्रीफल–ळ–(सं) न० नारळ.
श्रीमंत–(सं) वि० श्रीमान्, तालेवार.
श्रीराग–(सं) पु० रागविशेष.
श्रुत–(सं) वि० ऐकलेलें. २ न० शास्त्र.
श्रुति–(सं)स्त्री०वेद. २कान.३वैदिक आधार.
श्रेढी–धी–(सं)स्त्री० गणितशास्त्रसंज्ञाविशेष.
श्रेणि–णी–(सं) स्त्री० रांग, ओळ.
श्रेय–(सं) न० सुख. २ फळ. ३ पुण्य.
श्रेष्ठ–(सं) वि० मुख्य. २ उत्तम.
श्रोत्र–(सं) न० कान.
श्रौत–(सं) न० वेदविहित धर्म. २ वेदविहित धर्माचें मंत्र तंत्र.
श्रोत्रिय–(सं) सांग वेदाध्ययन केलेला षट्कर्मे करणारा ब्राह्मण.
श्रोता–(सं) पु० ऐकणारा.
श्लाघ्य–(सं) वि०स्तुतीस पात्र–योग्य,स्तुत्य.
श्लाघा–(सं) स्त्री० प्रशंसा, स्तुति. २ शेखी, डौल, प्रौढी.
श्लेष्मा–(सं) पु० शेंबूड, कफ.
श्लेष–(सं) पु० गुप्तार्थ.२ शब्दालंकारविशेष.
श्लोक–(सं) पु० पद्यविशेष.

**श्वशुर**–(सं) पु० सासरा.
**श्वान**–(सं) पु० कुतरा.
**श्वापद**–(सं) न० हिंसक पशु.
**श्वास**–(सं) पु० दम, कास.
**श्वेत**–(सं) वि० पांढरा, शुभ्र, सफेत.
**श्वेतद्वीप**–(सं) न० इंग्रज लोकांचा देश.
**शक्ति**–(सं) स्त्री० ताकत, जोर, दम. २ माया,
**शक्त्यनुसार**–(सं) क्रि० यथाशक्ति.
**शक्य**–(सं) वि० संभवनीय.
**शक्र**–(सं) पु० इंद्र, देवांचा राजा.
**शक**–(सं) पु० सन, वर्ष. २ (फा) संशय, शंका, वहीम. ३ सत्ता, प्रभुत्व, ताबा.
**शककर्त्ता**–(सं) पु० शक सुरू करणारा.
**शकट**–(सं) पु० रथ, गाडा.
**शकल**–(सं) न० तुकडा, खाप, छक्कल. २ स्त्री० युक्ति, तोड.
**शकुन**–(सं) पु० शुभाशुभसूचक बाहुस्फुरणकाकदर्शनादि.
**शठ**–(सं) वि० लुच्चा, फसव्या, लबाड.
**शत्रु**–(सं) पु० दुष्ट, दुष्मन, दावेदार,
**शत**–(सं) वि० शंभर, १००
**शतक**–(सं) न० शेंकडा, शें.
**शतंजीव**–(सं) के० शंभर वर्षे जग.
**शततारका**–(सं) स्त्री० नक्षत्रविशेष.
**शतंभीष्म**–(सं) पु० रथीमहारथी.
**शतायु**–(सं) वि० शंभर वर्षे उमरीचा.
**शनवार–निवार**–(सं) पु० मंदवार.
**शनि**–(सं) पु० ग्रहविशेष, शनैश्चर.
**शनैःशनैः**–(सं) क्रि० हळूहळू.
**शनैश्चर–श्वर**–(सं) पु० शनि.
**शपथ–त**–स्त्री० आण, भाक, वचन.
**शब्द**–(सं) पु० ध्वनि, आवाज. २ ज्याचा कांहीं अर्थ होतो असें अक्षर.
**शब्दकोश**–(सं) पु० शब्दसंग्रह.
**शब्दपांडित्य**–(सं)न० पोकळ–व्यर्थ भाषण.
**शब्दयोगी अव्यय**–(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष.
**शब्दशः**–(सं) क्रि० शब्दाशब्दांचा, निरनिराळा. २ जशाच्या तशा शब्दांनीं.
**शम**–(सं) पु० शांति.
**शमणें**–(सं) अ० शांत होणें, कमी होणें.
**शमन**–(सं) न० बसणें, शांत होणें, दबणें.
**शमी**–(सं) स्त्री० वनस्पतिविशेष, संवदडी.
**शय्या**–(सं) स्त्री० शेज, बिछाना, आंथरूण.
**शयन**–(सं) न० निजणें, पडणें. २ शय्या, शेज.
**शर्करा**–(सं) स्त्री० साखर, खंड, खांड, चिनी. २ वाळू, रेती.
**शर्त**–(आ) स्त्री० अट, भास. २ अनर्थ, शर्थ, सीमा.
**शर्यत**–(आ) स्त्री० पैज. २ धावणें.
**शर्थ**– स्त्री० पराकाष्ठा, सीमा.
**शर**–(सं) पु० बाण, तीर.
**शरण**–(सं) क्रि० नम्र. २ न० लाचार, गरीब.
**शरबत**–(फा) न० पन्हें, एक गोडआंबट पेय, सरबत.
**शरभ**–(सं) पु० पक्षिविशेष. २ देवताविशेष.
**शरम**–(फा) स्त्री० लाज, लज्जा.
**शरमिंदा**–(फा) वि० ओशाळा, लाजलेला.
**शराब**–(आ) स्त्री० मद्य, दारू.
**शरीर**–(सं) न० काय, देह, वपु.
**शरीरसंपत्ति**–(सं) स्त्री० निरोगीपणा, चांगलें शरीर.
**शरीरसंबंध**–(सं) पु० कन्याव्यवहार.
**शल्य**–(सं)न० टोंचणारा पदार्थ, टोंक, कुसळ.
**शलाका**–(सं) स्त्री० काडी, सळई.
**शव**–(सं) न० निर्जीव देह–शरीर, मृतदेह, प्रेत, मढें.
**शष्प**–(सं) न० झांट, शेंट. २ कोंवळें गवत.
**शस्त्र**–(सं) न० हत्यार, अवजार, आयुध.
**शह**–(फा) पु० इषारा, खूण. २ राजा.

शहर-(फा) न० नगर, पुर, मोठा गांव.
शहा-पु० सावकार, पैसेवाला.
शहांगी-वि० रोड, बारीक.
शहाजादा-(फा) पु० राजपुत्र, युवराज.
शहाजिरें-न० एक तऱ्हेचें जिरें.
शहाजोग-वि० भरंवशालायक, विश्वसनीय.
शहाण्णव-वि० ९६, सहा आणि नव्वद.
शहाणा-वि० धूर्त, हुशार, अक्कलवान्.
शहात्तर-वि० ७६, सत्तर आणि सहा.
शहानिशा-(फा) स्त्री० खरेंखोटें, खातरी.
शहामत-(फा) स्त्री० धिटाई, साहस, धाडस.
शहामृग-पु० पक्षिविशेष.
शहांयशी-वि० ८६, सहा आणि ऐंशी.
शहारे-रें-पु० कांटा, रोमांच.
शाइ-यदी-(आ) पु० साक्षीदार, साक्ष.
शाई-(फा) स्त्री० मषी. २ शाही.
शाक-ख-(सं) स्त्री० भाजी.
शाकार-पु० } कौलें चाळणें.
शाकारणी-स्त्री० }
शाकारणें-उ० वि० छप्पर-कौलार दुरुस्त करणें.
शाखा-(सं) स्त्री० भाग, हिस्सा. २ फांदी, खांदी.
शागिर्द-गीर्द-(फा) पु० विद्यार्थी, शिष्य. २ स्वैपाक-देवपुजेची तयारी करणारा.
शाटी-(सं) स्त्री० छाटी, भगवें वस्त्र, संन्याशाचें वस्त्र.
शाडवळ-(सं) वि० कवळें गवत. २ गांवढळ, अज्ञानी.
शाडू-वि० एक प्रकारची माती.
शान-(आ) स्त्री० डौल, छान, थाटमाट. २ वि० छानदार.
शाप-(सं) पु० श्राप, रागानें वाईट भाषण करणें.
शापणें-स० शाप देणें.
शापमोचन-(सं) न० उश्शाप, शापांतून सुटका.
शाबर-(सं) वि० शबर (भिल्ल-कोळी) संबंधी, शाबरी.
शाबास-के० वाहवा, भले, जीतेरहो.
शाबासकी-स्त्री० वाहवा, स्तुति.
शाबूत-द-(आ) वि० पक्कें, बराबर, कायम.
शामक-(सं) वि० शमन करणारें.
शामदान-(फा) न० एक तऱ्हेची हंडी-दिवा.
शायदी-(फा) स्त्री० साक्ष, साक्षीदार.
शायशी-वि० ८६.
शार्दूल-ळ-(सं) पु० वाघ. २ वृक्षविशेष.
शाल-स्त्री० शालजोडीचा फरद, महावस्त्र, शालजोडी.
शालक-(सं) पु० बायकोचा भाऊ, मेव्हणा.
शाला-(सं) स्त्री० घर, वाडा, जागा.
शालिग्राम-(सं) पु० गंडकी नदींतला धोंडा.
शालि-(सं) स्त्री० साळ, भात.
शालीन-(सं) वि० लाजाळू.
शालीनता-(सं) स्त्री० लाजाळूपणा.
शालू-पु० उंची लुगडें.
शाश्वत-(सं) वि० निश्चयाचा, नियमाचा.
शाश्वती-(सं) स्त्री० निश्चय, नियम.
शास्त्र-(सं) न० नियम, स्मृति, कायदा.
शास्त्री-(सं) पु० शास्त्रज्ञ, शास्त्र जाणता.
शास्त्रीय-(सं) वि० शास्त्रसंबंधी.
शास्ता-(सं) पु० शासनकर्ता, वागविणारा.
शासन-(सं) न० दंड, शिक्षा. २ आज्ञा, हुकूम.
शाहिदी-(फा) स्त्री० साक्ष, साक्षीदार.
शाहीर-(फा) पु० कवी, कवन करणारा.
शाळा-(सं) स्त्री० शिकविण्याची जागा. २ शिक्षण, साळ-शाळ.
शाळुंका-स्त्री० शिवलिंगांतला पिंडी खेरीजचा भाग.
शाळू-पु० जोंधळा, यावनाल. २ वि० लवकर जाणारा-होणारा.
शांत-(सं) वि० निवांत. २ स्तब्ध. ३ शमशील.
शांतवन-(सं) न० सांत्वन, शमन करणें
शांति-(सं) स्त्री० शांतता, शमन.

**शांतिपाठ**–(सं) पु० प्रसूतिकेचे संनिध ह्मणण्याचे मंत्र.
**शांबरी**–(सं) स्त्री० पार्वती. २ भांग, घोटा.
**शिकल–कल**–(आ) स्त्री० हत्यार पाजळणें.
**शिक्का**–(आ) पु० राजाची निशाणी, खूण. २ नाणें पाडण्याचा ठसा, नाणें.
**शिक्केकटार**–(आ) स्त्री० शिक्क्यावर कटारीची खूण. २ मृतास जाळण्याकरितां ज्या तिकाटण्यावर विस्तव नेतात ती शिकाळी.
**शिकरण–करण**–(सं) स्त्री० शिखरिणी, केळीं दूध साखर यांचें मिश्रण.
**शिक्षक**–(सं) पु० पंतोजी, गुरू.
**शिक्षण**–(सं) न० शासन. २ शिकवणी.
**शिक्षा**–(सं) स्त्री० शासन,सजा. २ शिक्षण.
**शिककाई**–स्त्री० एक वृक्ष व त्याच्या शेंगा, चिकाखारी.
**शिकणें**–(सं) उ० वि०अभ्यास–व्यासंग करणें, ध्यानांत ठेवणें.
**शिकंदर**–(आ)पु०एक राजा.२वि०बलवत्तर.
**शिकविणें**–स० अभ्यास करवणें, उपदेश करणें.
**शिकस्त**–(फा) स्त्री० कमाल, अखेर. ३पराजय–भव.
**शिकाऊ**–वि० शिकणाऊ, शीक,शिकणारा.
**शिकार**–(फा) स्त्री० पारध, मृगया. २ लाग, संधान.
**शिकारखाना**–(फा) पु० पशुपक्षिशाला, पारधीचीं जनावरें ठेवण्याची जागा.
**शिकारी**–(फा) पु०पारधी, मृगया करणारा.
**शिंकें**–(सं) न० शिंकें, अधांतरीं ठेवण्याचें साधन.
**शिखर**–(सं) न० कळस, अग्र. टोंक. २ पराकाष्ठा, सीमा.
**शिखंडी**–(सं) वि० तृतीयाप्रकृति, नपुंसक.
**शिखा**–(सं) स्त्री० शेंडी. २ तुरा.
**शिजणें**–अ०पक्क होणें, रांधणें. २ उकडणें, उकाडा–गर्मी होणें.
**शिटी**–स्त्री० शीळ.
**शिडकाव**–पु० बारीक थेंब, तुषार. २ सिंचन.
**शिडी–ढी**–(सं) स्त्री० दादर, जिना,चढणी.
**शिणक–णिक**–स्त्री० धमक, कळ.
**शिणणें**–अ० श्रमणें, थकणें,मेहनत करणें.
**शीतळ**–(सं) वि० थंड, गार.
**शीतळचिनी**–स्त्री० कंकोळ.
**शिताफळ**–(सं) स्त्री० फळविशेष.
**शिताफळी**–स्त्री० शिताफळाचें झाड.
**शिताफी–बी**–(फा) स्त्री० शैली, चपळाई, चलाखी.
**शिथिल**–(सं) वि० सैल, ढिलें. २ मंद.
**शिद्दी**–पु० आफ्रिकेंतला मनुष्य, हबशी.
**शिदोरी**–स्त्री० भोजन बांधलेली गांठोडी.
**शिधा**–(सं) पु० अन्नसामग्री, एक दिवसाचे भोजनास लागणारें सामान.
**शिपटी**–स्त्री० छडी, लहान काठी.
**शिपतर**–न० उथळ पाटी, बांबूची वेळणी.
**शिपाई**–(फा) पु० पायदळ, प्यादा. २ शूर मनुष्य. ३ रखवालदार.
**शिफारस**–(फा) स्त्री० वशीला. २स्तुति.
**शिबंदी**–(फा) स्त्री० किरकोळ फौज.
**शिबिका**–(सं) स्त्री० पालखी.
**शिबिर**–(सं) न० सैन्याचा तळ–गोट.
**शिबें**–न० एक त्वग्रोग.
**शिमगा**–पु० फाल्गुन. २ बोंब.
**शिमा**–(सं) स्त्री० सीमा, मर्यादा.
**शिर**–(सं) न० डोकें, मस्तक.
**शिरकणें**–अ० शिरणें, घुसणें.
**शिरकवणें**–स० घुसडणें, घालणें.
**शिरका**–(फा) पु० आसव.
**शिरकाव**–पु० रिघाव, वाट.
**शिरच्छेद**–(सं) पु० ठार मारणें.
**शिरजोर**–(फा) वि० डोईजड, जबरदस्त.
**शिरणें**–अ०( **शिरकणें** पहा. )
**शिरपाव**–(फा) पु० पागोटें, शिरताज.

शिरपेंच–(फा) पु० पागोट्याचें भूषणविशेष.
शिरशिरी–स्त्री० हुडहुडी, थंडी, हींव.
शिरस्ता–(फा) पु० दस्तूर, रिवाज, कायदा.
शिरस्तेदार–(फा) पु० कारकुनांचा मुख्य.
शिरस्त्राण–(सं) न० मस्तकाचें भूषण, पागोटें इत्यादि.
शिरस–पु० धान्यविशेष. [रक्तवाहिनी.
शिरा–(फा) पु० सांजा. २ स्त्री० शीर, र-
शिराणी–(फा) स्त्री० आनंद. २ स्त्री०उशी.
शिरें–न० धान्य जाळून त्यांत घातलेलें पाणी. २ वेल मांडवावर चढविण्यासाठीं त्याच्या जवळ पुरलेली झाडाची फांदी.
शिरोमणि–णी–(सं) पु० नायक, मुख्य.
शिल्प–(सं) न० हस्तकौशल्य, कारागिरी.
शिल्पशास्त्र–(सं) न० शिल्पविद्या.
शिल्पी–(सं) वि० कारागीर, कुशल.
शिलक–ल्लक–(फा) स्त्री० बाकी उरलेली रक्कम.
शिलकणें–गणें–अ० पेटणें, जळणें.
शिलंगण–(सं) न० सीमोल्लंघन.
शिला–(सं) स्त्री० धोंड–डा, दगड, चीप.
शिलाई–स्त्री० शिवणावळ.
शिलाजित–पु० औषधविशेष.
शिलेदार–(फा) पु० आपल्या खर्चानें घोडा बाळगणारा स्वार.
शिव–(सं) पु० महादेव. [झाड, शिवणी.
शिवण–(सं) स्त्री० शिवण्याचें काम. २एक
शिवणें–स० टाके मारणें, दोरा घालणें. २ स्पर्श करणें. [पैसा, छत्रपति.
शिवराई–वि० शिवाजी राज्याचा. २ पु०
शिवशिव–(सं) के० अरेरे, हरहर.
शिवशिवणें–अ० दंतविकारविशेष.
शिवाई–य–श० खेरीज, विना.
शिवार–शिंवार–न० मर्यादा, सीमा.
शिवी–स्त्री० शिवीगाळ, अपशब्द, दुर्भाषण.
शिश्न–स्न–(सं) न० पुरुषेंद्रिय.
शिशिर–(सं) पु० ऋतुविशेष.
शिशी–(फा) स्त्री० कुपी, लहान शिसा.
शिशु–(सं) न० लहान मूल, बच्चा.
शिष्ट–(सं) वि० श्रेष्ठ, संभावित.
शिष्टाई–स्त्री० शिष्टाचार.
शिष्टाचार–(सं) पु० शिष्टांचें आचरण. २ सभ्य रीत, चाल.
शिष्य–(सं) पु० शागिर्द, चेला, विद्यार्थी.
शिस्त–(फा) स्त्री० नेम,निशाण.२रीत,चाल.
शिसकारी–स्त्री० शिसारी, वीट.
शिसवी–(सं)स्त्री०एक झाड व त्याचें लाकूड.
शिसा–(फा) पु० मोठी शिशी, कुपा.
शिसारी–स्त्री० वीट, कंटाळा, ओकारी.
शिसें–(सं) न० धातुविशेष.
शिळपट–वि० पुळपुळीत, गरीब. [दगड.
शिळा–वि० बासा, उरलेला, जुना.२ स्त्री०
शिळाछाप–पु० लिहून छापण्याचें यंत्र.
शिळारस–(सं) पु० औषधिविशेष.
शिळोपा–पु० गारवा, थंड हवा.
शिंक–स्त्री० नाकांतून जें वायूचें निस्सरण होतें तें, छींक.
शिंकणें–अ० शिंक येणें–होणें.
शिंकाळी–स्त्री० भांड्यास लावण्याची दोरी.
शिंकें–न० शिंकें, एक प्रकारची शिंकाळी.
शिंग–(सं) न० शृंग, विषाण.२ वाद्यविशेष.
शिंगरूं–न० घोडीचा बच्चा.
शिंगा–पु० शिंगरूं ( नर ).
शिंगाडा–(सं) पु० फळविशेष.
शिंगी–स्त्री० शिंगरूं (मादी.)
शिंतडणें–उ० वि० शिंपडणें.
शिंतोडा–पु० थेंब, छिटा, तुषार.
शिंदळ–वि० छिनाल, सोदी.
शिंदळनखरा–पु० छिनाली ऐट.
शिंदी–स्त्री० खजूरी.

**शिंप**–स्त्री० शिंपला.
**शिंपणें**–उ० वि० शिंपडणें, छाटणें.
**शिंपला**–पु० शिंपा, मोठी शिंपी.
**शिंपी**–स्त्री० शिंपली, लहान शिंपला. २ पु० दरजी, शिवणकाम करणारा.
**शिवार**–स्त्री० सीमा, मर्यादा, शीव. २शिवेंतला प्रदेश.
**शीग**–स्त्री० राशीचा विचोळा भाग.
**शीघ्र**–(सं) कि० सत्वर, लवकर.
**शीघ्रकवी**–(सं) पु० जेथच्या तेथें लवकर कविता करणारा.
**शीघ्रकोपी**–(सं) वि० लवकर रागावणारा.
**शीट**–स्त्री० शीळ. २ पांखराची विष्ठा.
**शीड**–न० जहाजावरचा वाऱ्याकरितां केलेला पडदा.
**शीण**–पु० श्रम. [ वि० थंड, गार.
**शीत**–न० थंडी, गारवा. २ भाताचा कण. ३
**शीतज्वर**–(सं) पु० हिंवताप.
**शीतला**–(सं) स्त्री० देवी, रोगविशेष, माता.
**शीतल–ळ**–(सं) वि० थंड, गार.
**शीतळचिनी**–स्त्री० कंकोळ.
**शीप**–स्त्री० तिरपा काप.
**शीर**–(सं) नाडी, वाहिनी. २ न० मस्तक.
**शील**–(सं) न० स्वभाव, चाल, वागणूक.
**शीळ**–स्त्री० शीट–टी. २ रीत, चाल.
**शींव**–(सं) स्त्री० सीमा, मर्यादा.
**शुक्र**–(सं) पु० ग्रहविशेष. २ न० वीर्य. ३ शुक्राचार्य, दैत्यगुरु.
**शुक्राचार्य**–(सं) पु० दैत्यगुरु. २ वि० एकाक्ष, एका डोळ्यानें अंध.
**शुक्ल**–(सं) वि० शुभ्र, सफेत, पांढरा. २ एक भिक्षेकरी.
**शुक्लकाष्ठ**–(सं) न० शुष्क काष्ठ, लचांड.
**शुक्लपक्ष**–(सं) पु० अमावास्येपासून पूर्णिमेपर्यंतचा पंधरवडा. शुद्ध पक्ष.
**शुक**–(सं) पु० राघू, पोपट, तोता. २ मुनिविशेष, व्यासपुत्र.
**शुद्ध**–(सं) वि० शुचिर्भूत, स्वच्छ, पवित्र. २ निव्वळ, फक्त. ३ बरोबर, चांगलें. ४ चुकीशिवाय.
**शुद्धि**–(सं) स्त्री० शुद्धता, स्वच्छता. २शोध, तपास. ३ शुद्ध देहभाव.
**शुभ्र**–(सं) वि० श्वेत, पांढरा, सफेत.
**शुभ**–(सं) वि० मंगल, चांगलें, सुखाचें.
**शुभकार्य**–(सं) न० मंगलकर्म.
**शुश्रूषा**–(सं) स्त्री० सेवा, चाकरी, खस्त.
**शुष्क**–(सं) वि० वाळकें, वाळलेलें, खुष्क.
**शुंठी**–(सं) स्त्री० सुंठ, वाळवलेलें आलें.
**शुंडा**–(सं) स्त्री० सोंड.
**शूकर**–(सं) पु० डुकर–क्कर, सुव्वर.
**शूद्र**–(सं) पु० मुख्य हिंदु जातींतील चौथी जाति, मराठा, कुणबी.
**शून्य**–(सं) न० पूज्य, पूज. २ वि० स्तब्ध, एकांत. ३ श० रहित, वांचून.
**शूर्प**–(सं) न० सूप, पाखडण्याचें शिपतर.
**शूर**–(सं) पु० वीर, योद्धा, मर्द.
**शूल–ळ**–(सं) पु० एक शस्त्र, मेख. २ पोट मस्तक इत्यादींचें दुखणें.
**शृगाल**–(सं) पु० कोल्हा.
**शृंखला–ळा**–(सं) स्त्री० सांखळी. २ बेडी.
**शृंग**–(सं) न० शिंग, विषाण. २ पर्वताचें शिखर. [ ४ प्रथम रस.
**शृंगार**–(सं) पु० भूषण. २प्रीति. ३अभिनय.
**शृंगारिक**–(सं) वि० शृंगारसंबंधी.
**शेक**–पु० धग, झळई, गरमी. [ वर येणें.
**शेकणें**–उ० वि० शेक घेणें. २ अ० अंगा-
**शेकाटा**–पु० वेळू, बांबू.
**शेकारणें**–अ० ( शाकारणें पहा. )
**शेकोटी**–स्त्री० शेकण्याची जागा, धगोटी, आगटी.

**शेखी**—(फा) स्त्री० प्रौढी, प्रतिष्ठा.
**शेगडी**—स्त्री० विस्तव ठेवण्याचें पात्र.
**शेचाळ-ळीस**—वि० ४६, चाळीस आणि सहा.
**शेज**—(सं) स्त्री० शय्या, बिछाना. [णारा.
**शेजारु-री**—पु० पडोस-सी, समीप रहा-
**शेजारी**—क्रि० जवळ.
**शेट-ठ**—(सं) पु० श्रेष्ठी, वाणी, उदमी. २ धनी.
**शेटाणी**—स्त्री० शेटाची स्त्री, धनीन.
**शेडा**—पु० गोंडा, शेवट.
**शेण**—न० गाय म्हैस यांची विष्ठा. २ वाईट परिणाम, घाण, नास.
**शेणखळी**—स्त्री० शेण सांठविण्याची जागा.
**शेणवी**—पु० जातिविशेष.
**शेणी**—स्त्री० गोंवरी, उपली, कंडा.
**शेत**—(सं) न० क्षेत्र, जमीन, खाचर. २ उगवलेलें धान्य.
**शेतकरी**—पु० खेडू, जमीनदार.
**शेतखाना**—(फा) पु० पायखाना, शौचकूप.
**शेती**—स्त्री० शेतवाडी, जमीन, शेतकी.
**शेन**—(सं) पु० श्येन, ससाणा.
**शेप**—स्त्री० शेंपूट, पुच्छ, शेपटी, दूम.
**शेपटणें**—स० शिपटीनें मारणें.
**शेपटी**—स्त्री० शेप, पुच्छ. [होणें.
**शेपरणें-फरणें**—अ० मिजास करणें, उद्धट
**शेमला**—(आ) पु० समला, सोगा. [३ सिंह.
**शेर**—पु० वनस्पतिविशेष. २ परिणामविशेष.
**शेरडी**—स्त्री० शेळी, बकरी. २ ऊंस.
**शेरणी**—(फा) स्त्री० गोड पदार्थ. २ प्रसाद.
**शेरा**—(आ) पु० लेखी उत्तर-निकाल. [मीन.
**शेरी**—स्त्री० गल्ली, आळी. २ खळग्याची ज-
**शेलका**—वि० ठळक, चांगला, निवडक.
**शेला**—पु० दुपेटा, वस्त्रविशेष.
**शेलारी**—स्त्री० उंची साडी. [शेवई.
**शेव**—न० वृक्ष व त्याचें फळ. २ एक खाद्य,
**शेवगा-गवा**—पु० शेकट, एक वृक्ष.
**शेवट**—पु० अखेर. २ परिणाम. ३ टोंक.
**शेवती**—(सं) स्त्री० एक सुवासिक फुलझाड.
**शेवरी**—स्त्री० एक झाड. [तंतु.
**शेवल-वाळ**—(सं) न० पाण्यांतील बुळबुळीत
**शेष**—(सं) पु० सर्पांचा राजा. २ बाकी, शिल्लक.
**शेळी**—स्त्री० अजा, बकरी, शेरडी.
**शें**— } वि० शंभर, शतक.
**शेंकडा**— }
**शेंकणें**—उ० वि० ( शेकणें पहा. )
**शेंग**—स्त्री० फळ, फळी, फल्ली.
**शेंट-ठ**—न० जननेंद्रियावरील केस, झांट.
**शेंडा**—पु० शेवट, शिखर, कळस.
**शेंडी**—(सं) स्त्री० शिखा.
**शेंडेंनक्षत्र**—न० धूमकेतु.
**शेंदणें**—उ० वि० वर काढणें-ओढणें.
**शेंदूर**—(सं) पु० सिंदूर.
**शेंब-बी**—स्त्री० मूठ, काठी वगैरेच्या टोंकास बसविण्याची कडी.
**शेंबडा**—वि० श्लेष्मा असलेला.
**शेंबूड**—(सं) पु० श्लेष्मा, नासिकामल.
**शैत्य**—(सं) न० सरदी-र्दी, थंडी.
**शैथिल्य**—(सं) न० शिथिलता, ढिलेपणा.
**शैल**—(सं) पु० पर्वत.
**शैली**—(सं) स्त्री० खुबी, रीत, तऱ्हा.
**शोक**—(सं) पु० दुःख, विलाप. २ नाद, छंद. ३ शोष, तृषातिशय. [लगिरीची.
**शोचनीय**—(सं) वि० दुःखाची, दुःखप्रद, दि-
**शोणित**—(सं) न० आर्तव, विटाळ. २ रक्त. ३ वि० तांबडें, लाल.
**शोध**—(सं) पु० तपास, पत्ता. २ खूण.
**शोधक**—(सं) वि० शोधणारा, जिज्ञासु.
**शोधणें**—(सं) उ० वि० धुंडाळणें, तपास करणें. २ शुद्ध करणें, स्वच्छ करणें.
**शोप-शेप**—स्त्री० बडीशेप, वरियाळी. [दिसणें.
**शोभणें**—(सं) अ० चांगलें दिसणें, योग्य होणें-

**शोभा**–(सं) स्त्री० सौंदर्य, मौज; भूषण.

**शोभायमान**–(सं) वि० शोभणारें, सुंदर.

**शोभिवंत**–(सं) वि० शोभायमान, मौजदार, सुंदर.

**शोष**–(सं) पु० तहान, तृषा.

**शोषक**–(सं) वि० शोषून घेणारा.

**शोषण**–(सं) न० ओढून घेणें.

**शोषणें**–(सं) उ० वि० सुकणें, ओढणें, ओढून घेणें. २ न० शोषण.

**शौक**–(आ) पु० शोक, षोक, नाद, छंद.

**शौकी–शोकी**– वि० नादी, फंदी.

**शौच**– (सं) न० शुद्धता, स्वच्छता .२ मलशुद्धि, झाडा.

**शौचकूप**–(सं) पु० शेतखाना, संडास.

**शौर्य**–(सं) न० शूरत्व, मर्दाई, आढ्यता.

**शंकर**–(सं) पु० महादेव, शिव. २ वि० कल्याण करणारा.

**शंकरपाळा**–पु० पक्कान्नविशेष.

**शंका**–(सं) स्त्री० संशय, वहीम.२भय,भीति.

**शंकु**–(सं) पु० जमीन मोजण्याचें हत्यार. २. खुंटी.

**शंख**–(सं) पु० पांचजन्य, बोंब. २ समुद्रांतील विशिष्ट प्राण्यांचीं कवचें.

**शंखजिरें**–(सं) न० संगजिरें, औषधिविशेष.

**शंखिनी**–(सं) स्त्री० गोगलगाय. २ एक प्रकारची स्त्री.

**शंभर**–वि० शतं, शें, शेंकडा.

## ष.

**ष**–एकतिसावें व्यंजन.

**षट्**–(सं) वि० सहा.

**षट्कर्णी**–(सं) क्रि० प्रसिद्ध, जाहीर.

**षट्कर्म**–(सं) न० सहा कर्मे.

**षट्कोण**–(सं) वि० सहाकोन्या, सहा कोणाचा.

**षट्शास्त्रें**–(सं) न० सहा शास्त्रें.

**षडानन**–(सं) पु० सहा तोंडांचा, कार्तिकस्वामी.

**षड्रस**–(सं) पु० मधुरादि सहा रस.

**षड्ज**–(सं) पु० एक स्वर, सा.

**षड्रिपु**–(सं) पु० कामादि सहा शत्रु.

**षण्मास**–(सं) पु० सहामाही, अयन.

**षष्ठी**–(सं) स्त्री० सहावी तिथी–विभक्ति.

**षोक**–(फा) पु० शौक, शोक, नाद, आवड.

**षोडश**–(सं) वि० १६, सोळा.

**षंढ**–(सं) पु० तृतीयाप्रकृति, नामर्द.

## स.

**स**–बत्तिसावें व्यंजन.

**स्कंद**–(सं) पु० षडानन, कार्तिकस्वामी.

**स्कंध**–(सं) पु० खांदा.

**स्खलन**–(सं) न० खळणें, निघणें. २ चूक, दोष. ३ अडखळणें.

**स्त्री**–(सं) स्त्री० बायको, मादी, पत्नी.

**स्त्रीजित**–(सं) वि० बाईलबुद्ध्या.

**स्त्रीधन**–(सं) न० लग्नाचे वेळीं वधूस दिलेले दागिने वगैरे.

**स्त्रीलिंग**–(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष.

**स्त्रैण**–(सं) वि० स्त्रीजित, बाईलबुद्ध्या.

**स्तन**–(सं) पु० थान, अंचळ.

**स्तब्ध**–(सं) वि० उगा, शांत, अचल.

**स्तबक**–(सं) पु० गुच्छ.

**स्तंभ**–(सं) पु० खांब.

**स्तंभन**–(सं) न० थांबविणें.

**स्तव**–(सं) पु० स्तुति, स्तोत्र, पवाडा,प्रशंसा.

**स्तवणें**–(सं) स० स्तुति करणें, पवाडे गाणें.

**स्तुत्य**–(सं) वि० स्तुतीस योग्य.

स्तुति–(सं) स्त्री० स्तव, बढाई.
स्तोत्र–(सं) न० स्तुति, स्तव.
स्तोम–(सं) न० दंभ, बंड.
स्थ–(सं) एक प्रत्यय : याचा अर्थ–राहणारा.
स्थंडिल–(सं) न० अग्निकार्याकरितां केलेला मातीचा ओटा.
स्थल–(सं) न० जागा.
स्थलांतर–(सं) न० थारेपालट.
स्थान–(सं) न० स्थल–ळ.
स्थानिक–(सं) वि० जागचें, जेथल्यातेथचें.
स्थापणें–(सं) उ० वि० ( थापणें पहा. )
स्थापन–ना–(सं) न० स्त्री० प्राणप्रतिष्ठा. २ नेमणूक.
स्थायिक–(सं) वि० टिकाऊ, कायमचा.
स्थालि–(सं) स्त्री० भाताचें भांडें.
स्थावर–(सं) वि० न हालणारें, स्थिर.
स्थिति–(सं)स्त्री०दशा,वृत्ति, रीति, अस्तित्व.
स्थिर–(सं) वि० अचळ, कायमचें.
स्थिरता–(सं) स्त्री० स्थैर्य, कायमपणा.[णें.
स्थिरावणें–(सं)अ०स्थिर होणें,थांबणें,टिक-
स्थूल–ळ–(सं) वि० लठ्ठ, जाडी. २ ठोकळ.
स्थूलमान–(सं) न० ठोकळ प्रमाण. [भाव.
स्थैर्य–(सं) न०स्थिरता,कायमपणा,चांचल्या-
स्नान–(सं) न० आंघोळ, नहाणें.
स्नायु–(सं) पु० शिरा, रक्तवाहिनी.
स्निग्ध–(सं) वि० कस–मवारी असलेलें.
स्नुषा–(सं)स्त्री०सून, वऊ, मुलाची बायको.
स्नेह–(सं) पु० प्रेमा, प्रीति, मोहबत. २ न० तेल.
स्नेही–(सं) पु० मित्र, दोस्त, सोबती.
स्पर्धा–(सं) स्त्री० मत्सर, द्वेष, वरचढ होण्याची इच्छा.
स्पर्धी–(सं) वि० मत्सरी, द्वेषी, प्रतिस्पर्धी.
स्पर्श–(सं) पु० विटाळ, शिवाशिव. २ लवलेश, गंध, संस्कार, संबंध.
स्पष्ट–(सं) वि० अस्खलित, उघड,समजण्याजोगें.
स्पष्टवक्ता–(सं) पु० उघड बोलणारा.[डकी.
स्पष्टीकरण–(सं)न०टीका,सुलभ करणें,उघ-
स्फटिक–(सं) पु० पाषाणविशेष.
स्फुट–(सं) वि० स्पष्ट. २ किरकोळ.
स्फुंदणें–(सं) अ० फुंदणें.
स्फुरण–णें–न० फुरणें, फुरफुरणें.
स्फोट–(सं) पु० उघडकी, वाच्यता.
स्मरण–(सं) न० आठवण.
स्मरणी–(सं)स्त्री०लहान माळ–ला,जपमाळ.
स्मरणें–(सं) अ० आठवणें, स्मृति राहणें.
स्मार्त–(सं) वि० स्मृतीस अनुसरणारा.
स्मारक–(सं) न० स्मृति राहीलसें कृत्य.
स्मित–(सं) वि० हास्य, हसणें.
स्मृत–(सं) वि० आठवलेलें.
स्मृति–(सं) स्त्री० शास्त्र,कायदा. २आठवण.
स्यंदन–(सं) पु० रथ.
स्रवणें–(सं) अ० पाझरणें, स्राव होणें.
स्रष्टा–(सं) पु० प्रजापति, ब्रह्मदेव.
स्राव–(सं) पु० पाझर, ओघ.
स्व–(सं) सर्व० स्वतः, आपण, आपलें.
स्वकर्म–(सं) न० कर्तव्यकर्म.
स्वकल्पित–(सं) वि० आपण–स्वतः रचलेलें.
स्वकीय–(सं) वि० आपलें, आपणासंबंधी. २ सा. आप्त, सोयरेधायरे.
स्वच्छ–(सं) वि० निर्मल–ळ, सफा, साफ.
स्वच्छंदी–(सं) वि०स्वतंत्र, स्वतः, मुखत्यार.
स्वजन–(सं) पु० आपली जाति, स्वजाति.
स्वतः–(सं) सर्व० आपण.
स्वतंत्र–(सं) वि० निराळा. २ स्वच्छंदी.
स्वधर्म–(सं) पु० आपला धर्म, कर्तव्य कर्म.
स्वप्न–(सं) निद्रेंतील जागेपणाचा भास.
स्वप्नावस्था–(सं) स्त्री० स्वप्नाची स्थिति. २ स्वप्नमैथुन, झोंपेंत असतां धातु जाणें.

**स्वभाव**–(सं) गुण. २धर्म. ३ जन्माची खोड.
**स्वभावतः**–(सं) क्रि० मूळचें, जातीचें.
**स्वयंपाक**–(सं) पु० सैपाक, पाक, शिजविलेलें अन्न, रसाई.
**स्वयंपाकघर**–(सं) न० मुत्पाकखाना.
**स्वयंपाकी**–पु० पाक करणारा, आचारी.
**स्वयंभू**-(सं) वि० मूळचा, कृतीचा नव्हे तो.
**स्वयंवर**–(सं) पु० वधूनें स्वतः वर पसंत करण्याचा समारंभ.
**स्वयें**–सर्व० आपण, स्वतः.
**स्वर्ग**–(सं) पु० देवलोक.
**स्वर**–(सं) पु० ध्वनि, आवाज, सूर. २ज्याच्या साहाय्यानें अक्षर सिद्ध होतें तो वर्ण.
**स्वरूप**–(सं) न० रूप, सौंदर्य.
**स्वरूपवान्**–(सं) वि० सुंदर, सुरूप, सुरेख.
**स्वल्प**–(सं) वि० सोपें, सवघड. २ थोडें.
**स्वस्ताई**–स्त्री० सवंग, समृद्धि, विपुलता.
**स्वस्ति**–(सं) न० कल्याण, शुभ.
**स्वस्थ–स्त**–(सं) क्रि० उगाच, स्तब्ध, खुशाल. २ सवंग.
**स्वसत्ता**–(सं) स्त्री० आपली मुखत्यारी.
**स्वसंतोषानें**–क्रि० राजीखुषीनें.
**स्वसा**–(सं) स्त्री० बहीण, भगिनी.
**स्वहित**–(सं) न० आपलें हित, स्वार्थ.
**स्वातंत्र्य**–(सं) व० स्वतंत्रता, मवासपणा.
**स्वाती**–(सं) न० नक्षत्रविशेष.
**स्वाद**–(सं) पु० वास, रुचि.
**स्वाधीन**–(सं) क्रि० कबज्यांत, ताब्यांत.
**स्वाभाविक**–(सं) वि० मूळचें, स्वयंभू. [द्रव्य.
**स्वामित्व**–(सं) न० धनीपणा व त्याबद्दलचें
**स्वामिनी**–(सं) स्त्री० धनीन. [ सी–शी.
**स्वामी**–(सं) वि० श्रेष्ठ, मुख्य. २ पु०संन्या-
**स्वार्थ**-(सं) पु० आत्महित. २ व्याकरणसंज्ञाविशेष. [ काम करणारा शिपाई.
**स्वार–सवार**–(आ) पु० घोड्यावर बसून
**स्वारी**–स्त्री० एक पेंच. २ डामडौल, थाट, सरंजाम. ३ उतारू, प्रवासी.
**स्वास्थ्य**–(सं) न०स्वस्थपणा, आराम. [ळणें.
**स्वाहा करणें**–(सं)स०खाणें, गट्ट करणें, जा-
**स्वीकारणें**–(सं) स० घेणें, पतकरणें.
**स्वेच्छ**–(सं) वि० स्वैच्छ, स्वतंत्र.
**स्वेद**–(सं) पु० घर्म, घाम.
**स्वैरिणी**–(सं) स्त्री० स्वतंत्र बायको.
**सई–य**–(आ) स्त्री० याद, स्मरण, आठवण. २ बराबर, कबुली.
**सक्स**–(आ) पु० मनुष्य, शक्स.
**सक्ति**–स्त्री० जबरी, जुलूम.
**सकर्मक**–(सं) वि० व्याकरणसंज्ञाविशेष.
**सकल–ळ**–(सं) वि० सर्व, सगळे.
**सकस**–(आ) क्रि० कठिण, दुर्घट.
**सकाम**–(सं) वि० इच्छेसह.
**सकाळ**–स्त्री० प्रातःकाल, पहाट.
**सकुमार**–(सं) वि० सुकुमार, नाजूक.
**सकृतदर्शनीं**–(सं) प्रारंभीं, प्रथम.
**सकेशा**–स्त्री० वपन झाल्याशिवाय असलेली विधवा.
**सख्य**–(सं) न० मित्रत्व, स्नेह.
**सखल**–(सं) वि० खोल, खोलगट.
**सखा**–(सं) पु० मित्र, स्नेही.
**सखी**–(सं) स्त्री० स्त्रीमित्र–स्नेही.
**सगळा**–(सं) वि० सकल, सर्व.
**सगासोयरा**–पु० इष्टमित्र.
**सचिव**–मंत्री, प्रधान.
**सचोटी**–स्त्री० पत, अब्रू.
**सज्ज**–(सं) वि० तयार.
**सज्जन**–(सं) सा० सद्गृहस्थ, साधु.
**सज्जा**–पु० माडीवरील ओटी–पडवी.
**सज्जीखार**–पु० क्षारविशेष.
**सजगुरा**–पु० बाजरी व त्याचा दाणा.
**सजणें**–अ० शोभा येणें, शोभणें.

**सजविणें**–स० भूषित करणें.
**सजा**–स्त्री० शिक्षा, कैद.
**सजीव**–(सं) वि० जीवंत, प्राणी.
**सट्टा**–पु० मक्ता, ठेका, ठोकळ, प्रमाण.
**सटकणें**–अ० निसटणें, निघणें.
**सटकन्–सटदिशीं**–क्रि० चटकन्, झटकन्.
**सटरफटर**–वि० किरकोळ.
**सटीक**–(सं) वि० टीके–व्याख्येसह.
**सड्या**–पु० एक प्रकारचें किंकरें.
**सडक**–स्त्री० चांगला–चोपट मार्ग, रस्ता.
**सडकणें**–अ० मारणें, चोपणें.
**सडका**–वि० नासका, कुजका.
**सडकून**–क्रि० अतिशय, खूप–ब.
**सडणें**–स० कांडणें.
**सडपातळ**–वि० सडसडीत.
**सडा**–पु० शेणखळा शिंपणें,
**सडासंमार्जन**–न० झाडसारव.
**सडीक**–वि० सडलेलें.
**सडीस्वारी**–स्त्री०फक्त स्वारी, एकटें मनुष्य.
**सडेल**–वि० सडका, कुजका.
**सढळ**–वि० सैल. २ खर्चिक.
**सण**–पु० उत्साहाचा दिवस, तेहवार.
**सणंग–नंग**–पु० चांगलें वस्त्र.
**सणसणणें**–अ० सणसण असा आवाज होणें, खणखणणें.
**सणसणीत**–वि० मोठा, जोराचा, जबर.
**सत्**–(सं) वि० चांगलें.
**सत्कर्म**–(सं) न० चांगली कृति–कर्म.
**सत्कारणें**–(सं) न० सत्कार करणें, मान्यता ठेवणें, मान देणें.
**सत्कृति**–(सं) स्त्री० सत्कर्म, योग्य काम.
**सत्तर**–वि० ७०, साठ आणि दहा.
**सत्ता**–(सं) स्त्री० अधिकार,शक्ति, सामर्थ्य. २ आस्तित्व, भाव.
**सत्ताधीश**–(सं) पु० अधिकारी, समर्थ.
**सत्तावन्न**–वि० पन्नास आणि सात, ५७.
**सत्तावीस**–वि० वीस आणि सात. २७.
**सत्तेचाळ–चाळीस**–वि० चाळीस आणि सात, ४७.
**सत्पात्र**–(सं) न० योग्य मनुष्य, सुपात्र.
**सत्पुरुष**–(सं) पु० साधु, सिद्ध.
**सत्य**–(सं) वि० खरें, सच्चा. २ न० दिव्य. ३ लोकविशेष.
**सत्यनाश–स**–(सं) पु० नाश, खराबी.
**सत्ययुग**–(सं) न० कृतयुग, पहिलें युग.
**सत्याण्णव**–वि० नव्वद आणि सात, ९७.
**सत्यायशीं**–वि० आयशीं आणि सात, ८७.
**सत्याहत्तर**–वि० सत्तर आणि सात, ७७.
**सत्र**–(सं) न० छत्र, यज्ञसमारंभ. [जाजम.
**सत्रंजी**–(फा) स्त्री० सतरंगी, एक प्रकारचें
**सत्राणें**–क्रि० खूप जोरानें.
**सत्व**–(सं) न० सार. २ सत्यत्व. ३ स्निग्धपणा, भाव, अस्तित्व. ४ प्राणी. ५ गुणविशेष.
**सत्वर**–(सं) क्रि० त्वरेनें, लौकर.
**सत्वस्थ**–(सं) वि० सत्वशील,गरीब,सुशील.
**सत्संग**–(सं) पु० चांगला समागम.
**सतत**–(सं) क्रि० नेहमीं, निरंतर.
**सतरा**–वि० १७, संख्याविशेष.
**सतार**–स्त्री० सप्ततंत्री, वाद्यविशेष.
**सताविणें**–अ० चिडाविणें, त्रास देणें.
**सती**–(सं) स्त्री० पतिव्रता, साध्वी.
**सतेल–लें**–न० मोठें पातेलें.
**सद्दी**–स्त्री० नशीब.
**सदतीस**–वि० ३७, तीस आणि सात.
**सदन**–(सं) न० घर, वाडा, मंदिर.
**सदय**–(सं) वि० मायाळू, दयेसह.
**सदर**–(आ) वि० कित्ता. २ न० घर. ३ देवडी. [याधीश.
**सदरअमीन**–(आ) पु० मुख्य–मोठा न्या-

**सदरहू**-(आ) क्रि० वर लिहिल्याअन्वयें.
**सदा**-(सं) क्रि० नेहमीं, सर्व्हदा.
**सदावर्त्त**-(सं) न० कोरड्या अन्नाचें छत्र.
**सदृढ**-(सं) वि० बळकट, जोरदार.
**सदृश**-(सं) क्रि० सारखा, प्रमाणें.
**सदैव**-(सं) क्रि० नेहमीं.
**सध्यां**-क्रि० आतां, अलीकडे.
**सधन**-(सं) पु० श्रीमंत, धनिक, धनासह.
**सधवा**-(सं) वि० सौभाग्यवती, सुवासिनी.
**सन्निध**-(सं) क्रि० जवळ, पाशीं.
**सन्निपात**-(सं) पु० ज्वराचा एक प्रकार.
**सन्मुख**-(सं) वि० समोर.
**सन**-(आ) पु० शक.
**सनई**-स्त्री० सुषिर वाद्यविशेष.
**सनद**-स्त्री० दान-मुकत्यारपत्र.
**सनातन**-(सं) वि० प्राचीन, अनादि.
**सप्तमी**-(सं) स्त्री० सातवी तिथी-विभक्ति.
**सप्ताह-हा**-(सं) पु० आठवडा, सप्ता. २ एकसारखें भजन.
**सप्पा-सफ्फा**-पु० साफ, फन्ना.
**सपक**-वि० अळणी, नीरस.
**सपत्न**-(सं) वि० सापत्न, सावत्र.
**सपशेल**-क्रि० बेसावधपणें, गैरलगामी.
**सपसप-पां**-क्रि० भराभर.
**सपाट**-वि० सारखा.
**सपीठ**-न० मैदा, बारीक पीठ.
**सफर**-(आ) स्त्री० भूमि-जलप्रवास, पर्यटन. २ मुसलमानी दुसरा महिना.
**सफळ**-(सं)वि०फलद्रूप, विजयी. [चपळता.
**सफाई**-स्त्री० स्वच्छता, झिलई. २ चालाकी,
**सफेत**-(फा) वि० शुभ्र, पांढरा, श्वेत.
**सफेता**-(फा) पु० चुना.
**सफेती**-स्त्री० चुना. २ पांढरेपणा.
**सब्जा**-(फा) पु० वनस्पतिविशेष.
**सबजी**-स्त्री० भांग. २ टवटवी.
**सबंध**-वि० सर्व, सगळें.
**सबनीस**-(फा) पु० सेनालेखक.
**सबब**-(आ) स्त्री० कारण. २ उ० म्हणून.
**सबर**-वि० गाभण, फळलेली.
**सबुराई-सबूरी**-स्त्री० सावकाशी. २ क्षमा.
**सभ्य**-(सं) वि० संभावित, प्रतिष्ठित.
**सभर्तृका**-(सं) स्त्री०सुवासिनी, सौभाग्यवती.
**सभा**-(सं) स्त्री० अदालत, कचेरी.
**सभामंडप**-(सं) पु० सभास्थान. २ देवळापुढील इमारत.
**सभासद**-(सं) पु० सभेपैकीं मनुष्य.
**सभोंवता-तीं**-क्रि० भोंवतालीं.
**सम्मत**-(सं) वि० कबूल, मान्य.
**सम्मार्जन**-(सं) न० सडासारवण.
**सम**-(सं) स्त्री० अवसान, मध्य. २ वि० सारखा, सपाट. ३ श० सारखा.
**समई**-(फा) स्त्री० एक प्रकारचा दिवा.
**समक्ष**-(सं) वि० डोळ्यासमोर, देखत.
**समग्र**-(सं) वि० सर्व, संपूर्ण, साद्यंत.
**समजणें**-उ० वि० जाणणें, उमजणें, ताळ्यावर येणें, कळणें.
**समजदार**-वि० शहाणा, सुज्ञ, हुशार.
**समंजस**-वि० समजदार.
**समजाविणें**-स० कळविणें, सांगणें.
**समजूत**-स्त्री० समज, ध्यानांत येणें.
**समजूतदार**-वि० समजदार. [बुद्ध्या.
**समजूनउमजून**-क्रि० जाणूनबुजून, मुद्दाम,
**समतोल**-वि० सारख्या तोलाचें.
**समधात**-(सं) वि० समशीतोष्ण.
**समय**-(सं) पु० वेळ, काळ, प्रसंग.
**समयसूचकता**-(सं) स्त्री० वेळेवर सुचणें.
**समयोचित**-(सं) वि० वेळेस योग्य असलेलें.
**समर्थ**-(सं) वि० सामर्थ्यवान्, शक्तिवान्.
**समर्पक**-(सं) वि० योग्य, लायक, बराबर.
**समर**-(सं) पु० लढाई, संग्राम.

**समशेर**–(फा) स्त्री० तलवार, खड्ग.
**समस्त**–(सं) वि० सर्व, सगळे.
**समागम**–(सं) पु० सहवास, संघट्टन.
**समाचार**–(सं) पु० वर्तमान, खबर, बातमी.
**समाज**–(सं) पु० जमाव, मंडळी.
**समाध-धि**–(सं) स्त्री० योगसाधन. २ सधर्म प्राणत्याग. ३ थडगें, कबर.
**समाधान**–(सं) न० आनंद. २ आराम. ३ योग्य उत्तर. ४ तृप्ति. [एक वायु.
**समान**–(सं) वि० सपाट, सारखें, बरावर.२
**समाप्त**–(सं) वि० संपूर्ण, संपलेलें.
**समाप्ति**–(सं) स्त्री० शेवट, अखेर.
**समारंभ**–(सं) पु० कार्य, उत्साह, उत्साव.
**समाराधन-ना**–(सं) न० स्त्री० ब्राह्मणभोजन, भंडारा, भोजनसमारंभ.
**समावणें**–अ० समावेश होणें, मावणें.२ मिळून जाणें, योग्य होणें. [ शिवाव.
**समावेश**–(सं) पु० संग्रह, समास, मावणें,
**समास**–(सं) पु० समावेश, संग्रह. २ व्याकरणसंज्ञाविशेष. ३ संयुक्त शब्द. ३ ( कागदाची ) कोरी जागा.
**समिध**–(सं) स्त्री० वीत प्रमाणाची होमोपयुक्त काष्ठ.
**समीकरण**–(सं) न० सारखें करणें. २ गणितसंज्ञाविशेष.
**समीप**–(सं) वि०श०जवळ, सन्निध, शेजारीं.
**समीर**–(सं) पु० वायु, वात, वारा, हवा.
**समुच्चय**–(सं) पु० समुदाय, जमाव.
**समुद्र**–(सं) पु० सागर, दर्या. [चा फेस.
**समुद्रफेण**–(सं) पु० औषधिविशेष, समुद्रा-
**समुदाय**–(सं) पु० समुच्चय, जमाव,समाज.
**समूल-ळ**–(सं) वि० मुळासकट, संपूर्ण.
**समूह**–(सं) पु० समाज, लोक, मंडळी.
**समृद्धि**–(सं) स्त्री० विपुलता, स्वताई, चंगळ.
**समेट**–पु० मेळ, जम, ऐक्य, एकीकरण.
**समेटणें**–अ० एकवटणें, ऐक्य-मेळ होणें.
**समेत**–(सं) श० सहित, समवेत, सह.
**समेळ**–पु० संबळ, चर्मवाद्यविशेष.
**समोर**–वि०श० पुढें, विरुद्ध बाजूस, सरळ.
**समोरील**–वि० समोरचा.
**सर्ग**–(सं) पु० भाग, हिस्सा, अध्याय.
**सर्द**–वि० सरद, थंड, गार.
**सर्प**–(सं) पु० साप, नाग.
**सर्व**–(सं) वि०संपूर्ण, सगळे, प्रत्येक. [र्वथा.
**सर्वत्र**–(सं) क्रि० सर्व ठिकाणीं, सर्वथैव, स-
**सर्वदा**–(सं) क्रि० नेहमीं, हमेशा, रोज.
**सर्वनाम**–(सं) न० नामाबद्दल योजिलेला शब्द.
**सर्वज्ञ**–(सं) पु०ईश्वर. २वि० सर्व जाणणारा.
**सर्वांग**–(सं) न० सगळें शरीर.
**सर्वांशीं**–(सं) क्रि० सर्व हिश्शांनीं.
**सर्वोत्कृष्ट**–(सं) वि० अत्युत्तम. [ चा.
**सर्वोपयोगी**–(सं) वि० सर्वांच्या उपयोगा-
**सर**–(सं) स्त्री० पावसाचें आगमन. २ माळेचा पदर, एक फेरा. ३ (फा) वि० अव्वल मुख्य. ४ सरशी, बराबरी. ५ गाईल्हशीचें एक वेळ मैथुन.६ गंजिफांतील तलफ. ७ मस्तक, डोकें.
**सरकणें**–(सं) अ० सरणें. [ हिस्सा.
**सरकत**–(आ) स्त्री० वांटणी, भागी, भाग,
**सरकाविणें-कावणें-किवणें**–स० ढकलणें, पुढें करणें. [त्यार, वाली.
**सरकार**–(फा)न० राजाचा अधिकार, मुख-
**सरकारी**–(फा) वि० सरकारसंबंधी.
**सरकी**–स्त्री० कापसाची बी.
**सरजा**–(फा) पु० नथ दागिन्याची मोत्याची कळी. २ बंदुकीचा आकडा.
**सरंजाम**–(फा) पु० सामग्री, सामान, सरकारी खर्च.
**सरट-डा**–(सं) पु०पालीसारखा एक प्राणी.

**सरण**–न० चिता.
**सरणी**–(सं) स्त्री० चाल,तऱ्हा, रीत, रचना.
**सरणें**–(सं)अ०सरकणें.२संपणें,समाप्त होणें.
**सरता**–वि० शेवटचा–ला, सरते शेवटचा.
**सरद**–वि० थंड, गार, ओलसर.
**सरदणें**–अ० थंड–गार होणें.
**सरदार**–(फा) पु० मुख्य,श्रेष्ठ, सेनानायक.
**सरदी**–स्त्री० रुंदी. २ थंडी, शैत्य.
**सरपटणें**–अ० फरपटणें, हातापायांचा उपयोग केल्याखेरीज चालणें.
**सरपण**–न० जळण, जाळण्याचा पदार्थ.
**सरपोस**–(फा) पु० तबक–ताट वगैरेवर घालण्याचा कपडा.
**सरफांस**–पु० सरकफांस, सरणारा फांस.
**सरबत्ती**–स्त्री०चेतवणें–णी,बंदुकीचे आवाज.
**सरबत**–(आ) न० पन्हें, पेय.
**सरशी**–स्त्री० जय. २ क्रि० जवळ, पाशीं.
**सरस**–(फा) पु० कातडें चिकटविण्याचा रांधा. २ (सं) वि० चांगला, पसंत.
**सरसावणें**–स० पुढें होणें–येणें, धैर्य करणें.
**सरस्वती**–(सं) स्त्री० वाणी व तिची अधिष्ठात्री देवता, विद्या, गणपतीची बायको.
**सरहद्द**–(फा) स्त्री० हद्द, मर्यादा, सीमा.
**सरळ**–(सं) वि० सरल, समोर.
**सराई**–स्त्री० हंगाम, ऐन वेळ, ऋतु. २ धर्मशाळा.
**सराईत**–वि० संवय झालेला, वाकबगार.
**सराफ**–(आ) पु० नाणावटी, सोनें–चांदी–नाणें यांचा व्यापारी. २ कंजूष.
**सराव**–(सं) पु० राबता, संवय.
**सरासरी**–स्त्री० सररास, सुमार.
**सरी**–(सं) स्त्री० तार. २ एक दागिना.
**सरोज**–(सं) न० कमल.
**सरोद**–पु० वाद्यविशेष.
**सरोवर**–(सं) न० तळें, तलाव.

**सल्ला**–**ला**–(आ) पु० सल्लामसलत, मसलत, विचार. २समेट. ३एक प्रकारची अगठी.
**सल**–(सं) न० शल्य. २ खुरटा झालेला पोटांतला गर्भ.
**सलग**–**लंग**–वि० सबंध, समग्र.
**सलगी**–स्त्री० मैत्री, स्नेह.
**सलणें**–अ० दुखणें, खुपणें, टोंचणें.
**सलाम**–(आ) पु० नमस्कार.
**सलामत**–(आ) क्रि० सुखी.
**सलामी**–(आ)स्त्री० नमस्कार, चमत्कार, पहिली भेट.
**सलिल**–(सं) न० जल, पाणी.
**सलील**–(सं) वि० सहज होण्यासारखें.
**सलूक**–**ख**–**लोखा**–(आ) पु० समेट, सल्ला, स्नेह.
**सव्य**–(सं) वि० डावें, उलटें. २सुलटें,उजवें.
**सव्यापसव्य**–(सं) न० जानव्याचें डावेउजवीकडे करणें. २ व्यर्थ खटपट.
**सव्वीस**–वि० वीस आणि सहा, २६.
**सवई**–**य**–स्त्री० सराव, राबता.२चाल, रीत.
**सवकणें**–अ० शोक लागणें, सोकवणें.
**सवघड**–वि०सोपें, स्वल्प,सहज होण्यायोग्य.
**सवंग**– वि० विपुल, पुष्कळ. २ स्वस्त.
**सवंगाई**–स्त्री० स्वस्ताई.
**सवड**–**संवड**–(सं)स्त्री० फुरसत,रिकामपणा.
**सवत**–(सं) स्त्री० सोत, सपत्नी, एका नवऱ्याची दुसरी इत्यादि बायको.
**सवता**–वि० निराळा, अलग, स्वतंत्र.
**सवदा**–**सौदा**–(फा) पु० व्यापारसंबंधी ठराव. २ सामानसुमान.३ व्यापार,उदीम.
**सवदागर**–**गीर**–(फा) पु० व्यापारी,उदमी.
**सवन**–(सं) पु० आवाज, ध्वनि, सूर.२यज्ञ.
**सवा**–(सं) वि० पावभागासह.
**सवाई**–स्त्री० कविताविशेष. २ सवापट.
**सवागी**–स्त्री० एक क्षार.
**सवाणा**–पु० एक प्रकारचा चिमटा–हत्यार.

**सवार**–(फा) पु० (स्वार पहा.)
**सवाल**–(आ) पु० प्रश्न, पृच्छा, आक्षेप.
**सविता**–(सं) पु० सूर्य, रवि.
**सविस्तर**–(सं) वि० इत्थंभूत, खुलासेवार.
**सवें**–श० बरोबर, सहवर्तमान.
**सवें-च**–क्रि० नंतर, मग.
**सशक्त**–(सं) वि० बळकट, जोरदार.
**सस्ता**–वि० स्वस्त, सवंग.
**ससकार**–पु० वकिलास दिलेलें द्रव्य.
**ससा**–(सं) पु० शशक, खरगोष, एक पशु.
**ससाणा**–पु० बाज, पक्षीविशेष, बहिरी ससाणा.
**सह**–(सं) क्रि० श० सहित, बरोबर.
**सहगमन**–(सं) न० बरोबर जाणें, सती जाणें व त्याचा विधि.
**सहचर**–(सं) वि० बरोबर असणारा, सोबती.
**सहज**–(सं) पु० सख्खा भाऊ, एका आईपासून झालेला. २ क्रि० स्वल्प, सोपें, सवचड.
**सहन**–(सं) न० सोसणें.
**सहल**–(आ) स्त्री० रपेट, फिरण्याचा व्यायाम.
**सहवास**–(सं) पु० परिचय, एके ठिकाणीं बसणें–उठणें.
**सहस्र**–(सं) वि० हजार, १०००.
**सहस्रशः**–क्रि० हजारों, लाखों, शेंकडों.
**सहसा**–(सं) क्रि० एकाएकीं, बहुत करून.
**सहा**–(सं) वि० संख्याविशेष, षट्, ६.
**सहाण**–(सं) स्त्री० गंध उगाळण्याचा दगड. २ निष्णा.
**सहाय**–(सं) न० मदत, साधन. पु० मदतगार.
**सहासष्ट**–वि० साठ आणि सहा, ६६.
**सही**–(आ) स्त्री० आपल्या नांवाचीं अक्षरें, हस्ताक्षर.
**सहोदर**–(सं) वि० बंधु, भाऊ, सहज.
**सळई**–(सं) स्त्री० शलाका, तार, टांचणी–सुईच्या आकाराची धातूची काडी.
**सळपा**–पु० लांकूड, फोड, भुलपा.
**सळसळणें**–अ० आधण येणें, उकळी फुटणें.
**साक्ष्य**–(सं) न० साक्ष, पुरावा, साक्षी.
**साक्ष–क्षी**–(सं) स्त्री० शाहदी, साक्ष देणारा.
**साक्षा**–(सं) स्त्री० चमत्कार, ईश्वरी कृत्य.
**साक्षात्**–(सं) क्रि० प्रत्यक्ष, समक्ष.
**साक्षीदार**–(सं) सा० साक्षी.
**साक**–स्त्री० पत, साख.
**साकडा**–पु० गाडीची मधली चौकट.
**साकळ–सांकळ–खळ**–(सं) स्त्री० शृंखळा.
**साकी**–स्त्री० छंदविशेष.
**साख**–स्त्री० पत, अब्रू. २ साखलेलें–तळीं बसलेलें द्रव्य.
**साखर**–स्त्री० खंड, शर्करा, चिनी.
**साखरझोंप**–स्त्री० पहाटची झोंप.
**साखरभात**–पु० केशरीभात.
**साखसुरत**–क्रि० समक्ष, प्रत्यक्ष.
**साग्र**–(सं) वि० आदिअंतांसुद्धां, समग्र, संपूर्ण.
**साग**–पु० सागवान. २ शाक.
**सागर**–(सं) पु० समुद्र, दर्या, पृथ्वीवरील खाऱ्या पाण्याचा मोठा समुदाय.
**सागरगोटा**–पु० एक वनस्पति व तिचें फळ.
**सागळ**–स्त्री० नरी.
**सागुती–गोती**–स्त्री० मांसाचा एक पदार्थ.
**सागू**–पु० साबू, वृक्षविशेष.
**साज**–पु० संच, सरंजाम, साधन. २ वेष. ३ भूषण.
**साजण–णी**–पु० स्त्री० मित्र, स्नेही.
**साजणें**–अ० शोभणें, चांगलें दिसणें.
**साजिंदा**–(फा) पु० बजवय्या, तबलजी, गाणारणीची साथ करणारा.
**साजूक**–वि० ताजें, घरगुती, लोणकढें.
**साट–ठ**–न० आमरसाची–फणसाच्या गऱ्यांची पोळी.
**साटा–ठा**–पु० सांगाडा, सांपळा. २ तवंग.
**साटी**–स्त्री० ज्यावर ओझें ठेवितात तो गाडीचा भाग.

**साटें**–न० सट्टा; सौदा.
**साटेंलोटें**–न० देवाण घेवाण, अदलाबदल.
**साठ**–(सं) वि० षष्टि, ६०
**साठीं**–श० करितां, कारणें.
**साडी**–स्त्री० लहान लुगडें, चिरडी.
**साडू**–पु० ज्यांच्या स्त्रिया परस्पर बहिणी होत ते गृहस्थ.
**साडे**–पु० हाल. २ भूषणविशेष. ३ लग्नांतला समारंभविशेष. वि० सार्ध.
**साडेसाती**–स्त्री० आकाबाईचा पाया–फेरा.
**सात्विक**–(सं) वि० प्रामाणिक, सत्वशील.
**सात**–(सं)वि०संख्याविशेष,सप्त, ७. २साथ.
**सातू**–पु० धान्यविशेष, जव.
**साथ–सात–थं**–स्त्री० धाड, सात.
**साथी**–पु० सोबती, स्नेही.
**साद्यंत**–(सं) वि० कच्ची, अव्वलअखेर.
**सादर**–(सं) वि० आदरयुक्त.
**सादृश्य**–(सं) न० साम्य, सारखेपणा.
**साध्य**–(सं) वि० साधण्याजोगें, योग्य.
**साध्वी**–(सं) स्त्री० सती, पतिव्रता.
**साधक**–(सं) वि० साधन करणारा.
**साधणें**–(सं) स० सिद्ध करणें, मिळवणें.
**साधन**–(सं) न० साहित्य, सामग्री.
**साधा**–(फा) वि० भोळा, छक्केपंज्याशिवाय.
**साधारण**–(सं) वि० सार्वत्रिक. २ सामान्य.
**साधु**–(सं) वि० चांगला, पवित्र. २ सज्जन.
**साप**–(सं) पु० सर्प, नाग, जिवाणू.
**सापत्न**–(सं) वि० सावत्र, सवतीचे.
**साफ**–(आ) वि०स्वच्छ,सफा.२खरा, उघड.
**साफल्य**–(सं) न० सार्थक.
**साफी**–(आ) स्त्री० स्वच्छता. २ छापी.
**साबण–साबू**–(आ) पु० चुना व तेल ह्यांचें एक तऱ्हेचें मिश्रण.
**साबरी**–(सं) वि० जादूचें, शबरसंबंधी.
**साबीत–बूद**–(आ) वि०घट्ट, पक्का. २लागू.
**साम्य**–(सं) न० सादृश्य; बराबरी.
**साम**–(सं) पु० चवथा वेद. २ सौम्योपचार. ३ सावळा.
**सामग्री**–(सं) स्त्री० पुरवठा,साधन, साहित्य.
**सामता**–पु० भोंक पाडण्याचें एक हत्यार.
**सामना**–पु० चढाओढ, झगडा. २ वि० समोर, विरुद्ध बाजूस.
**सामर्थ्य**–(सं) न०शक्ति,बळ,जोर,अधिकार.
**साममूम**–स्त्री० स्तब्धता, एकांत.
**सामाजिक**–(सं) वि० समाजासंबंधी.
**सामान्य**–(सं) वि० साधारण, सार्वजनिक.
**सामान्यनाम**–(सं) न० जातिवाचक शब्द.
**सामान्यरूप**–(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष.
**सामान**–(फा) न० साहित्य, साधन, संसार.
**सामील**–(आ) वि० मिळविलेलें, सहाय.
**सामुद्रिक**–(सं) वि० अंगावरच्या रेषा वगैरेचें शास्त्र.
**सामोरा**–क्रि० सामना, समोर, विरुद्ध बाजूस.
**साय–इ**–स्त्री० मलई, तवंग.२साग,सागवान.
**सायवान**–(फा) न० पडवीचे डौलाचा उतरता मंडपादिकाचा भाग. २ सागवान.
**सायसंगीन**–वि० पक्के, मजबूत.
**सायास**–पु० श्रम, पुष्कळ कष्ट–श्रम.
**सार्थ**–(सं) वि० अर्था–भाषांतरासहित.
**सार्थक–क्य**–(सं) न० साफल्य, सफलता.
**सार्वकाल**–(सं) क्रि० सर्वकाळ–वेळ,नेहमीं.
**सार**–(सं) न० तत्व, अर्क, तात्पर्य. २ एक प्रकारची कढी, आम्लपदार्थविशेष. ३ अर्थालंकारविशेष.
**सारक**–(सं)वि० मलशुद्धि करणारें, जुलाबाचें.
**सारखा**–वि० श० प्रमाणें, सम, तोडीचा.
**सारंग**–(सं) पु० रागविशेष. २ पक्षी.
**सारंगी**–(सं) स्त्री० वाद्याविशेष, तर्फांचा एक प्रकारचा कोका.
**सारण**–स्त्री० पाट, कालवा.

**सारणी**–(सं) स्त्री॰ रीत, मोड, मांडणी. २ गणितसंज्ञाविशेष.
**सारणें**–स॰ ढकलणें, घुसडणें. २ संपविणें.
**सारथि**–(सं) पु॰ गाडीवान, रथ हाकणारा.
**सारमंडळ**–(सं) न॰ वाद्यविशेष.
**सारवण**–न॰ लिंपण–णें, पोतेरें.
**सारवान**–(फा) पु॰ उंटावरचा स्वार.
**सारा**–पु॰ कर, धारा. २ नेत्ररोगविशेष.
**सारांश**–(सं) पु॰ तात्पर्य, तत्व.
**सारासार**–वि॰ अनुकूल प्रतिकूल.
**साल**–(फा) न॰ वर्ष, संवत्सर काल. २ न॰ सालपट, त्वचा, सालटें.
**सालमजकूर**–न॰ चालतें साल.
**सालंमिश्री**–स्त्री॰ औषधिविशेष.
**सालस**–(आ) वि॰ गरीब, नीतिमान.
**सालिना**–(फा) वि॰ दरसाल, प्रतिवर्षी.
**साव**–(सं) पु॰ साधु, संभावित, साळसूद.
**सावकार**–पु॰ सराफ, सौदागर, धनिक.
**सावकारी**–मि॰ सावकारासंबंधी.
**सावकाश**–(सं)क्रि॰ अवकाशानें, स्वस्थपणें.
**सावट**–न॰ वक्षः छाया असलेली जागा.
**सावज**–(सं) न॰ पशु, जनावर, शिकार.
**सावत्र**–(सं) वि॰ सापत्न, सवतीचा.
**सावध**–(सं) वि॰ हुशार, जागृत.
**सावधान**–(सं) वि॰ सावध, लक्षानें, सलक्ष. २ लग्न, विवाह.
**सावरणें**–स॰ व्यवस्था लावणें–करणें, आवरणें. २ तोल संभाळणें. ३चांगल्या स्थितीस येणें.
**सावुली**–(सं) स्त्री॰ छाया, पडछाया.
**सावळी–सांवळी**–स्त्री॰ नारळादि वृक्षांची फांदी. २ वि॰ अस्मानी.
**सासर**–(सं) न॰ स्वशुरगृह, सासऱ्याचें घर.
**सासरा**–(सं) पु॰ श्वशुर, वधूवराचा जो बाप तो परस्परांचा.
**सासू**–(सं) स्त्री॰ सासऱ्याची स्त्री–बायको.
**साहजिक**–(सं) क्रि॰ सहज, अल्प श्रमानें.
**साहणें**–उ॰ वि॰ सहन करणें, सोसणें.
**साहस**–(सं) न॰ धैर्य, छाति, धाडस.
**साहसी**–वि॰ धाडशी–स, छातीचा.
**साहित्य**–(सं) न॰ सामान, साधन, सामग्री.
**साहेब**–(आ) पु॰ बडा लोक. २ स्वामी. ३ टोपीवाला, गोरा.
**साहेबलोक**–सा॰ युरोपांतील लोक.
**साळढाळ**–स्त्री॰ निवडानिवड.
**साळणें**–अ॰ साल–त्वचा काढणें.
**साळपीस**–साळूजनावराचे अंगावरील कांटा.
**साळसूद**–(सं) वि॰ साव, संभावित.
**साळी**–(सं) स्त्री॰ भात, तुसासुद्धां तांदुळ. २ कोष्टी, जातिविशेष.
**साळुंकी–खी**–स्त्री॰ पक्षिविशेष.
**साळू**–स्त्री॰ सर्वांगावर कांटे असलेलें एक [जनावर.
**सांकटणें**–अ॰ दाटी होणें.
**सांकड–डें**–वि॰ अरुंद, दाटीचें. २ न॰ संकट.
**सांकळणें**–अ॰ जमा होणें, तवंग येणें.
**सांकळदंड**–पु॰ मोठी सांखळ–शृंखळा.
**सांक–खळी**–(सं) स्त्री॰ शृंखळा.
**सांगड**–स्त्री॰जोडी–ड, गांठ. २ वाळलेल्या कडू भोपळ्यांचा पेटा.
**सांगणें**–स॰ कळविणें, समजाविणें, सुचविणें. २ न॰ सांगणी, सांगी.
**सांगशी**–स्त्री॰ लहान पेठी, करंडी, फणेरें.
**सांगाडा**–पु॰ खोका, सांपळा, पंजर, पिंजरा.
**सांगी**–स्त्री॰ सांगणी–णें, शिकवणी.
**सांचणें**–(सं) स॰ जमणें, संचय होणें.
**सांचा**–पु॰ ठसा, सकंचा, छाप.
**सांज**–(सं) स्त्री॰ संध्याकाल, अस्तमान.
**सांजा**–पु॰ शिरा. २ जाड रवा.
**सांठणें**–अ॰ सांकळणें, जमा होणें.
**सांठविणें**–स॰ जमा–गोळा–एकत्र करणें.

**सांठा**–पु० सामग्री, पुरावा, पुंजी. २ छत्री इत्यादींचा सांगाडा.
**सांड-णी**–स्त्री० उंट ( मादी ).
**सांडणीस्वार**–पु० सारवान.
**सांडणें**–उ० वि० सोडणें, सुटणें, हरवणें, नाहींसें होणें. २ लवंडणें.
**सांडस**–पु० चिमटा, पकड.
**सांत्वन**–(सं) न० समाधान, शांतवन.
**सांत**–स्त्री० सांथ, धाड, फेरी.
**सांधणें**–(सं) उ० वि० जोडणें, जमवणें.
**सांधा**–(सं) पु० जोड, संधि.
**सांप्रत**–(सं) क्रि० सध्यां, ह्यावेळीं.
**सांप्रदाय**–(सं) पु० संप्रदाय, प्रघात, रूढी.
**सांपडणें**–अ० ताब्यांत होणें–येणें, दिसणें, घावणें, मिळणें.
**सांपळा**–पु० सांगाडा. २ पिंजरा. [तें हरण.
**सांबर**–न० ज्याच्या शिंगास फाटे येतात
**सांबारें-भारें**–न० एक प्रकारची आमटी.
**सांवरी**–स्त्री० वृक्षविशेष. [बत.
**सिकंजी**–(फा) स्त्री० एक तऱ्हेचें थंड सर-
**सिकल**–स्त्री० ( **शिकल** पहा. )
**सिद्ध**–(सं) पु० ईश्वरप्राप्ति ज्यानें साधून घेतली आहे तो. २ वि० ठरलेलें.
**सिद्धता**–(सं) स्त्री० सामग्री, तयारी.
**सिद्धांत**–(सं) पु० ज्याचा अंत–शेवट ठरलेला आहे तो. [चमत्कार.
**सिद्धि**–(सं) स्त्री० सिद्धाई, ईश्वरप्राप्तीचे
**सिद्धी**–पु० हबशी, आफ्रिकेंतला काळा मनुष्य. [मार्जन.
**सिंचणें**–(सं) अ० शिंपणें, शिंपडणें,सिंचन,
**सिंदूर**–(सं) पु० शेंदूर.
**सिंह**–(सं)पु०मृगेंद्र, पशूंचा राजा. [जधानी.
**सिंहलद्वीप**–(सं) न० लंका, रावणाची रा-
**सिंहासन**–(सं) न० राजाची गादी.
**सिंहीण**–(सं) स्त्री० सिंह ( मादी ).

**सीताफळ**–(सं) न० फळविशेष, शिताफळ.
**सीमा**–(सं) स्त्री० शींव, मर्यादा.
**सींव**–(सं) स्त्री० ( **सीमा** पहा. )
**सु**–उपसर्गः चांगलें. [ण्याचें हत्यार.
**सुई**–(सं) स्त्री० सूची, लहान दाभण, शिव-
**सुईण**–स्त्री० सुवीण, बाळंतपणाची खटपट करणारी.
**सुएर-सोयर**–न० वृद्धि, जननाशौच.
**सुकणें**–(सं) अ० वाळणें, पाणी अटणें.
**सुका**–(सं) वि० शुष्क, वाळलेला, कोरडा.
**सुकाण-णूं**–(आ) न० गलबत फिरविण्याचें साधन.
**सुकुमार**–(सं) वि० नाजुक, कोमल.
**सुकृत**–(सं) न० पुण्य, परोपकार. २ दैव.
**सुकेळ-ळें**–न० सुकें–वाळलेलें केळें.
**सुख**–(सं) न० चैन, आराम, आनंद.
**सुखी**–(सं) वि० आनंदी–चैनी, खातापिता.
**सुगड**–न०मातीचें बोळकें. २वि०पटु,हुशार.
**सुगंध**–(सं) पु० सुवास.
**सुगम**–(सं) वि० सुलभ, सोपें.
**सुगरिण-ग्रीण-ग्रण**–स्त्री० स्वैपाकांत चतुर स्त्री. २ पक्षिविशेष.
**सुगावा**–पु० शोध, तपास.
**सुगी**–स्त्री० ऐन वेळ, हंगाम.
**सुघड**–वि० सुग्रण. २ सुलभ.
**सुचणें**–(सं) अ० आठवणें, स्मृति होणें.
**सुचना**–(सं) स्त्री० ( **सूचना** पहा. )
**सुचविणें**–स० सूचना करणें.
**सुचिन्ह**–(सं)न० चांगलें लक्षण,शुभ शकुन.
**सुजट**–वि० सुजलेला.
**सुजणें**–अ० सूज चढणें, रोगाचें फुगणें.
**सुजन**–(सं) पु० सज्जन, सुजाण.
**सुटा**–वि० मोकळा, रिकामा.
**सुटी-ट्टी**–स्त्री० मोकळीक, रजा, टाळा. २ वि० अलग, निराळा.

**सुडका**–**कें**–पु० न० जीर्ण वस्त्र व त्याचें फडकें.
**सुडावणें**–अ० धैर्य होणें–येणें, निटावणें, संवय होणें.
**सुडी**–स्त्री० कणसासह जोंधळा इत्यादि धान्य व त्याची गंजी.
**सुत**–(सं) पु० पुत्र, मुलगा, लेक.
**सुतक**–(सं) न० सूतक, मृताशौच.
**सुतकी**–वि० सुतकुला, सुतक असलेला. २ धोंडे फोडण्याचें एक हत्यार.
**सुतराम**–वि० सर्वथा, बिलकुल. [बारीक दोरी.
**सुतळ**–**ळी**–स्त्री० दोरी, रश्शी, तागाची
**सुताडा**–पु० पांघरण्याचें एक वस्त्र, जाड वस्त्र.
**सुतार**–पु० जातिविशेष, सुतारकाम करणारा. २ पक्षिविशेष.
**सुतारकी**–स्त्री० सुतार काम, लांकडें तासणें सरळ करणें इत्यादि काम.
**सुती**–वि० सुताचें, सूत्रमिश्रित. २ सरळ.
**सुद्धां**–श० सकट, देखील, ही.
**सुदर्शन**–(सं) न० चक्र, एक हत्यार. २ शाळिग्रामाचें छक्कल. ३ लफंडें, लचांड.
**सुदामजी**–पु० एक दरिद्री ब्राह्मण. २ रोड.
**सुदिन**–(सं) पु० चांगला दिवस–काळ.
**सुदृढ**–(सं) वि० बळकट, जोरदार, मजबूत.
**सुधा**–(सं) स्त्री० अमृत, देवांचें पेय. २ वि० समोर, सोईचा.
**सुधारणा**–(सं) स्त्री० चांगले फेरफार.
**सुधारणें**–(सं) उ० वि० चांगलें होणें–करणें, नीट करणें, बराबर करणें.
**सुधारस**–(सं) पु० अमृत, सुधा.
**सुनका**–वि० सुना, वांवडा, व्यर्थ.
**सुनबहिरी**–स्त्री० रोगविशेष.
**सुना**–(सं) वि० शून्यवत्, रिकामा.
**सुनावणें**–स० सांगणें, समजावणें. २ न० सुनावणी, सुनवणी.
**सुन्नी**–(आ) पु० एक मुसलमानी पंथ.
**सुप्रसन्न**–(सं) वि० खुष, आनंदित.
**सुपली**–स्त्री० लहान सूप.
**सुपात्र**–(सं) न० सत्पात्र. [ळीचें बी.
**सुपारी**–स्त्री० फळविशेष, पूगीफळ, पोफ-
**सुपीक**–(सं) वि० पिकाची, उत्पन्नाची.
**सुफराटा**–(सं) वि० सुलटा, सुरफाटा.
**सुबक**–(फा) वि० चांगल्या घाटाचें.
**सुबत्ता**–स्त्री० समृद्धि, विपुलता, स्वस्ताई.
**सुबा**–**भा**–(आ) पु० परगणा, प्रांत. [कारी.
**सुबेदार**–**सुभेदार**–(फा) पु० सुभ्याचा अधि-
**सुभाषित**–(सं) न० चांगलें भाषण–बोलणें.
**सुमंत**–(सं) पु० अष्टप्रधानांतील एक.
**सुमन**–(सं) न) सुवर्ण–सोनें. २ पुष्प. ३ चांगलें मन. २ गहूं.
**सुमार्ग**–(सं) पु० सन्मार्ग, नीतिमार्ग.
**सुमार**–(फा) पु० अदमास, अंदाज.
**सुमारें**–क्रि० अदमासें.
**सुयंत्र**–(सं) वि० सुरळीत, नीट, ठीक.
**सुयुक्तिक**–(सं) वि० युक्तीसह, युक्तीला जुळेल असें. [४ मुरदुंग्याची पाटी.
**सुर**–(सं) पु० देव. २ स्वर. ३ स्वर धरणारा.
**सुरई**–स्त्री० कुजा, मृत्तिकापात्रविशेष.
**सुरकंडी**–स्त्री० सुरुळी, पाण्यांत घुसणें.
**सुरकुती**–स्त्री० घडी, चिरमी, आठी.
**सुरखी**–**खाई**–(फा) स्त्री० लाली, गुलाबी, तेज.
**सुरण**–(सं) पु० कंदविशेष.
**सुरत**–स्त्री० चेहरा, मुख, मनुष्य. २ न० शहरविशेष. ३ मैथुन.
**सुरमा**–(फा) पु० एक तऱ्हेचें काजळ.
**सुरलोक**–(सं) पु० स्वर्ग, देवलोक.
**सुरवंट**–पु० घुला, कीटविशेष, कुसरूड.
**सुरवात**–(आ) स्त्री० आरंभ, प्रारंभ.
**सुरवार**–(फा) स्त्री० विजार, पायचोळणा.
**सुरळी**–स्त्री० गुंडाळी, सुरकुंडी.
**सुरळीत**–वि० यथास्थित.

सुरा-(सं) स्त्री० मद्य, दारू. २ पु० क्षुरा.
सुरी-स्त्री० लहान सुरा, चाकू.
सुरू-(फा) पु० एक वृक्ष. २ वि० चालू.
सुरुंग-रंग-(सं) पु० खाणींतलें छिद्र व त्यांत दारू घालून बार करण्याची युक्ति.
सुरूप-(सं) वि० सुरेख, सुखरूप, सुंदर.
सुलटा-वि० सुरफाटा, सवईचा.
सुलभ-(सं) वि० स्वल्प, सोपें, सवघड.
सुलाख-(फा) पु० छेद, छिद्र, भोंक.
सुवर्ण-(सं) न० सोनें, जर, धातुविशेष.
सुवास-(सं) पु० सुगंध, चांगला वास.
सुवासिनी-(सं) स्त्री० सौभाग्यवती, नवरा असलेली स्त्री. [ नीतिमान.
सुशिक्षित-(सं) वि० चांगल्या शिक्षणाचा,
सुशी-स्त्री० एक रोग. २ वस्त्रविशेष.
सुशील-(सं) वि० जातिवंत, सुस्वभावी.
सुशोभित-(सं) वि० शोभायमान.
सुषुप्ति-(सं) स्त्री० गाढ निद्रा-झोंप.
सुस्कार-रा-पु० श्वास.
सुस्त-(फा) वि० आळशी, मंद, मैंद.
सुस्ताई-(फा) स्त्री० आळस, हयगय, सुस्ती.
सुस्तावणें-अ० आळसावणें, हयगय करणें.
सुस्वर-(सं) वि० चांगल्या आवाजाचें.
सुसर-स्त्री० मगर, नक्र.
सुहागी-स्त्री० सवागी, एक क्षार.
सुळका-(सं) पु० शूळ, टोंक, टेकाड.
सुळसुळाट-पु० सुबत्ता, विपुलता.
सुळा-(सं) पु० शूळ, सुळका. २ दंतविशेष.
सुंकलें-न० एक दागिना.
सुंगणें-स० वास घेणें, हुंगणें.
सुंठ-(सं) स्त्री० शुंठी, वाळविलेलें आलें.
सुंता-(आ) स्त्री० सुनत, मुसलमानांचा एक शिस्न कापवून घेण्याचा संस्कार.
सुंदर-(सं) वि० सुरेख, खूपसुरत, मनोरम.
सुंब-भ-(सं) न० काथ्या, नारळावरील तंतु.
सूक्ष्म-(सं) वि० बारीक, लहान, अयोग्य.
सूकर-(सं) पु० डुकर-कर, वराह.
सूचक-(सं) वि० सुचविणारा, कळविणार
सूचना-(सं) स्त्री० इषारा, खूण.
सूची-(सं) स्त्री० सुई, बारीक दाभण.
सूज-(सं) स्त्री० सुजणें, शोथ.
सूट-स्त्री० माफी, मोकळीक.
सूड-पु० द्वेष, दावा, बदला.
सूत्र-(सं) न० सूत, धागा, दोरा.
सूत्रधार-(सं) पु० नाटकांतला मुख्य मनुष्य, मुख्य नट.
सूत-(सं) सारथि. २ धागा, दोरा.
सूतक-(सं) न० सुतक, अशौच.
सूतिका-(सं) स्त्री० बाळंतीण.
सून-(सं) स्त्री० मुलाची बायको, वऊ.
सूप-(सं) न० शूर्प, मोठी सुपली.
सूपशास्त्र-(सं) न० पाकशास्त्र.
सूर्य-(सं) पु० रवि, भानु.
सूर्यकमल-(सं) न० पुष्पविशेष.
सूर्यकांत-(सं) पु० एक पाषाण.
सूर्यपुट-ठ-पु० उन्हांत वाळवणें.
सूर्यवंश-(सं) पु० सूर्यापासून झालेला क्षत्रियविस्तार.
सूर-(सं) पु० स्वर, आवाज, ध्वनि.
सूळ-(सं) पु० शूल. २एक शिक्षा व ज्यावर गुन्हेगारास बसवून मारावयाचा तो खांब.
सृष्टि-(सं) स्त्री० जग, लोक, पृथ्वी. [मार्ग.
सेतु-(सं) पु० पूल, पाण्यावरून जाण्याचा
सेना-(सं) स्त्री० सैन्य, फौज. [यक.
सेनापति-(सं) पु० फौजेचा अधिपति, ना-
सेवक-(सं) पु० चाकर, दास, गडी.
सेवणें-(सं) स० घेणें, स्वीकारणें. २न० सेवन.
सेवा-(सं) स्त्री० चाकरी, दास्य, दास्य.
सेवेकरी-पु० देवस्थानाचे ठिकाणीं आपण होऊन झालेला चाकर.

**सैतान**-(आ) न०. पिशाच, भूत.
**सैन्य**-(सं) न० सेना, फौज.
**सैन्याधिपति**-(सं) पु० सेनापति.
**सैपाक-सैंपाक**-(सं) पु० स्वयंपाक, रसई.
**सैरावैरा**-क्रि० भयाभया.
**सैल**-(सं) वि० पोकळ, ढिला, शिथिल.
**सैली**-स्त्री० एक प्रकारची सुताची माळ.
**सैंधव**-(सं) न० क्षारविशेष, मीठ.
**सैंवर**-(सं) न० स्वयंवर, स्त्रीनें आपणच नवरा पसंत करणें.
**सोईसोईनें**-क्रि० सावकाश.
**सोक्षमोक्ष**-पु० निकाल.
**सोकटी-सोंकटी-गटी**-स्त्री० एक लांबट सुपारीच्या आकाराचें-काष्ठ अगर हस्तिदंती पदार्थ.
**सोकणें**-अ० सवकणें, संवय होणें.
**सोकरा**-पु० छोकरा, मुलगा.
**सोगा**-पु० फलका, ओचा, समला, पदर.
**सोजी**-स्त्री० भाजून शिजविलेले तांदुळ.
**सोट**-पु० उंच एक सारखा झालेला वृक्ष. २ सरळ लांकूड.
**सोट-डगा-गें**-पु० न० सोटा, मोठी काठी, [दंडा.
**सोडणें**-स० खुला करणें, मोकळा करणें.
**सोडत**-स्त्री० एक प्रकारचा जुव्वा, नशिबाची परीक्षा.
**सोडविणें**-स० सोडण्यास लावणें.
**सोदा**-वि० विषयी. २ लुच्चा.
**सोदेशाई**-स्त्री० लबाडी.
**सोनकाव-ऊ**-स्त्री० एक प्रकारचा गेरू.
**सोनकिडा**-पु० कीटविशेष, काजवा.
**सोनकेळ**-न० लहान केळ.
**सोनचाफा**-पु० चंपकविशेष, सुवर्ण चंपक.
**सोनटका**-पु० एक फुलझाड.
**सोनामुखी**-(सं) स्त्री० सुवर्णमुखी, भुईतरवड.
**सोनार**-(सं) पु० सुवर्णकार, सोनें घडणारा.
**सोनें**-(सं) न० सुवर्ण, जर.
**सोनेरी**-वि० सोन्याचा, सुवर्णाचा.
**सोप-पट**-न० केळीची साल.
**सोपणें**-अ० संपणें, पूर्ण होणें. २ देणें.
**सोपा**-(सं) वि० स्वल्प, सवघड. २ पडवी.
**सोपान**-(सं) न० जिना, दादर.
**सोबत**-(आ) स्त्री० संगत, स्नेह.
**सोबती**-(फा) पु० स्नेही, मित्र, दोस्त.
**सोबतीण**-(फा) स्त्री० स्त्रीमित्र.
**सोम**-(सं) पु० चंद्र, चांद.
**सोमल**-(आ) पु० एक प्रकारचा क्षार-विष.
**सोमवंश**-(सं) पु० चंद्रापासून झालेला विस्तार.
**सोमाळें**-वि० कोंवट.
**सोय-ई**-स्त्री० उपयोग. २ चाकरी.
**सोयरा**-(सं) पु० आप्त. २ यार.
**सोयरीक**-स्त्री० नातें, आप्तपणा.
**सोरठ-ट**-पु० रागविशेष. २ सौराष्ट्र, गुजराथ. ३ लुच्चा, लबाड.
**सोरा**-पु० एक क्षार.
**सोल**-न० दोरखंड, मोठा दोर.
**सोलणें**-उ० वि० साल काढणें-निघणें.
**सोला-लाणा**-पु० सोललेला ताजा हरभरा.
**सोशीक**-वि० सहनशीळ.
**सोस**-(सं) पु० शोष, तृषा. २ हौस.
**सोसणें**-(सं) उ० वि० सहन करणें, ऐकणें. २ मानणें-वणें.
**सोसाट-ट**-पु० झपाटा.
**सोहळा-हाळा**-पु० मिरवणूक.
**सोळा**-वि० दहा आणि सहा, १६.
**सोळाआणे**-वि० पक्कें, बराबर.
**सोंग**-न० वेष, मिष, ढोंग.
**सोंड**-(सं) स्त्री० शुंडा, हत्तीचें लांबट नाक.
**सोंवळें सोवळें**-वि० धूत-पवित्र-शुद्ध वस्त्र.
**सौख्य**-(सं) न० सुख, आनंद, चैन.
**सौजन्य**-(सं) न० सुजनता, भलाई, चांगुलपणा.

सौदा-(फा) पु० व्यापार, उदीम, सट्टा, सुवदा. [कार.
सौदागर-(फा) पु० धनिक, व्यापारी, साव-
सौभाग्यवती-(सं) स्त्री० सुवासिनी. २ जाया, भार्या.
सौम्य-(सं) वि० हलकें, साधें.
सौर-(सं) वि० सूर्यभक्त.
सौंदर्य-(सं) न० लावण्य, स्वरूप.
संक्रांत-ति-(सं) स्त्री० संक्रमण. २ धाड.
संक्षेप-(सं) पु० लहान रूप.
संकट-(सं) न० कठिण अवस्था-प्रसंग.
संकर-(सं) पु० मिश्रभाव, एकीकरण.
संकल्प-(सं) पु० नियम, निश्चय.
संकष्ट-(सं) पु० संकट, त्रास, अडचण.
संकीर्ण-(सं) वि० मिश्रित.
संकीर्त्तन-(सं) न० कीर्तन, उच्चारण.
संकेत-(सं) पु० बेत, विचार, नियम, खूण.
संकोच-(सं) पु० लज्जा, भीड, कमीपणा. २ मिटणें. ३ संक्षेप.
संकोचित-(सं) वि० संकुचित, थोडी.
संख्या-(सं) स्त्री० प्रमाण, मोजबात. [शेष.
संख्याविशेषण-(सं) न० व्याकरणसंज्ञावि-
संग्रह-(सं) पु० संचय, साठा.
संग्रहणी-(सं) स्त्री० रोगविशेष, आंव.
संग्राम-(सं) पु० लढाई, युद्ध.
संग-(सं) पु० स्नेह, सोबत. २ मैथुन.
संगत-ति-(सं) स्त्री० संग. २ जुळणी. ३ सोबती, स्नेही.
संगनमत-न० संकेत, विचार. [संयोग.
संगम-(सं) पु० दोन प्रवाहांचें एकीकरण,
संगमरवर-(सं) पु० अरसपाण, एक जातीचा पांढरा दगड.
संगीत-(सं) न० गायन.
संगीन-वि० मजबुत, धक्कें, जंगी.
संगोपन-(सं) न० संरक्षण, पालन.
संघ-(सं) पु० समुदाय, जमाव.
संघट्टण-न-न० मित्रत्व, स्नेह.
संच-पु० जमाव, बंद. २ सामग्री.
संचय-(सं) पु० सांठवण-णें, सांठा, संग्रह
संचरणें-अ० अंगात शिरणें, सुरू होणें २ फिरणें.
संचार-(सं) पु० फेरी, फिरणें, सहल.
संचित-(सं) वि० सांचलेलें, साठ्याचें.
संज्ञा-(सं) स्त्री० विशेष नांव, खूण.
संजाप-फ-पु० घेरा, कड, मगजी.
संजीवनी-(सं) वि० मृतास जिवंत करणारी.
संडास-पु० शेत-पायखाना, शौचकूप.
संत-(सं) पु० साधु, सिद्ध, महंत.
संतति-(सं) स्त्री० संतान, वारस.
संतर्पण-(सं) न० अन्नदान, भोजन देणें.
संतापणें-अ० रागावणें, कातावणें.
संतुष्ट-(सं) वि० राजीखुषी, आनंदी.
संतोष-(सं) पु० हर्ष, आनंद, आल्हाद.
संतोषी-(सं) वि० आनंदी, राजी.
संथ-(सं) वि० मंद, सावकाश चालणारा.
संथा-(सं) स्त्री० थोडथोडा धडा-पाठ.
संदर्भ-(सं) पु० संबंध, संधान.
संदिग्ध-(सं) वि० संशयाचें, अस्पष्ट.
संदूक-(फा) स्त्री० पेटी, पेटारा.
संदेसा-पु० निरोप, संदेश.
संदेह-(सं) पु० संशय, शंका, भ्रम.
संध्या-(सं) स्त्री० ब्रम्हकर्मविशेष. [लाग-ट.
संधान-(सं) न० लक्ष्य, रोंख.२ बग, वशीला.
संधि-(सं) पु० सांधा, जोड. २ दोन वर्णांचें एकीकरण. ३ समेट.
संधिवात-वायु-(सं) पु० रोगविशेष.
संप्रदान-(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष.
संप्रदाय-(सं) पु० रीत, चाल, रूढी.
संप-(सं) पु० ऐक्य, कट, जमाव. [माप्ति.
संपणें-अ० नाहींसें होणें, पूर्ण होणें, स-

संपत्-त्ति- } (सं) स्त्री० द्रव्य, पैसा,
संपदा- } लक्ष्मी.
संपत्तिमान-(सं) वि० श्रीमान, तालेवार.
संपन्न-(सं) वि० युक्त, सहित. २ श्रीमान्, आढ्य.
संपर्क-(सं) पु० संबंध, प्रसंग.
संपविणें-(सं) वि० समाप्त करणें.
संपादणें-स० मिळविणें, प्राप्ति करून घेणें.
संपादणी-स्त्री० बतावणी.
संपादन-(सं) न० प्राप्ति, मिळविणें, अर्जन.
संपूर्ण-(सं) वि० सर्व, सगळें. [ नातें.
संबंध-(सं) पु० संपर्क, प्रसंग, आप्तपणा,
संबंधी-(सं) वि०नातेवाईक, आप्त. [विशेष.
संबधीसर्वनाम-(सं) न० व्याकरणसंज्ञा-
संबळ-पु० चर्मवाद्यविशेष, समेळ.
संबळी-स्त्री० वेत-वेश इत्यादींचें पात्र, सांगशी, पेटी, डबा.
संबोधन-(सं) न० व्याकरणसंज्ञाविशेष.
संभव-(सं) पु० आदमास, होण्याची आशा.
संभवणें-अ० संभव असणें-होणें.
संभवनीय-(सं) वि० होण्यायोग्य. [क्षणा.
संभावना-(सं) स्त्री० बोळवण, बिदागी, द-
संभाषण-(सं) न० भाषण, बोलणें.
संभाळ-सांभाळ-पु० संरक्षण,पालन,पोषण.
संभाळणें-अ० जपणें, रक्षणें. २ बाळगणें.
संभोग-(सं) पु० मैथुन, कामशांति.
संयुक्त-(सं) वि० जोडलेला, जुळलेला.
संयोग-(सं) पु० योग, सांधा, संधि.[भूमि.
संयोगीभूमि-स्त्री० दोन भूप्रदेश जोडणारी
संरक्षक-(सं) वि० रक्षक, रखवालदार.
संरक्षणें-(सं) न० रक्षणें, राखणें, बाळगणें.
संवगडा-डी-पु० सोबती, खेळगडी.
संवत्-(सं) पु० संवत्सर, वर्ष, साल.
संवय-सवय-स्त्री० सहवास, आदत, लक-ब. रिवाज
संवाद-(सं) पु० वादाविवाद, प्रश्नोत्तर.
संशय-(सं) पु० संदेह, शंका, शक, अंदेशा, फेर, फरक.
संशयखोर-वि० संशयी, शंकेखोर.
संस्कृत-(सं) वि० चांगली केलेली. २ न० गीर्वाण-देवभाषा.
संस्था-(सं) स्त्री० स्थान, सभा. २ स्थापन.
संस्थान-(सं) न० रजवाडा,लहान राजधानी.
संस्थानिक-(सं) पु० जहागिरदार, लहान राजा, रजवाडा.
संस्थापणें-(सं) स० स्थापणें, थापणें.
संसर्ग-(सं) पु० संबंध, विटाळ,स्पर्श. [पंच.
संसार-(सं) पु०भव, इहलोकचा व्यापार, प्र-
संसारी-(सं) पु० गृहस्थ, प्रापंचिक.
संसृति-पु० प्रपंच, संसार.
संहार-(सं) पु० नाश-स, लय.
संहारक-(सं) वि० मारणारा,मारक,नाशक.
संहारणें-अ० ठार मारणें, नाश करणें.

## ह.

ह-तेहतिसावें व्यंजन: विसर्गाच्या बदली ह्याचा उपयोग क्वचित् होतो.
ऱ्हस्व-(सं) वि० लघु, लहान, आंखूड.
ऱ्हास-(सं) पु० अपकर्ष, प्रतिकूळकाळ.
हक्क-(आ) पु० संबंध, वारसा, मालकी.
हक्कदार-(फा) सा० वारस, धनी.
हक्कमाल-वि० हक्क असलेला.
हकाटणें-अ० ( हाकाटणें पहा. )
हकारणें-स० } हांकणें, हाकालणें.
हकालणें- }
हकिकत-(आ) स्त्री० खबर,बातमी,वर्तमान.
हकीम-(आ) पु० वैद्य, औषधांचा ज्ञाता.
हग-(सं) पु० मल, गू.

**हगणें**–अ० शौचास–परसाकडेस बसणें.
**हगंदरी**–स्त्री० हगण्याची जागा.
**हगमूत**–न० हगणेंमुतणें.
**हगरा**–वि० हगणारा, गळणारा, हगिरडा.
**हगरी**–स्त्री० ज्यांतून मल शौचकूपांत पडतो ते छिद्र असलेला दगड व तें छिद्र.
**हगवण**–स्त्री० हगण्याचा रोग, आमांश.
**हजबी**–स्त्री० दुहेरी पिशवी.
**हजाम**–(आ) पु० नाहवी, नापित.
**हजामत**–(आ) स्त्री० स्मश्रु, वपन.
**हजार**–(फा) वि० सहस्र, १०००.
**हजारा**–(फा) पु० सोंगट्याच्या खेळांतील एक संज्ञा. २ पुष्कळ धारा निघण्याजोगें कारंजें वगैरेस लावण्याचें तोंड.
**हट्ट**–(सं) पु० आग्रह, नाद. २ बाजार.
**हट्टी**–वि० नादी, आग्रही.
**हट**–(सं) पु० ( हट्ट पहा. )
**हटकणें**–स० अडथळा–हरकत करणें.
**हटकून**–क्रि० मुद्दाम, बळेंनें, अवश्य.
**हटणें**–अ० मागें घेणें–सरणें.
**हटवाद**–वि० आग्रह.
**हटवादी**–(सं) वि० आग्रही.
**हटविणें**–स०बंद करणें,थांबवणें,मागें सारणें.
**हटी**–स्त्री० टोळी. २ लहान मेळा–बाजार.
**हड्डी**–स्त्री० हाड, अस्थि.
**हडकणें**–अ० वाळणें, सुकणें.
**हडप**–स्त्री० मोबदला ठेविलेला वस्त्रपात्रादि [पदार्थ.
**हडपणें**–अ० झाडणें.
**हडपा**–पु० पंखा, विंझणा. २ पेटारा.
**हडसूनखडसून**–क्रि० बजावून.
**हडळ**–स्त्री० जखीण, स्त्रीसैतान.
**हडूक**–न० अस्थि, हाड, हड्डी.
**हणणें**–(सं) अ० ठार मारणें. २ न० हनन, मार.
**हत्ती**–(सं) पु० हस्ति, गज.
**हत्तीण**–(सं) स्त्री० ( मादी ) हत्ती.
**हत्या**–(सं) स्त्री० हिंसा, ठार मारणें. २ ठार मारण्याचा दोष.
**हत्यार**–न० शस्त्र. २ अवजार, साधन.
**हत्यारबंद**–वि० शस्त्रासह.
**हत**–(सं) वि० गेलेलें. २ मारलेलें.
**हतदैव**–(सं) वि० दुर्दैवी, कमनशीबी.
**हतवीर्य**–(सं) वि० दुर्बळ, नामर्द.
**हताश**–(सं) वि० निराश.
**हतोडा–डी**–पु० स्त्री० लहान घण.
**हद्द**–(आ) स्त्री० सीमा, मर्यादा.
**हदरणें**–अ० हलणें.
**हनन**–(सं) न० मारणें, हत्या.
**हनवटी**–(सं) स्त्री० हनु, अनवटी.
**हप्ता**–(फा) पु० सप्ताह, आठवडा. २ फेडीचा मुदतवार देण्याचा अंश.
**हपका**–पु० शिंतोडा, छाटा.
**हप–बशी**–(आ) पु० सिद्दी, शिद्दी.
**हबकणें**–अ० चुबकणें, धुणें, हापटणें.
**हबका**–पु० धक्का.
**हबेलंडी**–स्त्री० घाबरगुंडी.
**हमखास–स्त**–(आ) क्रि० राजरोस, उघड.
**हमजात**–स्त्री० सजातीय.
**हमरातुमरी**–स्त्री० भांडाभांडी, अरेतुरे.
**हमामखाना**–(फा) पु० स्नान करण्याचें ठिकाण, न्हाणी.
**हमामा**–पु० एक खेळ.
**हमाल**–(आ) पु० स्त्री० ओझेवाला, मजूर.
**हमाली**–(आ) स्त्री० ओझेंवाल्याचा धंदा. २ ओझें वाहण्याबद्दलची मजूरी.
**हमी**–(आ) स्त्री० जिम्मा, जामिनकी.
**हय**–(सं) पु० अश्व, घोडा.
**हयगय**–स्त्री० हलगर्जीपणा, हेळसांड.
**हयवान**–(आ) न० जनावर. २ वि० अशक्त, दुर्बळ.
**हया**–(आ) स्त्री० लज्जा, शरम.

